*With Best Compliments*

***From***

**His Highness Raja Shrimant**

**SIR RAGHUNATHRAO *Alias* BABASAHEB PANDIT,**

**Pant Sachiv, K. C. I. E.,**

***RAJA OF BHOR***

राजा

# श्रीमंत रघुनाथराव पंडित पंतसचिव

## राजेसाहेब संस्थान भोर

# यांचें चरित्र

खंड २ रा

लेखक :

**वासुदेव नारायण जोशी**

( माजी शाळाधिकारी, भोर स्टेट )

१९३९

# अनुक्रमणिका

## खंड २ रा

# चित्रानुक्रमणिका

## खंड २ रा

चित्रांक ७०



राजा श्रीमंत रघुनाथराव बाबासाहेब पंडित पंत सचिव, ( श्रीमंतांचा गादीवर आल्यावेळचा फोटो ).

[ सं. पा. ३९४

## प्रकरण १ लें

# प्रास्ताविक

श्रीमंत बाबासाहेब गादीवर येईपर्यंत त्याचा जीवनवृत्तान्त पहिल्या भागात देण्यात आला आहे.

दुसऱ्या भागास सुरुवात करण्यापूर्वी श्रीमंत राजेसाहेब गादीवर आले त्या वेळीं संस्थानची राजकीय परिस्थिति कशी होती तें प्रथम देण्याचें योजिले आहे.

श्रीमंत रावसाहेबाचा राज्यकारभार एकतंत्री होता हें मागे सागण्यात आलेंच आहे. ही एकतंत्री राज्यकारभारपद्धति महायुद्ध सुरू होईपर्यंत सुरळीत चालली होती असे म्हणण्यास हरकत नाहीं. हिर्डा व जंगल या दोन बाबींसंबंधीं प्रजेंत असंतोष होता व मधून मधून तो जरी डोकें वर काढीत होता तरी तो लवकरच नाहीसा करण्यात येत असे व प्रजेत शातता नादत आहे असाच श्रीमंत रावसाहेबाचा ग्रह होत असे. वास्तविक असंतोष नष्ट न होता तो धुमसत राहिला होता.

महायुद्ध सुरू झाल्यानंतर लवकरच महर्गतेचें उग्र स्वरूप प्रकट झाले. त्यामुळे ब्रिटिश इंडियात नोकर लोकाचे पगारात भराभर वाढ होत चालली. संस्थानी नोकराचे पगार अगोदरच कमी, त्यांत महर्गता; यांमुळें त्याचे हाल होऊं लागले. तेव्हा त्यांच्यात असंतोष उत्पन्न होऊन पगारवाढीबद्दल त्यांच्या तक्रारी सुरू झाल्या. श्रीमंत रावसाहेबाचा स्वभाव काटकसरी असल्या-मुळें जसजशी महागाई होत चालली तसतशी त्यांची प्रत्येक गोष्टींत काटकसर वाढतच चालली. यामुळें राज्यकारभारात फारच ढिलाई उत्पन्न होत चालली.

मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर सर्व हिंदुस्थानात नवीन विचाराचे वारे वाहण्यास सुरुवात होऊन स्वातंत्र्याच्या लाटा उसळूं लागल्या. त्यांचा परिणाम संस्थानावरहि झाल्यावाचून राहिला नाही. राज्यकारभारात आपला हात असला पाहिजे ही कल्पना पूर्वी संस्थानच्या प्रजेच्या मनात नव्हती, ती आता उदय पावूं लागली होती.

परंतु सन १९२० सालच्या जून महिन्यापासून पुण्यातील लोकसंग्रह वर्तमानपत्रातून प्रथम भोर संस्थानच्या राज्यकारभारपद्धतीवर कडक टीका

येण्यास सुरुवात झाली. हे लेख प्रजेत असंतोष पसरवून नवविचार जागृत करण्यास कारणीभूत झाले. याच वेळीं टिळकयुग संपून गांधीयुगास सुरुवात झाली व लोकाना अपरिचित असलेली असहकाराची व करबंदीची भाषा सर्व देशभर प्रसार पावूं लागली. संस्थानच्या प्रजेंतहि त्या भाषेचा शिरकाव होण्यास सुरुवात झाली. आजपर्यंत प्रजा मूक होती ती गाधी-चळवळीमुळें बोलकी होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं.

संस्थानांतील सुधागड तालुक्यातील कांहीं विद्वान् मंडळींनीं मुंबईस ता. २९ ऑगस्ट १९२० सालीं एक सभा भरवून प्रजेंत जागृति उत्पन्न करण्या-करितां त्याच सालच्या नाताळांत पाली येथें सुधागड तालुक्याचें प्रथमाधिवेशन भरविण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें पुण्यातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत एल्. जे. आपटे याच्या अध्यक्षतेखालीं सदर अधिवेशन भरविलें गेलें. सनदशीर मार्गानें आपल्या योग्य तक्रारींची दाद लावून घेण्याचें जरी या सभेंत ठरलें होतें तरी कांहीं जहाल वक्त्यांनीं, प्रजेची मनें प्रक्षुब्ध करण्याच्या हेतूनें बेजबाबदारीचीं व संस्थानाधिपतींविषयीं अप्रीति उत्पन्न करणारीं भाषणे केलींच.

याच वेळीं शिरवळ येथेंहि तेथील पुढाऱ्यानीं आपलीं गाऱ्हाणीं सरकाराच्या कानांवर घालण्याकरिता सभा भरवून काहीं ठराव पास केले व श्रीमंत रावसाहेब सन १९२१ च्या जानेवारींत तेथें जमाबंदीकरितां गेले असता त्याच्याकडे ते ठराव पाठविले, व ठरावाची अंमलबजावणी न झाली तर असहकार व साराबंदी करावी असे लोकाना प्रोत्साहन दिलें.

श्रीमंत रावसाहेब गादीवर आल्यापासून सन १९२० पर्यंत शाततेनें राज्यकारभार करण्यात त्याचे दिवस गेले. वृद्धापकाळीं या नवीन निर्माण झालेल्या परिस्थितीस तोंड देण्याचा त्याना प्रसंग आला. राज्यकारभारात प्रजेचा हात असावा ही कल्पनाच त्याना चमत्कारिक वाटूं लागली. ते म्हणत, " पूर्वीं टिळकाची लाट आली होती तशी आता गाधींची लाट आली आहे. पूर्वीच्या लाटेप्रमाणें हीहि लाट निघून जाईल." परंतु येणारी प्रत्येक लाट आपलें कार्य केल्याशिवाय परत जात नाहीं ही गोष्ट त्यांच्या लक्षात आली नाहीं. सन १९२० सालीं संस्थानात उत्पन्न झालेल्या लाटेनें श्रीमंत रावसाहेबांच्या मनास धक्के देण्यास सुरुवात केली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ता. २७-२८ मार्च सन १९२१ इ. रोजीं विचित्रगड तालुक्यातील पुढाऱ्यांनीं आपल्या तालुक्याचें पहिले अधिवेशन शिरवळ नजीकच्या ब्रिटिश हद्दींत भरवून संस्थानच्या राज्यकारभारावर टीकेचा भडिमार केला.

सरकारच्या धोरणावर केलेली कडक टीका ऐकून घेण्याची श्रीमंत रावसाहेबाना कधींच संवय नव्हती. म्हणून पाली व शिरवळ येथें सभा होऊन जे प्रकार घडले तसे पुन्हा घडूं नयेत म्हणून सागली संस्थानप्रमाणें भोर संस्थानात त्यानीं ता. २३ जून सन १९२१ रोजीं सभाबंदीचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यात आगाऊ परवानगी घेतल्याशिवाय व कोण काय बोलणार त्याचीं टिपणें दिल्याशिवाय सभा भरविण्यास प्रतिबंध करण्यात आला होता. याचा परिणाम आघात झाला कीं प्रत्याघात या नियमाप्रमाणेंच झाला.

संस्थानी प्रजेच्या हक्कसंरक्षणार्थ पुण्यांतील पुढाऱ्यांनीं दक्षिणी-संस्थान-हितवर्धक सभा स्थापन करण्याचे ठरविले व त्याकरिता दक्षिणी संस्थानातील प्रजापरिषदेचे अधिवेशन पुणें येथें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात ता. २४ व २५ मे सन १९२१ रोजीं भरविले. सदर परिषदेस निरनिराळ्या संस्थानातून सुमारें १५० प्रतिनिधी हजर होते. परिषदेच्या सेक्रेटरींत श्रीयुत तात्यासाहेब केळकर हे एक असून त्यानीं जमलेल्या प्रतिनिधींचें स्वागत करून संस्थेचे हेतू समजावून दिले. नंतर याच अधिवेशनात दक्षिणी-संस्थान-हितवर्धक सभेची स्थापना झाली. या सभेचा पाठिंबा मिळाल्यामुळे संस्थानातील पुढाऱ्याना चळवळ करण्यास उत्तेजन मिळालें.

भोर संस्थानात सभाबंदीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यावर ता. २७ जून १९२१ रोजीं पुणें येथें सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीत श्रीयुत नारायण मल्हार जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं सभाबंदीच्या कायद्याचा निषेध करण्याकरितां भोर संस्थानातील पुढाऱ्यानीं सभा भरविली व सदर कायद्याचा तीव्र निषेध केला.

सन १९२१ च्या जून महिन्यात पुणें येथें सभाबंदीच्या जाहीरनाम्याच्या निषेधाची सभा झाल्यानंतर भोर संस्थानातच चळवळ सुरू ठेवण्याच्या हेतूनें संस्थानातील काहीं पुढाऱ्यांनीं पुण्यातील श्रीयुत तात्यासाहेब केळकर, वामनरावजी पटवर्धन वगैरेसारख्या लोकप्रिय पुढाऱ्याच्यापुढें आपली बाजू

मांडून संस्थानांत सुधारणा घडवून आणण्याच्या कामीं मदत करण्याबद्दल त्यांचीं मनें वळविलीं, व त्याच्या नेतृत्वाखालीं संस्थानांत ठिकठिकाणीं संस्थानलगतच्या ब्रिटिश हद्दींत सभा भरवून संस्थानी प्रजेंत जागृति उत्पन्न करून लोकशाहीच्या तत्त्वाचें बीजारोपण करण्याचें ठरविलें. पुण्यांतील पुढाऱ्यानीं संस्थानी पुढाऱ्यांच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून त्याना पाठिंबा देण्याचें कबूल केलें. पुढें ऑक्टोबरच्या १२ तारखेस शिरवळ येथें नीरा नदीच्या काठीं ब्रिटिश हद्दींत सभा भरविण्यांत आली. या सभेस पुण्यातील श्रीयुत तात्यासाहेब केळकर, वामनरावजी पटवर्धन, गुंजाळ, कोठारी वगैरे मंडळी हजर होती, व त्यांनीं जमलेल्या मंडळींस जगांत चाललेल्या घडामोडींची माहिती दिली. सर्वांच्या भाषणाचा आशय एकच होता. तो म्हणजे राजा आणि प्रजा, शासित आणि शास्ते, नोकरशाही आणि लोकशाही यांचे परस्परसंबंध कसे असावेत व हल्लीं ते कसे आहेत या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाचा त्या वेळीं जगात सर्वत्र कसा विचार चालू आहे हा होय. शिवाय मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांतील संस्थानिकासंबंधीं असलेली माहितीहि देण्यात आली. शिरवळ येथें सभा झाल्यानंतर दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. १३ रोजीं ती सर्व मंडळी भोरास आली व भोरपासून दीड-दोन मैलावर असलेल्या भाटघर येथें ब्रिटिश हद्दींत सभा भरविण्याचें ठरले होतें. परंतु खुद्द भोरला येऊन दडपशाहीच्या भीतीनें केवळ सभेकरिता भोर सोडून दोन मैल लाब ब्रिटिश हद्दींत जावे लागणें हें कोणासहि भूषणास्पद नाहीं; म्हणून शहरांतच परवानगी काढून सभा भरविण्याचें ठरविलें, व त्याप्रमाणें संस्थानी पुढाऱ्यानीं अधिकाऱ्यांच्या मुलाखती घेऊन सभेस परवानगी देण्याबद्दल विनंति केली. कायद्याप्रमाणें आगाऊ परवानगी न घेतल्यामुळें सभा भरविण्यास परवानगी देण्यात आली नाहीं. त्या वेळीं श्रीयुत नानासाहेब धायगुडे हे कारभारी असून कै. लक्ष्मणराव जोगळेकर हे दुय्यम कारभारी होते. त्यानीं श्रीमंत रावसाहेबाच्या सांगण्याप्रमाणें आगाऊ परवानगी न घेतल्यामुळें भोर येथें सभा भरविण्यास परवानगी मिळणार नाहीं असा आग्रह धरला; तेव्हा तडजोड करण्यांत हातखंडा असलेले श्रीयुत तात्यासाहेब केळकर यानीं पुण्यातील पाहुणे मंडळींतर्फे अशी विनंति केली कीं, वाटेल तर आजची सभा तहकूब करून आम्ही परत जातों.

पुढें एखादे वेळीं जाहीरनाम्यांतील शर्तीप्रमाणें आगाऊ ८ दिवसाऐवजीं १५ दिवसांची परवानगी मागूं व जाहीरनाम्यातील सर्व शर्ती पाळूं; पण पुढें तरी सभेस परवानगी देण्याचें आश्वासन द्यावे. म्हणजे सभाबंदीच्या जाहीरनाम्याचा योग्य मान राखला जाऊन संस्थानांत सभा भरविण्याच्या आमच्या तत्त्वाला मान दिल्यासारखें होईल व अशा परस्पर बहुमानास्पद रीतीनें या प्रश्नाचा निकाल लागेल. श्रीयुत तात्यासाहेब केळकर याची ही विनंति अयोग्य होती असें कोणीहि म्हणणार नाहीं. पण ती फेटाळण्यांत आली. तेव्हा त्यानीं अखेरची विनंति अशी केलीं कीं, सरकार लिहून देतील तेवढाच मजकूर आम्ही वाचून दाखवूं; जास्त बोलणार नाहीं. पण सभा न भरविता जर आम्हीं गेलों तर 'थप्पड खाऊन परत आले' अशी आमची सर्वत्र निर्भर्त्सना होऊन आमची नाचक्की होईल. याकरितां सभेला आज परवानगी द्यावी. पुन्हा आम्ही सरकारच्या संमतीशिवाय येथें येणार नाहीं. अशा प्रकारची कळकळीची विनंति त्यांनीं केली. त्या वेळीं ब्रिटिश सरकारांत करड्या अंमलाबद्दल ख्याति असलेल्या जोगळेकरांनाहि केळकराचें म्हणणें पटून त्यांनींहि श्रीयुत केळकरानीं सुचविलेल्या अटींवर परवानगी द्यावी अशी श्रीमंत रावसाहेबाना सल्ला दिली. परंतु त्या दिवशीं हट्टास पेटून श्रीमंत रावसाहेब यानीं कोणत्याहि अटीवर परवानगी देण्याचें नाकारले. परवानगी दिली नाही तर पुढें काय प्रसंग येईल याची त्यांना त्या वेळीं कल्पना आली नाही. सुप्रसिद्ध कवी भवभूतीनें म्हटले आहे :

प्रायः समापन्नविपत्तिकाले । धियोऽपि पुंसा मलिनीभवंति ।।

—उत्तररामचरितम् ।

विनाशकाल आला कीं, चागल्या माणसांच्याहि बुद्धीला भ्रम होतो हे कांहीं खोटें नाहीं. श्रीमंत रावसाहेबानी या वेळी जर परवानगी दिली असती तर पुढील अनर्थपरंपरा खास टळली असती. परंतु श्रीमंत रावसाहेबांना परवानगी देण्याची बुद्धि झाली नाहीं. श्रीयुत केळकरांसारख्या स्वाभिमानी गृहस्थांना सभा न भरविता परत जाणें अपमानास्पद वाटून जमलेल्या मंडळींनीं कायदेभंग करून त्या दिवशीं सायंकाळीं सभा भरविली. कायदेभंग केल्याबद्दल दरबारकडूनहि सर्व पुढाऱ्यावर खटले भरण्यांत आले. परंतु पुढें श्रीमंत

रावसाहेबानीं एकंदर परिस्थिति लक्षात घेऊन सर्व पुढाऱ्यास माफी देऊन त्याच्यावरील खटले काढून टाकण्यास मंजुरी दिली.

भोर येथें सभा झाल्यानंतर संस्थानच्या पांचहि तालुक्यातील प्रजाजनाच्या प्रतिनिधींनीं ता. १३ नोव्हेंबर रोजीं पुणें येथें सार्वजनिक सभेच्या दिवाण-खान्यांत सभा भरविली, व सनदशीर मार्गानें संस्थानात जागृति उत्पन्न करण्याकरिता ' भोर संस्थान प्रजापरिषद ' नावाची संस्था स्थापन केली व सदर परिषदेची पहिली बैठक प्रथम भोर येथेंच सन १९२२ सालच्या जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यांत भरविण्याचें ठरविलें.

पूर्वी ठरल्याप्रमाणें ' भोर संस्थान प्रजापरिषदे'नें दरबारची परवानगी घेऊन पहिली बैठक ता. २५-२६ जानेवारी सन १९२२ रोजीं भोर येथें भरविण्याचें निश्चित केले.

त्याप्रमाणें ता. २५-२६ जानेवारी रोजीं प्रजापरिषदेची बैठक श्रीयुत केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. अध्यक्ष जरी समतोल वृत्तीचे होते तरी सभेंत काहीं बेजबाबदार वक्त्यानीं प्रजेंत प्रक्षुब्ध वातावरण उत्पन्न करणारीं अशीं भाषणें केलींच. अध्यक्ष श्रीयुत केळकर याचें भाषण मात्र प्रजेला मार्गदर्शक होईल असेच होतें.

प्रजेलाहि केळकरांनीं असा इषारा दिला कीं, या चळवळी नव्या आहेत; तेव्हां त्या जपूनच चालविल्या पाहिजेत. हक्क क्रमाक्रमानें मिळणार असतील त्यास आपण कबूल झाले पाहिजे. बेताल बोलणें केव्हाहि वाईटच व संस्थानांत तर राजघराण्याचा मोठा आदर ठेवून व त्याचे पूर्व उपकार आठवून बेतानेच बोलणे प्रजेचे कर्तव्य आहे. संस्थानात ब्रिटिश राज्यव्यवस्थेवर टीका करण्याचें कारण नाहीं.

श्रीमंत पंतसाहेब याच्या अडचणी पूर्णपणें लक्षांत घेऊनच चळवळ चालविली पाहिजे, अशा प्रकारचा त्यानीं प्रजेच्या पुढाऱ्याना योग्य सल्ला दिला. या सल्ल्याप्रमाणें प्रजेचे पुढारी वागते तर शांतताभंग न होतां त्यांना पुष्कळ कार्य करून दाखवितां आलें असतें. परंतु असें न करता पुढें त्यानीं प्रजेची दिशाभूल करण्याचा प्रयत्न सुरू केला. परिषदेची ही बैठक झाल्यानंतर काहीं स्वयंमन्य पुढाऱ्यानीं गावोगाव हिंडून प्रजेंत गैरसमज पसरविला. त्यामुळें

मावळ भागांतील अशिक्षित, भावनावश, अडाणी मावळ्या लोकानीं शेतसारा भरण्याचें नाकारलें; सरकारी जंगले तोडण्यास सुरुवात केली; एक राउंडगार्ड पंचनामा करण्यास गेला असता त्याच्यावर हल्ला केला व त्याचे कपडे फाडले; एके ठिकाणीं शिरवळ तालुक्याच्या मॅजिस्ट्रेटचें वॉरंट बजाविण्यास दोन पोलिस गेले असतां तेथील काहीं लोकानीं तीं वॉरंटें त्याच्याजवळून हिसकावून घेऊन फाडून टाकिलीं व पोलिसाना हाकलून दिलें. याप्रमाणें कायद्याचा अंमल झुगारून देऊन बंडाळी माजविण्यास सुरुवात झाली.

संस्थानचें पोलिसखातें कार्यक्षम न ठेविल्यामुळे बिकट प्रसंगीं पोलिसाना बंदोबस्त करता येईना. याचा परिणाम असा झाला कीं, अराजक चळवळ करणाऱ्यांना असंतोष पसरविण्यास ही संधि चागली आहे असे वाटू लागले.

पोलिसखात्याप्रमाणें इतर खात्यातहि स्थिति होती. किरकोळ दंगेधोपेसुद्धा मोडण्याचें सामर्थ्य संस्थानात नसावे ही गोष्ट संस्थानच्या इभ्रतीस कमीपणा आणणारी होती. साराश, प्रजा असंतुष्ट, नोकरवर्ग नाखुष अशा प्रकारची स्थिति उत्पन्न झाली होती. ती उत्पन्न होण्याचे एकच कारण होतें; ते म्हणजे श्रीमंत रावसाहेबांच्या काटकसरीपणाचा अतिरेक हें होय. श्रीमंत रावसाहेबाच्या अंगीं अनेक बहुमोल व दुर्मिळ गुण असून केवळ अत्यंत काटकसरीपणाच्या एका दोषामुळे वरील परिस्थिति निर्माण झाली.

वरील परिस्थितीमुळें श्रीमंत रावसाहेबाचे अखेरचे दिवस अत्यंत त्रासात गेले. ते दिवंगत झाले त्या वेळी संस्थानचें वातावरण अत्यंत क्षुब्ध झालेले होते. अराजकता माजली होती. एकदा प्रजेस अनिष्ट वळण लागले म्हणजे तें नाहींसे होण्यास बराच त्रास पडतो. अशा स्थितींत श्रीमंत बाबासाहेबाच्या गळ्यात राज्यधुरा येऊन पडली. तेव्हा त्याचा मार्ग किती बिकट होता याची कोणालाहि सहज कल्पना करता येईल. तथापि श्रीमंत रावसाहेबाच्या काटकसरी स्वभावामुळे संस्थानची सापत्तिक स्थिति मात्र चागली होती. ही एका दृष्टीने श्रीमंत बाबासाहेब गादीवर आले त्या वेळीं अनुकूल गोष्ट होती.

## प्रकरण २ रें

# राज्यारोहणसमारंभ, मानपत्रें वगैरे

दीपाः स्थितं वस्तु विभावयन्ति ।
कुलप्रदीपास्तु भवन्ति केचित् ॥
चिरव्यतीतान्यपि पूर्वजान्ये ।
प्रकाशयन्ति स्वगुणप्रकर्षात् ॥
—सुभाषित रत्नभाण्डागार

नवे तस्मिन्महीपाले सर्वं नवमिवाभवत् ।
—रघुवंश

श्रीमंत रावसाहेब ता. १७ जुलै सन १९२२ इ. रोजीं सायंकाळीं ६ वाजता पुणें येथील वाड्यात दिवंगत झाले. दुसरे दिवशीं म्हणजे ता. १८ रोजीं श्रीमंत बाबासाहेबांनीं राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेतल्याचा जाहीरनामा भोर येथें प्रसिद्ध केला, तो मागे देण्यात आलाच आहे. त्या जाहीरनाम्यात "धार्मिक कृत्य संपल्यानंतर राज्यारोहणसमारंभ चालीप्रमाणें पुढें होणार आहे," असें त्यांनीं कळविले होतें. त्याप्रमाणे समारंभाकरिता ता. १८ ऑगस्ट १९२२ इ. हा दिवस त्यानी मुक्रर करून तो जाहीर केला.

श्री. रावसाहेब कैलासवासी झाल्याची बातमी कळल्यानंतर हिंदुस्थानचे बादशहा पंचम जॉर्ज, व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग, मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड, मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन, संस्थानिक बंधू, आप्त, इष्टमित्र व हितचिंतक याचेकडून श्रीमंत बाबासाहेबाना दुखवट्याचे संदेश, तारा व पत्रे आलीं. हिंदुस्थानचे बादशहा यांचेकडून मुंबई सरकार याचेमार्फत जो संदेश आला तो पुढें दिला आहे.

Office of the Political Agent,
Poona, 2nd August 1922.

To

Raghunathrao Shankarrao alias Babasaheb Pandit
Pant Sachiv, Chief of Bhor.

Dear Pant Saheb,

I am requested by Government to convey to yourself and your family the sincere sympathy of His Majesty the King

Emperor in the bereavement sustained by you through the death of His late Highness, your lamented father.

Your sincere friend,
W. F. Hudson.

श्रीमंत बाबासाहेब अशौचात असतानाच सांगली संस्थानचे अधिपति श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन ता. २९ जुलै रोजीं श्रीमंत बाबासाहेबांच्या समाचाराकरिता भोरास येऊन श्रीमंताचें सांत्वन करून त्याच दिवशीं परत गेले.

श्रीमंत रावसाहेबाचें उत्तर कार्य यथासांग आटोपल्यानंतर श्रीमंत बाबासाहेब ता. ४ ऑगस्ट रोजीं पुण्यास गेले. तेथें त्याना मुंबई सरकारचें ता. ३ ऑगस्टचें पत्र मिळालें. त्यांत दक्षिणेंतील फर्स्टक्लास सरदार म्हणून जे हक्क श्रीमंत रावसाहेबाना होते ते हक्क श्रीमंत बाबासाहेबाना देण्यात येऊन त्याचें नांव फर्स्टक्लास सरदाराच्या यादींत दाखल केल्याचें लिहिलें आहे. तें पत्र खालीं दिलें आहे.

No. 294 T

Political Department,
Secretariat, Fort, Bombay.
Bombay, 3rd August 1922.

From

A. F. Kindersley, Esqr.
Acting Secretary to Government of Bombay,
Political Department, Bombay.

To

Meherban Raghunathrao Shankarrao alias
Babasaheb Pant Sachiv, Chief of Bhor,
Sachiv Wada, Shukruwar Peth, Poona.

Sir,

I have the honour to inform you that H.E. the Governor-in-Council has been pleased to direct that the privileges of a First Class Sardar of the Deccan enjoyed by your late father

should be continued and that your name should be enrolled in the list of First Class Sardars.

I have the honour to be,
Sir,
Your most obedient servant,
A. F. Kindersley,
Ag. Secretary to Government of Bombay,
Political Department.

पुण्यास गेल्यावर ता. ५ ऑगस्ट रोजीं श्रीमंत बाबासाहेब पोलिटिकल एजंट यांच्या भेटीस गेले, त्या वेळीं त्यांना पोलिसपार्टीची सलामी देण्यांत येऊन पोलिटिकल एजंट यानीं त्यांचें बहुमानपूर्वक पानसुपारी, हार अर्पण करून स्वागत केलें.

ता. ७ ऑगस्ट रोजीं श्रीमंत बाबासाहेब संस्थानाधिपति या नात्यानें प्रथमच गव्हर्मेंट हाउसमध्यें गव्हर्नरसाहेबांच्या भेटीस गेले. त्या वेळीं गव्हर्नर-साहेबांनींहि त्याना योग्य तो मान देऊन त्याचें स्वागत केले. पुढें ता. ८ माहे ऑगस्ट रोजीं गव्हर्नरसाहेबानीं सरदारांचा दरबार भरविला. त्या दरबारास निमंत्रणावरून श्रीमंत बाबासाहेब गेले. फर्स्टक्लास सरदार या नात्यानें श्रीमंत बाबासाहेब या दरबारात प्रथमच हजर होते. या दरबारांत गव्हर्नरसाहेबानीं श्रीमंत बाबासाहेबांना ४।। वस्त्रें दिलीं. या प्रसंगीं गव्हर्नरसाहेबानीं जें भाषण केले त्यांत श्रीमंत रावसाहेबाच्या दीर्घकालीन कारकीर्दीचा गौरवपर उल्लेख करून श्रीमंत बाबासाहेबाच्या अंगच्या कर्तृत्वशक्तीचा उल्लेख केला व त्याच्या कारकीर्दींत संस्थानची सर्वांगीण उन्नति झाल्यावाचून राहणार नाहीं अशी खात्री असल्याचें आपले मत व्यक्त केलें.

श्रीमंत बाबासाहेबांचा मुक्काम पुण्यात असतांनाच औंध संस्थानचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि श्रीमंत बाबासाहेबाच्या भेटीस आले होते. पुण्यातील कार्यक्रम आटोपल्यानंतर श्रीमंत बाबासाहेब ता. १८ ऑगस्ट रोजीं होणाऱ्या राज्यारोहणसमारंभाकरिता भोरास आले. समारंभाच्या दिवशीं सकाळींच त्याना संस्थानचीं अधिकारसूत्रें हातीं घेतल्याबद्दल मुंबई सरकारचें रीतसर मान्यतेचें पत्र पोलिटिकल एजंटमार्फत आलें तें पुढें दिलें आहे.

No. P. P./P. S./197

From

W. F. Hudson, Esqr., I. C. S., C. I. E.,
Political Agent, Poona.

To

Shrimant Raghunathrao Shankarrao alias
Babasaheb Pandit Pant Sachiv, Chief of Bhor.

Poona, 17th Aug 1922.

Subject : Bhor Succession.

My friend,

I am directed by Government to inform you that H. E. the Governor has been pleased to recognise you as the Chief of Bhor State in succession to His late Highness Shankarrao Pandit Pant Sachiv.

Your sincere friend,
W. F. Hudson,
Political Agent, Poona.

राज्यारोहणाकरितां ठरविलेला दिवस केव्हां उजाडतो याकडे सर्व प्रजाजनाचें लक्ष वेधून राहिलें. राज्यकारभाराची जुनी पद्धत जाऊन नवयुगास प्रारंभ होणार म्हणून सर्वांच्या अंतःकरणांत आनंदाच्या ऊर्मी उसळत होत्या. राज्यारोहणसमारंभात प्रत्यक्ष भाग घेण्याचें भाग्य संस्थानच्या प्रजेस ५० वर्षांनीं लाभलें होतें. यामुळे हा समारंभ अपूर्व होणार असें सर्वांना वाटत होतें व त्याप्रमाणें तो झालाहि. श्रीमंत बाबासाहेब युवराज असताना त्यानीं पुष्कळ संस्थांशीं संबंध ठेविला होता व पुष्कळ लोकाचा परिचय करून घेतला होता, हें मागें सागण्यांत आलेंच आहे. त्यानीं या समारंभास यावें असें श्रीमंत बाबासाहेबास साहजिकच वाटत होतें. म्हणून राज्यारोहणसमारंभाकरिता त्यानीं संस्थानिक बंधू, आप्त, इष्टमित्र, अनेक संस्थानचे चालक यांना, त्याचप्रमाणें संस्थानांतील प्रतिष्ठित प्रजाजन यांसहि निमंत्रण केले होतें.

या समारंभाकरितां जमणाऱ्या मंडळींची कोणत्याहि प्रकारें गैरसोय होऊं नये, त्याच्या आदरातिथ्यांत यत्किंचितहि न्यूनता पडूं नये म्हणून श्रीमंत बाबासाहेबांनीं फारच दक्षता ठेवली होती. त्यांनीं त्या वेळचे कारभारी रा. रा. धायगुडे यांच्या अध्यक्षतेखालीं एक समारंभ-कमिटी नेमून त्या कमिटीकडे सर्व व्यवस्था सोंपविली होती. या कमिटीनें पोट-कमिट्या नेमून त्यांच्याकडे

निरनिराळीं कामें दिलीं होतीं. प्रत्येक गोष्टींत हुजूर मंजुरीची जरुरी ठेविली नव्हती. पाहुण्यांची उतरण्याची सोय ठिकठिकाणीं केली होती.

श्रीमंत रावसाहेबांच्या वेळीं स्वागतसमारंभांतील ज्या उणीवा त्याचे दृष्टोत्पत्तीस आल्या होत्या त्या त्यांनीं दूर करून पाहुण्याची यत्किंचितहि गैरसोय होऊं नये अशा प्रकारची त्यानीं व्यवस्था ठेविली. एक दोन दिवसा-करिता आलेला पाहुणा अनेक प्रकारच्या कार्यक्रमात गुंतलेला असल्यामुळे त्याचें बारीक सारीक गोष्टींकडे जरी लक्ष जात नसले व थोडी अव्यवस्था झाली व ती त्याच्या ध्यानांत येण्यासारखी नसली तरी, हलगर्जीपणा करून वेळ निभावून नेणें ही आदरसत्कार करणारास कमीपणाची गोष्ट असून ती त्याच्या अंतःकरणातील खरा प्रेमादरभावनिदर्शक नाहीं असें श्रीमंत बाबासाहेब नेहमीं म्हणत असतात, व ते आपल्या नोकराना बजावून सांगत असतात की, ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें व्यवस्था ठेवण्यांत जर अंगचोरपणा व कसूर दिसून आली तर आम्हाला कधींहि खपावयाचें नाहीं. श्रीमंत बाबासाहेबाच्या या वृत्तीची आतां त्यांच्या नोकराना पूर्ण जाणीव झाली असल्यामुळें त्यांच्या हातून कोणाहि पाहुण्याचें आदरातिथ्य ठेवण्यांत बुद्धिपुरस्सर हलगर्जीपणा केल्याचें उदाहरण सहसा दृष्टीस पडत नाहीं. तसेंच कोणच्याहि समारंभाचे वेळीं सर्व नोकरवर्गांना व गांवांतील प्रतिष्ठित नागरिकाना हजर असण्याबद्दल निमंत्रण करण्यात येतें.

पूर्वी दरबारच्या वेळीं जो तो आपआपल्या आवडीप्रमाणें पोषाख करून येई. त्यामुळे एक प्रकारें बेडौलपणा येऊन समारंभाच्या शोभेंत गौणत्व येई. तेव्हा श्रीमंत बाबासाहेबानीं हें गौणत्व नाहींसें करण्याचें ठरवून एक ऑफिशिअल युनिफॉर्म ठरविला व सर्वांनीं त्या युनिफॉर्मप्रमाणें कोणत्याहि समारंभास हजर राहत जावें असें जाहीर केलें. युनिफॉर्ममध्यें, पांढरी तुमान, पांढरा अंगरखा, पगडी, बूट व उपरणें याचा समावेश केलेला आहे. या युनिफॉर्ममुळें सर्व दर्जांच्या नोकरांना पैशाचा फार भार न पडतां पोषाखात एकसूत्रीपणा येण्यास फार मदत झाली.

दरबाराकरिता लागणारें सामान पुरेसें नव्हतें. जें होतें तेंहि मोडकें तोडकें होतें. कोचें नादुरुस्त होतीं तीं दुरुस्त करून घेण्यांत आलीं. नवीन

चित्रांक ७१



श्री. सौ. लक्ष्मीबाई, राणीसाहेब.

[ सं. पा. ४२५

२०० बेटवुड खुर्च्या खरेदी कराव्या लागल्या. तसेच इतर बरेच नवीन सामान घेणें भाग पडलें. पूर्वीच्या कारकीर्दीत दरसाल नादुरुस्त सामान दुरुस्त करून कांहीं नवीन सामान खरेदी करण्याची वहिवाट नसल्यामुळें व आहे त्यातच भागवून वेळ निभावून नेण्याचें धोरण असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेब गादीवर आले तेव्हां पहिल्याच दरबाराकरितां सामानखरेदींत त्याना बराच पैसा खर्च करावा लागला; व कालमानाप्रमाणें तो खर्च अगदी आवश्यकच होता.

## राज्यारोहणसमारंभ

राज्यारोहणसमारंभाच्या पूर्वी ता. १४ रोजी श्रीमंत बाबासाहेब सह-कुटुंब अंबवडें येथें जाऊन संस्थानचे मूळ संस्थापक श्री. शंकराजी नारायण यांच्या समाधीचें व तेथील नागेश्वराचें दर्शन घेऊन आले.

राज्यारोहणसमारंभासाठीं निमंत्रित पाहुणेमंडळी येण्यास सुरुवात बुधवार ता. १६ पासूनच झाली. गुरुवार ता. १७ रोजीं सकाळीं १० वाजता राज्यारोहणानिमित्त धार्मिक विधि झाल्यावर दुपारीं ब्राह्मणभोजन झाले. भोजनोत्तर सुरूच्या दिवाणखान्यात छोटासा दरबार भरला होता. त्या दरबारात श्रीमंत बाबासाहेबाचेवर पूर्वरूढीप्रमाणें सोन्याचादीचीं फुलें उधळण्यांत आलीं. नंतर भोर व पुणें येथील काहीं विद्वान् शास्त्रीमंडळींनीं श्रीमंतांच्या गुणवर्णनपर श्लोक तयार करून आणिले होते ते त्यानीं वाचून दाखविल्यावर पानसुपारी होऊन दरबार बरखास्त झाला. रात्रीं निमंत्रित मंडळींसाठीं गाणें झालें.

शुक्रवार ता. १८ हा दरबारचा मुख्य दिवस होता. दरबारची वेळ दुपारीं १।। वाजतां जाहीर झाली होती. पोलिटिकल एजंट मि. डब्ल्यू. एफ्. हडसन्, मिसेस हडसन्, मि. सी. एच्. ब्रिस्टो वगैरे युरोपियन मंडळी सकाळीं १० वाजताच रामबागेंतील बंगल्यात येऊन दाखल झाली होती. तेथें श्रीमंत बाबासाहेब, श्रीमंत युवराज भाऊसाहेब व काहीं अधिकारी मंडळी त्याच्या स्वागतार्थ हजर होतो. साहेबांची व्यवस्था ठेवण्याचे काम कारभारी याचेकडे सोंपविलें होतें. दुपारीं एक वाजेपर्यंत पाहुणे मंडळींच्या मोटारी येत होत्या. दरबाराकरितां वाड्यातील श्रीराममंडप फारच उत्तम रीतीनें शृंगारला होता. त्या वेळपर्यंत श्रीरामनवमीशिवाय ह्या मंडपांत दरबार भरविण्यात येत नव्हता.

या वेळीं भोर येथें श्रीजगद्गुरु शंकराचार्य, मठ संकेश्वर, याचा मुक्काम चातुर्मासानिमित्त असून त्यांनीं कोटिलिंगार्चन केलें होतें. या मंगल प्रसंगीं त्याच्या आशीर्वादाचा लाभ श्रीमंत बाबासाहेबाना अनायासेच मिळण्याचा योग आला. श्रीराममंडपाच्या पश्चिम अंगच्या सोप्यांत श्रीरामनवमी-उत्सवात जेथें श्रीरामाची मूर्ति माडण्यात येते तेथें उच्चासनीं श्रीशंकराचार्यांची बसण्याची व्यवस्था केली होती. खालीं मंडपांत सुमारें २ फूट उंचीचा प्लॅटफॉर्म तयार करून त्यावर मध्यभागीं चांदीचा कोच व पुढें चांदीचें टेबल ठेवण्यात येऊन दोन्ही बाजूंस कोच मांडण्यांत आले होते. प्लॅटफॉर्मच्या खालीं उजव्या व डाव्या बाजूंस पहिली ओळ कोचाची व त्याच्या मागे खुर्च्या व बाके माडण्यात येऊन सुमारें ५०० मंडळी बसण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. शिवाय मंडपाच्या उत्तर दक्षिण सोप्यात जाजमें व सतरंज्या घालून तेथेंहि बसण्याची सोय होती. बायकाच्याकरिता सभोंवारच्या गॅलरींत व्यवस्था केलेली होती. दिवस पावसाळी असल्यामुळे मंडपाच्या सभोंवार पत्रे टाकिले होते. यामुळे थोडा उजेड कमी पडण्याचा संभव होता. याकरिता हंड्या, झुंबरें लावून मेणबत्त्याची उत्तम रोषणाई केली होती. त्या वेळीं विजेच्या दिव्याची सोय नव्हती. पण हंड्या-झुंबरांची शोभा व रोषणाई विजेच्या प्रकाशास नसते हें सागावयास पाहिजे असें नाहीं.

मे. पोलिटिकल एजंट यास भेटण्याकरिता श्रीमंत बाबासाहेब श्रीमंत युवराज भाऊसाहेबासह दुपारी २ वाजतां रामबागेत गेले. तेथे मे. पोलिटिकल एजंटसाहेबांनीं श्रीमंत बाबासाहेब व श्रीमंत युवराजसाहेब यास पानसुपारी, अत्तरगुलाब वगैरे देऊन पुष्पहार घातले. नंतर सर्व मंडळी रामबागेंतून निघून शहराबाहेर असलेल्या धर्मशाळेपर्यंत आली. तेथून मिरवणूक निघाली. श्रीमंत बाबासाहेब व श्रीमंत युवराज हत्तीवर अंबारींत बसले होते. त्यांचे मागें पोलिटिकल एजंट चार घोड्यांच्या गाडींत बसले होते. मिरवणुकीला भव्य स्वरूप आलें होतें. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस लोकाची अतोनात गर्दी होती. त्या दिवशीं शहरवासीयांच्या चित्तवृत्ती भांबावून गेल्यासारख्या दिसत होत्या. आपण अगदीं नवीन वातावरणांत वावरत आहोंत असें त्यांना वाटत होतें. श्रीमंतांच्या स्वाऱ्या अंबारींतून वाड्याच्या दरवाज्यापाशीं उतरल्या त्या वेळेस

चित्रांक ७२



राज्यारोहणाच्या वेळचा पोलिटिकल एजंट यांचेसह श्रीमंत बाबासाहेब व इतर मंडळींचा फोटो.

**खुर्चीची** रांगः—२ मि. सी. एच. ब्रिस्टो; ३ मिसेस् ब्रिस्टो; ४ मि. डब्ल्यू. एफ्. हडसन, पो. ए.; ५ श्रीमंत राजे बाबासाहेब; ६ मिसेस् हडसन; ७ श्रीमंत युवराज भाऊसाहेब; ८ श्रीमंत राजे शामराज; ९ सरदार बाळासाहेब विंचूरकर; १० सरदार बाळासाहेब नातू.

[ सं. पा. ४०३

Kharita from Government presented by the Political Agent, Poona.

Political Department, Secretariat,
Fort, Bombay,
16th August 1922.

To

Meherban Shrimant Raghunathrao Shankarrao
alias Babasaheb Pant Sachiv,
Chief of Bhor.

My friend,

H. E. the Governor desires me to express to you his great pleasure in announcing that he has on behalf of H. I. M. the King Emperor of India been pleased to recognise your succession to the Gadi of the Bhor State, with the powers appertaining to it and to offer you His Excellency's hearty congratulations.

2. H. E. is confident that you realise that the powers entrusted to you carry with them not only great privileges but great responsibilities. In the discharge of those responsibilities you will be greatly strengthened by the long experience of practical administration, which, thanks to the fatherly care of H. H. the late Chief, you have been able to enjoy. Occasion will, however, doubtless arise in which you will feel the need of counsel and assistance and H. E. desires me to assure you that on all such occasions the Political Agent, Poona, will be ready to give you his advice.

3. H. E. also wishes me to assure you that he will watch your career with deep interest, and he trusts that you will long be spared to administer your state for the benefit of those entrusted to your care and with credit and distinction for yourself.

Yours sincerely,
A. F. Kindersley.

खलिता वाचून झाल्यावर मे. पोलिटिकल एजंट यांनीं भाषण केले. त्यात प्रथम श्रीमंत रावसाहेबाच्या कारकीर्दीचा गौरवपूर्वक उल्लेख करून श्रीमंत

बाबासाहेबांचें शिक्षण व त्यानीं मिळविलेल्या राज्यकारभाराच्या अनुभवाबद्दल इंग्रजींत भाषण केलें. त्याचा मराठी तर्जुमा पो. ए. यांचे चिटणीस मि. भागवत यांनीं वाचून दाखविला.

## मेहेरबान पोलिटिकल एजंटसाहेब बहादुर यांचें भाषण

चीफ साहेब व सभ्य गृहस्थहो,

नेक नामदार गव्हर्नरसाहेब, मुंबई, यानीं केलेल्या अभिनंदनाचा व दर्शविलेल्या सदिच्छेचा संदेश आताच आपण ऐकला आहे. आता पोलिटिकल एजंट या नात्याने मला जे जास्त सागण्याची इच्छा आहे तें सागतों. या मंगल व महत्त्वाच्या प्रसंगी मला येथे हजर राहण्याचा योग आला त्याबद्दल मला अत्यंत आनंद होत आहे.

पूर्ण काल झाल्यानंतर व बहुमान संपादन केल्यानंतर श्रीमंत रावसाहेब पितृलोकाला गेले आहेत व त्याचे चिरंजीव आजचे आपले यजमान त्याचे जागीं राज्य करीत आहेत. ते आता राज्यनौका कशी चालवितील याबद्दल नौकेंतील नावाडी व उतारू, किनाऱ्यावरील प्रेक्षक अथवा दुसऱ्या नौकेतील प्रेक्षक हे साशंकित झाले असल्यास त्यात नवल नाही. परंतु या बाबतींत, मला वाटतें, कोणीहि भिण्याचे कारण नाही. कारण राज्यकारभारात हे नवीन कर्णधार अनभिज्ञ नाहींत. तरुणपणीं नामांकित प्रोफेसरापैकी काहींच्या हातांखालीं त्यांना पहिल्या प्रतीचें शिक्षण मिळालेलें आहे. इलाख्यात प्रसिद्ध असलेल्या पुणें हायस्कुलात प्रथम प्रवेश करून व तेथें गुरुजींकडून उत्तम धन्यवाद मिळवून ते डेक्कन कॉलेजसारख्या सुप्रसिद्ध कॉलेजात गेले. तेथें त्यानीं तीन वर्षे आर्ट्स कोर्समध्ये घालविल्यानंतर कायद्याचेंहि अध्ययन केले. याप्रमाणें पूर्ण तयारी करून अल्प वयातच त्यानी सार्वजनिक आयुष्यक्रमास सुरुवात केली. सन १९०६ सालीं ते पुण्यास ऑनररी मॅजिस्ट्रेट म्हणून बेंचमध्यें काम करूं लागले व अलीकडे सुमारे १० वर्षें संस्थानच्या एका महत्त्वाच्या तालुक्याचा कारभार पाहत आले आहेत व आपल्या कारभारानें त्यानीं कै. हिज हायनेस, पोलिटिकल एजंट व त्याचे ताब्यात असलेल्या प्रजेचें पूर्ण समाधान केले आहे. शिक्षण व कामाचा पोक्त अनुभव घेऊन ते राज्यारूढ झाले आहेत. असें शिक्षण व अनुभव फारच

थोड्या राज्यकर्त्यांच्या अंगी प्रथम असतो. जे ह्या नवीन कर्णधाराकडे स्नेहभावानें पाहत आहेत त्यानी खुशाल खात्री बाळगावी कीं, ते राज्यनौका सरळ व संथ मार्गानें हाकारतील. भोर संस्थान व ब्रिटिश राज्य याची जी स्नेहबंधने आहेत तीं ते कायम ठेवून जास्त दृढ करतील याबद्दल मला पूर्ण खात्री वाटत आहे; व त्याना मी आश्वासन देतों कीं, पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेले स्नेहभाव वृद्धिंगत करण्याची जी जी संधि येईल ती ती मुंबई सरकार व पोलिटिकल एजंट वाया जाऊं देणार नाहींत व त्याना त्याच्या हातीं असलेल्या कोणत्याहि मार्गानें मदत करतील.

आणि म्हणून, सभ्य गृहस्थहो, राज्यारूढ झाल्याबद्दल आपण त्याचे अभिनंदन करीत असताना त्याची कारकीर्द दीर्घकालीन, सौख्यपूर्ण व सुप्रसिद्ध होवो अशी इच्छा करूं या. हिंदुस्थानचें प्रत्यहीं स्थित्यंतर होत आहे. नवीन शक्ति, नवी ध्येये व नवी तत्त्वे प्रादुर्भूत होत आहेत. पुढील थोडी वर्षेपावेतों कोणत्याहि राज्यकर्त्यापुढे किंवा राज्यकारभार चालविणाऱ्यापुढें सोपे काम नाहीं. इतर राज्यकर्त्यांप्रमाणे भोरच्या चीफ साहेबासहि बिकट प्रश्नाना शहाणपणाने व धैर्यानें तोंड द्यावे लागेल व शेवटी जेणेंकरून स्वतःला भूषणप्रद व रयतेला सुखदायक होईल अशा मार्गानें हे प्रश्न सोडवितील, आणि आज त्याचा सन्मान करण्याकरिता, त्याच्या प्रेमळ आदरातिथ्याचा स्वीकार करण्याकरिता व त्याच्या भावी कारकीर्दीत त्याना पूर्ण यशप्राप्ति व्हावी अशी इच्छा करण्याकरिता जे आपण सर्वजण येथें जमलों आहों त्या सर्वांची, असेच वर सांगितल्याप्रमाणें घडून येवो अशी अंतःकरणपूर्वक प्रार्थना असली पाहिजे अशी माझी खात्री आहे.

( मूळ भाषण इंग्रजीत झालें तें परिशिष्ट १ मध्ये दिलें आहे. )

पोलिटिकल एजंट याचे भाषण झाल्यावर श्रीमंत बाबासाहेब यानी भाषण केले.

## श्रीमंत बाबासाहेबांचें भाषण

मि. व मिसेस हडसन, सरदार, सन्मान्य पाहुणे आणि इतर स्त्री-पुरुषहो,

भोर संस्थानच्या गादीवर आम्ही अधिष्ठित झालों हें जाहीर करण्याकरितां आम्ही आज रोजीं खास भरविलेल्या दरबारचे मंगल प्रसंगीं आपणां

सर्वांचें अंतःकरणपूर्वक स्वागत करण्यास आम्हास विशेष आनंद वाटत आहे; आणि आमच्या विनंतीस मान देऊन आजच्या समारंभास हजर राहण्याची आपण तसदी घेतली याबद्दलहि आम्ही आपले फार फार आभार मानतों.

यानंतरचें आजचें आमचें प्रमुख कर्तव्य म्हटलें म्हणजे, नुकतेंच कैलासवासी झालेल्या आमच्या वडिलांचे पश्चात् त्यांचे कायदेशीर वारसपुत्र या नात्यानें भोर संस्थानच्या गादीवर आरूढ होऊन आम्ही राज्यसूत्रें हातीं घेतलीं, या गोष्टीस मुंबईचे गव्हर्नर नेक नामदार सर जॉर्ज लॉइडसाहेब यांनी हिज इंपीरियल मॅजेस्टी दि किंग एम्परर ऑफ इंडिया, यांच्या खलित्यानें मान्यता दिली याबद्दल त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें, हे होय. नामदार साहेबांनीं आजच्या समारंभाप्रीत्यर्थ पाठविलेला अभिनंदनपर व शुभचिंतनपर खलिता आताच आमच्या हातीं पडला आहे. त्याबद्दलहि आम्ही त्यांचे फार ऋणी आहोंत. त्याचप्रमाणे पुणे मुक्कामी नुकत्याच भरलेल्या सरदारांचे दरबारांत केलेल्या भाषणांत सदय अंतःकरणानें आमचे परमपूज्य तीर्थरूपांबद्दल व आमचे-बद्दल नामदारसाहेबांनीं जो गौरवपूर्वक उल्लेख केला त्याबद्दलहि आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

मि. हडसनसाहेब, आपण आमचे अगत्यपूर्वक केलेल्या विनंतीस मान देऊन आपल्या अमूल्य व कामाच्या वेळांतून एक दिवसाची सवड काढली व येथें येऊन मिसेस हडसन व मि. ब्रिस्टो यांचेसह आजचा राज्यारोहणसमारंभ साजरा करण्याची तसदी घेतली याबद्दल आम्ही आपले किती आभारी आहोंत हे शब्दांनी व्यक्त करण्यास आम्ही असमर्थ आहों. भोर संस्थानशीं व खुद्द आमच्याशीं आपले संबंध फार सलोख्याचे व स्नेहभावाचे असून संस्थानचे कल्याणाबद्दल आपण नेहमी फार काळजी दाखविली आहे आणि संस्थानचा दर्जा वाढवून संस्थानची योग्यता कायम राहण्यासाठी आपण फार परिश्रम घेतले आहेत. त्याचप्रमाणे आपल्या सुंदर व मधुर भाषणांत आमचें मनापासून व गौरवपूर्वक अभिनंदन करून आमची कारकीर्द यशस्वी व्हावी अशी आपण सदिच्छा प्रकट केली आहे आणि अशा वेळीं आपण जो समयोचित बहुमोल सल्ला आम्हास दिला आहे त्याबद्दल आम्ही आपले अत्यंत ऋणी आहों. तसेंच जरुरीचे वेळीं आम्हास पूर्ण मदत व पाठिंबा देण्याविषयीं आपण जें आश्वासन आम्हास दिलें आहे त्याबद्दलहि

आम्हास फार आनंद होत आहे. उलटपक्षीं पोलिटिकल एजंटाचा सल्ला अवश्य तेव्हां आम्ही घेतल्याशिवाय कधींहि राहणार नाही व त्याचप्रमाणें आमचे घराण्याचे पिढीजाद राजनिष्ठेस व वैभवास साजेल अशा प्रकारें राज्यकारभार चालवण्याचा आम्ही शक्य तितका प्रयत्न करणार आहोंत हें जाहीर करण्यास आम्हास फार संतोष वाटतो.

आमच्या कैलासवासी तीर्थरूपांचे अंगच्या नानाविध गुणाचा गौरवपूर्वक उल्लेख करून सरकारातून त्याच्या कारभाराची नेहमीच वाहवा होत गेली आणि इंग्लंडचे तक्ताबद्दल त्याच्या ठायीं असलेली निःसीम राजनिष्ठा व उत्कट भक्ति, त्यानीं कर्तव्यबुद्धीनें महायुद्धाचे वेळीं सरकारास केलेली फार मोठी द्रव्याची मदत आणि भाटघर धरणासारख्या सरकारने काढलेल्या कोणत्याहि सार्वजनिक हिताच्या कामात सरकार म्हणेल त्या सयुक्तिक बाबतीत पूर्ण मदत करण्याचे ठेवलेलें धोरण इत्यादि कारणामुळे त्यास तोफासलामीचे बहुमान मिळाले याबद्दल आपण समयानुरूप योग्य शब्दानीं निर्देश केला आहे त्याबद्दल आम्हास फार आनंद होत आहे आणि आमचे घराण्याचा मालिक-मा-आझम, केसर-इ-हिंद सार्वभौम बादशहा यांचे घराण्याशीं जो पूर्वापार उत्कट स्नेहसंबंध आहे तो वृद्धिंगत करून अबाधित चालविण्याचा व सरकारास हरएक सार्वजनिक हिताची गोष्ट करताना राजनिष्ठापूर्वक मदत करण्याचें धोरण कायम राखण्याचा आमचे वडिलाप्रमाणें आमचा संकल्प आहे हे कळवण्यास आम्हास मोठा अभिमान वाटतो.

आम्हास साप्रतचे हिंदुस्थानचे बादशहा याचे प्रत्यक्ष दर्शन घेऊन राजनिष्ठा व्यक्त करण्याचा सुप्रसंग दोन वेळ लाभला आहे, हें या ठिकाणीं नमूद करणें अप्रासंगिक होणार नाहीं. प्रथम सन १९०५ सालीं बादशहा हे युवराज या नात्यानें इकडे येऊन गेले तेव्हा व नंतर सन १९११ सालीं दिल्लीस दरबारात आपलें राज्यारोहण जाहीर करण्याकरिता हिंदुस्थानात बादशहा म्हणून आले होते त्या वेळीं, याप्रमाणें दोन वेळ प्रत्यक्ष भेटीचा लाभ आम्हांस झालेला आहे. त्याचप्रमाणें सन १९२० मध्यें हिज् रॉयल हायनेस ड्यूक ऑफ कॅनॉट हे नवीन सुधारणांस अनुसरून कौन्सिलाचा अनावरणसमारंभ करण्यासाठीं आले होते त्या वेळीच त्याच्या भेटीचा व

गेल्या नोव्हेंबर महिन्यात हिज रॉयल हायनेस प्रिन्स ऑफ वेल्स पुणें येथें आले त्या वेळीं त्याच्या भेटीचा अपूर्व मान आम्हास मिळालेला आहे व याप्रमाणें इंग्लंडचे राजघराण्यांतील पुरुषाशीं आमचे निकटचे संबंध आलेले आहेत.

सभ्य स्त्री-पुरुषहो, आमचे कै. तीर्थरूप हिज हायनेस श्रीमंत सरकार शंकरराव चिमणाजी पंडित पंतसचिव हे दिवंगत झाल्यामुळे परमेश्वरी संकेतास अनुसरून आम्हास भोर संस्थानची राज्यसूत्रे हातीं घ्यावी लागली या गोष्टीस सुमारे एक महिनाच झाला आहे. त्या वेळीं आम्हीं एक जाहीरनामा काढून प्रजेचें हित व कल्याण हीं सदैव आमच्या मनात वास करतील व संस्थानचें सौख्य वृद्धिंगत करून संस्थानची भरभराट ठेवण्याचा आम्ही यत्न करणार आहोंत असें कळविलें हें आपणास विदितच आहे, असें आम्हास वाटतें. तेव्हा आता पुन: तींच आश्वासनें येथें देण्याचे प्रयोजन आहे असें नाही. सबब या ठिकाणीं आम्ही इतकेंच सुचवून ठेवतों कीं, प्रस्तुतचे राज्यकारभाराची तपशीलवार माहिती प्रथम करून घेऊन त्यात जरूर त्या सुधारणा क्रमाक्रमानें करण्याचा आमचा विचार आहे. तसेंच प्रजा व ब्रिटिश सरकार यानीं आमच्यावर टाकलेल्या विश्वासाचे योग्य चीज करून दाखविण्याची आमची फार फार इच्छा आहे.

सभ्य स्त्री-पुरुषहो, भोर संस्थानचा युवराज या नात्यानें डेक्कन कॉलेज-मधील आमचा विद्याभ्यास संपविल्यानंतर सुमारे सन १९०४ सालापासून आमचा व ज्या ज्या मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्याचा व पोलिटिकल एजंटांचा संबंध आला व ज्यानीं ज्यानी आमच्या अडचणीच्या समयीं आम्हास बहुमोल मदत केली त्या सर्वांच्या कृपेबद्दल आमची कृतज्ञता याच वेळीं व्यक्त केल्या-शिवाय आम्हां ही संधि वाया जाऊं दिली तर एका महत्त्वाच्या कर्तव्यकर्मांत आम्हीं मोठी चूक केली असें होणार आहे. त्यातहि विशेषेंकरून नेक नामदार लॉर्ड विलिंग्डन व नामदार डब्ल्यू. डी. शेपर्ड आणि मि. स्विफ्ट यानीं वेळोवेळी योग्य सल्ला देऊन मदत केली, त्याबद्दल आम्ही त्यांचे विशेष ऋणी आहों.

आम्हास या ठिकाणीं निर्देश करण्यास संतोष वाटतो की, आमचे सन १९१३ पासून विचित्रगड तालुक्याचे कामाबद्दल वेळोवेळीं पोलिटिकल एजंटांनीं व विशेषत: नेक नामदार लॉर्ड विलिंग्डनसाहेब येथें सन १९१५च्या

ऑक्टोबरात आले होते, त्या वेळीं त्यानीं म्युनिसिपॅलिटीच्या उत्तरात प्रशंसा केली आहे व आम्हास अशी आशा आहे कीं, या अनुभवाचा आता आमचेवर येऊन पडलेली जबाबदारी पार पडण्याच्या कामीं आम्हास उपयोग होईल.

सभ्य स्त्री-पुरुषहो, आमच्यावर प्रस्तुत जी जबाबदारी येऊन पडली आहे, ती फार जोखमीची आहे हें आम्ही जाणून आहों. तसेच, गेल्या पिढींत व विशेषत: महायुद्धापासून काळ फारच पालटला असून प्रजाजनाच्या आकांक्षा प्रत्यही वाढत आहेत या गोष्टीकडे दुर्लक्ष करून भागावयाचें नाहीं हेंहि आम्ही जाणून आहों. परंतु, समयास अवश्य अशा प्रकारे वागून सरकारचे राजकीय अधिकारी याच्या मदतीने आणि आमचे प्रजाजन, नोकर व अधिकारी याच्या सहानुभूतीने प्रस्तुत परिस्थितीस तोंड देऊन यश संपादन करण्याची आम्हास उमेद आहे.

आमच्या प्रजाजनानींहि आमच्या अडचणी कोणत्याहि प्रकारें न वाढवता शांततेचे वातावरण ठेवावे व त्याच्या गाऱ्हाण्याची हकीकत समजून घेऊन त्यांची दाद लावण्याचा प्रयत्न करण्याची व आमचें स्थूल धोरण ठरवून ते अमलात आणण्याची सवड आम्हांस द्यावी अशी इशारत याच ठिकाणीं देऊन ठेवली असता वाया जाणार नाही, असा आम्हास भरंवसा आहे.

मि. हडसनसाहेब, आमच्या तीर्थरूपाचे निधनामुळे संस्थानचा दर्जा कमी झालेला आहे हें आपण जाणतच आहा. तेव्हा तो दर्जा पूर्ववत् प्रस्थापित करवाल अशी आम्हास पूर्ण उमेद आहे.

आमच्या राज्यारोहणाचे सर्व प्रजाजनास निरंतर स्मरण राहावे म्हणून खाली दिलेल्या देणग्या व सवलती देण्याचे आम्ही जाहीर करतों.

पहिले:—आमच्या प्रजाजनाची राजनिष्ठा व सर्वसाधारण शांत वृत्ति लक्षात घेऊन खेड्यातील घरपट्टी, म्हैसपट्टी, लग्नटक्का, पाटदाम हे कर चालू वर्षापासून अजीबात माफ करण्याचें आम्ही योजिले आहे. हे कर सुमारे १५० वर्षांपासून अव्याहत वसूल होत असून त्याचेपासून सालीना सुमारे बारा हजार रुपयाचे संस्थानात उत्पन्न होत असतें. परंतु हे कर ब्राह्मणासारख्या विशिष्ट जातीस माफ असून गरीब व इतर जातींचे लोकावरच बहुतांशीं त्याचा

बोजा बसतो. परंतु सर्व जातीस सारखेपणानें वागविण्याचा आमचा मुख्य इरादा असल्याकारणाने साळीना एवढ्या मोठ्या रकमेचे नुकसान सोसण्याचें आम्ही योजले आहे. मात्र विशेष शर्तीवर घरपट्टी बसविली असेल व विशिष्ट सवलती दिल्यामुळे धनगर लोकावर कर बसविले आहेत त्यास हा जाहीरनामा लागू नाही व ते कर माफ केलेले नाहींत.

दुसरे:—तपकीर, शेंदूर, विड्याची पाने या जिनसाचे व्यापार करणाऱ्या दुकानदारावर लायसेन्स-फी घेण्यात येते, तीहि आम्ही माफ करण्याचे ठरविले आहे. कारण ही बाब लहान प्रमाणावर धंदे करणाऱ्या लोकासच भरावी लागते.

तिसरें:—प्राथमिक शिक्षणावरील फी अजिबात उठवून तें सर्वस्वी मोफत करण्याचा आमचा हेतु आहे. आमचे वडिलानी या संबंधात थोडासा उपक्रम पूर्वीच काही तालुक्यात केलेला आहे व तो बराच फायदेशीर झाल्याचे समजतें. आणखी एक पाऊल पुढें टाकून कोणत्याहि प्राथमिक शाळेतील पहिल्या चार इयत्तात फी बिलकूल घेतली जाणार नाहीं असे आम्ही जाहीर करतों.

चवथें—यंदा जरी पर्जन्याची कृपा आहे तथापि आमचे राज्यारोहण-समारंभानिमित्त सालमजकूर जमीन महसुलाच्या साऱ्याची अंशतः सूट खालसा जमिनीपुरती देण्याचे आम्ही योजिले आहे. ती अशी कीं, १० रुपयापर्यंत सारा भरणाऱ्या खातेदारास रुपयास चार आणे व त्यावरील रकमेचे खातेदारास रुपयास एक आणा याप्रमाणें माफी देण्याचें ठरविले आहे. ही सवलत ज्याच्या-कडे साऱ्याची बाकी राहिलेली नाहीं किंवा असलेली बाकी जे नोव्हेंबर महिना-अखेर देऊन टाकतील अशा खातेदारासच देण्यात यावयाची आहे. या सवलतीनें संस्थानचे सुमारे ३५००० रुपयाचे नुकसान होणार आहे.

पाचवें:—आमच्या सर्व नोकरांस व अधिकाऱ्यास खालीलप्रमाणें जादा पगार बोनस म्हणून देण्याचे आम्हीं फर्माविले आहे.

दरमहा ४० रुपयापर्यंत पगार असणाऱ्या नोकरास एक महिन्याचा पगार.

दरमहा ४० ते ७५ रुपयापर्यंत पगार असणाऱ्या नोकरास पाऊण महिन्याचा पगार.

आणि रुपये ७५ चे वर पगार असणाऱ्या अधिकाऱ्यास अर्ध्या महिन्याचा पगार.

या देणगीचा खर्च सुमारें १४००० रुपये होत आहे.

सहावे:—काहीं माहिती मागविलेली आहे. ती आल्यावर मालकी नंबरांतील जंगलाबद्दल काहीं हक्क रयतेस देण्याचा आमचा विचार आहे. यासंबंधींच्या रयतेच्या तक्रारी आमच्या लक्षांत आलेल्या आहेत व शक्य तितक्या लवकर यासंबंधींच्या सवलती जाहीर करण्याचा आमचा मनोदय आहे.

सातवें:—सुधागड तालुक्याच्या प्रजेच्या सोयीकरितां दवाखाना सुरू करण्याचा आमचा विचार आहे.

आठवे:—भोर येथें ब्राह्मणांचे मुलास धार्मिक शिक्षण देण्यासाठीं एक वेदशाळा स्थापन करण्याचें श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य, मठ संकेश्वर, याचे इच्छेप्रमाणें आम्हीं ठरविलें आहे. श्रीचा मुक्काम साप्रत येथें असून आजच्या सुप्रसंगीं आमचे विनंतीवरून श्रींनीं या समारंभास हजर राहण्याची तसदी घेतली आहे; व त्याचा मंगल आशीर्वाद या शुभ प्रसंगीं मिळण्याचा अलभ्य लाभ आम्हांस प्राप्त होत आहे हें आम्ही आपले महद्भाग्य व विशेष सुदैव समजतों.

शेवटीं अशा समारंभातील नेहमींच्या संप्रदायाप्रमाणें एक कैदी बंधमुक्त करून दुसऱ्या पांच कैद्यांस एक महिन्याची माफी देण्याचें आम्हीं ठरविले आहे. सरतेशेवटीं ज्या आमच्या हिंदी हितचिंतक व स्नेही मंडळींनीं आम्हांस आमचेवरील प्रस्तुतची जबाबदारी पार पाडण्याची लायकी उत्पन्न करून घेण्याचे कामीं हरएक तऱ्हेनें सल्लामसलत देऊन मदत केली आहे त्या सर्वांचे आम्ही मन:पूर्वक आभार मानतों. त्यातहि आमचे शाळेपासूनचे मित्र मि. कोंडो महादेव कुमठेकर, बी.ए., एल्.एल्.बी., सबजज्ज, बारामती, हे येथें हजर असून त्यांच्या निरपेक्ष मदतीबद्दल आम्ही आभारी आहोंत.

सभ्य स्त्री-पुरुषहो, आमच्या निमंत्रणास मान देऊन आपण अगत्यपूर्वक येथें आल्याबद्दल आम्ही पुन: एकवार आपले आभार मानतों व आपणां सर्वांचें कल्याण असावे अशी इच्छा प्रकट करून आम्ही आपलें भाषण संपवितों.

( श्रीमंत बाबासाहेब यांनीं इंग्रजींत भाषण केले व त्याचा मराठी तर्जुमा संस्थानचे त्या वेळचे कारभारी रा. रा. धायगुडे यानीं वाचून दाखविला. मूळ इंग्रजी भाषण परिशिष्ट २ मध्यें दिलें आहे. )

या दिवशींच्या समारंभास जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य हे स्वतः हजर राहून त्यांनीं श्रीमंत बाबासाहेब याना मंगल आशीर्वाद दिला, तो पुढे दिला आहे.

## श्रीमच्छंकराचार्य यांचा आशीर्वाद

श्रीशंकरो विजयते ।

श्रीमज्जगद्गुरुशङ्कराचार्यसंकेश्वरपीठाधिष्ठित—श्रीमदभिनवसच्चिदानन्दविद्या-नृसिंहभारतीस्वामिश्रीचरणैः श्रीमतो " रघुनाथराव पण्डित पन्तसचिव संस्थान भोर " इत्यस्य राज्याधिरोहणसमये कृतम्

आशीर्वचनम्

अमृतकरेऽधिगतेऽस्तं प्रोद्यन्तं भानुमिव गते ताते ॥
सिंहासनमधिरूढं परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ १ ॥
आचार्यवर्यभगवत्पादैरस्मिन्प्रतिष्ठिते पीठे ॥
विलसद्विशुद्धभावं परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ २ ॥
भावत्कभव्यमूर्ति-ध्यानविनिर्धूतकल्मषस्वान्तम् ॥
कमलासनसहधर्मिणि ! परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ ३ ॥
धर्मोऽभ्युदयविमुक्त्योर्बीजं दन्ध्वन्यते श्रुतिस्मृतिभिः ॥
तमनुष्ठाप्य कुमारं परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ ४ ॥
दत्त्वा प्रजानुरंजनराज्यपरित्राणपटुतमां बुद्धिम् ॥
श्रीचक्रराजसंस्थे ! परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ ५ ॥
धर्मोन्नतिसंकल्पः शिष्येष्वेवंविधेषु वाग्देवि ! ॥
आयतते नः कामं परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ ६ ॥
अनुरज्यतां प्रजाऽस्मिन् तद्योगक्षेममेष निर्वहतु ॥
अन्योन्यभावमुदितं परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ ७ ॥
शिष्टा बहु मोदन्तां दुष्टा दौष्ट्यं निरस्य नन्दन्तु ॥
उन्नमतु भोरराज्यं परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ ८ ॥
आयुष्मतोऽर्थकामौ स्यातां धर्माविरोधिनौ नित्यम् ॥
शिष्यावतंसमेनं परिपालय शारदाम्ब ! रघुनाथम् ॥ ९ ॥
देवि ! श्रीमति ! शारदाम्ब ! भगवन् ! श्रीचन्द्रमौलीश्वर ! ॥
वत्सेऽस्मिन् रघुनाथराजतिलके मूर्धाभिषिक्तेऽधुना ॥
पीयूषद्रववर्षिणी सकरुणा दृष्टिर्विनिक्षिप्यतां ॥
येन स्यात् रघुनाथवत् प्रभुरयं धर्म्ये प्रजापालने ॥ १० ॥

धर्मो दीव्यतु जीवितं स हि नृणां, भूः सस्यपूर्णा भवेत्
नित्यं नन्दतु भोरमण्डलजनो राजैकनिष्ठाशयः ॥
जीयात् श्रीरघुनाथभूपतिरयं सब्राह्मणः सप्रजः
सामात्यः सकलत्रपुत्रविभवः सुख्यन् समाः शाश्वतीः ॥११॥

श्रावणकृष्णदशम्यां शुक्रवारे १८४४ शके.
मु. सं. भोर, १८ ऑगस्ट १९२२.

त्यानंतर संस्थानिकाकडून, श्रीमंत सरदार बाळासाहेब विंचुरकर याचेकडून व इतर आप्तेष्टाकडून अहेराचा समारंभ होऊन हारतुरे, पानसुपारी वाटण्यात आली व दरबार बरखास्त झाला. नंतर पोलिटिकल एजंटसह श्रीमंत बाबा-साहेबाचा फोटो घेण्यात आला. पोलिटिकल एजंट हे श्रीमंताच्याबरोबर चहा घेऊन परत पुण्यास रवाना झाले.

त्या दिवशी तिसऱ्या प्रहरी हायस्कूलच्या इमारतींत पाहुणेमंडळीस ‘ ॲटहोम ’ पार्टी देण्यात आली. त्या प्रसंगीं श्रीमंतानीं सर्वांस कुशल वगैरे विचारून सायंकाळींच ज्याना जावयाचे होतें त्याना निरोप दिला. याच वेळी पुणें आरोग्य-मंडळ, शिक्षण-प्रसारक मंडळी व पी. वाय्. सी. हिंदु जिमखाना या संस्थातर्फे श्रीमंताना मानपत्रें रौप्य-करंडकातून अर्पण करण्यात आलीं. हीं मानपत्रे त्या त्या संस्थेमार्फत बॅ. जी. के. गाडगीळ, प्रो. पोतदार व डॉ. विष्णुपंत बापट यानीं वाचून दाखविलीं. मानपत्रास श्रीमंतानी आयत्या वेळी थोडक्यात (extempore) समयोचित उत्तर दिले. नंतर बरीच पाहुणेमंडळी पुण्यास परत गेली.

अशा प्रकारचा भव्य व थाटाचा दरबार पूर्वी कधींहि भरलेला नव्हता. या दरबारास अपूर्वता येण्याचीं मुख्य कारणें होतीं तीं:—पूर्वी ब्रिटिश सत्तेखालच्या हिंदी संस्थानिकाना वारसा हक्क असताहि वरिष्ठ सरकारची परवानगी मिळेपर्यंत राज्याधिकाराचीं सूत्रे हातीं घेता येत नसत. नरेन्द्र-मंडळ स्थापन झाल्यानंतर सार्वभौम सरकारच्या संमतीनें असा एक ठराव पास झाला आहे की, ज्या संस्थानिकास आकरा किंवा आकरापेक्षा जास्त तोफाच्या सलामीचा वंशपरंपरेचा मान आहे तो संस्थानिक दिवंगत होताच त्याच्या पुत्रास अगर निर्विवाद वारसा हक्क असलेल्यास, तो वयात आला असल्यास सार्वभौम सरकारच्या संमतीची

वाट न पाहता त्यास एकदम गादीवर बसण्यास हरकत नाही. राज्यकारभाराची सूत्रें हाती घेऊन योग्य अधिकाऱ्यामार्फत गादीवर बसल्याचें वरिष्ठ सरकारकडे जाहीर केले म्हणजे झाले. पुढे सरकारी रीत्या त्या गोष्टीस मान्यता मिळत असे. श्रीमंत बाबासाहेबाच्या बाबतीत हा ठराव लागू पडण्यासारखा नव्हता. कारण भोर संस्थानास ११ तोफांच्या सलामीचा जो मान होता तो वैयक्तिक होता. यामुळे वरील ठरावातील अटीप्रमाणे श्रीमंत बाबासाहेबाना वडील कैलासवासी होताच गादीवर बसण्याचा हक्क नव्हता. परंतु श्रीमंत बाबासाहेब काही लहान नव्हते. शिवाय त्याच्या स्वभावाची, वर्तणुकीची व हुपारीची मुंबई सरकारास माहिती असल्यामुळे वरील ठरावातील अट त्याच्या बाबतीत आड न येऊं देता त्याना त्याचे वडील निधन पावताच राज्याचे सर्व अधिकार धारण करण्यास हरकत घेतली नाहीं; व सरकारी रीतीनें त्यास मान्यतादर्शक पत्र एक महिन्याच्या आतच श्रीमंत बाबासाहेब यास पाठविले, ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट घडून आली. तें पत्र सुरुवातीस दिलेंच आहे.

राज्यारोहण झाल्यानंतर टाइम्स ऑफ इंडियानें राज्यारोहणासंबंधीं जो लेख लिहिला त्यात ह्या समारंभाला Installation व Investiture असे शब्द वापरले होते. हा लेख मे. पोलिटिकल एजंटसाहेब याचे वाचनात आल्यावर त्यांनी श्रीमंत बाबासाहेबाना कळविले कीं, *Times of India* नें Installation व Investiture हे शब्द वापरले आहेत ते दोन्हीहि चुकीचे असून आपण स्वतः होऊनच गादीवर बसल्यामुळे व त्यास गव्हर्मेन्टने मान्यता दिली असल्यामुळें आपल्या राज्यारोहणास Accession असा शब्द योग्य आहे. तेव्हा *Times of India* च्या नजरेस ही चूक आणून दिली. ह्यावरूनहि वरील लिहिलेल्या मजकुरास पुष्टि मिळणार आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे आजपर्यंत भोरच्या इतिहासात राज्यारोहणसमारंभ दरबार भरवून त्या दरबारांत प्रजेला संतुष्ट करण्याकरिता पूर्वीच्या कोणत्याहि अधिपतीनें जाहीर केलें नव्हतें तें जाहीर करण्यात आले, व विषमतानिदर्शक करहि बरेच नुकसान सोसून माफ करण्यात आले; व प्रजानुवर्ती राज्यकार-भाराचे धोरण कसें राहील हेंहि जाहिर केलें. या व इतर अनेक गोष्टींमुळे हा समारंभ भोर संस्थानच्या इतिहासात चिरस्मरणीय झाल्यावाचून राहणार नाही.

या समारंभाच्या दिवशीं श्रीमंत बाबासाहेबांना अनेक ठिकाणांहून अभिनंदनपर तारा आल्या होत्या. त्यात प्रामुख्यानें लॉर्ड व लेडी विलिंग्डन, काश्मीरचे महाराज, देवासचे महाराज, बडोद्याचे महाराज, चीफ ऑफ सांगली, चीफ ऑफ मिरज ( सीनियर ), चीफ ऑफ जत, चीफ ऑफ फलटण, सीनियर प्रिन्स ऑफ तंजावर, चीफ ऑफ मिरज ( जूनियर ), चीफ ऑफ इचलकरंजी, चीफ ऑफ विशाळगड, महाराजा ऑफ कोल्हापूर, महाराजा ऑफ धार, चीफ ऑफ सावंतवाडी, सरदार पंडितराव, सातारा, नबाब शेखमिरे, वाई, श्रीमती रमाबाई रानडे, शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी, प्रिन्सिपॉल भाटे, सरदार माधवराव रास्ते, रावबहादुर गरूड, अभ्यंकर वकील, सांगली, दादासाहेब करंदीकर, सातारा, रा. ब. तात्यासाहेब कुमटेकर, सरदार भय्यासाहेब विंचुरकर, डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणें, चीफसाहेब रामदुर्ग, चीफसाहेब कुरुंदवाड, चीफसाहेब जमखंडी, मि. क्रेरार, डेक्कन क्लब, पुणें, भोर स्टेट प्रजा-सभा, इत्यादींकडून आलेल्या होत्या. यांशिवाय कित्येकांचीं पत्रेंहि आलेलीं होतीं.

## मानपत्रसमारंभ

श्रीमंत बाबासाहेबांनीं राज्यारोहणसमारंभाची १८ आगस्ट तारीख जाहीर केल्यानंतर संस्थानांतील व संस्थानाबाहेरील अनेक संस्थाकडून मानपत्रे स्वीकारण्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांच्याकडे विनंति-अर्ज येऊं लागले. अद्याप आपल्या हातून काहींच कार्य झालें नसल्यामुळे मानपत्राचा स्वीकार करणें त्याना प्रशस्त वाटेना. परंतु लोकाचा उत्साहभंग करून त्याना नाखूष करणें हेंहि इष्ट नाहीं, असा विचार करून त्यानीं मानपत्रें अर्पण करण्यास संमति दिली, व राज्यारोहणसमारंभाच्या दिवशींच सायंकाळीं तीन संस्थांच्या मानपत्रांचा त्यानीं स्वीकार केला, हें वर सांगण्यात आलेच आहे. बाकीच्या मानपत्राकरितां ता. १९ हा दिवस ठरविला होता.

दरबारच्या दुसरे दिवशीं म्हणजे ता. १९ शनिवार रोजीं निमंत्रित पाहुणेमंडळींपैकीं जी मंडळी राहिली होती त्याना व मानपत्रें अर्पण करण्याकरिता जी मंडळी आली होती त्याना दुपारीं मोठ्या थाटाची मेजवानी श्रीराममंडपात देण्यात आली. या मेजवानीच्या प्रसंगीं श्रीमंत बाबासाहेबानीं एक नूतन सांप्रदाय सुरू केला. ब्राह्मणांच्या पंक्तीबरोबरच प्रभू वगैरे पांढरपेशा ज्ञाती व

मराठे यांच्या पंक्ती बसविण्यांत आल्या होत्या. या नवीन प्रघातामुळें सर्वांना संतोष वाटला. भोजनानंतर पानसुपारीच्या वेळीं ठिकठिकाणच्या इनामदारांकडून व इतर गृहस्थाकडून आलेल्या आहेराचा श्रीमंत बाबासाहेबानीं स्वीकार केला.

याच दिवशीं सायंकाळीं श्रीराम-मंडपांत मानपत्रसमारंभ झाला. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय, श्रीराम क्रीडाभुवन, भोर म्युनिसिपालिटी वगैरे भोर शहरातील संस्था याच्यातर्फे, संस्थानातील निरनिराळया पांचहि तालुक्यातर्फे आलेली मानपत्रें, त्याचप्रमाणें कॅंप एज्युकेशन सोसायटी, रामोशी संघ, एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल, मुंबई, पिरंगुट रहिवासी, ऐक्यवर्धक क्लब, शिरवळ, समाजसेवासंघ, पाली, पाली नागोठणें रोड कमेटी वगैरे संस्थाकडून, त्याचप्रमाणें वे. शा. सं. पंडित दीक्षित, भोर, वे. शा. सं. बाळशास्त्री पारखी, वे. शा. सं. बाबा दीक्षित, वे. शा. सं. मार्तंड नारायण आचार्य, नाडसूर, रा. नारायण नरसिंह साठे, पुणें, रा. गो. रा. भिडे, रा. बा. पा. ठकार, भोर, व व्यंकटेश प्रेस, मुंबई, याचीं वैयक्तिक मानपत्रें श्रीमंत बाबासाहेबांना अर्पण करण्यात आलीं. या मानपत्रात रामोशी संघानें दिलेले मानपत्र श्रीमंत बाबासाहेबानी स्वीकारले ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची होती. रामोशी संघ, पुणें, व भोर संस्थानातील रामोशी प्रजाजन यांचेतर्फे श्रीमंत बाबासाहेब याना मानपत्र अर्पण करण्याकरिता पुण्याहून विद्यादेवी सौ. सावित्रीबाई रोडे या राज्यारोहण-समारंभाचे दिवशींच भोरास आल्या होत्या. त्याचें मानपत्र स्वीकारण्याचें श्रीमंत बाबासाहेबानी कबूल केलें हे पाहून कट्टर सनातन्याना व जुन्या पिढीतील कांहीं लोकास थोडासा धक्का बसल्यासारखाच झाला. मानपत्राचे दिवशीं भर दरबारात जातिभेद न ठेवता जेव्हा श्रीमंत बाबासाहेबांनीं रामोशी प्रजेचें मानपत्र स्वीकारलें तेव्हां तर वरील लोकाच्या तोंडून "काल पालटला, आता काहीं दिवसानी राम-मंडपात महारहि बसूं लागतील," वगैरे उद्‌गार ऐकूं येऊं लागले. नवीन विचाराच्या मंडळीनी श्रीमंत बाबासाहेबाच्या या मनोधैर्याची प्रशंसा केली. श्रीमंत बाबासाहेबाचे हातीं संस्थानचीं राज्यसूत्रें आलीं याबद्दल सर्व मानपत्रात त्याचे मन:पूर्वक अभिनंदन करण्यात येऊन त्याच्या हातून संस्थानची सर्वांगीण प्रगति होईल अशी आशा प्रदर्शित केली होती. श्रीमंत बाबासाहेबानीं सर्व मानपत्रास उत्तरादाखल एकच भाषण केले, व त्यात पुढे राज्यकारभाराचें धोरण काय ठेवणार तें जाहीर केलें. तें भाषण येणेंप्रमाणें :

## श्रीमंत बाबासाहेब यांचें मानपत्रांस उत्तर

" सद्‌गृहस्थहो,

आमच्या राज्यारोहणाच्या सुप्रसंगानिमित्त जी निरनिराळी मानपत्रें आतांच आम्हास अर्पण केलीं त्याबद्दल आम्ही सर्व डेप्युटेशनमधील सभासदाचे व त्याच्या द्वारे ज्या ज्या संस्थाचे प्रतिनिधी म्हणून ते येथें आलेले आहेत त्या त्या संस्थाच्या दुसऱ्या सर्व सभासदांचे मनःपूर्वक आभार मानतों.

सर्व मानपत्रात गौरवपूर्वक आमचें अभिनंदन करून आमच्या भावी कारकीर्दीबद्दल आपण शुभचिंतन केले आहे ही फार संतोषाची गोष्ट आहे. आणि आपल्या सदिच्छेप्रमाणेंच यथायोग्य जनसेवा आमचे हातून ईशकृपेनें घडावी व भोर संस्थानचा एकंदरीत उत्तरोत्तर उत्कर्ष व्हावा इतकीच आमची प्रभूपाशीं विनंति आहे.

सद्‌गृहस्थहो, परमेश्वरी संकेताप्रमाणें भोरसारख्या ऐतिहासिक महत्त्वाच्या संस्थानचे अधिपतिपदावर अधिष्ठित होण्याचा सुप्रसंग लाभण्याइतके दीर्घायुरारोग्य ईश्वरानें आम्हास दिले याबद्दल त्या सर्वशक्तिमान् जगन्नियंत्याचे आम्ही खरोखर फार फार ऋणी आहोंत.

सद्‌गृहस्थहो, अधिपतीचें कर्तव्य सामान्यतः दोन प्रकारचे आहे असें आमचें मत आहे. एक धर्म व ईश्वर याची सेवा आणि दुसरे प्रजेचें परिपालन यथायोग्य करून तद्द्वारा जनतारूपी परमेश्वराची सेवा. याप्रमाणें दोन्ही प्रकारची राजाची कर्तव्ये यथाशक्ति आजन्म बजावीत राहण्याचा आमचा हेतु आहे.

परंतु हेतु आणि कृति याच्यामध्यें मेळ राहण्यास परिस्थितीहि तितकीच अनुकूल असावी लागते. पण आमची परिस्थिति असावी तितकी अनुकूल नाहीं, हें आपल्यास ठाऊकच आहे; किंबहुना एका मानपत्रात त्याबद्दल स्पष्ट उल्लेखहि आहे.

आमच्या स्थितीचा सूक्ष्म विचार करता आमच्या मार्गातील पहिली अडचण अशी दिसते की, लोकाच्या आकांक्षा गेल्या पिढींत व विशेषतः महा-युद्धापासून सभोंवारची परिस्थिति पाहून वाढत वाढत जात आहेत. आणि आपल्या संस्थानचा कारभार आजपावेतों जुन्या एकतंत्री वळणावर चालविला गेला असल्या कारणानें नवीन मनूबरोबर जलद मार्ग आक्रमण करण्याची

चित्रांक ७२



भोर म्युनिसिपालिटीनें श्रीमंत राजेसाहेबांना पहिली त्रैवार्षिक मुदत संपल्यानंतर पानसुपारी केली त्या वेळीं म्युनिसिपल सभासदांसह घेतलेला फोटो. ( सन १९२६ )

खुर्चीवरः—१ माधवदास देवी; २ गुपचूप वकील; ३ कानिटकर मुन्सफ; ४ न. गो. आंबेकर; ५ रा. ब. अंजनगांवकर; ६ श्री. राजे बाबासाहेब; ७ अ. रा. जोशी; ८ पाटणकर वकील; ९ श्री. के. भिडे, मास्तर; १० श्री. को. रं. दबडघाव.

शक्ति लोकात काय किंवा नोकरवर्गांत काय अवश्य तितकी प्रादुर्भूत झालेली नाहीं हें आपणासहि मान्य होईल. तसेंच ही शक्ति यक्षिणीचे कांडीप्रमाणें एकदम उत्पन्न होणारी नाहीं. यामुळें आपले पाऊल जें पुढें पडावयाचें आहे तें मनांत आहे तितक्या शीघ्र गतीनें पडेल किंवा नाहीं याची आम्हास शंका वाटते.

दुसरें असें कीं, संस्थानच्या उत्पन्नाच्या बऱ्याचशा बाबी कालमाना-प्रमाणें आपोआप वाढत जातील अशा तऱ्हेची योजना संस्थानास लागू केलेली नाहीं. त्यामुळें कोणतीहि वाढत्या खर्चाची सुधारणा सुरू करणे झाले तर ती फार सावधगिरीनेंच केली पाहिजे; इकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं.

वरील सबबी कांहीं करावयाचें नाही किंवा कोणीं काहीच मागूं नये अशा बुद्धीनें आम्हीं पुढें काढल्या नाहींत, किंवा आपल्यास काहीं कळत नसून दूरदर्शीपणाचा सर्व मक्ता आमचेकडे आहे अशा भावनेनें माडलेल्या नाहींत हें लक्षांत घेऊन, आमच्या हेतूविषयीं भलताच गैरसमज आपण करून घेऊं नये, अशी प्रथमच आम्ही आपल्यास सूचना देऊन ठेवतों. या अडचणी आपल्या-समोर ठेवण्याचा उद्देश, आपण आमच्या एकंदर परिस्थितीचा विचार शातपणानें करावा व आमचे कार्यांत आपली पूर्ण सहानुभूति आणि दिलसफाई असावी इतकाच आहे.

सद्गृहस्थहो, बहुतेक मानपत्रात आमच्या शिक्षणाची व प्रवासाची आणि कारभाराच्या अनुभवाची बरीच प्रशंसा केलेली आहे. परंतु विशिष्ट कारणामुळें व प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे वरील तिन्ही साधनाचा घ्यावयास पाहिजे होता तितका फायदा आम्हास घेता आला नाहीं व यापुढें तो घेऊं म्हटले तर आमच्यावर येऊन पडलेल्या जबाबदारीमुळें व उमेदीचें वय बरेचसें निघून गेल्यामुळे तेंहि शक्य दिसत नाहीं, ही गोष्ट प्रांजलपणें प्रारंभींच आम्ही कबूल करतों. तथापि श्रीरामक्रीडा-भुवन व वाचनालय या संस्थांच्या मानपत्रात ध्वनित केल्याप्रमाणें प्रजेचा पैसा लोकप्रतिनिधींच्या इच्छेस अनुसरून प्रजेच्या कल्याणाकडेच शक्य तेथवर खर्च करण्याचें स्थूल धोरण आम्ही आपल्या कारभारांत ठेवणार आहोंत, हें पुन्हां आजच्या प्रसंगीं जाहीर करण्यास आम्हांस फार आनंद वाटतो.

आतां येथें एका गोष्टीचा खुलासा करून ठेवणें अप्रासंगिक होणार नाहीं. सद्गृहस्थहो, संस्थानिक लोकांस संस्थानच्या बाहेरच्या लोकोपयोगी सार्वजनिक संस्थांस यथाशक्ति मदत करण्यांत कांहीं खर्च करावा लागतो व त्याबद्दल संस्थानी प्रजेस तक्रार करण्यास संधि मिळते; परंतु वास्तविक वरील खर्च विशिष्ट मर्यादेच्या बाहेर नसेल तर वरील तत्त्वास सोडून आहे असें म्हणतां येणार नाहीं, हें आपण लक्षांत ध्यावें. शिवाय ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांतील प्रजाजनांचे हितसंबंध खरोखर विरोधी किंवा भिन्न नसून परस्परांत पूर्णपणें निगडित झालेले आहेत. यामुळें ब्रिटिश हिंदुस्थानांतील रुग्णालयांस किंवा विद्यालयास अथवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या व्यापक उपयुक्त संस्थेस दिलेल्या देणगीचा फायदा संस्थानी प्रजेसहि पर्यायानें किंवा मनांत आणलें तर साक्षात्‌हि घेतां येतो, किंवा मिळत असतो, हें थोड्या विचारांतीं आपल्याहि ध्यानांत येणार आहे. उलटपक्षीं संस्थानिकांकडे संस्थानाबाहेरील सार्वजनिक संस्थांनीं मदत मागणें तीहि यथाप्रमाण असावी हेंहि या ठिकाणीं नमूद करणें उचित आहे. कारण हा नियम सुटला तर लहान संस्थानाचीं उत्पन्नें बेताचींच असल्यामुळें त्यांच्या स्वतःच्या प्रजाजनांच्या विशेष हिताच्या गोष्टींकडे योग्य लक्ष पुरविण्यास संस्थानांचे अधिपतींस कमी वाव सापडण्याचा संभव असतो.

सद्गृहस्थहो, हिंदुस्थानच्या एका बड्या व्हाइसरॉयांनीं हिंदुस्थानांत पाय ठेवतांच मिळालेल्या स्वागतपर मानपत्रांत येथील परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन करून वादग्रस्त प्रश्नांविषयीं आमचें पक्व मत बनविण्यास आणि मग अनुरूप अशी कृति करण्यास कांहीं काल सवड द्यावी आणि मग माझी पारख करावी अशी मानपत्र देणाऱ्या लोकांस विनंति केली होती. तीच आम्ही आज आपल्यापुढें ठेवतों.

अशी संधि मिळाली म्हणजे सांप्रतची कारभाराची पद्धति कशी आहे हें आमूलाग्र व तपशीलवार स्वतः समजून घेऊन त्यांत कांहीं दोष आढळून आल्यास ते कसे दूर करतां येतील याचा विचार करण्याचा आमचा मनोदय आहे. तसेंच दुसऱ्या प्रागतिक संस्थानांतून राज्यकारभार कसा चालतो ती माहिती घेऊन त्याप्रमाणें कितपत अंमल करतां येईल तें आम्ही ठरविणार

आहों. तसेंच लोकांच्या अडचणी काय आहेत तें समजून घेऊन त्याची तत्काळ दाद लावण्याचा आमचा हेतु आहे. आणि शेवटीं बजेटची पद्धति ठेवून लोकांची कर्तबगारी दिसून येईल त्या मानानें कारभाराच्या संघटितपणास कमीपणा न येईल अशा प्रकारें लोकप्रतिनिधित्वाचें तत्त्व कारभारास लावण्याची व सर्वतोपरी संस्थानचा उत्कर्ष करण्याची आमची आकांक्षा आहे. परंतु हें सर्व परिपूर्ण होण्यास आपल्यासारख्या प्रजाजनांच्या पुढाऱ्यांनीं व नोकर-लोकांनीं आमच्या अडचणी कोणत्याहि प्रकारें न वाढवितां आम्हांस प्रामाणिक-पणानें साहाय्य केलें पाहिजे अशी आमची इच्छा आहे, व त्या कामीं आमची निराशा होणार नाहीं अशी आम्हांस आशा आहे. आतां या ठिकाणीं हेंहि सागून ठेवणें जरूर आहे कीं, उद्योगधंदे किंवा कालवे वगैरे प्रकारच्या काहीं कांहीं विशिष्ट खात्यांत नवीन पद्धतीवर सुधारणा करण्याकरिता माहितगार, तज्ज्ञ व अनुभवी माणसें बाहेरून आणावीं लागतील व संस्थानांतील मंडळी तयार होऊन त्यांची कर्तबगारी दिसूं लागेपर्यंत कांहीं काल तीं ठेवावीं लागतील. तेव्हा याबद्दल विनाकारण कोणींहि गैरसमज करून घेऊं नये.

आमचा ऐन उमेदीचा काळ बहुतेक निघून गेलेला असल्याकारणानें आमचे हेतू अंमलांत आणण्याच्या कामीं दिरंगाई करून भागावयाचें नाहीं हें आम्ही पूर्णपणें जाणून आहों आणि म्हणूनच या सर्व गोष्टी शक्य तितक्या लवकर करण्याचा व पुढील पिढ्यांस सुंदर इमारत रचतां येईल असा बळकट पाया घालण्याचा आमचा अंतःकरणपूर्वक संकल्प आहे, असें आम्ही आपल्यास जाहीर आश्वासन देतों.

कालरोजीं झालेल्या दरबारांतील भाषणांत आजच आम्हीं कोणत्या गोष्टी करण्याचें योजिलें आहे तें आपल्यास कळलेलेंच आहे. तसेंच आमच्या परमपूज्य तीर्थरूपांचे कर्तृत्वाबद्दल वगैरे समयानुरूप काल उल्लेखहि झाला आहेच. यामुळें त्याविषयीं पुनरुक्ति येथें करीत नाहीं. आम्हांस जें कांहीं आपल्यास या प्रसंगीं कळवावयाचें होतें तें एकच असल्यामुळें सर्व मानपत्रांचें उत्तर एकत्र देण्यांत आलें आहे.

मानपत्रांतून विशिष्ट मागण्या न करितां मोघम सूचना केल्या आहेत याबद्दल आम्ही आपले फार आभारी आहोंत, व यावरून आम्हांस प्रथमारंभींच

बिकट अडचणींत न घालतां आमच्या प्रस्तुतच्या स्थितीची पूर्ण जाणीव आपल्यास आहे, अशी समयज्ञता आपण स्पष्ट प्रगट केली आहे.

श्रीरामक्रीडा-भुवन व वाचनालयाचे सभासदहो, आपल्या उभय संस्थांशीं आमचा पहिल्यापासून निकट संबंध असल्यामुळें त्यांचा आम्हांस सदैव विशेष अभिमान राहील हें आम्हीं विशेष रीतीनें सागण्याची आवश्यकता आहे असें नाहीं. तथापि या संस्थांची स्थापना व जोपासना करण्याचे कामीं सदर संस्थांच्या प्रमुख सभासदांचें अमोलिक साहाय्य आम्हांस झाले आहे याचा विशेष रीतीनें निर्देश करणें अवश्य आहे. आणि आमची अशी इच्छा आहे कीं, त्यांनीं आजपर्यंत चालत आल्याप्रमाणें हरएक बाबतींत आम्हास अशी मदत द्यावी म्हणजे या संस्थाची व भोरची भरभराट करण्याचा आमचा मनोदय सुलभ रीतीनें सिद्धीस जाणार आहे. तसेंच या संस्थांप्रमाणेंच शिरवळ येथील ऐक्य-वर्धक क्लब, किंवा पाली येथील वाचनालय, किंवा समाजसेवासंघ यासारख्या लोकोपयोगी संस्थांच्या आकाक्षांकडे आमची पूर्ण सहानुभूति राहील.

संस्थानांतील ज्या ज्या लोकांनीं, मग ते सरकारी नोकर असोत किंवा स्वतंत्र धंदेवाले असोत, लोकोपयोगी किंवा संस्थानची कामगिरी द्रव्य, अंग-मेहनत किंवा बौद्धिक सामर्थ्य इत्यादि द्वारांनीं विशेष प्रकारची केलेली दृष्टोत्पत्तीस येईल त्याना त्यांना, ब्रिटिश सरकार किंवा दुसरीं कांहीं संस्थानें यांत चालू असलेल्या धर्तीवर, तिकडील मानमरातबांचीं चिन्हें किवा पदव्या यांच्याशीं विरोध न येईल अशा प्रकारे मानमरातब व किताब देण्याची पद्धति, माननीयांचा मान व्हावा व प्रशंसनीय कर्तबगारी करून दाखविण्यास दुसऱ्या लोकानाहि उत्तेजन यावें, या हेतूनें सुरू करून त्याचा अल्पारंभहि हल्लीं चालू असलेल्या समारंभांत करावा असें आम्हास सयुक्तिक वाटल्यावरून येथील प्रसिद्ध शेट रामदास किसनदास याना आम्ही आतांच 'नगरशेट' ही त्यांच्या वंशास अनुरूप अशी बहुमानाची पदवी अर्पण करणार आहोंत.

सद्‌गृहस्थहो, शेट रामदास हे भोर वाचनालयाचे व्हाइस-प्रेसिडेंट असून दानशूर आहेत व जुन्या तऱ्हेनें धर्मादाय करण्याकडे त्यांची विशेष प्रवृत्ति आहे. तथापि श्रीरामक्रीडाभुवन यासारख्या नवीन पद्धतीच्या संस्थेस त्यांनीं दीडशें रुपयांची देणगी दिली असून नुकतीच येथील वाचनालयास दोनशें रुपयांची

देणगी दिली आहे आणि गरीब विद्यार्थ्यांकरितां व्याजातून मदत देण्यासाठीं दोन हजार रुपये खर्च करून प्रॉमिसरी नोटा घेतल्या आहेत. हें शेटजींचें उदाहरण अनुकूलता असेल त्यांनीं घेण्यासारखें आहे यात शंका नाहीं.

सरतेशेवटीं आमच्या राज्यारोहणसमारंभासाठीं नेमलेल्या कमेटींतील मंडळींनीं आपआपलीं कामें फार चांगल्या रीतीनें केलीं व यामुळेंच हल्लींचा समारंभ निर्विघ्नपणें व थाटानें प्रभुकृपेनें पार पडला आहे याबद्दल संतोष व्यक्त करण्याची याच वेळीं आम्ही संधि घेतों.

तयारीस वेळ थोडाच मिळाल्यामुळें व पर्जन्य ऋतु असल्यामुळें कांही गोष्टींत न्यूनता राहणें साहजिक आहे. परंतु त्याबद्दल पाहुणेमंडळी मनात काहीं आणणार नाहींत अशी आम्हास उमेद आहे.

सद्गृहस्थहो, कोणाच्याहि कर्तबगारीची योग्यता अधिकारसूत्रे हाती येताना गावयाची नसून तीं सूत्रें सुटल्यावर ती यथार्थ ठरत असते, असे उद्गार एका वरिष्ठ दर्जाच्या सुप्रसिद्ध अधिकाऱ्यानें अधिकारारोहणाचे वेळीं काढलेले आम्हास आठवतात. त्या न्यायानें ज्या जगदीश्वरानें आमच्या आयुष्यांतील आजचा सोन्याचा दिवस दाखविला त्याच्याच कृपेनें आपल्या सदिच्छेप्रमाणें अंशतः तरी अजरामर राहणारी कामगिरी आमचे हातून घडावी अशी आपल्या-प्रमाणेंच प्रभू रामचंद्रापाशीं करुणा भाकून व आपल्या सर्वांचे ईश्वरकृपेनें कल्याण असो अशी इच्छा प्रदर्शित करून आम्हीं आपले भाषण समाप्त करतों."

रविवार ता. २० रोजीं भोरातील सर्व पांढरपेशे जातीस बुंदीच्या लाडवाचें प्रयोजन देण्यात आलें. सर्व पंक्तींतून श्रीमंत बाबासाहेब स्वतः हिंडून समाचार घेत होते. दुसरे दिवशीं म्हणजे ता. २१ रोजीं दुपारीं मराठे वगैरे व नंतर अस्पृश्य जातीसहि बुंदीचें भोजन घालण्यांत आलें. याहि दिवशीं श्रीमंत बाबासाहेब सर्वांच्या पंक्तींत हिंडून समाचार घेत होते. श्रीमंत स्वतः आपला समाचार घेऊन आपणास आग्रहपूर्वक वाढवीत आहेत हें पाहून अस्पृश्यवर्गास धन्यता वाटत होती. भेदाभेद न ठेवतां श्रीमंतानीं सर्व जातींना पक्कान्नाचे सारखेंच भोजन घातलें, हीहि एक लोकाना अपूर्वच गोष्ट वाटत होती. दोन्ही दिवस मिळून एकंदर पाच हजाराचे वर पात्रें झालीं.

श्रीमंत बाबासाहेबांनीं संस्थानच्या नोकरवर्गास देणग्या देऊन संतुष्ट केलें. इतकेंच नव्हे, तर ते आपल्या पूर्वीच्या खासगी नोकरांसहि विसरले नाहींत. राज्यारोहणानिमित्त त्यांनाहि देणगीदाखल एकंदर रु. ८५०० देऊन श्रीमंत बाबासाहेबांनीं आपलें औदार्य प्रगट केलें.

भोर संस्थानचे माजी शाळाधिकारी रा. रा. वासुदेव नारायण जोशी यांनीं विनंति केल्यावरून श्रीमंत बाबासाहेबांनीं ता. २४ रोजीं हायस्कुलांत येऊन मुलांना बक्षिसें व मिठाई वांटण्याचें कबूल केलें. हायस्कूलचे हेडमास्तर रा. सामक यांनीं शहरांतील प्रतिष्ठित नागरिक व वरिष्ठ अंमलदार यांना निमंत्रणें केलीं. ठरलेल्या तारखेस दुपारीं चार वाजतां सर्व निमंत्रित मंडळी व विद्यार्थी हायस्कूलचे हॉलमध्यें जमले. श्रीमंतांची स्वारी श्रीमंत युवराजांसह बरोबर साडेचार वाजतां हायस्कुलांत आली. हायस्कूलच्या दाराजवळ हायस्कूलचे शाळाधिकारी व हेडमास्तर यांनीं त्यांचें स्वागत केल्यावर स्वाऱ्या हॉलमध्यें जाऊन स्थानापन्न झाल्या. नंतर मुलांचें सुस्वर पद्यगायन होऊन कांहीं संवाद झाल्यावर शाळाधिकारी यांनीं संस्थानांतील शिक्षण-खात्याचा सविस्तर अहवाल निवेदन केला. श्रीमंतांनीं उत्तरादाखल भाषण केलें तें येणेंप्रमाणें :—

## श्रीमंत बाबासाहेबांचें भोर हायस्कूलमधील भाषण

" शाळाधिकारी, हेडमास्तर, इतर शिक्षकवर्ग, सभ्य गृहस्थ व विद्यार्थीहो,

आतांच शाळाधिकारी यांनीं आपल्या भाषणांत राज्यारोहणानिमित्त मीं जें काय केलें आहे त्याबद्दल जे प्रशंसापर उद्गार काढले आहेत त्यांबद्दल मला संतोष वाटत आहे. परंतु मीं त्यांत कांहीं विशेष केलें आहे असें मला वाटत नाहीं, हेंहि मला येथें सांगणें जरूर वाटत आहे. कालमानानुरूप कर्तव्यापेक्षां मीं कांहीं जास्त केलें नाहीं अशी माझी समजूत आहे.

एकंदर हायस्कूलचा इतिहास सांगतांना शाळाधिकारी यांनीं मास्तरलोकांच्या कामगिरीसंबंधानें व विशेषतः हायस्कूलचे पहिले हेडमास्तर रा. श्रीपाद केशव भिडे मास्तर, यांचेसंबंधीं जें सांगितलें तें अगदीं खरोखर आहे व त्याबद्दल मला आनंद होत आहे. रा. रा. भिडे मास्तरांचें व माझें एकमेकांशीं गुरु-शिष्याचें नातें असल्यामुळें मला इतराप्रमाणेंच त्यांच्याविषयीं आदर व प्रेम वाटत आहे, व गुरुजी या नात्यानें त्यांची योग्यता मी जाणून आहें, हें येथें

सांगण्यास मला फार अभिमान वाटत आहे. सध्यांचा शिक्षकवर्गहि यापुढें पूर्वीप्रमाणेंच चोख रीतीनें व कळकळीनें व निस्वार्थीपणानें आपलें पवित्र कर्तव्य बजावून उत्तम शिष्यवर्ग तयार करील व हायस्कूलचा व पर्यायानें संस्थानचा नावलौकिक वाढविण्यास कारणीभूत होईल अशी मला उमेद आहे.

शाळाधिकारी यांनीं आपल्या भाषणांत सागितलें आहे कीं, लहान-सहान संस्थानांतून प्रयोगादाखल विनाकारण खर्च करूं नये; कोणतीहि पद्धत प्रयोगावस्थेच्या पलीकडे जाऊन कायम व यशस्वी झाली म्हणजे इकडे अंमलांत आणावी. ही त्यांची सूचना मला मान्य आहे. कारण त्या योगानें खर्च विना-कारण न होता लोकांच्या अनुभवाचा फायदा आपणांस करून घेतां येईल.

शेवटीं विद्यार्थ्यांस उपदेशपर दोन शब्द सांगण्यास मला विनंति करण्यांत आली आहे. माझ्या मतें हें काम फारच अवघड आहे. कित्येकांना तें कदाचित् सोपेंहि वाटत असेल, परंतु तसें मला वाटत नाहीं. तथापि विद्यार्थि-वर्गावर माझें अत्यंत प्रेम असल्यामुळें स्वानुभवसिद्ध असे दोन शब्द सांगतों.

विद्यार्थ्यांनीं या वयांत विद्यार्जनाप्रमाणें शरीर-सामर्थ्याकडेहि लक्ष फारच पुरविलें पाहिजे. कारण नुसती विद्या संपादन करून पुढील आयुष्यांत भागत नाहीं. विद्येला शरीर-सामर्थ्याची जोड लागते. नाहीं तर त्यांच्या हातून पुढें कोणतेंहि मोठे कार्य होत नाहीं. हा अनुभव मला स्वतःला असल्यामुळे पुढील तरुण पिढींनीं त्यासंबंधीं एव्हांपासून नीट खबरदारी घ्यावी, असा माझा त्यांना कळकळीचा उपदेश आहे. एकपरी परीक्षेंत नापास झालें तरी चालेल, परंतु विद्यार्थ्यांचा शारीरिक ऱ्हास झालेला पाहून मला बिलकुल बरें वाटणार नाहीं. कारण सध्यांच्या विद्यार्थिवर्गावरच संस्थानची सर्व प्रकारची भावी उन्नति अवलंबून आहे.

दुसरी गोष्ट विद्यार्थ्यांस सांगावयाची ती ही कीं, त्यांनीं आपल्या संस्थानचा अभिमान बाळगण्यास शिकलें पाहिजे, व तसें त्यांना शिक्षकवर्गानें शिकविलें पाहिजे. तसेंच शिक्षणाचा अंतिम हेतु नोकरी करून पैसे मिळविणें हा नसून आपण ज्या देशांत जन्मास आलों त्या देशाचा उद्धार करणें हा आहे; व त्याकरितां हरएक प्रकारचा थोडाबहुत तरी प्रत्येकानें स्वार्थत्याग करण्यास आतापासून शिकलें पाहिजे.

तिसरी गोष्ट म्हणजे विद्यार्थ्यांस उच्च प्रकारच्या धर्मशिक्षणाची जरुरी आहे; व ती जरुरी घरच्या शिक्षणानें अंशतः तरी भरून निघणारी आहे. कारण येथील विद्यार्थ्यांचा भरणा ब्राह्मणवर्गांतीलच असल्यामुळें घरीं धर्माचें शिक्षण आईबापाकडून सहज मिळत असलें पाहिजे. तथापि शिक्षकांनीं हरएक प्रसंगीं धर्मांतील उच्च तत्त्वें त्याचे मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करावा. धर्माखेरीज नीतिमत्ता सुधारणार नाही, नीतिखेरीज शील चागले बनणार नाहीं व शीलवान् नागरिकांखेरीज देशोद्धार होणार नाहीं, ही परंपरा ध्यानांत ठेविली पाहिजे. " शीलं परं भूषणं " हें कवींनीं म्हटलें आहे तें सर्वस्वीं खरें आहे. आपल्या धर्मांतील उच्च तत्त्वें मनावर उत्तम बिबलीं म्हणजे तो मनुष्य कोणत्याहि संकटाला तोंड देण्यास तयार होतो, व त्याच्या मनास खरीखुरी सात्त्विक शाति प्राप्त होते.

चवथी गोष्ट, विद्यार्थ्यांनीं विद्यार्थिदशेंत कोणत्याहि राजकीय, सामाजिक वगैरे गोष्टीसंबंधीं आपलीं मतें बनवून घेऊं नयेत. त्याविषयीं मतें बनविण्याची साधनसामग्री संपादन करावी व पुढें त्या साधनसामग्रीचा उपयोग करून प्रत्यक्ष अनुभवानें आपलीं मतें बनवावींत.

शिक्षणाच्या व्याख्या मोठमोठ्या पंडितांनीं नानाप्रकारच्या केल्या आहेत. परंतु सर्वसाधारण माझ्या मतें खऱ्या शिक्षणाची व्याख्या म्हणजे, ज्याच्या योगानें मनुष्याला आपली जबाबदारी उत्तम तऱ्हेनें व सुलभ रीतीनें पार पाडतां येते तें खरे शिक्षण होय. तशा प्रकारचें शिक्षण अंमलात आणण्यास संस्थानकडून शक्य तितका प्रयत्न केला जाईल; परंतु या गोष्टीला नगरशेट रामदास शेटजीं-प्रमाणें इतर धनिक लोकांनींहि शक्य तेवढी मदत केली पाहिजे. कारण शिक्षणासारखी दुसरी पवित्र वस्तु नाहीं व पवित्र स्थलीं धर्म करण्यासारखें दुसरें पुण्य नाहीं.

शेवटीं माझें भाषण शांत चित्तानें ऐकून घेतलें याबद्दल सर्वांचे आभार मानून मी रजा घेतों."

वरीलप्रमाणें श्रीमंत बाबासाहेबानी विद्यार्थ्यांना उपदेशपर भाषण करून बक्षिसें व मिठाई वांटली. नंतर श्रीमंताना व युवराजाना पुष्पहार घातल्यावर पानसुपारी, अत्तर-गुलाब वगैरे देण्यांत आलें.

शुक्रवार ता. २५ रोजीं दुपारीं तीन वाजता हायस्कूलच्या दिवाण-खान्यांतच श्री. सौ. राणीसाहेब यांच्या हस्तें शाळेंतील मुलींस पुस्तके, मिठाई व खण वांटण्याचा समारंभ झाला. या समारंभाकरिता शहरांतील बऱ्याच स्त्रियांना निमंत्रण करण्यांत आले होतें. त्याप्रमाणें त्या ठरलेल्या वेळेपूर्वीच हायस्कुलांत येऊन आपआपल्या जागीं बसल्या होत्या.

श्री. सौ. राणीसाहेब बरोबर तीन वाजता हायस्कुलात येऊन स्थानापन्न झाल्यावर मुलींनीं सुस्वर आवाजात स्वागतपर पद्यें म्हणून त्याचें स्वागत केले. नंतर शाळाधिकारी रा. जोशी यानीं सांगितलें कीं, "आजपर्यंत मुलींना खाऊ, बक्षिसें मिळत आलीं आहेत; पण तीं श्रीमंत सौ. राणीसाहेब याचे हस्तें मिळण्याचा हा पहिलाच योग होय. आजपर्यंत राजघराण्यातील स्त्रिया सार्वजनिक समारंभात भाग घेत नसत. ही जुनी रूढि मोडून श्रीमंत सौ. राणीसाहेबानीं हा नवीन उपक्रम सुरू केल्यामुळे आजचा दिवस भोरच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आहे." नंतर त्यांनीं श्रीमंत सौ. राणीसाहेबांच्या शिक्षणाबद्दल, बहुश्रुतपणाबद्दल व धार्मिक ग्रंथांच्या परिशीलना-बद्दल योग्य माहिती सांगितली व शेवटी श्रीमंत सौ. राणीसाहेबाच्या उत्तेजनानें संस्थानांत स्त्री-शिक्षणाची झपाट्यानें वाढ झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी आशा प्रदर्शित करून जमलेल्या स्त्रियाना व मुलींना स्त्री-शिक्षणाबद्दल चार शब्द सागून बक्षिसें वाटण्याबद्दल त्यानीं श्रीमंत सौ. राणीसाहेबाना विनंति केली.

शाळाधिकाऱ्यांनीं विनंति केल्याप्रमाणें श्रीमंत सौ. राणीसाहेब यानीं थोडक्यांत पुढीलप्रमाणें विचारपरिप्लुत व मार्गदर्शक भाषण केले.

## श्री. सौ. राणीसाहेब यांचें भाषण

" आज मुलींना मिठाई वांटण्याची जी संधि मला मिळाली तीबद्दल मला फार आनंद वाटत आहे. रा. रा. शाळाधिकारी यानीं आतां जी माझी स्तुति केली आहे तिला मी पात्र आहें असें मला वाटत नाहीं. माझे अंगीं विद्वत्ता नाहीं किंवा मी परीक्षा दिल्या नाहींत. शाळाधिकारी यांनीं मला भाषण करून उपदेश करण्याची विनंति केली आहे. परंतु आपणास उपदेश करण्याचा माझा अधिकार नाहीं. तथापि चार शब्द बोलणें मला भाग आहे. ते आपण शांतपणानें ऐकाल अशी मला आशा आहे.

शाळाधिकारी यांनीं मुलींच्या शिक्षणाची आतां जी स्थिति सांगितली ती समाधानकारक नाहीं असें मला वाटतें; परंतु दिवसानुदिवस स्त्री-शिक्षणाची आवड वाढत आहे याबद्दल संतोष वाटतो. पुरुषांना जशी शिक्षणाची जरुरी आहे तशी बायकांनाहि आहे ही गोष्ट आतां सर्वांना मान्य झाली आहे. मातांची योग्यता किती मोठी आहे हें आतां सर्व विचारी लोकांच्या पूर्ण लक्षांत आलें आहे. परमेश्वरानें पुरुषांप्रमाणें बायकांनाहि बुद्धि दिली आहे. पुरुषांच्या बुद्धीची जशी वाढ झाली पाहिजे, तशी बायकांच्या बुद्धीचीहि वाढ झाली पाहिजे. बायकांनीं घरांतील झाडसारव, स्वयंपाक, धुणींपाणी करणें वगैरे गोष्टी करावयाच्या असतात, त्यांना शिक्षण कशाला पाहिजे असें म्हणणारे कांहीं आहेत. त्यांना भीति वाटते कीं, बायका शिकल्यावर हीं कामें कोण करील. परंतु ही त्यांची चूक आहे. असले विचार अप्पलपोटेपणाचे आहेत. बायकांना शिक्षण मिळालें तर त्या आपल्या पतींना प्रत्येक कामांत चांगली मदतच करतील. पुरुषांचीं कामें निराळीं व बायकांचीं कामें निराळीं हें खरें आहे; परंतु कोणतेंहि कां काम असेना, तें उत्तम रीतीनें करतां येण्यास शिक्षण अवश्यच आहे. जन्मास येऊन प्रत्येकास आपलें कर्तव्य बजावितां आलें म्हणजे जन्माचें सार्थक झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु आपलें योग्य कर्तव्य कोणतें, आपल्यावर कोणती जबाबदारी आहे, हें शिक्षणावांचून चांगलें कळणार नाहीं. म्हणून शिक्षण मिळविणें किती जरुरीचें आहे हें आपल्या लक्षांत येईल.

पुरुषांचीं व बायकांचीं कामें निरनिराळीं असल्यामुळें पुरुषांना ज्या प्रकारच्या शिक्षणाची जरुरी आहे, त्याच प्रकारचें शिक्षण बायकांना मिळालें पाहिजे असें नाहीं. आर्य धर्माला, आर्य चालीरीतींना व आर्य समाजपद्धतीला अनुसरून स्त्री-शिक्षण मिळालें पाहिजे. समाजव्यवस्था न बिघडतां कौटुंबिक सुख वाढेल अशा प्रकारच्या शिक्षणाची बायकांना जरुरी आहे. प्रत्येक स्त्रीला लिहितां वाचतां येऊन तिनें धार्मिक, नैतिक, बौद्धिक व शारीरिक शिक्षण मिळविलें पाहिजे. तरच तिला तिच्यावर येणारी जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडतां येईल. स्त्रियांच्यावर मुख्य जबाबदारी गृहव्यवस्थेची, बालसंगोपनाची व बालशिक्षणाची आहे. त्यांचें मुख्य कर्तव्य हेंच आहे व हें बजावितां येण्याकरितां सामान्य, धार्मिक, नैतिक व आरोग्यविषयक शिक्षणाची अत्यंत

जरुरी आहे. मुलें चांगलीं किंवा वाईट निघणें हें मातांच्यावर अवलंबून आहे. माता जर सुशिक्षित असतील तर मुलें चांगलीं निघतील. मुलें दुर्व्यसनी निघालीं, अनीतिमान निघालीं तर त्याचा दोष बहुतांशीं त्यांचे मातांकडेच आहे. म्हणून आपलेवर केवढी जबाबदारी आहे हें ओळखून आपण आपल्या मुलींना शिक्षण देण्याचे कामीं बिलकुल हलगर्जीपणा करतां उपयोगी नाहीं. कारण त्याच पुढें माता होणार आहेत. मुलींना शिवणकाम, वीणकाम, सूत काढणें इत्यादि उपयुक्त कामें येऊन त्यांना गायनकलेचीहि माहिती असणें जरूर आहे. येथील मुलींची शाळा नमुनेदार व्हावी अशी माझी इच्छा आहे व तशी ती करण्याचे कामीं मी शक्य तों प्रयत्न करीन.''

वरील भाषण केल्यानंतर श्रीमंत सौ. राणीसाहेबानीं मुलींना खण, पुस्तकें व खाऊ वांटला. नंतर श्री. सौ. अन्नपूर्णाबाई भिडे यांनीं श्री. सौ. राणीसाहेब याना हळदकुंकू, पुष्पहार, पानसुपारी दिल्यावर सर्व स्त्रियाना हळदकुंकू, पानसुपारी देण्यांत आली. शेवटीं श्री. सौ. इंदिराबाई जोशी यांनीं योग्य शब्दात श्री. सौ. राणीसाहेबाचे आभार मानल्यावर पुन्हा मुलींचें गाणें होऊन समारंभ आटोपला. श्री. सौ. राणीसाहेब दिवाणखान्यातून बाहेर जात असतांना मुली त्यांचा जयजयकार करीत होत्या. ज्या मुली जवळ येत होत्या त्यांच्या तोंडांवरून त्या मातृप्रेमानें हात फिरवीत होत्या व त्याचा निरोप घेत होत्या.

अशा प्रकारचा समारंभ भोरच्या स्त्रियांना अगदींच नवीन असल्यामुळें स्त्रीवर्गांत श्री. सौ. राणीसाहेबांच्याबद्दल धन्योद्गार ऐकूं येत होते. भोरापासून फार दूर नसलेल्या पुणें शहरांत स्त्रीशिक्षणाचा प्रसार किती झपाट्यानें होत आहे व स्त्रियाना किती स्वातंत्र्य आहे, ही गोष्ट भोरातील नवीन पिढींतील स्त्रियांना माहित नव्हती असें नाहीं. परंतु योग्य उत्तेजनाच्या अभावीं भोरास स्त्री-शिक्षणाची वाढ खुरटलेली होती. श्रीमंत बाबासाहेब स्त्रीशिक्षणाभिमानी असून स्त्रियाना काहीं बाबतींत स्वातंत्र्य असलें पाहिजे असें त्यांचें मत असल्यामुळें त्यांनीं मुलींचा बक्षिससमारंभ श्री. सौ. राणीसाहेबांस करण्यास परवानगी दिली. भोरांत पूर्वीं बायकांनीं समाजांत उभें राहून भाषण करणें म्हणजे महत्‌पाप गणलें जाई. परंतु या समारंभाच्या वेळीं श्रीमंत सौ. राणीसाहेब

यांनीं भाषण करून स्त्रियांच्या कर्तव्याची जाणीव स्त्रीवर्गासच करून दिली. तेव्हां स्त्रीवर्गांत उत्पन्न करून ठेविलेली पातकाची खोटी भीति नाहींशी होऊन स्त्रीवर्ग खडबडून जागा झाल्यासारखा दिसूं लागला. श्री. सौ. राणीसाहेबांच्या भाषणाचा चांगलाच परिणाम झाला. पूर्वी स्त्रीशिक्षणाची अनास्था होती. श्री. सौ. राणीसाहेब यांनीं पुढाकार घेतल्यामुळें तेव्हांपासून मराठी व इंग्रजी शाळेंत मुलींची संख्या कशी वाढत आहे हें पुढें सांगण्यांत येणार आहे.

ता. १८ ऑगस्टपासून राज्यारोहणानिमित्त एक आठवडा समारंभांत गेला व हा आठवडा अत्यंत महत्त्वाचा असून भोर संस्थानच्या इतिहासांत संस्मरणीय असाच झाला.

## श्रीमंत बाबासाहेबांच्या राजकीय धोरणासंबंधीं लोकमत

श्रीमंत रावसाहेब दिवंगत झाले तेव्हां त्यांच्या वेळच्या अधिकारीवर्गापैकीं काहीं व्यक्तींना आपले आता उच्चाटन होणार अशी भीति उत्पन्न झाली. श्रीमंत बाबासाहेबांची आपणावर पूर्ण कृपादृष्टि आहे असें ज्याना वाटत होतें, त्यांना आपणास आता मोठमोठ्या अधिकाराच्या जागा मिळणार असें वाटूं लागलें व असे अधिकार मिळण्यापूर्वींच त्याच्या तोंडून चढेलपणाचीं भाषणेंहि ऐकूं येऊं लागलीं. श्रीमंत बाबासाहेबांच्या राजकीय धोरणासंबंधींहि अनेकाच्या अनेक कल्पना व विचार चालू होते. पूर्वींची राज्यपद्धति मोडून श्रीमंत बाबासाहेब एकदम सर्व अधिकार प्रजेच्या स्वाधीन करून लोकसत्ताक-राज्यपद्धति सुरू करतील असें काहीं उतावीळ वृत्तीच्या स्वार्थपरायण व प्रजाशासनशास्त्राचा गंधहि नसतांना सर्वज्ञतेची घमेंड बाळगणाऱ्या कांहीं स्वयंमन्य पुढाऱ्याना वाटत होतें व आपल्या हातीं अधिकार आल्यावर आपल्या इच्छेप्रमाणें आपण वाटेल त्या सुधारणा घडवून आणूं अशीहि वल्गना त्याच्या तोंडून ऐकूं येत असे. सारांश, जो तो आपल्या कल्पनेप्रमाणें मनोराज्य उभारण्यात दंग झालेला दिसत होता. कांहीं भीतीनें गांगरून गेले होते, तर कांहीं भावी उत्कर्षाच्या आशेनें आनंदित झाले होते. सर्वजणाचें लक्ष श्रीमंत बाबासाहेबाच्या राज्यारोहणाच्या वेळच्या भाषणाकडे लागलें होतें. राज्यारोहणसमारंभाच्या दिवशीं व मानपत्रांच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं भाषणें करून आपलें ध्येय व राज्यकारभाराचें धोरण जाहीर केलें. तेव्हा राजकारणी व विचारवंत लोकांना

श्रीमंत बाबासाहेब यांच्या अंगच्या मुत्सद्दीपणाची ओळख पटून त्यानीं त्याच्या दोन्ही भाषणांची तारीफच केली. हीं दोन्ही भाषणें अत्यंत महत्त्वाचीं असून त्यांत जाहीर केलेल्या धोरणास अनुसरूनच शक्य तोंवर श्रीमंत बाबासाहेबांनीं राज्यकारभार चालविला आहे हें सागण्याची आवश्यकता नाहीं. श्रीमंत बाबासाहेबाचें धोरण जाहीर होतांच अनेकांचा भ्रमनिरास झाला. उतावळ्या पुढाऱ्यांचीं मनोराज्यें ढासळून पडलीं. संस्थानांत असलेल्या नोकरवर्गास जी भीति वाटत होती ती दूर झाली. प्रजेला देणग्या मिळून विषमतादर्शक जाचक कर नाहींसे झाल्यामुळें प्रजा संतुष्ट झाली. वेदशाळा स्थापन करण्याचा हेतु जाहीर केल्यामुळें वैदिकांना आनंद झाला. पूर्वीचा अधिकारीवर्ग नाहींसा होऊन आपणास अधिकाराच्या जागा मिळतील असें ज्या आशाळभूतांना वाटत होतें त्याची फजिती उडून ते उपहासास पात्र झाले. तात्पर्य, श्रीमंत बाबासाहेबांनीं आपले भावी धोरण अखेरपर्यंत गुप्त ठेविल्यामुळें त्यांचें गूढमंत्रत्व व दूरदर्शित्व लोकनिदर्शनास येऊन त्याच्या या गुणाची सर्वत्र प्रशंसा झाली.

राज्यारोहणसमारंभाचे वेळीं श्रीमंत बाबासाहेब यानीं जें भाषण केले तें मे. पोलिटिकल एजंट मि. डब्ल्यू. एफ्. हडसन यांनाहि पसंत पडून त्यानीं दुसरे दिवशीं श्रीमंत बाबासाहेबांना पुढील पत्र पाठविलें.

Poona, 19-8-1922

My dear Chief Saheb,

After I had posted my letter to you this morning the Chitnis gave me yours of today and the copy of your speech. I am very glad to have the letter. I thought it an excellent speech and your concessions most wise ones.

Yours sincerely
W. F. HUDSON

राज्यारोहणाच्या वेळचें भाषण व दुसरे दिवशीं मानपत्रांस उत्तरादाखल केलेलें भाषण या दोन्ही भाषणांबद्दल प्रमुख वर्तमानपत्रातून प्रशंसापर लेख आले होते. ता. २२ ऑगस्टचे केसरींत या भाषणावर तीन स्फुट लेख आले होते. त्यातील उतारे पुढें दिले आहेत. त्यांवरून श्रीमंत बाबासाहेबांच्या प्रगतिपर धोरणाबद्दल जनतेंत कशा प्रकारचें मत झालें तें दिसून येणार आहे, व श्रीमंत बाबासाहेबांस परिस्थितीचें कसें बरोबर आकलन झालें होतें, हें ह्या उताऱ्यांवरून व श्रीमंतांनीं प्रजापरिषदेच्या मानपत्रास उत्तर दिलें, त्यावरून दिसून येणार आहे.

## ता. २२ माहे ऑगस्ट सन १९२२ च्या केसरींतील उतारे

"भोर येथील यापूर्वींचा राज्यारोहणसमारंभ सन १८७१ सालीं झाला. तो इतका जुना असल्यानें चालू पिढीच्या आठवणींत हा पहिला समारंभ होता हें तर खरेंच, पण प्रस्तुतचा समारंभ अनेक दृष्टींनींहि अपूर्व झाला, यांत संशय नाहीं. वरिष्ठापासून कनिष्ठापर्यंत सर्व दर्जांचे प्रजाजन भोर येथें हजर असून, त्यांनीं दिलेल्या अनेक मानपत्रांतून श्रीमंत बाबासाहेब यांचें जें अभिनंदन केलें तें मनःपूर्वक होतें. तसेंच नव्या कारकीर्दीपासून प्रजेला सुख लाभण्याच्या अनेक गोष्टी होतील ही त्यात दर्शविलेली आशा सर्वस्वी यथार्थ आहे असें आम्हांस वाटतें. या प्रसंगीं हजर असलेले पो. ए. मि. हडसन् यांनीं सूचित केल्याप्रमाणें नव्या संस्थानाधिपतींपुढें लवकरच अनेक बिकट प्रश्न उभे राहतील, व त्यांतून त्यांना धिमेपणानें व धैर्यानें मार्ग काढावा लागेल यांत संशय नाहीं.

"श्रीमंत बाबासाहेब यांनीं मानपत्रांस उत्तर देतांना आपल्या अडचणींचा उल्लेख केला तो कांहीं खोटा नाहीं. एकतंत्रीपणाचा पाढा पन्नास वर्षेंपर्यंत जुन्या कारकीर्दींत घटविला गेल्यामुळें, व प्रजेच्या आकांक्षा परिस्थिति पाहून एकदम वाढल्यामुळें, मागणाराची अपेक्षा व देणाराची इच्छा यांच्या गतीला पुरी पडेल इतकी शीघ्र सुधारणा होणार नाहीं हें आम्हांस मान्य आहे. तथापि सुदैवानें भोर संस्थान इतकें समृद्ध आहे कीं, चालचलाऊ जरूरीच्या सुधारणा करण्याचें यजमानसाहेबांनीं मनांत आणल्यास तें सहज सिद्ध होईल. त्याला केवळ यक्षिणीची कांडी नको. किंबहुना ही गोष्ट त्यांनीं स्वतः प्रत्यक्ष कृतीनें प्रारंभींच थोडीफार करून दाखविलीहि आहे. कारण ज्या कांहीं जुलमाच्या बाबी त्यांनीं एकदम सोडल्या, त्या सोडाव्या असें मनांत नसतें तर, त्यांना बरेच दिवस घोळ घालतां आला असता, व प्रजेलाहि त्रास सोसून तितके दिवस चळवळ करावी लागली असती.

"२. श्रीमंतांनीं मानपत्रास उत्तर देतांना केलेल्या भाषणांत परिस्थितीचें योग्य आकलन केलेलें दिसून येतें, व आपल्या धोरणाची जी स्थूल रेषा त्यांनीं या भाषणांत आंखली आहे तिला धरून जर पुढील कारभार झाला तर, कारभाराच्या उमेदीचें वय फुकट गेलें असें जें त्यांना वाटतें, व जें एका अर्थानें खरेंहि आहे, तें खरोखरच फुकट गेलेलें नाहीं असेंच सर्वांच्या निदर्शनास येईल."

## श्रीमंत बाबासाहेब यांचा ४४ वा वाढदिवस

ता. १८ ऑगस्ट रोजीं राज्यारोहणसमारंभ झाल्यानंतर पुढील महिन्यांत म्हणजे ता. २० सप्टेंबर रोजीं श्रीमंत बाबासाहेबांचा चव्वेचाळीसावा वाढदिवस होता. श्रीमंतांचें राज्यारोहण झाल्यानंतर त्यांचा वाढदिवस साजरा करण्याचा मंगल प्रसंग भोर संस्थानच्या प्रजेस प्रथमच लाभला असल्यामुळें संस्थान-प्रजासभेच्या कार्यकारी मंडळानें या शुभ प्रसंगीं भरणाऱ्या दरबारांत श्रीमंत बाबासाहेबांना मानपत्र अर्पण करण्याचें ठरविलें व त्यांची परवानगी मागितली. श्रीमंत बाबासाहेब यांनीं मंडळाचे विनंतीस मान देऊन मानपत्र स्वीकारण्याचें कबूल केलें.

वरील वाढदिवसाचे समारंभाकरितां श्रीराम-मंडपांतच दरबार भरविण्याचें ठरविण्यांत आलें. ता. २० रोजीं सकाळीं पुण्याहून भोर संस्थान-प्रजासभेच्या कार्यकारी मंडळाचे बहुतेक सभासद, त्याचप्रमाणें प्रत्येक तालुक्यांतून कांहीं सभासद आले होते. दुपारीं ४ वाजता दरबार भरला. श्रीमंत बाबासाहेब दरबारात येऊन स्थानापन्न झाल्यावर प्रजासभेचे अध्यक्ष रा. दत्तोपंत पटवर्धन, वकील, यांनीं मानपत्र वाचून दाखविलें. सदर मानपत्रांत राज्यारोहणाच्या वेळीं दिलेल्या देणग्या व आश्वासनें यांबद्दल गौरवपूर्वक उल्लेख केला होता.

श्रीमंत बाबासाहेबाना राज्यारोहणाच्या दुसऱ्या दिवशीं मानपत्रें अर्पण करण्यात आलीं होतीं. त्या वेळीं त्यानीं उत्तरादाखल केलेल्या भाषणांत आपल्या राज्यकारभाराचें धोरण जाहीर केलेंच होतें. वरील प्रजासभेच्या मानपत्रास त्यांनीं जें उत्तर दिले त्यात त्यांनीं आपल्या धोरणाचा जास्त खुलासा केला आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

## श्रीमंत बाबासाहेब यांच्या भाषणांतील महत्त्वाचा भाग

"सद्गृहस्थहो, आमच्या राज्यारोहणसमारंभाचे वेळीं आम्हास जीं मानपत्रें अर्पण करण्यांत आलीं तीं सामान्यतः आमचे अधिकारी, नोकर व रयत लोक यांचें तर्फेचीं होतीं व कांहीं लोकोपयोगी पुण्याचे सार्वजनिक संस्थांचे वतीनें देण्यांत आलीं. परंतु आजचें मानपत्र अखिल भोर संस्थान-प्रजासभेचें असून ही सभा लोकांच्या गाऱ्हाण्यांची दाद लावण्याकरितां जन्मास आलेली असल्यामुळें व या सभेच्या कामांत संस्थानाबाहेर राहणाऱ्या संस्थानांतील व परस्थ विद्वान्

लोकांची मदत असल्याकारणानें आजच्या मानपत्राबद्दल आम्हांस विशेष संतोष व अभिमान वाटणें साहजिक आहे आणि त्यांतहि पूर्वीच्या मानपत्रांप्रमाणेंच कोणतीहि विशिष्ट मागणी मानपत्रांत न घालण्याचे धोरण कार्यकारी मंडळानें कायम ठेवलें असून त्यामुळें आमचे मार्गांत कोणतीहि अडचण घालण्यांत आली नाहीं, याबद्दल मंडळाचे चालक व सल्लागार यांचे आम्ही फार आभारी आहोंत.

आमच्या राज्यारोहणाच्या समारंभाचे वेळींच मानपत्र देण्याचा सभेचा हेतु आहे असें आम्हांस कळविण्यात आले होतें. परंतु कोणत्याहि कारणानें कां होईना हें मानपत्र त्या वेळीं न होता आज सवडीचे दिवशीं होत आहे हेंहि एका अर्थी बरेंच झाले असें आम्ही समजतों. कारण प्रस्तुत दुसरा कांहीं कार्यक्रम नसल्यामुळे कार्यकारी मंडळाचे प्रतिनिधींस आमच्या कारभाऱ्यांची खासगी रीतीनें भेट घेऊन आपले विचार मोकळेपणानें प्रदर्शित करण्याची संधि मिळत आहे व कारभारी राजेश्री नानासाहेब धायगुडे याचे मार्फत सभेचे हेतु व गाऱ्हाणीं यांची माहिती आम्हास कळत आहे. सांप्रतचे परिस्थितींत राजा व प्रजा याच्या दरम्यानचे संबंध सलोख्याचे राहण्याचे कामीं अशा प्रकारचा विचारविनिमय होणें अत्यंत अवश्य आहे, अशी आमची समजूत आहे व यामुळे आजच्या समारंभाचें आम्हांस विशेष महत्त्व वाटतें.

प्रजासभेच्या काही सभासदानीं मानपत्र देण्यासंबंधीं समक्ष आमची भेट घेऊन परवानगी मागितली, त्या वेळीं संस्थानातील प्रजेपैकीं हजारों मावळे प्रतिनिधी जमवून आमचे गाडीचे घोडे सोडून आमची थाटानें मिरवणूक काढण्याबद्दल संमति मिळावी म्हणून विनंति केली; परंतु या गोष्टीस मान्यता देणें आम्हांस सयुक्तिक वाटलें नाहीं, म्हणून आम्हीं ती नाकबूल केली. यामुळे मंडळींचा मोठा हिरमोड झाला असेल. परंतु विचारांतीं आम्हीं दिलेले उत्तर वाजवी आहे असें आपल्याहि लक्षात येईल, अशी आम्हांस उमेद आहे. हा मान फार मोठा असल्यामुळें समक्ष भेटींत आम्हीं प्रतिनिधींचे म्हणण्यास रुकार देता येत नाहीं म्हणून सागितलें. परंतु त्यास आणखीहि काहीं कारणें आहेत तीं आज आपला गैरसमज राहूं नये म्हणून सांगण्याचें योजिले आहे.

सदर बहुमानास संमति न देण्याचें पहिलें कारण असें आहे कीं, हा मान फार मोठा असून ज्यानीं अपार बुद्धिसामर्थ्याचे योगानें किंवा द्रव्यद्वारा

अथवा खडतर शारीरिक कष्ट सोसून लोक-कल्याण साधलेले असतें व अशा रीतीनें जनतेची किंवा मातृभूमीची सेवा केलेली असते अशा सुप्रसिद्ध पुढाऱ्यांना अथवा फार मोठ्या भू-प्रदेशावर साम्राज्य-सत्ता अधिकाराने व तेजस्वीपणानें गाजविण्याचें महद्भाग्य ज्यांना लाभतें त्यांनाच देण्यांतील आहे. तेव्हा अशा बहुमानास बिलकुल पात्रता नसतां मान्यता देण्यात मोठा प्रमाद झाला असता, अशी आमची समज आहे.

सद्गृहस्थहो, आम्हास ज्या विशेष गोष्टी सांगावयाच्या होत्या त्या आम्हीं राज्यारोहणाचे वेळच्या मानपत्रात उत्तर देताना कळविल्याच आहेत. आज आणखी सुचवावयाचें म्हणून इतकेंच की, आमचा राजनिष्ठापूर्वक गौरव आपण करीत आहा तो मनापासून आहे असे आम्ही गृहित धरून चालतों; व त्या विश्वासावर आमच्या अडचणी निष्कारण आपल्याकडून वाढणार नाहींत अशी आम्हांस उमेद आहे. कारण लोकमतास एकदां अनिष्ट चलन मिळाले म्हणजे कांहीं केलें तरी पुढाऱ्यासहि आवर घालण्यास जड जातें हें आपणहि जाणत आहां. यामुळें आपणाकडून असे अनिष्ट चलन मिळणार नाहीं, असा आम्हांस भरंवसा आहे.

सरते शेवटीं आपण जें मानपत्र अर्पण करून आमचा आज गौरव केला व लोकनायकाप्रमाणें आमची गाडी ओढून मिरवणूक काढण्याचें मनात आणले होतें याबद्दल पुन्हां एकवार आपले आभार मानून आम्ही आपलें भाषण पुरें करतों."

हा समारंभ झाल्यानंतर श्रीमंतांनीं मावळे लोक व त्यांचे पुढारी याचे-बरोबर अल्पोपाहार केला.

## किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलचें मानपत्र

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर पुणें येथील किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल या संस्थेनें श्रीमंताना मानपत्र देण्याचा आपला हेतु कळवून संस्थेस भेट देऊन मानपत्राचा स्वीकार करावा अशी विनंती केली. राज्यारोहणानंतर दुसऱ्या अनेक कामकाजामुळे वरील संस्थेचें मानपत्र स्वीकारण्यास एक वर्षपर्यंत श्रीमंत राजेसाहेब यांना सवड झाली नाहीं. थोडें स्थिरस्थावर झाल्यावर व

लोकांची मदत असल्याकारणानें आजच्या मानपत्राबद्दल आम्हांस विशेष संतोष व अभिमान वाटणें साहजिक आहे आणि त्यांतहि पूर्वीच्या मानपत्रांप्रमाणेंच कोणतीहि विशिष्ट मागणी मानपत्रांत न घालण्याचें धोरण कार्यकारी मंडळानें कायम ठेवलें असून त्यामुळें आमचे मार्गांत कोणतीहि अडचण घालण्यांत आली नाहीं, याबद्दल मंडळाचे चालक व सल्लागार यांचे आम्ही फार आभारी आहोंत.

आमच्या राज्यारोहणाच्या समारंभाचे वेळींच मानपत्र देण्याचा सभेचा हेतु आहे असें आम्हांस कळविण्यांत आले होतें. परंतु कोणत्याहि कारणानें का होईना हें मानपत्र त्या वेळीं न होतां आज सवडीचे दिवशीं होत आहे हेंहि एका अर्थी बरेंच झालें असें आम्ही समजतों. कारण प्रस्तुत दुसरा काहीं कार्यक्रम नसल्यामुळें कार्यकारी मंडळाचे प्रतिनिधींस आमच्या कारभाऱ्यांची खासगी रीतीनें भेट घेऊन आपले विचार मोकळेपणानें प्रदर्शित करण्याची संधि मिळत आहे व कारभारी राजेश्री नानासाहेब धायगुडे यांचे मार्फत सभेचे हेतु व गाऱ्हाणीं यांची माहिती आम्हास कळत आहे. साप्रतचे परिस्थितींत राजा व प्रजा यांच्या दरम्यानचे संबंध सलोख्याचे राहण्याचे कामीं अशा प्रकारचा विचारविनिमय होणें अत्यंत अवश्य आहे, अशी आमची समजूत आहे व यामुळे आजच्या समारंभाचें आम्हांस विशेष महत्त्व वाटतें.

प्रजासभेच्या कांहीं सभासदानीं मानपत्र देण्यासंबंधीं समक्ष आमची भेट घेऊन परवानगी मागितली, त्या वेळीं संस्थानातील प्रजेपैकीं हजारों मावळे प्रतिनिधी जमवून आमचे गाडीचे घोडे सोडून आमची थाटानें मिरवणूक काढण्याबद्दल संमति मिळावी म्हणून विनंति केली; परंतु या गोष्टीस मान्यता देणें आम्हास सयुक्तिक वाटले नाहीं, म्हणून आम्हीं ती नाकबूल केली. यामुळें मंडळींचा मोठा हिरमोड झाला असेल. परंतु विचारांतीं आम्हीं दिलेलें उत्तर वाजवी आहे असें आपल्याहि लक्षांत येईल, अशी आम्हांस उमेद आहे. हा मान फार मोठा असल्यामुळें समक्ष भेटींत आम्हीं प्रतिनिधींचे म्हणण्यास रुकार देतां येत नाहीं म्हणून सांगितले. परंतु त्यास आणखीहि काहीं कारणें आहेत तीं आज आपला गैरसमज राहूं नये म्हणून सांगण्याचें योजिलें आहे.

सदर बहुमानास संमति न देण्याचें पहिलें कारण असें आहे कीं, हा मान फार मोठा असून ज्यांनीं अपार बुद्धिसामर्थ्याचे योगानें किंवा द्रव्यद्वारा

अथवा खडतर शारीरिक कष्ट सोसून लोक-कल्याण साधलेले असतें व अशा रीतीनें जनतेची किंवा मातृभूमीची सेवा केलेली असते अशा सुप्रसिद्ध पुढाऱ्याना अथवा फार मोठ्या भू-प्रदेशावर साम्राज्य-सत्ता अधिकारानें व तेजस्वीपणानें गाजविण्याचें महद्भाग्य ज्याना लाभतें त्यानाच देण्यातील आहे. तेव्हा अशा बहुमानास बिलकुल पात्रता नसतां मान्यता देण्यात मोठा प्रमाद झाला असता, अशी आमची समज आहे.

सद्गृहस्थहो, आम्हास ज्या विशेष गोष्टी सागावयाच्या होत्या त्या आम्हीं राज्यारोहणाचे वेळच्या मानपत्रात उत्तर देताना कळविल्याच आहेत. आज आणखी सुचवावयाचें म्हणून इतकेच की, आमचा राजनिष्ठापूर्वक गौरव आपण करीत आहा तो मनापासून आहे असे आम्ही गृहित धरून चालतों; व त्या विश्वासावर आमच्या अडचणी निष्कारण आपल्याकडून वाढणार नाहींत अशी आम्हास उमेद आहे. कारण लोकमतास एकदां अनिष्ट चलन मिळाले म्हणजे काहीं केले तरी पुढाऱ्यासहि आवर घालण्यास जड जातें हे आपणहि जाणत आहां. यामुळें आपणांकडून असें अनिष्ट चलन मिळणार नाहीं, असा आम्हास भरंवसा आहे.

सरते शेवटीं आपण जें मानपत्र अर्पण करून आमचा आज गौरव केला व लोकनायकाप्रमाणें आमची गाडी ओढून मिरवणूक काढण्याचें मनांत आणलें होतें याबद्दल पुन्हां एकवार आपले आभार मानून आम्ही आपले भाषण पुरें करतों."

हा समारंभ झाल्यानंतर श्रीमंतानीं मावळे लोक व त्याचे पुढारी याचे-बरोबर अल्पोपाहार केला.

## किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलचें मानपत्र

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर पुणे येथील किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल या संस्थेनें श्रीमंताना मानपत्र देण्याचा आपला हेतु कळवून संस्थेस भेट देऊन मानपत्राचा स्वीकार करावा अशी विनंती केली. राज्यारोहणानंतर दुसऱ्या अनेक कामकाजामुळें वरील संस्थेचें मानपत्र स्वीकारण्यास एक वर्षपर्यंत श्रीमंत राजेसाहेब याना सवड झाली नाहीं. थोडें स्थिरस्थावर झाल्यावर व

मनाला थोडें स्वास्थ्य मिळाल्यावर १९२३ च्या ऑगस्ट महिन्याच्या ३१ तारखेस श्रीमंत राजेसाहेब यानीं वरील संस्थेस भेट दिली व मानपत्राचा स्वीकार केला. या समारंभास पुण्याचे कलेक्टर, कमिशनर, सिव्हिल सर्जन व दुसरे बरेच सरकारी अधिकारी व सरदार लोक हजर होते. संस्थेच्या अध्यक्षांनीं मानपत्र वाचून दाखवून तें श्रीमंत राजेसाहेब यांना अर्पण केल्यावर श्रीमंत राजेसाहेब यांनीं, हा समारंभ मुद्दाम घडवून आणून आपला सन्मान केल्याबद्दल संस्थेच्या चालकांचे आभार मानले. पानसुपारी झाल्यावर हा समारंभ समाप्त झाला.

## पिरंगूट येथील मानपत्र

श्रीमंत राजेसाहेब यांनीं १९२२ मध्यें संस्थानांतील सर्व तालुक्यातून जमाबंदीचा दौरा काढला त्या वेळीं पिरंगूट येथें प्लेग सुरू असल्यामुळें तेथें जाण्याचें त्या वेळीं रहित केलें होतें. तेथील सांथ नाहींशी झाल्यावर तेथील रहिवाश्यांनीं पिरंगूटला भेट देऊन तेथील लोकांचें मानपत्र स्वीकारण्याची श्रीमंतांना विनंती केली. त्या विनंतीस अनुसरून श्रीमंत राजेसाहेब ता. ९ सप्टेंबर १९२३ रोजीं पिरंगुटास गेले त्या वेळीं तेथील रहिवाश्यांनीं त्यांचें अत्यंत उत्साहानें स्वागत केलें व स्वागत मंडळाच्या अध्यक्षांनीं मानपत्र वाचून दाखवून तें श्रीमंतांना अर्पण केलें. त्यावर श्रीमंतांनीं समयोचित भाषण करून मानपत्राबद्दल आभार मानले. यानंतर पिरंगूट येथील प्रसिद्ध रहिवासी व त्या वेळचे चिंचवड संस्थानचे ट्रस्टी श्री. रा. रा. एम्. एच्. देव, यांनीं श्रीमंतांच्या स्तुतिपर भाषण करून पिरंगुटास येऊन मानपत्राचा स्वीकार केल्याबद्दल अंतःकरणपूर्वक आभार मानले. हारतुरे पानसुपारी झाल्यावर हा समारंभ आटोपला व श्रीमंत राजेसाहेब मुक्कामास पुण्यास आले.

---

# प्रकरण ३ रें

# मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड यांचें भोरास आगमन

राज्यारोहणसमारंभाच्या सर्व कार्यक्रमांतून मोकळे झाल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांनीं त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड याना भोरास भेट देण्याबद्दल विनंति केली. माजी गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल १८ जून १८७८ मध्यें भोरास आले. यांचे कारकीर्दीपासून प्रत्येक गव्हर्नरनें आपल्या पंचवार्षिक कारकीर्दींत भोरास एकदा भेट देण्याचा क्रम सुरू ठेविला होता. त्यात कधीं खंड पडला नाहीं. या प्रघातास अनुसरून सर जॉर्ज लॉइड यानीं श्रीमंत बाबासाहेबांच्या विनंतीस मान देऊन ता. २४ ऑक्टोबर सन १९२२ इ. रोजीं भोरास येऊन वरील प्रथा कायम ठेविली.

## स्थानिक स्वराज्याचा उपक्रम

कै. श्रीमंत रावसाहेबांच्या कारकीर्दींत प्रत्येक गव्हर्नर भोरास येत असत त्या वेळीं त्यांना भोर म्युनिसिपालिटीतर्फे मानपत्र अर्पण करण्यात येई. परंतु, त्या वेळची म्युनिसिपालिटी म्हणजे एक नांवाचीच संस्था असून तिचा सर्व कारभार सरकारमार्फत चालत असे. संस्थानच्या इतर खात्यांप्रमाणें तें एक खातें असून त्या खात्याचे हिशेब निराळे ठेवण्यांत येत असत, इतकेंच. या खात्यावर सरकारांतूनच एक सेक्रेटरी नेमिला असून, त्याच्यामार्फत सर्व कामें चालत. म्युनिसिपालिटीचा कोणीतरी एक नामधारी अध्यक्ष नेमिला जाई. त्याच्याकडे काम कांहींच नसे. म्युनिसिपालिटीस कांहींच अधिकार नसल्यामुळें सभासद नेमण्याचें प्रयोजन नव्हतेंच. श्रीमंत बाबासाहेब म्युनिसिपालिटीची ही स्थिति पाहत आले होते. त्यांना ही पद्धत मुळींच पसंत नव्हती. म्हणून त्यांनीं गादीवर आल्यानंतर पुढील महिन्यांत म्हणजे सप्टेंबरमध्यें भोर म्युनिसिपालिटीची पुनर्घटना करून भोरचे नागरिकांना स्थानिक स्वराज्याचे हक्क देण्याचें ठरविलें, व ही सुधारणा ताबडतोब अमलांत आणण्याकरिता त्यांनीं बॉंबे म्युनिसिपल ॲक्ट संस्थानांत लागू केला.

या ॲक्टाप्रमाणें प्रथम त्यांनीं अध्यक्षासुद्धां १६ सभासद नेमण्याचें ठरविलें. त्यांत ९ सरकारी व ७ बिनसरकारी सभासद नोकर नसलेले असावे असा नियम केला. हा उपक्रम नवीनच असल्यामुळें एकदम निवडणुकीचें तत्त्व लागू न करितां बिनसरकारी सभासद सरकारनियुक्तच असणें श्रेयस्कर होईल असे वाटून हे सभासद सरकारांतून नेमिले गेले. बिनसरकारी सभासद जरी सरकारनियुक्त होते, तरी उत्साही व सार्वजनिक कामाची हौस असलेले असेच होते. यामुळे त्यांच्या नेमणुकीबद्दल भोरच्या नागरिकांना संतोष वाटला. सरकारी सभासद भोरचेच रहिवासी असल्यामुळें त्यांनाहि भोर शहराची सुधारणा व्हावी असें वाटत होतें. शहर-सुधारणा ही सरकारी व बिनसरकारी सभासदांची एकच इच्छा असल्यामुळें त्यांच्यांत फक्त नावाचाच काय तो भेद होता.

श्रीमंत बाबासाहेबांनीं आपलें राज्यकारभाराचें जें ध्येय जाहीर केलें होतें त्यास अनुसरून " अल्पारंभः क्षेमकरः " या न्यायानें प्रथम भोर येथें स्थानिक स्वराज्यसंस्था स्थापन करून तिचा सर्व कारभार नवीन नेमिलेल्या मंडळाचे स्वाधीन केला. या वेळीं म्युनिसिपालिटीचें सालीना उत्पन्न अवघें पाच हजार रुपयांचें होतें. या उत्पन्नांत रस्तेदुरुस्ती, आरोग्य, दिवाबत्ती, स्वच्छता, वगैरेकडे वार्षिक होणारा खर्च भागणार नाहीं, ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेबांच्या लक्षांत प्रथमपासूनच असल्यामुळें त्यांनीं पहिलीं तीन वर्षेंपर्यंत दरसाल पाच हजार रुपयांची ग्रँट भोर म्युनिसिपालिटीस देण्याचें मंजूर केलें. ही ग्रँट मिळाल्यामुळें म्युनिसिपालिटीचे सभासदाना काम करून दाखविण्याचा हुरूप येऊन शहरांतील सडका अगदीं नादुरुस्त झाल्या होत्या त्यापैकीं प्रथम साडेतीन हजार रुपये खर्च करून राजवाड्यापासून शहराबाहेरील धर्मशाळे-पर्यंतची मुख्य सडक दुरुस्त करण्याचे त्यांनीं ठरविले व सदर दुरुस्तीचें काम भाटघर धरणावर नांवलौकिक मिळविलेले प्रसिद्ध कॉन्ट्रॅक्टर श्रीयुत राघोबा तुकाराम शेटे यांना दिलें.

मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड यांनीं ता. २४ ऑक्टोबर रोजीं भोरास भेट देण्याचें कबूल केल्याबद्दल मागे सांगण्यांत आलेंच आहे. ते येण्यापूर्वींच भोरच्या स्थानिक स्वराज्यसंस्थेची घटना झाली होती. या नवीन स्थापन झालेल्या म्युनिसिपालिटीनें श्रीमंत बाबासाहेबांची संमति घेऊन गव्हर्नर-

चित्रांक ७४



मुंबईचे गव्हर्नर ने. ना. सर जार्ज लॉइड यांनीं ता. २४ ऑक्टोबर १९२२ रोजीं भोरास भेट दिली.

खुर्चीवरः—१ रा. ब. सातभाई; २ गो. वि. धायगुडे ( कारभारी ); ३ मि. सी. एच्. ब्रिस्टो, पो. ए.; ४ ने. ना. सर जॉर्ज लॉइड; ५ श्रीमंत राजेसाहेब; ६ श्री. युवराज भाऊसाहेब; ८ वा. गो. पुराणिक.

उभेः—३ न. गो. आंबेकर; ४ अ. रा. जोशी; ५ ए. डी. सी.; ६ मि. ॲडॅम; ७ ए. डी. सी.; ८ रा. जालीहाल.

[ सं. पा. ४४३

साहेबांस मानपत्र देण्याचें ठरविलें. पूर्वीं म्युनिसिपालिटीतर्फे गव्हर्नरांना मानपत्रें देण्यांत येत असत. परंतु, या म्युनिसिपालिटीचें वास्तविक स्वरूप कशा प्रकारचें होतें हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ती स्थिति लक्षांत घेतली म्हणजे या वेळीं नवीन स्थापन झालेल्या म्युनिसिपालिटीनें जें मानपत्र देण्याचें ठरविले तेंच भोर-प्रजाजनातर्फे पहिलें खरे मानपत्र समजण्यास हरकत नाहीं.

## गव्हर्नरांच्या भेटीची पूर्वतयारी

श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यानंतर त्यांचे कारकीर्दींत गव्हर्नर-साहेबाची ही प्रथमच भेट होती; म्हणून त्याचे स्वागतांत कोणत्याहि प्रकारे न्यूनता न पडूं देण्याकरिता श्रीमंत बाबासाहेबानी जारीनें तयारी करण्यास सुरुवात केली. गव्हर्नरसाहेब भोरास आले म्हणजे त्याची उतरण्याची जागा रामबागेंतील बंगल्यांत असते. सदर बंगला बराच नादुरुस्त झाला होता. त्याची दुरुस्ती करण्यात आली. गव्हर्नरसाहेबाचे बरोबर दुसरेहि युरोपियन अधिकारी पाहुणे यावयाचे होते. बंगल्यात गव्हर्नरसाहेबाशिवाय दुसऱ्या कोणाची सोय होण्यासारखी नसल्यामुळे पुण्याहून तंबू आणवून ते बंगल्याबाहेरील आबराईंत उभारण्यांत आले. बरेच नवीन सामान, फर्निचर वगैरे खरेदी करावे लागलें. तसेंच घोड्यांचीं जिनें व शिबंदी, पागा वगैरेकडील लोकाना नवीन नवीन कपडे करावे लागले. गव्हर्नरसाहेबांच्या स्वागतसमारंभाची निरनिराळीं कामें जरी निरनिराळ्या अधिकाऱ्याकडे सोंपविलीं होतीं तरी, श्रीमंत बाबा-साहेब स्वतः हिंडून प्रत्येक काम व्यवस्थित झाले आहे कीं नाहीं हें पाहत असत. दुसऱ्यावर विसंबून न राहता प्रत्येक बारीकसारीक कामहि स्वतः पाहिल्याशिवाय राहावयाचे नाही हा त्याचा स्वभावच आहे. यामुळे त्याना आपल्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी करवून घेता येतात. त्यानी गव्हर्नरसाहेबाच्या स्वागतार्थ उत्तम तयारी करविली. त्याकरितां त्याना बराच खर्च करावा लागला, व तो करणें जरूर होतें. योग्य वेळीं योग्य खर्च करण्यात काटकसर करणें त्याना आवडत नाहीं. पूर्वी श्रीमंत रावसाहेबाच्या कारकीर्दींत गव्हर्नरसाहेब येत त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब हजर असत. श्रीमंत रावसाहेब त्यांची कशी व्यवस्था ठेवीत, हेंहि पाहत असत. श्रीमंत रावसाहेबांनीं स्वागताचा जो कार्यक्रम आखून ठेविला होता, तोच कार्यक्रम श्रीमंत बाबासाहेबानीं थोडा फेरफार करून

कायम ठेविला. पूर्वी स्वागताचा दरबार वाड्यांतील सुरूचे दिवाणखान्यांत भरविला जात असे; तो श्रीराममंडपांत भरविण्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं ठरविलें. कारण सुरूचे दिवाणखान्यांत फार तर १००।१५० माणसांचाच समावेश होतो. श्रीराम-मंडपांत सुमारें १००० मंडळी सहज बसूं शकतात. म्हणून कोणत्याहि मोठ्या समारंभाकरितां हीच जागा प्रशस्त व भव्य असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांनीं अशा समारंभाकरितां हाच मंडप कायम केलेला आहे.

गव्हर्नरसाहेब येण्याचे अगोदर ३।४ दिवस सर्व तयारी पूर्ण झाली होती. गव्हर्नरसाहेब ज्या तारखेस यावयाचे त्याचे आदले दिवशीं पोलिटिकल एजंट यांनीं येऊन व्यवस्था बरोबर झाली आहे कीं नाहीं हें पाहून ठेवण्याची वहिवाट असे. या वहिवाटीप्रमाणें त्या वेळचे ॲ. पोलिटिकल एजंट मि. सी. एच्. ब्रिस्टो, ( Mr. C. H. Bristow ) हे ता. २३ ऑक्टोबर रोजीं दुपारीं १ वाजता भोरास रामबाग बंगल्यांत आले. श्रीमंत बाबासाहेब, युवराज श्रीमंत भाऊसाहेब, स्टेट कारभारी व संस्थानचे दुसरे बडे अधिकारी साहेबांचे स्वागतार्थ रामबाग बंगल्यात हजर होते. त्याना ११ तोफांची सलामी देण्यांत आली व गार्ड ऑफ ऑनरची सलामी झाली. नंतर श्रीमंत बाबासाहेब युवराज व अधिकारी यांचेसह शहरांत आले. दुपारीं साहेबांचें लंच झाल्यावर ३ वाजता स्टेट कारभारी त्यांना घेऊन शहरांत आले व गव्हर्नरसाहेबाचे स्वागतार्थ केलेली सर्व तयारी त्यांना दाखविण्यांत आली. रामबाग बंगल्यांतील व्यवस्था व बाहेरील तंबूंची व्यवस्था त्यानीं पाहिली होती. अगदीं बारीक-सारीक गोष्टींतहि किती दक्षता ठेवण्यांत आली होती हें पाहून मि. ब्रिस्टोसाहेबांनीं समाधान व्यक्त केलें. नंतर किरकोळ एकदोन उपयुक्त सूचना केल्या.

## गव्हर्नरसाहेबांचें आगमन

ठरल्याप्रमाणें ता. २४ रोजीं दुपारीं गव्हर्नरसाहेबांची स्वारी बरोबर १ वाजतां रामबाग बंगल्याजवळ येऊन दाखल झाली. त्यांचेबरोबर प्रायव्हेट सेक्रेटरी मि. सी. जी. ॲडॅम् (C. G. Adam), सी. आय्. ई., आय्. सी. एस्., ऑफिशिएटिंग मिलिटरी सेक्रेटरी कॅप्टन रॉस्टॉर्न (Capt. Rawstorne) व ए. डी. सी. ही मंडळी होती. गव्हर्नरसाहेबांची स्वारी रामबाग बंगल्याजवळ

येतांच श्रीमंत बाबासाहेब, युवराज श्रीमंत भाऊसाहेब, स्टेट कारभारी व इतर बडे अधिकारी यांनीं त्यांचें अंत:करणपूर्वक स्वागत केले. गव्हर्नरसाहेबांचे आगमनार्थ १७ तोफांची सलामी देण्यांत आली. पोलिस, स्वार व शिबंदी यांनीं बंदुकांची सलामी दिली. नंतर सर्व मंडळी बंगल्यात गेली. तेथें गव्हर्नरसाहेब व त्यांच्या बरोबरचे मंडळींस पुष्पहार, पानसुपारी, अत्तरगुलाब देण्यात आलें. नंतर, शिष्टाचारदर्शक कुशल प्रश्नोत्तरें झाल्यावर श्रीमंतांची स्वारी परत आली. गव्हर्नरसाहेबांची राहण्याची व्यवस्था बंगल्यांत करण्यात आली होती, व इतर पाहुण्यांची व्यवस्था तंबूंतून होती.

दरबारची वेळ त्याच दिवशीं दुपारीं ४॥ वाजतां ठरली होती. दरबाराकरितां सर्व नोकर-लोक, श्रीमंतांचे आप्तइष्ट, दरकदार, मानकरी व गांवांतील शेटसावकार आणि प्रसिद्ध नागरिक याना निमंत्रणें करण्यांत आलीं होतीं. निमंत्रित मंडळी दरबारी पोषाख करून ३ वाजल्यापासून श्रीराम-मंडपांत जमूं लागली. ज्याचे त्याचे योग्यतेप्रमाणें त्यांस बसविण्याकरितां अंमलदार नेमिले होते, ते त्याना बसवीत होते. चार वाजण्याचे आंतच श्रीराम-मंडप भरून गेला. चार वाजतां श्रीमंत बाबासाहेब कारभारीसाहेबासह गव्हर्नरसाहेबांना दरबारासाठीं आणण्याकरितां रामबागेंत गेले आणि तेथून गव्हर्नरसाहेब व पाहुणेमंडळी यांना घेऊन शहरात येण्याकरितां ३-४५ वाजता निघाले. शहराबाहेरील धर्मशाळेजवळ आल्यावर श्रीमंत बाबासाहेब गव्हर्नरसाहेबासह हत्तीवरील अंबारींत विराजमान झाले. नंतर तेथून मिरवणुकीस सुरुवात झाली. धर्मशाळेपासून राजवाड्यापर्यंतचा राजमार्ग दोन्ही बाजूंस ध्वजा, पताका लावून सुशोभित केला होता, राजरस्त्यावरील दुकानदारांनीं आपआपलीं दुकानें शृंगारलीं होतीं. त्यांत नवीन रोषणाई करण्यांत आल्यामुळें या राजमार्गास अप्रतिम शोभा आली होती. हा समारंभ पाहण्याकरितां आसपासच्या खेड्यांतून बरेच लोक आले होते. त्यामुळें रस्त्याच्या दोन्ही बाजूंस लोकांची चिकार गर्दी झाली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या घरांच्या माड्या, खिडक्या, सज्जे, गच्चा वगैरे स्त्री-पुरुषांनीं खेचून भरल्या होत्या.

धर्मशाळेपासून मिरवणूक निघाली. मिरवणुकीच्या अग्रभागीं उंट चालत असून बँड वाजत होता. त्याचे मागें घोडेस्वार होते. त्यांचे मागें शिबंदीचे

लोक असून या लोकांचे मागें उत्तम रीतीनें शृंगारलेला अंबारीचा हत्ती होता. याच हत्तीवर गव्हर्नरसाहेब व श्रीमंत बाबासाहेब विराजमान झाले होते व त्यांचे मागचे बाजूस अंबारींत ए. डी. सी. बसले होते. हत्तीच्या मागें मोटारमध्यें पोलिटिकल एजंट व इतर युरोपियन पाहुणे बसले होते. राजवाड्यापुढील भव्य चौकाच्या प्रवेशाचे ठिकाणीं दिल्ली दरवाजा उभारण्यांत आला होता. या दरवाजांत मिरवणूक येताच मिरवणुकीचा फोटो घेण्यात आला. तेथून रिसाल्याची व शिबंदीची सलामी घेत घेत हत्ती राजवाड्याचे दरवाजाजवळ आला. तेथें हत्तीवरून उतरल्यावर युवराज श्रीमंत भाऊसाहेब व कारभारीसाहेब यांनी गव्हर्नरसाहेबाचे स्वागत केले. नंतर बरोबर साडेचार वाजतां श्रीमंत बाबासाहेबानीं पाहुणेमंडळीसह दरबाराकरिता उत्तम रीतीनें सुशोभित केलेल्या श्रीराम-मंडपांत प्रवेश केला. गव्हर्नरसाहेब दरबार हॉलमध्यें ( श्रीराम-मंडपास आतां हेंच नाव पडले आहे. ) येतांच सर्वांनीं उभें राहून त्यांना खडी ताजीम दिली. त्या वेळीं १७ तोफांची सलामी झडली. श्रीमंत बाबासाहेब व गव्हर्नरसाहेब उच्चासनावर ( डायसवर ) माडलेल्या चांदीच्या कोचावर विराजित झाल्यावर त्यांचे डावे बाजूस युवराज श्रीमंत भाऊसाहेब व आप्तमंडळी बसली व उजवे बाजूस युरोपियन पाहुणेमंडळी बसली. रावसाहेबाचे वेळेस गव्हर्नर, पो. ए. वगैरे बड्या पाहुण्याच्या आगमनाचे वेळीं स्वागतपर दरबार भरविण्यात येत असत. परंतु स्वागतपर भाषण करण्याची रावसाहेब यांची पद्धति नव्हती. दरबारात अत्तर, गुलाब, पानसुपारी देण्यात येई व म्युनिसिपालिटींत म्युनिसिपालिटीतर्फे मानपत्र देण्यात येत असे. ही पद्धति बदलून श्रीमंत बाबासाहेबानीं या वेळेपासून दरबारांत भाषण करून स्वागत करण्याची प्रथा पाडली व नंतर म्युनिसिपालिटीचे मानपत्रहि देण्यात येऊं लागले. सर्व मंडळी स्थानापन्न झाल्यावर श्रीमंत बाबासाहेबांनीं स्वागतपर भाषण केलें.

श्रीमंतांचे भाषणानंतर नवीन स्थापन झालेल्या म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष रा. जालीहाळ यांनीं म्युनिसिपल सभासदांची गव्हर्नरसाहेबांना ओळख करून देऊन, गव्हर्नरसाहेबांना अर्पण करावयाचें मानपत्र वाचून दाखविलें व तें रौप्य करंडकांतून गव्हर्नरसाहेबाना अर्पण केलें. नंतर गव्हर्नरसाहेबांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या स्वागतपर भाषणास व म्युनिसिपालिटीचे मानपत्रास उत्तरादाखल पुढील भाषण केले.

# गव्हर्नरसाहेबांचें भाषण

Chief and gentlemen,

Let me thank you first of all for the very cordial welcome with which I have been received to-day.

I am indeed glad to think that by this visit, late though it comes in my term of office, I have succeeded in maintaining the unbroken tradition that to every Governor of Bombay the lavish hospitality of Bhor State should be extended. Your State is, I have reason to know, very proud of its old traditions handed down from the great days of the Maratha Empire, and I hope that this new tradition will serve in its turn as an incentive to loyalty to the Imperial connection.

The Chief has been good enough to refer too kindly to my administration, but I notice that he has maintained a very complete silence about his own achievements of the past and the present. I have no doubt that these are well known to you all, but I cannot refrain from recalling the many years of devoted and unobtrusive service which he rendered to the State as head of a Taluka administration, thereby fitting him-self by first-hand experience for the high post which he now occupies. His accession to the Gadi took place only last August, but he had already given tangible proofs of a broad-minded desire to march with the times, both by making primary education a free gift from the State, and by introducing the provisions of the District Municipal Act, and thereby endeavouring to increase the interest and the responsibility of his subjects in their own local affairs.

These acts are sure evidence of his firm intention to increase by all means in his power the moral progress and the material prosperity of his State, and at the same time to maintain unimpaired the devoted loyalty to the throne and person of His Majesty, which has ever been its proudest boast.

You, Chief Saheb, referred in felicitous terms to the regrets which were felt at Lady Lloyd's unavoidable absence to-day. Let me assure you, on her behalf how much she

would have enjoyed your hospitality had it been possible for our visit to take place after her return. Let me also thank you on my own hehalf for the admirable arrangements made for our reception and for its cordiality.

And now let me thank the members of the Bhor Municipality for their welcome, and for the eulogistic expressions which they have been kind enough to use regarding myself. It is with great pleasure that I recall the terms of their reference to His late Highness whose long reign has so lately drawn to a close. His Highness maintained at the highest level the ties of friendship and loyalty to the British connection. Among many evidences of the cordial friendship there is the one very near at hand, I refer to the full measure of help which my Government received from his State in connection with the raising of the great Dam at Bhatghar and I desire to take this opportunity of gratefully acknowledging the readiness with which His late Highness fell in with the proposal to commence this work, and the help the State has given by contributions in money and by other concessions towards the execution of the work itself. His administration was at all times sound and steady, and it has left the State in a position of a material prosperity which many Governments in India might envy but cannot emulate.

Your present Chief has great opportunities of using these resources to strengthen the various departments of the State and especially those which deal with the preservation of law and order and at the same time of developing on progressive lines educational and self-governing institutions.

He has already given you clear evidence of his beneficent intentions and I feel confident that you on your part will show that steadiness and sanity coupled with sound patriotism upon which alone real progress must depend. His late Highness was, as you are aware, dignified with his high title after he had proved his merits by many years of rulership, and I am sure that your present ruler will maintain the reputation of his State unimpaired and by his conduct at its head will win

an esteem and affection as great and as universal as that in which his father was held.

In conclusion, let me confidently wish for you, Chief Saheb, many years of successful and untroubled administration of your State during which your ideals of progress may be realised, and for your subjects unbroken prosperity and steady moral and material development while continuing to enjoy your confidence and affection as you enjoy theirs.

गव्हर्नरसाहेबाचें भाषण झाल्यावर कारभारीसाहेब यांनीं श्रीमंताच्या आप्तेष्टांची व अधिकाऱ्यांची गव्हर्नरसाहेबांना ओळख करून दिली. नंतर पुष्पहार, पानसुपारी, अत्तर-गुलाब देण्यांत येऊन दरबार बरखास्त झाला. दरबार आटोपल्यावर श्रीमंत बाबासाहेब गव्हर्नरसाहेबांना पाहुणेमंडळीसह घेऊन भोर हायस्कुलांत गेले. हायस्कूलचे दरवाजाजवळ शाळाधिकारी रा. जोशी व हेडमास्तर रा. सामक यांनीं श्रीमंतांचें व पाहुणेमंडळींचें स्वागत केलें व त्यांना हायस्कूलच्या दुसऱ्या मजल्यांतील हॉलमध्यें घेऊन गेले. सर्व मंडळी आपआपल्या जागीं बसल्यानंतर विद्यार्थ्यांनीं सुस्वर आवाजांत स्वागतपर पद्यें म्हटलीं. त्या वेळीं युवराज श्रीमंत भाऊसाहेब भोर हायस्कुलातच शिकत असल्यामुळें त्यांनीं व हायस्कूलच्या दुसऱ्या विद्यार्थ्यांनीं इंग्रजींत डायलॉग (संवाद) म्हणून दाखविले. संवाद ऐकून गव्हर्नरसाहेब फारच खूष झाले. नंतर शाळाधिकारी रा. जोशी यांनीं भोर संस्थानांतील शाळाखात्याचा अहवाल वाचून दाखविला. शाळाधिकारी यांच्या रिपोर्ट-वाचनानंतर गव्हर्नरसाहेबांनीं थोडक्यात भाषण केलें. त्यानीं भोर हायस्कूलमध्यें देण्यात येत असलेल्या उत्तम शिक्षणाबद्दल शिक्षकवर्गाची तारीफ करून शारीरिक, नैतिक व धार्मिक शिक्षणाची श्रीमंत बाबासाहेबांनीं गादीवर आल्यावर विशेष लक्ष देऊन सोय केली याबद्दल समाधान व्यक्त केलें. पानसुपारी वगैरे झाल्यावर शाळेंतील समारंभ आटोपला. नंतर गव्हर्नरसाहेब श्रीमंतांसह दवाखाना पाहण्यास गेले. तेथें चीफ मेडिकल ऑफिसर डॉ. ताम्हणकर यांनीं सर्वांचें स्वागत करून दवाखाना दाखविला. तेथील निरनिराळे भाग व त्यांतील व्यवस्था पाहून गव्हर्नरसाहेबांनीं संतोष व्यक्त केला. दवाखान्याची पाहणी झाल्यावर गव्हर्नरसाहेब व इतर पाहुणेमंडळी रामबागेंत परत गेली.

रात्रीं ८ वाजता दारूकाम पाहण्याकरिता नदीच्या घाटावर उभारलेल्या मंडपांत पाहुणेमंडळी आली. दारूकाम प्रेक्षणीय होतें. दारूकाम पाहून झाल्यावर श्रीमंत बाबासाहेब पाहुण्यांना घेऊन वाड्याशेजारील बागेंतील बंगल्यांत गेले. तेथें त्यांना खाना देण्यांत आला. त्या वेळेस श्रीमंत बाबासाहेब यांनीं टोस्ट-स्पीच ( भाषण ) केलें व त्यास गव्हर्नरसाहेबानीं समयोचित उत्तर दिलें. खाना झाल्यावर पाहुणेमंडळी विश्रांतीसाठीं रामबागेंत गेली.

बुधवार ता. २५ रोजीं सकाळीं छोटी हजेरी झाल्यावर ८ वाजता नामदार गव्हर्नरसाहेबांची स्वारी पाहुणेमंडळींसह भाटघर धरणावरून पुण्यास रवाना झाली. त्यांना निरोप देण्यासाठीं श्रीमंत बाबासाहेब, युवराज श्रीमंत भाऊसाहेब व कारभारीसाहेब रामबागेंत हजर होते. एकंदर समारंभाच्या व्यवस्थेकडे ज्या अधिकाऱ्याच्या नेमणुका करण्यांत आल्या होत्या त्यानीं आपआपलीं कामें श्रीमंत बाबासाहेबाच्या इच्छेप्रमाणें मोठ्या दक्षतेनें व उत्साहानें बजाविलीं हें पाहून श्रीमंत बाबासाहेबांना समाधान वाटलें व तसें त्यानीं नियुक्त अधिकाऱ्याना कारभाऱ्यांचे मार्फत कळविलें. सर्व व्यवस्था उत्तम ठेविल्याबद्दल पुण्याहून नामदार गव्हर्नरसाहेबाचेंहि आभारप्रदर्शक पत्र श्रीमंत बाबासाहेबाना आलें. श्रीमंत बाबासाहेबाना इलाखाधिपतीसारख्या बड्या पाहुण्याचा आदरसत्कार करण्याचा गादीवर बसल्यानंतर हा पहिलाच प्रसंग होता. परंतु, श्रीमंत बाबासाहेब सर्व बारीकसारीक कामातहि अत्यंत दक्षतेनें लक्ष घालीत असल्यामुळें व कोणत्याहि कामात यत्किंचितहि चालढकल व हलगर्जीपणा दाखविण्याची त्याना कधींहि संवय नसल्यामुळें नोकरवर्गावर त्याचा फार दरारा असतो. त्याच्या या दराऱ्यामुळेच स्वागतसमारंभ यशस्वितेनें पार पडला. त्याचा आत्मविश्वासहि फार दाडगा आहे, व या आत्मविश्वासाच्या बळावरच कोणतेंहि अंगीकृत कार्य तडीस नेण्याची त्याना नेहमीं उमेद वाटत असते.

गव्हर्नरसाहेबांच्या स्वागतसमारंभाची जी सविस्तर हकीकत दिली आहे ती कोणास कंटाळवाणी वाटण्याचा संभव आहे. परंतु श्रीमंत बाबासाहेब आदरातिथ्याच्या कामीं किती दक्षता बाळगतात याची लोकाना यथार्थ कल्पना यावी इतकाच हेतु ती देण्यांत आहे. यानंतर पुढें जेव्हां जेव्हा गव्हर्नरसाहेबांसारखे बडे पाहुणे येतात तेव्हा तेव्हां त्याचीहि याप्रमाणें व्यवस्था ठेवण्यात येत असते.

चित्रांक ७५



दाक्षिणेतील संस्थानांचे ए. जी. जी. ले.-क. विल्बरफोर्स-ब्रेल यांनीं गंगुताईसाहेब वाचनालयास भेट दिल्यावेळचा फोटो. (१९३३)

## जमाबंदीनिमित्त संस्थानांत पहिला दौरा

श्रीमंत बाबासाहेब युवराज असतांना त्यांचेकडे शिरवळ तालुक्याचे अधिकार असल्यामुळें त्या तालुक्याची त्याना पूर्ण माहिती झालेली होती. बाकीच्या चार तालुक्यांतील प्रजेशीं त्यांचा संबंध न आल्यामुळें त्यांना त्या तालुक्यांतील लोकस्थितीची प्रत्यक्ष माहिती नव्हती. म्हणून पहिल्याच वर्षी सर्व तालुक्यातून हिंडून संस्थानची एकंदर पाहणी करण्याचें त्यांचे मनात होतें. त्याप्रमाणें सन १९२२च्या डिसेंबरांत व सन १९२३च्या जानेवारींत त्यांनीं जमाबंदीकरिता दौरा काढून निरनिराळ्या तालुक्यातील प्रमुख लोकांचा परिचय करून घेऊन त्याचीं सुखदुःखें काय आहेत तीं समजावून घेण्याचें ठरविलें आणि दौऱ्याचा कार्यक्रम जाहीर केला. पांच तालुक्यापैकीं पौनमावळ तालुक्यात प्लेगमुळें हवा बिघडली होती, त्यामुळें तो तालुका वगळून चार तालुक्यांचीच पाहणी करण्याचें ठरविण्यात आले होतें. तथापि पौनमावळ तालुक्याच्या **कोळवण** व **पिरंगूट** या गावास त्यानीं थोडा वेळ भेट दिलीच. डिसेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात सुधागड व जानेवारींत प्रचंडगड, राजगड व विचित्रगड याप्रमाणें कार्यक्रम होता.

## सुधागड तालुका

प्रथम सुधागड तालुक्यांत जावयाचें असल्यामुळें ता. १५ डिसेंबर नंतर प्रत्येक खात्याची तपासणी करण्याकरितां त्या त्या खात्याचे अधिकारी व त्यांचे तज्ज्ञ कारकून पुढें रवाना करण्यात आले व श्रीमंत बाबासाहेब श्रीमंत युवराजांसह मुंबईस गेले. तेथून उभयतां श्रीमंताच्या स्वाऱ्या नागोठणामार्गानें ता. २० डिसेंबर रोजीं सायंकाळीं सुधागड तालुक्याच्या ठाण्याच्या गांवीं म्हणजे पाली येथें दाखल झाल्या. वाटेंत पेण येथें श्री. अप्पासाहेब टिळक यांचे आग्रहावरून त्यांचेकडे श्रीमंतांच्या स्वाऱ्या भोजनास उतरल्या होत्या. पाली-नागोठणें रस्ता तयार करण्याकरितां एक कमिटी स्थापन झाली होती. हा रस्ता जरी ब्रिटिश हद्दींत आहे तरी सुधागड तालुक्यांतील लोकांना नागोठण्याशीं दळणवळणाचा हाच मार्ग असल्यामुळें या कमिटींत पाली येथील प्रतिष्ठित नागरिकहि होते. श्रीमंत बाबासाहेब नागोठणें-मार्गानें येणार असें कळल्यावर चिंचडोहावर कमिटीतर्फे अल्पोपाहार व पानसुपारी स्वीकारण्याबद्दल सदर कमिटीच्या

चालकांनीं त्यांना विनंति केली होती व ती त्यांनीं मान्य केली होती. त्याप्रमाणें चिंचडोहावर अल्पोपाहार व पानसुपारी झाल्यावर श्रीमंतांचे फोटो घेण्यांत आले.

राज्यारोहणानंतर श्रीमंत बाबासाहेबांची या तालुक्यांस ही प्रथमच भेट होती. पूर्वी युवराज असतांना श्रीमंत बाबासाहेब सन १९१८ सालीं या तालुक्यांत आले होते. त्या वेळीं लोकांनीं त्यांचें किती प्रेमानें व भक्तीनें स्वागत केलें ती हकीकत मागें १ ल्या खंडांत देण्यांत आलीच आहे. त्या वेळींच श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या सौजन्यानें व मनमोकळेपणानें त्या तालुक्यांतील लोकांचीं मनें आकर्षण केलीं होतीं. त्या वेळीं चार वर्षांनींच श्रीमंत बाबासाहेब संस्थानचे अधिपति या नात्यानें आपल्या तालुक्यांत येतील असें कोणाच्या स्वप्नींहि नव्हतें. या तालुक्यांतील प्रजेच्या मनांत श्री. बाबासाहेबांच्याबद्दल पूर्वीच्या भेटीपासून उत्पन्न झालेल्या आदरबुद्धीमुळें व राज्यारोहणसमयीं त्यांनीं प्रजेच्या हितार्थ जाहीर केलेल्या देणग्यांमुळें प्रजाजनांस आपली स्वामिनिष्ठा व कृतज्ञता-बुद्धि व्यक्त करण्यास ही संधि मिळाली म्हणून समाधान वाटलें.

चिंचडोहाजवळ पाली-नागोठणारोड कमिटीच्या पानसुपारीचा समारंभ झाल्यावर श्रीमंतांच्या स्वाऱ्या सायंकाळीं पाली येथील बाजारपेठ तळ्याजवळ आल्या. तेथें त्यांचें स्वागत करण्यास शेंकडो लोक जमा झाले होते. या तळ्याशीं येतांच तालुका सभेमार्फत सभेचे सेक्रेटरी रा. रा. आठवले यांनीं श्रीमंतांना पुष्पहार घातले. नंतर तेथून वाड्याकडे जाण्याकरितां श्रीमंतांच्या स्वाऱ्या चौचाकी गाडींत बसून निघाल्या. रात्र झाल्यामुळें रस्त्याचे दोन्ही बाजूंस चिरकदानें लावण्यांत आलीं होतीं. गाडीच्या पुढें चौघडा, ताशे, वाजंत्री वाजत होते. रस्त्याच्या दुतर्फा उभे असलेले आबालवृद्ध स्त्री-पुरुष श्रीमंतांचें प्रेमभरित अंत:करणानें दर्शन घेऊन त्यांनीं दिलेल्या देणग्यांबद्दल त्यांना धन्यवाद देत होते. पाली गांव लहान असूनहि मिरवणुकीचा थाट अपूर्व होता. वाड्याजवळ येईपर्यंत वाटेंत अनेक ठिकाणीं त्यांना पुष्पहार अर्पण करण्यांत आले. वाड्या-जवळ आल्यावर श्रीमंतांच्या स्वाऱ्या गाडींतून उतरल्या व वाड्यांत प्रवेश करून स्थानापन्न झाल्यावर रीतीप्रमाणें अधिकारीवर्गाकडून त्यांना पानसुपारी, पुष्पहार अर्पण करण्यांत आले. हा छोटासा दरबारासारखाच समारंभ होता. हा समारंभ झाल्यावर जमलेली मंडळी श्रीमंतांचा निरोप घेऊन आपआपल्या घरीं गेली.

श्रीमंतांच्या स्वाऱ्या ता. २० रोजीं सायंकाळीं पालीस आल्या. तेव्हा-पासून ता. २४ अखेरपर्यंत त्यांचा पालीस मुक्काम होता. श्रीमंतांच्या स्वाऱ्या तेथें गेल्यापासून पाली गांव जिकडे तिकडे गुढया तोरणें व स्वागतपर कमानी यांनीं सुशोभित केलेला दिसत होता. या चार दिवसांच्या मुक्कामांत पालींतील प्रमुख नागरिक व अंमलदार यांचेकडून श्रीमंतांना पानसुपारी देण्यांत आली. ता. २२ रोजीं पाली तालुक्यातील समाजसेवा-संघातर्फें रा. माधवराव भिडे यांच्या घरीं श्रीमंतांना पानसुपारी झाली. त्या वेळीं संघाच्या स्तुत्य कार्याबद्दल श्रीमंतांनीं आपली सहानुभूति व्यक्त करून संघास २५० रु. ची मदतीदाखल देणगी दिली; व संघाच्या विनंतीप्रमाणें 'जनसेवा ईश्वरसेवा' असें पत्रक प्रसिद्ध केलें. ता. २३ रोजीं सार्वजनिक वाचनालयातर्फें मानपत्र व सरकारी शाळेंतील बक्षिससमारंभ हे दोन समारंभ फारच थाटाचे झाले. वाचनालयातर्फें जें मानपत्र अर्पण करण्यांत आले तें त्या वेळीं पाली येथें असलेले सबजज्ज श्रीयुत बापूसाहेब रानडे यांनीं संस्कृत पद्यांत लिहिलें होतें. श्रीमंतांनीं पालीसारख्या लहान गांवांत लोकांनीं मोठया उत्साहानें चालविलेल्या या संस्थेबद्दल समाधान व्यक्त केलें. शाळेंतील बक्षिससमारंभाचे वेळीं विद्यार्थ्यांना चार उपदेशपर शब्द सांगितल्यानंतर सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाबद्दल त्यांनीं आपले विचार जमलेल्या मंडळींपुढें मांडिले. ते म्हणाले, "सक्तीचें शिक्षण सुरू करून सर्व प्रजा साक्षर केली पाहिजे याबद्दल कोणाचाहि विरोध असणें शक्य नाहीं. परंतु, हा प्रश्न फार बिकट असून बडोद्यासारख्या मोठमोठया संस्थानांत किंवा ब्रिटिश मुलखांतहि अद्याप समाधानकारक रीतीनें सुटलेला नाहीं; व त्यांतच युद्धामुळें उद्भवलेल्या महर्गतेमुळें विशेषतः लहान संस्थानांचे बाबतींत जास्तच अडचणी उत्पन्न झालेल्या आहेत. शिवाय आपल्या संस्थानचें उत्पन्न थोडें असून त्याची वाढ करण्यास मोठया संस्थानांप्रमाणें अगर ब्रिटिश सरकारप्रमाणें साधनानुकूलता नसल्यामुळें तें मर्यादित स्वरूपाचेंच राहणार. तेव्हां सर्व गोष्टींचा व्यवहार्य दृष्टीनें विचार करून लोकांनीं सक्तीच्या शिक्षणविषयक बाबतींतील आपलें धोरण ठरवावें."

## नवीन दवाखान्याचें अनावरण

श्रीमंतांच्या मुक्कामाच्या अखेरच्या दिवशीं म्हणजे रविवार ता.२४ डिसेंबर रोजीं पाली येथें दोन महत्त्वाचे समारंभ झाले. त्यात पाली येथें नवीन स्थापन

केलेल्या दवाखान्याचा अनावरणसमारंभ हा पहिला होय. राज्यारोहणसमारंभाच्या वेळीं प्रजेच्या सुखसोयी करण्याकडे शक्य तितकें लवकर लक्ष दिले जाईल असें श्रीमंत बाबासाहेबांनीं जाहीर आश्वासन दिलें होतें, त्याप्रमाणें सुधागड तालुक्यांत प्रथम दवाखाना सुरू करण्याचें ठरवून त्या तालुक्यांत जाण्यापूर्वींच पाली येथें दवाखाना स्थापन करण्याची सर्व सिद्धता करून एका एल्.सी.पी.एस्. डॉक्टरची नेमणूक केली. याच दवाखान्याचा हा अनावरण समारंभ होता. या दवाखान्याकरितां पाली येथील प्रसिद्ध व्यापारी शेठ साखळचंद यांनीं एक वर्षपर्यंत आपली इमारत फुकट दिली होती. संस्थानचे चीफ मेडिकल ऑफिसर डॉ. ताम्हनकर यानीं, दवाखान्यासारखी खर्चाची बाब असतांहि श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रजेच्या आरोग्यरक्षणार्थ प्रथम ही सुधारणा हातीं घेतली यावरून प्रजेच्या हिताकडे श्रीमंतांचें किती लक्ष आहे ही गोष्ट समारंभास जमलेल्या लोकांच्या निदर्शनास आणून दिली. पुण्या-मुंबईच्या इस्पितळाशीं तालुक्यांच्या या दवाखान्यांची तुलना कोणींहि करूं नये असा लोकाना इषारा देऊन त्यांनीं दवाखाना उघडण्याची श्रीमंत बाबासाहेबांना विनंति केली.

उत्तरादाखल भाषण करतांना श्रीमंत बाबासाहेबांनीं दवाखान्याकरिता एक वर्षपर्यंत फुकट जागा दिल्याबद्दल शेठ साखळचंद यांचे आभार मानिले व डॉ. ताम्हनकर यांनीं सुचविल्याप्रमाणें मोठमोठ्या इस्पितळांप्रमाणें येथें सर्व सोयी होतील अशी भलतीच आशा न बाळगण्याबद्दल लोकांना सांगितलें. तालुक्याच्या दवाखान्यांतून जितक्या सोयी करण्यांत येतात तितक्या करण्यांत येतील असें ते म्हणाले. शेवटीं पालीचे रहिवासी, हल्लीं नाशिक येथील कॉलेजचे प्रिन्सिपॉल असलेले श्रीयुत टी. ए. कुलकर्णी यांनीं श्रीमंतांनीं पाली येथें दवाखाना सुरू केल्याबद्दल पाली तालुक्यातील प्रजाजनांतर्फे श्रीमंतांचे आभार मानले.

## तालुका सभेचें मानपत्र

दुसरा समारंभ म्हणजे तालुका सभेच्या मानपत्राचा होय. हा समारंभ श्रीरामाच्या देवळापुढें मुद्दाम घातलेल्या सुशोभित मंडपांत ता. २४ रोजीं सायंकाळीं करण्यांत आला. या समारंभाकरितां या तालुक्यांतील मुंबई, पुणें वगैरे ठिकाणीं असलेली बरीच विद्वान् मंडळी मुद्दाम आली होती. श्रीमंतांची स्वारी

मंडपांत आल्यावर त्याचें स्वागत करण्यांत आलें. महाराष्ट्राच्या परिचयाचे पडघवली येथील रहिवासी सुप्रसिद्ध विद्वान लेखक व कवि श्रीयुत माधवरावजी मोडक यांनीं या समारंभाकरितां मुद्दाम तयार केलेलीं स्वागतपर पद्यें मुलांमुलींनीं सुस्वर आवाजांत म्हटल्यावर पडघवलीचेच रहिवासी सॉलिसिटर दिवेकर यांनीं मानपत्र वाचून दाखविलें व तें रौप्य-करंडकांतून अध्यक्षांचे हस्तें श्रीमंतांना अर्पण करण्यात आलें. मानपत्रातील महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे.

## मानपत्रांतील महत्त्वाचा भाग

"श्रीमंत सरकार युवराजपदारूढ असतां युवराज या नात्यानें श्रीमंतानीं आमच्या या तालुक्याला भेट दिली व प्रजेमध्यें मिळूनमिसळून व सलगीनें वागून प्रजेच्या सुखदुःखांविषयीं जी सहानुभूति व कळकळ व्यक्त केली तिच्या योगानें श्रीमंतांच्या अंगीं वसत असलेल्या दयादाक्षिण्यादि बहुविध गुणाचा व श्रीमंतांच्या अत्यंत मनमिळाऊ, मोकळ्या व प्रेमळ स्वभावाचा आम्हांला परिचय झाला. त्यायोगानें श्रीमंतांनीं युवराजपदावर असतांनाच आपल्या प्रजाजनांचें चित्त वेधून घेऊन परस्परांमध्यें दिलजमाईचें बीजारोपण करून ठेविलें. त्या बीजाचा अंकुर परस्परांच्या अंतःकरणांत आजपर्यंत जोरावत होता. त्याचाच श्रीमंत सरकार पंतसचिव पदारूढ झाल्यापासून अत्यंत जोरानें फोफावणारा वृक्ष बनून तो फलपुष्पांनीं युक्त होण्याचा सु-समय प्राप्त झाला, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे.

सुधागड तालुकासभा शके १८४२, श्रावण शुद्ध पौर्णिमा रोजीं स्थापन होऊन तिचें पहिले अधिवेशन सन १९२०च्या डिसेंबर महिन्यांत पाली मुक्कामीं भरलें. सदर प्रसंगीं आम्हीं आमच्या योग्य मागण्या ठरावरूपानें संकलित करून सरकारचे हुजुरास सादर केल्या, ही गोष्ट श्रीमंतांना विदितच आहे. आपल्या परमपूज्य व वैभवशाली वडिलांच्या निधनानें आमच्या सदर मागण्या पुरविण्याची जबाबदारी श्रीमंतांवर येऊन पडली व श्रीमंतांनीं थोडाहि विलंब न लावतां राज्यारोहणप्रसंगींच आपलें प्रजावात्सल्य अगदीं खुल्या दिलानें व स्पष्ट शब्दांनीं व्यक्त केलें आणि आमच्या आकांक्षांबद्दल पूर्ण सहानुभूति दाखवून आमच्या सदर मागण्यांपैकीं कांहीं मागण्या पूर्ण केल्याचें जाहीर केलें. त्यामुळें आमचा उत्साह द्विगुणित होऊन आमच्या सर्व आकांक्षा लवकरच तृप्त होतील असा आम्हाला भरंवसा वाटूं लागला आहे.

सत्ता व सदिच्छा हीं श्रीमंतांचे ठिकाणीं एकवटल्यामुळें श्रीमंतांची कारकीर्द श्रीमंतांच्या प्रजाजनांना अत्यंत सुखकारक व संस्थानला भरभराटीची होईल याबद्दल आम्हाला पूर्ण खात्री वाटत आहे."

श्रीमंत बाबासाहेबानीं मानपत्रास उत्तरादाखल जें भाषण केलें त्यांत त्यांनीं आपला मनमोकळेपणा व्यक्त केला. भाषणांतील महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे.

## श्रीमंतांचे भाषणांतील महत्त्वाचा भाग

"आपल्या तालुक्यात कै. प्रो. हरिभाऊ लिमये याच्यासारखे पुढारी होऊन गेले असून एकंदरींत सुशिक्षित लोकांचा भरणा विशेष आहे. लायब्ररी आणि समाजसेवासंघ यासारख्या लोकोपयोगी संस्था आपण सरकारी मदतीवांचून स्वावलंबनाचे तत्त्वानुसार काढलेल्या आहेत. भोरसारख्या मुख्य शहरांत देखील अशा संस्था निघालेल्या नाहींत; यामुळें या तालुक्यांतील लोकांच्या कर्तबगारी-बद्दल आम्हास अभिमान वाटतो.

राज्यारोहणसमारंभाचे वेळीं ज्या गोष्टी बोनस, सारामाफी, दवाखाना वगैरे करण्याचें आम्हीं स्पष्टपणें आश्वासन दिलें होतें त्या सर्व गोष्टी जरूर ते हुकूम देऊन आम्हीं प्रत्यक्ष कृतींत आणिल्या आहेत हें आपल्या लक्षांत आलेंच आहे. त्यानंतर वरीलशिवाय भोर म्युनिसिपालिटीचा कारभार भोरास डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल ॲक्ट लागू करून लोकांच्या बहुतेक अंशीं स्वाधीन करण्यांत आला आहे, व ही गोष्ट स्थानिक स्वराज्याची पहिली पायरी म्हणून करण्यांत आली आहे, हेंहि आपणांस कळलेंच आहे.

याप्रमाणें आम्ही आपल्या दृष्टीनें योग्य त्या मार्गानें काम करीत असतांना आमच्या संस्थानपैकीं कांहीं थोडे पुढारी म्हणविणारे लोक आमच्या अडचणी वाढवीत आहेत, हें सागण्यास आम्हांस मोठें दु:ख वाटतें. आम्हांस जरूर तो विचार करून उच्चाराप्रमाणें आचार करून दाखविण्यास सवड द्या व आमच्या अडचणी वाढवूं नका अशी स्पष्ट सूचना आम्हीं केली असता, राज्यारोहणानंतर एक महिन्याचे आंत भाटघरसारख्या ठिकाणीं हजारों लोकांच्या हितासाठीं दहा-बारा वर्षांपासून ब्रिटिश सरकारनें चालविलेल्या निरा कॅनॉलचे कामीं हरकती उत्पन्न करून व हिरड्यावर पिढ्यान् पिढ्या

अमलांत असलेला संस्थानचा हक्क नष्ट व्हावा अशी बेसनदशीर चळवळ करून कर न देण्यापर्यंत व सत्याग्रहापर्यंत पाळी या लोकांनीं आणिलेली आहे. तथापि पुष्कळदां प्रतिकूल परिस्थितीमुळें तसा मोह उत्पन्न झाला असतांहि अशा लोकांवर काम चालविण्याच्या भरीस आम्ही पडलों नाहीं; व असें करण्यांत आमचे सरकारी अधिकारी यांचे सल्ल्याविरुद्धहि आम्हास जावें लागलें; परंतु अद्याप लोक उमजतील असा आम्हांस भरंवसा वाटत आहे. वास्तविक असा प्रकार झाला नसता तर आम्हांस जास्त काम करून दाखवितां आलें असतें. परंतु या अडचणींचा विचार करण्याकडे बराच वेळ आम्हांस द्यावा लागल्यामुळें आमची मोठी निराशा झालेली आहे.

हा जो अनिष्ट चळवळीचा उल्लेख आम्हीं केला आहे त्याचा आपल्या तालुक्याशीं बिलकुल संबंध नाहीं. परंतु आमची एक अडचण म्हणून व आमच्या कांहीं कृत्यांबद्दल उगाच गैरसमज होऊं नये म्हणून त्याचें दिग्दर्शन आम्हीं या ठिकाणीं केलें आहे. लोकांची समजूत घालण्यासाठीं आम्ही आपल्या अधिकाऱ्यांस भाटघर व हिरडोशी वगैरे ठिकाणीं पाठविले होतें. परंतु वरील पुढाऱ्यांच्या उलट्या प्रयत्नांमुळे अद्यापि यश आले नाहीं. भाटघर धरणाचा प्रश्न आमच्या हातचा नसून ब्रिटिश सरकारशीं त्याचा संबंध पोहोंचतो. परंतु या बाबतींत रयतेचे सुखाबद्दल जी खटपट करणें जरूर आहे ती करण्याचा आमचा हेतु आहे, व तसाच प्रकार हिरड्याबद्दलचा आहे. परंतु रयतलोक या कामीं चिथावणीमुळें तडजोडीचें धोरण ठेवूं इच्छीत असल्याचें दिसत नाहीं ही मोठी अडचण आहे.

आमच्या मार्गांतील आणखी एक महत्त्वाची अडचण म्हटली म्हणजे आमच्यापाशीं फार मोठी शिल्लक आहे अशा प्रकारचा लोकभ्रम ही होय. हा भ्रम आपल्यासारख्या लोकांचाच आहे असें नसून मोठमोठे त्रयस्थ लोक व ब्रिटिश अधिकारीहि या भ्रमांत आहेत व यामुळें आम्हांस चांगले प्रकारची मदत द्या असें म्हणणाऱ्या शेंकडों संस्था मोठ्या आशेनें आमचेकडे आजपर्यंत आल्या आहेत व प्रत्यहीं नवीन नवीन येत आहेत, व प्रत्येकास आपलीच संस्था खरी लोकहिताची असून तिला मदत करण्याशिवाय संस्थानिकांचें दुसरें कांहीं कर्तव्य नाहीं असें जणूं काय वाटत आहे. यामुळें हेच प्रश्न आम्हांस सोडवावे

लागत असून त्या योगानें आमचें खऱ्या कर्तव्याकडे थोडें दुर्लक्ष साहजिक होत आहे. परंतु या बाबतींत नकार दिल्यामुळें किंवा अपेक्षेप्रमाणें विचार न झाल्यामुळें कोणाचाहि गैरसमज होऊं नये.

वास्तविक पाहतां संस्थानच्या सांपत्तिक स्थितीबद्दल ज्याप्रमाणें समाजांत निष्कारण भ्रम असल्याचें आपण पाहतों त्याप्रमाणें आमच्या संस्थानचे बाबतींतहि लोकांची भ्रामक समजूत झाली आहे हें सांगण्यास आम्हासहि मोठा खेद वाटतो. खर्चाचे बाबतींत आमचे परमपूज्य वडिलांनीं ठेविलेलें विशेष काटकसरीचें धोरण, दुष्काळासारख्या आपत्तींतहि दुसऱ्याकडे कर्ज काढण्याची पाळी न येता वेळचेवेळीं पगार वगैरे देण्याची ठेविलेली पद्धत आणि राजनिष्ठ-पणानें महायुद्ध व किंग एडवर्ड मेमोरिअलसारख्या गोष्टींस दिलेली विशेष मदत अशा प्रकारच्या कारणांनीं हा लोकभ्रम पोसत गेलेला आहे, असें सूक्ष्म विचारांतीं आम्हांस आढळून आलेले आहे व याबद्दल कोणास खात्री करून घ्यावयाची असल्यास संस्थानचे कागदपत्र, तिजोऱ्या पाहण्यासहि हरकत नाहीं.

सारांश, संसथनचें सालीना उत्पन्न उत्तरोत्तर कायमचें वाढण्याची तजवीज झाल्याशिवाय संस्थानचा दर्जा कालमानाप्रमाणें कायम ठेवण्याची व्यवस्था करून कोणत्याहि महत्त्वाच्या सुधारणा हातीं घेऊन अमलांत आणण्यास फार अडचणी आहेत. एवढा विस्तार करून इतकेंच आपले निदर्शनास आणण्याचा आमचा उद्देश आहे.

राज्यकारभारांतील सर्व जरुरीच्या गोष्टी करून सार्वजनिक लोकहिताच्या गोष्टी करण्यास जितका अवसर आहे असें दिसून येईल तितकी मदत देण्यास आमची मुळींच हरकत नाहीं. किंबहुना लोकाच्या अपेक्षेप्रमाणें राज्यकारभाराचे सुसंघटितपणास व्यत्यय न येतां या कामीं सढळ मदत देता येईल तितकी देण्यास आम्हांस आनंदच होईल. परंतु संस्थानचे पैशाचे आम्ही ट्रस्टी आहों अशी जी आमची समजूत आहे तीमुळें या बाबतींत अयोग्यपणें मागणाऱ्या लोकांची नाखुशी झाली तरी योग्य तेंच करणें भाग पडणार आहे.

सद्गृहस्थहो, संस्थानें हिंदुस्थानच्या एकंदर प्रगतींत अडथळे आणणारीं होतील अगर तीं मार्गदर्शक होतील हें मलाहि अगर तुम्हांलाहि आज सांगतां यावयाचें नाहीं. असल्या वादग्रस्त प्रश्नाची जास्त चर्चा न करितां ते सोड-

विण्याचें काम भावी इतिहासावर सोंपवून, आज आहे ती स्थिति अशीच बराच काळपर्यंत निदान तरी चालू राहणार हें आपण गृहित धरणें भाग आहे. अशा स्थितींत प्रजेच्या आकांक्षेकडे सहानुभूति ठेवणें हें संस्थानिकांचें कर्तव्य असून राजनिष्ठा न सोडणें हेंच प्रजेचें कर्तव्य आहे असें आम्हांस वाटतें व तीं आहेत तोंपर्यंत संस्थानच्या कारभाराची तुलना ब्रिटिश सरकारचे कारभाराशीं किंवा लहान संस्थानांची बडोदें, म्हैसूरसारख्या फार विशाल संस्थानांशीं करणें सयुक्तिक होणार नाहीं. कारण तसें केल्यानें एखाद्या खुज्या माणसाची उंच व धिप्पाड माणसाशीं बरोबरी करण्यासारखें होणार आहे. म्हैसूर, बडोद्यासारख्या संस्थानांचीं ध्येयें नजरेसमोर ठेवण्यास हरकत नाहीं. परंतु खरी तुलना दुसऱ्या अशाच बरोबरीच्या संस्थानांशीं करणें सयुक्तिक होईल व तशी करूं. आणखी कांहीं वर्षांनीं आपले संस्थानचा कारभार दुसऱ्या तशा संस्थानापेक्षां कमी प्रतीचा दिसेल तर त्याबद्दलची जबाबदारी आमचे शिरावर घेण्यास आम्ही तयार आहों. त्याचप्रमाणें आमची अशी सूचना आहे कीं, कारभारावर टीका करण्यापूर्वी संस्थानच्या सालीना उत्पन्नाच्या मानानें विधायक कार्यक्रम आमचे-पुढें ठेवावा व त्याप्रमाणें कांहींच न होईल तर किंवा त्याचा विचार न होईल तर जरूर ती टीका करण्यास हरकत नाहीं.

या तालुक्यांत इतर तालुक्यांप्रमाणें सभाबंदीच्या जाहीरनाम्याविरुद्ध अद्याप वर्तन करण्यांत आलेलें नाहीं व एकंदर लोकांचें धोरण सनदशीर चळवळीचें आहे हें लक्षांत घेऊन सभाबंदीचा जाहीरनामा या तालुक्यापुरता आम्ही आजपासून रद्द केल्याचें जाहीर करतों."

श्रीमंत बाबासाहेबांचें वरील सर्वच भाषण महत्त्वाचें असून त्यांत त्यानीं कोणत्याहि प्रकारचा आडपडदा न ठेवितां संस्थानची वस्तुस्थिति लोकांच्या पूर्णपणें लक्षांत येण्याकरितां मनमोकळेपणानें आपले विचार प्रकट केले. त्यामुळें संस्थानच्या खजिन्याबद्दल लोकांत निष्कारण पसरलेला गैरसमज दूर झाला. या तालुक्यापुरता सभाबंदीचा जाहीरनामा रद्द करून लोकांच्या भाषणस्वातंत्र्यावरील निर्बंध दूर केल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांच्या प्रगमनशील धोरणाची खात्री पटूं लागली.

सुधागड तालुक्यांतील जमाबंदीचें काम पुरें करून श्रीमंतांच्या स्वाऱ्या ता. २५ रोजीं सायंकाळीं पुण्यास गेल्या. नंतर जानेवारी सन १९२३ अखेर-पर्यंत घाटावरील चार तालुक्यांतील जमाबंदीचें काम केलें. प्रत्येक तालुक्याच्या ठाण्याच्या ठिकाणीं तीन चार दिवस मुक्काम असे. प्रत्येक तालुक्यात त्या त्या ठिकाणच्या सार्वजनिक संस्थांकडून, प्रसिद्ध रहिवाश्याकडून व अधिकाऱ्यांकडून श्रीमंतांना पानसुपाऱ्या होत असत. त्या जमाबंदीच्या फिरतीची त्रोटक हकीकत खालीं दिली आहे.

## घाटावरील चार तालुके

### पौनमावळ

सुधागड तालुक्यांतील जमाबंदीचें काम झाल्यावर ता. ३० डिसेंबर १९२२ इ. रोजीं पुण्याहून श्रीमंत बाबासाहेब पौनमावळ तालुक्याचे जमाबंदी-साठीं कोळवण येथें गेले. जातांना वाटेंत मुळशी येथें रा. ब. भाऊसाहेब जोगळेकर यांचेकडे दुपारचें भोजन उरकून मुळशीचें धरण पाहून पौडवरून सायंकाळीं मुक्कामास कोळवण येथें आले. कोळवण येथील पेठेंतून मिरवणुकीनें श्रीमंत बाबासाहेब यांना राजवाड्यांत नेण्यांत आलें. येथें सुभेदार, फडणीस, जंगल इन्स्पेक्टर, पोलिस, जमादार यांच्या पानसुपारीचा वाड्यांत श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वीकार केला. कोळवण येथील शाळेस भेट देऊन विद्यार्थ्यांना बक्षिसें व मेवामिठाई वांटली. रा. फडके, रा. आगाशे व मोहनशेट दत्तुशेट यांच्याकडील पानसुपारीचा स्वीकार करण्यांत आला. ता. २ रोजीं कोळवण सोडलें. वाटेंत पौड येथें रा. भालचंद्र अनंत करमरकर यांचेकडे व पिरंगूट येथें रा. अनंत बाळकृष्ण देव यांचेकडे श्रीमंत राजेसाहेबांना पानसुपारी करण्यांत आली. सायंकाळीं मुक्कामास नसरापुरास श्रीमंत राजेसाहेब आले.

### राजगड

चेलाडी नाक्यावर खडकी गांवच्या लोकांनीं पानसुपारी केली. नसरापूरच्या प्रवेशरस्त्यावर पेठकरी लोकांनीं हार घालून श्रीमंतांचें स्वागत केलें. वाड्यांत आल्यावर राजगड तालुक्यांतील हतवें गांवचे लोकांनीं पानसुपारी दिली. ता. ३ रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं श्रीबनेश्वरदर्शन घेतलें व वनांतील पेशव्यांचा वाडा पाहिला. दुपारीं शाळेस भेट दिली. सायंकाळीं नसरापूर येथील

मिशनरी मि. रीव्ह यांचेकडे पानसुपारी झाली. त्या वेळीं मि. रीव्ह यांनीं स्वागतपर भाषण केलें. त्यास श्रीमंत राजेसाहेबांनीं समयोचित उत्तर दिले.

## प्रचंडगड

ता. ५ रोजीं श्रीमंत राजेसाहेब प्रचंडगडतालुक्याचें मुख्य ठिकाण वेलें येथें गेले. वाटेंत वीरवाडी नाक्यावर पाटील भेट व फळें यांचा श्रीमंतांनीं स्वीकार केला. अंबवणेकर देशपांडे यांनीं पानसुपारी केली. वेलें येथें मामलेदार, सरकारी नोकर व ग्रामस्थ यांनीं सामोरें येऊन श्रीमंतांचें स्वागत करून हार अर्पण केला व मिरवणुकीनें श्रीमंत राजेसाहेबांना राजवाड्यांत नेले. ता. ७ रोजीं वाड्यांत मामलेदार, फडणीस, फौजदार, इन्स्पेक्टर यांच्या पानसुपारीचा स्वीकार करण्यांत आला. सायंकाळीं ५ वाजतां शाळेस भेट दिली. तेथें श्रीमंत राजेसाहेब यांनीं मुलांना बक्षिसें वांटलीं. नंतर रा. साबणे व पटवर्धन यांच्याकडे पानसुपारी झाली. ता. ९ रोजीं जमाबंदीचें कामकाज संपल्यामुळे श्रीमंत राजेसाहेब भोजनोत्तर वेल्याहून निघून विंझर येथें गेले व तेथें त्यांनीं रा. दामुअण्णा फडके याचेकडे पानसुपारी व चहा घेतला. करंजवणें येथें मांगदरीकर आगाशे याच्या पानसुपारीचा स्वीकार केला व सडकेवर कुरंगवडीकर रा. खासनीस याची व जाभळीनजीक रा. जोशी शाळाधिकारी याची पानसुपारी स्वीकारून नसरापूर येथें श्रीमंत राजेसाहेब परत आले.

## पुन्हा राजगड

ता. १० रोजीं नसरापूर-तपासणीचें काम झालें. सायंकाळीं राजवाड्यात श्रीमंत राजेसाहेब यांना मामलेदार, फौजदार, ओव्हरसिअर व रा. सिताराम गोविंद देशपांडे व कुसगावचे देशमूख या सर्वांनीं पानसुपारी केली. नसरापूर येथील समारंभ झाल्यानंतर श्रीमंत राजेसाहेब शिरवळ येथें सायंकाळीं मुक्कामास आले. वाटेंत हरिश्चंद्र गांवच्या लोकांनीं व कापूरव्हाळचे पाटील यांनीं केलेल्या पानसुपारीचा स्वीकार केला.

## विचित्रगड

शिरवळ येथें रहदारीचे बंगल्यानजीक ग्रामस्थ कामगार, देशमूख, पाटील वगैरे हजार-बाराशें लोकांनीं श्रीमंतांचें स्वागत केले. चावडीजवळ देशमूख, पाटील यांनीं व श्रीविठ्ठल मंदिराजवळ पेठकर मंडळींनी श्रीमंताना

पानसुपारी केली. गांवांतून मिरवणुकीनें श्रीमंत बाबासाहेबांना राजवाड्यांत नेण्यांत आलें. तेथें भोंगवली गांवचे लोकांची पानसुपारी स्वीकारली. ता. ११ रोजीं भादवडें गांवचे लोकांची पानसुपारी स्वीकारली. दुपारीं शिरवळ येथील दवाखान्यास राजेसाहेबांनीं भेट दिली. ता. १२ रोजीं शिरवळ येथील प्रमुख नागरिक, देशमूख, वाचनालयाचे पंच यांना राजेसाहेबांनीं मेजवानी दिली. दुपारीं मामलेदार, फडणीस, फौजदार यांनीं पानसुपाऱ्या केल्या. शिरवळ मोफत वाचनालयांत श्रीमंतांना मानपत्र अर्पण करण्याचा समारंभ झाला. त्यास त्यांनीं समयोचित उत्तर दिलें.

श्रीमंतांनीं सायंकाळीं शिरवळ येथील शाळेस भेट दिली. तेथें मुलांना बक्षिसें व मिठाई वांटली. ता. १३ रोजीं श्रीरामदास ऐक्यवर्धक क्लबमध्यें पानसुपारी झाली. तेथें समयानुरूप भाषणें झालीं. सायंकाळीं ५-३० वाजता शिरवळहून निघून भोरास येणें झालें. याप्रमाणें श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर भोर संस्थानच्या पांचहि तालुक्यांतील प्रमुख गांवांस जमाबंदीकरिता गेले. ठिकठिकाणीं त्यांचें लोकांनीं प्रेमानें व उत्साहानें स्वागत केलें, व राजघराण्याबद्दल वाटत असलेला आदर व्यक्त केला.

या फिरतीचे वेळीं प्रत्येक ठिकाणीं रयत लोक अर्ज घेऊन येत. त्यांचें म्हणणें काय आहे तें श्रीमंत बाबासाहेब समक्ष ऐकून घेत. यामुळें त्यांच्या पुढें जाऊन आपलीं गाऱ्हाणीं समक्ष माडण्यास कोणीहि भीत नसे.

जानेवारी सन १९२३ अखेरपर्यंत सर्व संस्थानची पाहणी करून श्रीमंत बाबासाहेब भोरास आले. भोरास आल्यावर एक अनपेक्षित प्रकार उघडकीस आला. हा प्रकार म्हणजे संस्थानचे खजिन्यांतील अफरातफर हा होय.

## संस्थानच्या खजिन्याची अफरातफर

श्रीमंत रावसाहेब दिवंगत झाल्यावर दुसरेच दिवशीं भोरास आल्याबरोबर श्रीमंत बाबासाहेबांच्या आज्ञेवरून संस्थानच्या कारभाऱ्यांच्या सहीच्या खजिन्यास मोहरा करण्यांत आल्या. संस्थानच्या मुलकी खात्याचे शिरस्तेदार रा. होनप व खजिनदार रा. पोतनीस यांच्या मोहरा खजिन्यास असत. त्याच्याच जवळ कारभाऱ्यांच्या मोहरा करण्यांत आल्या. राज्यारोहणसमारंभ, गव्हर्नरांची

भेट, संस्थानची पाहणी इत्यादि कामांतून सवड मिळाल्यावर खजिन्याची मोजदाद करण्यांत आली. तेव्हां एक लक्ष चव्वेचाळीस हजार रुपये कमी असल्याचें आढळून आलें. कै. श्रीमंत रावसाहेबांनीं खजिन्याची सर्व जबाबदारी वरील दोन इसमांवर टाकिली होती. श्रीमंत रावसाहेब हिशेबाचे बाबतींत अगदीं दक्ष असत. वरचेवर खजिना तपासण्यांत येत असे. परंतु वरील दोन इसमावर त्यांचा पूर्ण भरंवसा असल्यामुळें व वृद्धापकाळामुळें अलीकडे ४–५ वर्षांत खजिन्याची मोजदाद करण्यांत आली नव्हती. वरील दोन इसमांनीं श्रीमंत रावसाहेबांच्या विश्वासाचा फायदा घेऊन वरील रक्कम हळूहळू लाबविली असावी. वरील तूट नजरेस येतांच वरील दोघा इसमांस पकडण्यांत येऊन त्यांचेवर रीतसर खटले भरण्यांत आले व दोघांनाहि शिक्षा देण्यात आल्या.

## सुधारणांची पूर्वतयारी

जमाबंदीनिमित्त सर्व संस्थानची पाहणी केल्यावर संस्थानांत कोण-कोणत्या सुधारणा केल्या पाहिजेत ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेबांच्या लक्षांत आली. प्रत्येक तालुक्यांतील नोकरवर्ग त्यानीं पाहिला. त्याचप्रमाणें तालुक्यातील सरकारी इमारती व ऑफिसांतील इस्ताद सामान वगैरेची त्यांनीं तपासणी केली. नोकरवर्गांतील बरेच लोक वृद्ध व कामास नालायक असे आढळून आले. सरकारी इमारती नादुरुस्त स्थितींत असलेल्या दिसल्या. प्रत्येक ऑफिसांत सामानाची उणीव भासत होती. शिपाई लोकांच्या अंगावरचा ड्रेस फाटका दिसत होता. पोलिसात शिक्षण, शिस्त व कवाइतीचा अभाव दिसून आला.

ब्रिटिश मुलखाप्रमाणें संस्थानांत राज्यकारभाराचीं सर्व खातीं कै. श्रीमंत रावसाहेबानीं सुरू केलीं होतीं. परंतु तीं जितकीं कार्यक्षम असावयास पाहिजेत तितकीं नाहींत ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेब विचित्रगड तालुक्याचा कारभार पाहत असतांनाच त्यांच्या लक्षांत आली होती. लोकस्थितीचें निरीक्षण करताना त्यांना निरनिराळ्या तालुक्यांतील लोकांच्या मनोवृत्ती भिन्न असल्याचें दिसून आलें. सुधागड तालुका इतर तालुक्यापेक्षां शिक्षणाच्या बाबतींत पुढारलेला असून तेथील लोक सनदशीर मार्गानें जाणारे आहेत. प्रचंडगड तालुक्यापैकीं अगदीं घाटमाथ्यालगतच्या मोसें खोऱ्यांतील मावळे लोक, राजगड तालुक्यांतील वेळवंड खोऱ्यांतील मावळे लोक व विचित्रगड तालुक्यांतील हिरडसमावळ

भागांतील मावळे लोक जात्या गरीब परंतु अत्यंत भावनावश असल्यामुळें जसा पुढारी मिळेल त्याप्रमाणें वागणारे आहेत. यामुळें कोणत्याहि प्रकारची चळवळ करण्यास हे भाग चळवळया लोकानीं कां पसंत केले ही गोष्टहि श्रीमंत बाबासाहेबाच्या लक्षात आल्यावांचून राहिली नाहीं. वरील भागांशिवाय इतर भागांतील लोक स्वत: आपल्या हितानहिताचा विचार करणारे असल्या-मुळें ते कोणाच्याहि चिथावणीस सहसा बळी पडणारे नाहींत असें त्यांना आढळून आलें.

राज्ययंत्राच्या सर्व भागाचें व लोकस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण केल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांना आपल्याला किती बिकट काम करावयाचें आहे याची पूर्ण कल्पना आली. राज्ययंत्राचे खिळखिळे झालेले सर्व भाग दुरुस्त करून यंत्र सुरळीत चालू करावयाचें होतें. त्याचप्रमाणें लोकस्थिति लक्षांत घेऊन शांतता प्रस्थापित करण्याचे उपाय योजून लोकहिताचीं कामें करावयाचीं होतीं. राज्यकारभाराची चालू असलेली व्यवस्था एकदम मोडून टाकून त्यांना क्रांति करावयाची नव्हती. हलके हलके सुधारणा करून नवीन कालाला अनुरूप असें नवीन स्वरूप चालू राज्यकारभारपद्धतीस द्यावयाचें होतें.

श्रीमंत बाबासाहेबांनीं आतापर्यंत ज्या सुधारणा व लोकहिताचीं कामें केलीं आहेत तीं त्यांनीं स्वत:च्या बुद्धीनें व आपल्या जबाबदारीवर केलीं आहेत ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. 'ऐकावें जनाचें व करावें मनाचें' हें तत्त्व त्यांच्या आचरणांत नेहमीं दिसून येतें. गादीवर आल्यानंतर पुष्कळांनीं पुष्कळ तऱ्हेच्या सुधारणा त्यांना सुचविल्या. कांहींनीं लोकाना विशेष हक्क देऊं नयेत असेंहि सुचविलें. परंतु गादीवर येण्यापूर्वीं त्यांनीं जो अनुभव मिळविला होता त्या अनुभवावरून त्यांचें राज्यकारभाराचें धोरण ठरलें होतें. व तेंच धोरण परिस्थितीप्रमाणें थोड्याफार फरकानें अमलांत आणण्याचा त्याचा निश्चय झालेला होता. प्रत्येकाच्या सल्ल्याप्रमाणें वागल्यास ' म्हातारा व त्याचा लेक ' यांच्याप्रमाणें स्थिति व्हावयाची ही गोष्ट ते पूर्णपणें जाणून आहेत. त्यांनीं आपल्या ध्येयाला अनुसरून गादीवर आल्यापासून आतांपर्यंत कोणकोणत्या सुधारणा करून राज्यकारभारास प्रगतिपर वळण देण्याचा क्रम कसा चालू ठेविला आहे हें पुढें क्रमाक्रमानें सागण्यांत येणार आहे.

---

## प्रकरण ४ थें

# सुधारणा

### पेन्शन, ग्रॅच्युइटी, भाडें-भत्त्याबद्दल नियम व पगारवाढ

श्रीमंत बाबासाहेब गादीवर येण्यापूर्वी संस्थानांत पेन्शन व ग्रॅच्युइटीबद्दल नियम नव्हते. श्रीमंत बाबासाहेब शिरवळ तालुक्याचा कारभार चालवीत होते, त्या वेळेपासूनच नोकरवर्गास पेन्शन किंवा ग्रॅच्युइटी देण्याची व्यवस्था केली पाहिजे असें त्यांना वाटत होतें. परंतु त्या वेळीं त्यांच्या हातांत काहींच सत्ता नसल्यामुळे त्याना काहीं करता आलें नाहीं. गादीवर आल्यावर थोड्याच दिवसांत त्यांनीं पेन्शन व ग्रॅच्युइटीसंबंधीं नियम तयार करून ते जाहीर केले. हे नियम जरी सन १९२३ सालीं प्रसिद्ध केले तरी त्यापूर्वी नोकरींत असलेल्या सर्व नोकर वर्गास ते लागू करण्यात आले. त्यामुळे जुन्या नोकरवर्गास नोकरी संपल्यावर आपली काहीं सोय लागणार कीं नाहीं ही धास्ती राहिली नाहीं. नोकरांचे बाबतींत श्रीमंत बाबासाहेबांनीं मोठीच सुधारणा केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वी पेन्शन मिळण्याची आशा नसल्यामुळें नोकर लोकांचें आपल्या कामाकडे जितकें लक्ष असावयास पाहिजे तितकें नसे. वरील नियम झाल्यापासून नोकर लोक उमेदीनें काम करीत आहेत. आपल्या हातून काहीं अपराध झाला तर नोकरीस व पेन्शनीस मुकावे लागेल ही भीति असल्यामुळे नोकर लोकातील निष्काळजीपणा व चुकारपणा बहुतेक नाहींसा झाला आहे.

पूर्वी भाडें-भत्त्याबद्दल नियम नव्हते. याचा अनिष्ट परिणाम होतो ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेबांच्या लक्षांत आली होती. पूर्वीं भाडेंभत्त्याची सोय नसल्यामुळे अधिकारी तालुक्यांतून फिरत नसत. परंतु जेव्हा ते कामानिमित्त फिरतीवर जात तेव्हां ते ज्या गांवीं जात तेथील त्यांचा बराचसा खर्च गांवकामगारावर पडे. गावकामगार तरी पदरचा थोडाच खर्च करणार ? तो खर्च शेवटीं गांवकऱ्यांवरच पडत असे.

श्रीमंत बाबासाहेबांनीं पेन्शन व ग्रॅच्युइटीचे नियम केले त्याच वेळीं भाडेंभत्त्याचेहि नियम करून ते प्रसिद्ध केले व तालुक्यांतील अमुक अंमलदाराने

महिन्यांतून अमुक दिवस तालुक्यांत फिरलेंच पाहिजे अशाबद्दलहि नियम केले. या व्यवस्थेमुळें आतां मामलेदार, फौजदार, पोलिस सुपरिंटेंडेंट वगैरे अधिकाऱ्यांना नेहमीं फिरतीवर राहून लोकांच्या तक्रारींची ताबडतोब दाद लावणें भाग पडतें.

## पगारवाढ

पगार कमी असल्यामुळें नोकरवर्ग किती असंतुष्ट होता हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ही असंतुष्टता प्रथम नाहींशी केली पाहिजे असें श्रीमंत बाबासाहेबांना वाटत होतें; व हें कामहि त्यांनीं दिरंगाईवर टाकिलें नाहीं. या कामाकरितां त्यांनीं कारभाऱ्यांसुद्धां तीन अधिकाऱ्यांची एक कमिटी नेमून त्याचेकडे कोणास किती पगार वाढविला पाहिजे याबद्दल रिपोर्ट करण्याचें काम सोंपविलें. वरील कमिटीनें संस्थानांतील वरिष्ठापासून कनिष्ठापर्यंत सर्व नोकरवर्गाचे खातेनिहाय तक्ते तयार केले व प्रत्येक नोकराचीं नोकरीचीं वर्षें व लायकी लक्षांत घेऊन त्यास किती पगारवाढ केली पाहिजे तो आकडा त्यांच्या नांवांपुढें दाखल केला. अशा रीतीनें सर्व तक्ते भरून ते श्रीमंत बाबासाहेबाच्या-कडे पाठविले. श्रीमंत बाबासाहेबांनीं कमिटीनें केलेल्या शिफारशींत थोडाफार फरक करून ते तक्ते सन १९२४च्या जानेवारींत मंजूर केले. तथापि जूनपासून संस्थानचें साल बदलत असल्यामुळें ता. १ जून सन १९२३ पासून पगार-वाढीची अंमलबजावणी करण्याबद्दल हुकूम दिले. वरच्या अधिकाऱ्यांपासून तों अगदीं खालच्या शिपायापर्यंत सर्वांच्या पगारांत त्यांच्या लायकीप्रमाणें वाढ करण्यांत आली. या पगारवाढीमुळें संस्थानांतील सर्व नोकरलोकांच्या पगारा-करितां वार्षिक जी रक्कम खर्च होत असे त्या रकमेंत शेंकडा २० नें वाढ झाली. पूर्वीपेक्षां पगाराप्रीत्यर्थ वार्षिक ३२ हजारांनी खर्च वाढला. तेव्हां-पासून आतांपर्यंत नोकर लोकांच्या पगारांत त्यांची विशेष कामगिरी लक्षांत घेऊन पगारवाढ करण्यांत येत असते.

इतर सुधारणा करण्यापूर्वी श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रथम ज्या नोकर लोकांच्या हातून कामें करून घ्यावयाचीं तो नोकरवर्ग उत्साही, कर्तव्यदक्ष होण्याकरितां पगारवाढ करून पेन्शन, ग्रॅच्युइटी, भाडें, भत्ता वगैरेबद्दल नियम केले यांत त्याची समयज्ञता दिसून येते. नोकरवर्ग प्रामाणिक, संतुष्ट, कर्तबगार

व स्वामिनिष्ठ असल्याशिवाय राज्यकारभार यशस्वी होत नाहीं याची त्याना पूर्ण जाणीव होती. म्हणूनच या सुधारणा त्यानीं प्रथम केल्या.

पूर्वी नोकर लोकांचीं सर्व्हिसबुकें ठेवण्याची पद्धत नव्हती. पेन्शन, ग्रॅच्युइटीचे नियम केल्यानंतर व पगारवाढीचें धोरण ठेविल्यावर सर्व्हिसबुकें ठेवणें अवश्यच होतें. म्हणून सर्व्हिसबुकें ठेवण्याची पद्धत सुरू करण्यांत आली. त्याचप्रमाणें प्रत्येक खात्याच्या अधिकाऱ्यानें आपल्या हाताखालील नोकरांचे हिस्टरी-शीट प्रत्येक वर्षी हुजूर पाठविण्याची पद्धतहि सुरू केली.

## मुलकी खातें

या खात्यांतहि गेल्या १७ वर्षांत अनेक सुधारणा झाल्या आहेत. ब्रिटिश मुलखांत काम करून पेन्शन घेतलेल्या लायक इसमाची त्यानें ब्रिटिश हद्दींत ज्या खात्यांत काम केले असेल त्याच संस्थानांतील प्रत्येक खात्याच्या वरिष्ठ जागेवर नेमणूक करून तें खातें सुधारण्याचा आपला हेतु असल्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या भाषणांतून जाहीर केलें होतें. या हेतूस अनुसरून त्यांनीं नवीन नेमणुका करण्यास सुरुवात केली. पुष्कळ लोकाना त्याचें हें धोरण पसंत नव्हतें व त्याच्या या धोरणाबद्दल त्याच्यावर टीकाहि झाली होती. श्रीमंत बाबासाहेबानीं हें धोरण का स्वीकारलें व त्यांचें हें करणेंच कसें योग्य आहे त्याबद्दल खुलासा करणें जरूर आहे.

ब्रिटिश मुलखांतील खात्यांप्रमाणें संस्थानांतील खातीं झालीं पाहिजेत अशी श्रीमंत बाबासाहेबांची पहिल्यापासून इच्छा होती. संस्थानांतील जुन्या पद्धतीच्या अंमलदारांकडून सुधारणा होणें शक्य नव्हतें. प्रत्येक खात्यांत ब्रिटिश पद्धतीप्रमाणें कामाची शिस्त लागण्यास ब्रिटिश हद्दींत काम केलेल्या इसमांचीच जरूर होती. काहींचें म्हणणें असें होतें कीं, संस्थानातील लायक, तरतरीत, होतकरू लोक शिकण्याकरितां बाहेर पाठवून ते तयार होऊन आल्यावर त्यांची नेमणूक करावी. परंतु असे प्रयोग करून पाहणें फार खर्चाचें ठरतें, ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेबांना माहीत होती. संस्थानच्या खर्चानें एखादा डॉक्टर, एंजिनिअर अगर दुसऱ्या एखाद्या खात्यांतील तज्ज्ञ तयार केला तर ब्रिटिश मुलखाप्रमाणें आपणांस पगार मिळाला पाहिजे अशी त्याची महत्त्वाकांक्षा असणें स्वाभाविक आहे. परंतु ब्रिटिश मुलखांत जो पगार असतो तितका पगार लहान

संस्थानास देतां येणें कधींहि शक्य नाहीं, ही गोष्ट कोणाहि विचारी माणसास मान्य होणार नाहीं असें वाटत नाहीं. संस्थानांत संस्थानाबाहेरील लोकांस नेमूं नयेत हें म्हणणेंहि समंजसपणाचें नाहीं. आज संस्थानांतील शेंकडों लोक ब्रिटिश हद्दींत नोकरीवर आहेत व कांहीं लोक मोठमोठ्या हुद्दयांचीं कामेंहि करीत आहेत. मग ब्रिटिश हद्दींतील थोडेसे लोक संस्थानांत आले तर त्याबद्दल संस्थानांतील लोकांना वैषम्य कां वाटावें हें समजत नाहीं. ब्रिटिश हद्दींत काम करून ज्यांनीं तिकडील राज्यकारभाराचा अनुभव घेतला आहे त्यांच्या अनुभवाचा फायदा घेऊन ब्रिटिश नमुन्याबरहुकूम राज्यकारभार चालविणें हेंच धोरण लहान संस्थानिकांच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे, असें निर्विकार मनानें विचार केल्यास दिसून येणार आहे. ब्रिटिश मुलखांत हिंदी लोकांना नोकऱ्या न देतां ब्रिटिशांना देण्यांत येतात म्हणून हिंदी प्रजेची ओरड असते. म्हणून संस्थानी प्रजेनें संस्थानाबाहेरील लोक नेमूं नयेत अशी ओरड करण्यांत कांहींच अर्थ नाहीं. संस्थानी व संस्थानाबाहेरील प्रजा भिन्नराष्ट्रीय नसून एकराष्ट्रीयच आहेत. इंग्रज लोक हिंदुस्थानांत नोकरी करून जें अनुभवजन्य ज्ञान मिळवितात तें ज्ञान नोकरी संपल्यावर ते विलायतेस घेऊन जातात. त्यांच्या ज्ञानाचा उपयोग हिंदुस्थानास मिळत नाहीं व त्याबद्दल तक्रार करणें योग्य ठरेल. परंतु संस्थानाबाहेरील हिंदी लोकाबद्दल असें म्हणता येत नाहीं. ते लोक व संस्थानचे लोक एकच आहेत. त्या लोकांनीं संपादन केलेल्या ज्ञानाचा उपयोग करून घेतला तर त्याबद्दल त्यांना नांवें ठेवणें कितपत समंजसपणाचें ठरेल हें सांगण्याचें कारण नाहीं. लोक कांहींहि म्हणोत; प्रत्येक खात्याचे मुख्य जागेवर त्या खात्याच्या ब्रिटिश हद्दींत काम केलेल्या तज्ज्ञ अधिकाऱ्याची नेमणूक करून तें खातें सुधारावयाचें असें श्रीमंत बाबासाहेबानीं आपल्या मनाशीं ठरवून ठेविलें होतें. तेंच धोरण त्यांनीं चालू ठेविलें आहे व त्याबद्दल त्यांना कोणी दोष देईल असें वाटत नाहीं. जबाबदारीच्या मुख्य जागेवर बाहेरचा पेन्शनर इसम नेमिला असतां त्याचा संस्थानच्या प्रजेशीं फारसा संबंध नसल्यामुळें व त्याला द्रव्याची हांव नसल्यामुळें लाचलुचपतीचा प्रकार बंद होऊन प्रजेस निःपक्षपातीपणानें न्याय मिळेल अशी श्रीमंत बाबासाहेबांची समजूत होती व ती आजपर्यंतच्या अनुभवावरून खरी ठरली आहे.

कै. श्रीमंत रावसाहेबांच्या कारकीर्दींत दप्तरदारीची जागा बरींच वर्षें रिकामी ठेवण्यांत येऊन त्यांच्या शिरस्तेदाराकडूनच तें काम करून घेण्यात येत असे. याच शिरस्तेदाराच्या हातून खजिन्याची अफरातफर झाली होती. श्रीमंत बाबासाहेबांनीं गादीवर येतांच या जबाबदारीच्या जागेवर मुलकी खात्याचा पूर्ण अनुभव असलेल्या एका ब्रिटिश पेन्शनराची नेमणूक करून तें खातें सुधारण्याचें काम त्याचेकडे सोंपविले. मागील कारकीर्दींत पौनमावळ तालुक्याच्या मामलेदारासच त्या तालुक्याच्या सबजज्जाचे अधिकार देण्यांत आले होते. एकाच इसमाकडे दोन्ही अधिकार होते. या व्यवस्थेमुळें न्यायाच्या बाबतींत बराच घोटाळा उडत असे. श्रीमंत बाबासाहेबांना ही व्यवस्था मान्य नव्हती. त्यांनीं मामलेदारीच्या जागेवर दुसऱ्या इसमाची नेमणूक केली व सबजज्जाची जागा स्वतंत्र केली. पांचहि तालुक्यात जे मामलेदार होते त्याच्यापैकीं जो पेन्शनींत निघे त्याच्या जागीं ब्रिटिश पेन्शनर मामलेदार नेमण्यास सुरुवात झाली. अशा रीतीनें जुने लोक एकदम कमी न करितां नवीन अनुभविक इसम नेमण्यांत आले. थोडक्याच वर्षांत मामलेदारीसारख्या जबाबदारीच्या जागांवर ब्रिटिश पेन्शनर मामलेदार दिसूं लागले. त्यांनीं खालसा मुलखांतील कामाची पद्धति सुरू केली. त्यामुळें कामाची शिस्त लागून रयतेची लवकर दाद लागते. रयतेला आपल्या तक्रारींची दाद लावून घेण्यास पूर्वीप्रमाणें अंतस्थ खर्च करावा लागत नाहीं. कोणत्याहि तालुक्यांत हिंडून बारकाईनें चौकशी केली तर पूर्वीप्रमाणें आता अंदाधुंदी राहिली नाहीं अशा प्रकारचे उद्गार ऐकूं येतील.

दप्तरदारीच्या जागेवर लायक इसमांची नेमणूक होत असल्यामुळें भोर येथील मुख्य मुलकी ऑफिसांतहि बरेच फेरफार करण्यांत येऊन पुष्कळ सुधारणा झाली आहे. लायक व होतकरू कारकुनांच्या नेमणुका झाल्यामुळें काम फारसें शिल्लक राहत नाहीं. रयतेची शक्य तितकी लवकर दाद लावण्याबद्दल सक्तीचे हुकूम आहेत. या कामीं कोणाच्या हातून हलगर्जीपणा झाल्याचें नजरेस आल्यास त्यास कडक शासन होतें; त्यामुळें प्रत्येकजण आपलें काम दक्षतेनें काळजीपूर्वक करीत असतो.

खजिनदाराच्या जागीं एक तज्ज्ञ व लायक इसमाची नेमणूक करण्यांत आली आहे. हिशेबी खात्यांत पुष्कळच सुधारणा झाल्या आहेत. दरमहा खजिन्याची

मोजदाद करण्यांत येते. पूर्वींप्रमाणें वाटेल त्यास तसलमाती देण्याची पद्धत बंद करण्यांत आली आहे. विशेष कामाकरितां तसलमाती दिल्या तर ज्या कामाकरितां तसलमाती दिल्या असतील तें काम पुरें होतांच तसलमातींचा हिशेब द्यावा लागतो. नवीन तज्ज्ञ इसमांच्या नेमणुका झाल्यामुळें अकौट ऑफिसची चांगली सुधारणा झाली आहे. ऑडिट् ऑफिसचें कामहि समाधानकारक असतें. राज्याचा मुख्य आधार म्हणजे कोश. तो सुरक्षित ठेवण्याची जितकी दक्षता घ्यावयास पाहिजे तितकी घेण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे.

## न्यायखातें–दिवाणी

पूर्वी संस्थानांत भोर, पिरंगूट व पाली या तीन ठिकाणीं सब्‌जज्जेस कोर्टें होतीं. भोर येथील कोर्टांत विचित्रगड, राजगड व प्रचंडगडचा काहीं भाग यांतील कामें चालत. पिरंगूट कोर्टाकडे प्रचंडगडचा राहिलेला भाग व सबंध कोळवण तालुका देण्यात आला होता. सुधागड तालुका घाटाखालीं तुटक असल्यामुळें त्या तालुक्याकरितां स्वतंत्र कोर्ट होतें. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर त्यांनीं काहीं वर्षें हीच व्यवस्था कायम ठेविली होती. भोर व पाली येथें सबजज्जाचे जागेवर एल्‌एल्. बी. इसम होतेच. फक्त पिरंगूट येथील कोर्टावर जुने मराठी मुनसब होते. त्यांच्या जागीं श्रीमंत बाबासाहेबानीं एल्‌एल्. बी. इसमाची नेमणूक केली. पुढें पाली व पिरंगूट येथील कोर्टांना भरपूर काम नाहीं असें जेव्हा श्रीमंत बाबासाहेबाच्या लक्षांत आलें तेव्हा पिरंगूट कोर्टाकडे असलेल्या प्रचंडगड तालुक्यांतील गावांपैकीं कांहीं गांवें भोर कोर्टाकडे देऊन पाली व पिरंगूट या दोन कोर्टांचें संयुक्त कोर्ट (Linked Court) करण्याचें त्यानीं ठरविलें व त्याप्रमाणें एक सबजज्ज कमी करून पाली व पिरंगूट हीं दोन्ही कोर्टें एकाच सबजज्जाचे ताब्यांत देण्यांत आलीं आहेत. ते प्रत्येक ठिकाणीं दोन महिने पाळीपाळीनें काम करीत असतात. पाली कोर्टासहि काम भरपूर नव्हतें. वरील योजनेमुळें आतां दोन्ही कोर्टांचें मिळून एका सबजज्जास पुरेसें काम झालें आहे. सबजज्जांचे पगारहि त्यांच्या योग्यतेस व जागेस शोभतील असेच ठेवण्यांत आले आहेत. योग्य इसमांच्या नेमणुका होत असल्यामुळें गांवगुंडांचें प्रस्थ नाहींसें झालें आहे.

पूर्वी मुनसफ कोर्टावरील अपीलें कारभाऱ्यांचे पुढें चालत. श्रीमंत बाबासाहेबांनीं ही पद्धत मोडून डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्जाची स्वतंत्र जागा करून त्या जागेवर एका स्वतंत्र कायदेपंडिताची नेमणूक केली. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचे अधिकार दिवाणसाहेबांचेकडे देण्यात आले. कांहीं तालुक्यांच्या मामलेदारांना फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार देण्यात आले आहेत. पूर्वी कोणत्याहि तालुक्याचे मामलेदारास फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार नसत. कारभाऱ्यांना फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार असत. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचे अधिकार खुद्द चीफसाहेब चालवीत. पूर्वीच्या पद्धतींत बदल करून श्रीमंत बाबासाहेबांनीं वरील योजना केली आहे. यामुळें रयतेस योग्य न्याय मिळण्याची सोय झाली आहे. डिस्ट्रिक्ट जज्जांचे निकालावर स्पेशल अपिलांचे निकाल करण्याकरितां स्वतंत्र हायकोर्टची स्थापना करण्यांत आली आहे. या जागेवर दरसाल एक किंवा दोन महिने मुदतीनें खालसात काम करून पेन्शन घेतलेल्या एका नामांकित फर्स्टक्लास सबजज्जाची हायकोर्टजज्ज म्हणून नेमणूक १९३९ सालाचे सुरुवातीपर्यंत करण्यांत येत असे. या पद्धतीमुळें रयतेला योग्य व निःपक्षपाती न्याय मिळत असून लोकाना ही पद्धत पसंत पडलेली आहे. सन १९३९ पासून याहि पद्धतींत पुन्हा बदल करण्यात येऊन दिवाणसाहेबांच्याकडे हायकोर्ट जज्जचे अधिकार, त्यांनीं ब्रिटिशमध्यें डिस्ट्रिक्ट व सेशन जज्जचें काम केलेलें असल्यामुळें त्याना देण्यात आले असून त्याचे हाताखालीं एक रेव्हिन्यु-असिस्टट देण्यात येऊन त्यास कलेक्टर व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचे अधिकार दिले आहेत.

## फौजदारी

श्रीमंत बाबासाहेब यानीं या खात्यांत पुष्कळ सुधारणा केल्या आहेत. ते गादीवर आल्यावेळीं जे फौजदार होते त्याना एकदम कमी न करिता त्याच्यापैकीं जो पेन्शनींत निघे अगर ग्रॅच्युइटी देऊन कमी करण्यात येई त्याचे जागीं ब्रिटिश हद्दींत फौजदारीचें काम करून पेन्शन घेतलेल्या लायक इसमाची नेमणूक करण्यांत येई. अशा रीतीनें थोड्याच वर्षांत सर्व तालुक्यांत लायक फौजदार नेमण्यांत आले. भोर येथें पोलिस खात्यांत काय सुधारणा

केल्या त्या पुढें सांगितल्या आहेत. रयतेच्या जीविताचें व मालमत्तेचें रक्षण करण्याची जबाबदारी या खात्यावर असल्यामुळें त्या खात्यांत जितकी कार्यक्षमता उत्पन्न करता येईल तितकी करण्याकडे श्रीमंत बाबासाहेबांचें नेहमीं लक्ष असतें.

संस्थानास दिवाणी व फौजदारी संपूर्ण अधिकार आहेत. फांशीची शिक्षा देण्याचे कामीं कांहीं निर्बंध होते तेहि सन १९३० सालीं ब्रिटिश सरकारकडून दूर झाल्यामुळे इतर संस्थानातील इसमानें भोर संस्थानांत खून केला तर त्याचीहि चौकशी करण्याचा अधिकार संस्थानास आहे. इतर संस्थानच्या प्रजाजनांनीं या संस्थानांत कोणताहि गुन्हा केला तर त्याचाहि इन्साफ करण्याचा अधिकार या संस्थानला आहे.

सर्व प्रकारच्या फौजदारी गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार संस्थानास असल्यामुळें प्रजेला योग्य न्याय मिळविण्याकरिता या खात्याची सुधारणा करण्यांत आली आहे.

संस्थानांत हुजूर क्रिमिनल कोर्ट हेंच मुख्य हायकोर्ट आहे. या हायकोर्टाचे ताब्यांत पुढील क्रिमिनल कोर्टें आहेत—१ सेशन्स जज्ज कोर्ट, १ कोर्ट ऑफ अॅडिशनल सेशन्स जज्ज, १ कोर्ट ऑफ दि डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट; १ कोर्ट ऑफ दि अॅडिशनल डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, १ कोर्ट ऑफ दि सब्-डिव्हिजनल मॅजिस्ट्रेट, ३ फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट कोर्टें, ३ सेकंड क्लास मॅजिस्ट्रेट कोर्टें व ४ थर्ड क्लास मॅजिस्ट्रेट कोर्टें. अशा तऱ्हेची पद्धतशीर व्यवस्था पूर्वीं नव्हती, ती श्रीमंत बाबासाहेबांनीं सुरू केली.

दिवाणी व फौजदारी कामाची अशा प्रकारची ब्रिटिश नमुन्याबरहुकूम व्यवस्था करण्यांत आली, व त्यामुळे रयतेला त्वरित व योग्य न्याय मिळूं लागला. पूर्वीं न्याय मिळविण्याच्या कामीं दरबारखर्च म्हणून एक बाब रूढ झाली होती. हा एक आवश्यकच खर्च आहे व तो केल्याशिवाय न्याय मिळणारच नाहीं अशी गावगुंडांनीं अडाणी लोकांची इतकी दृढ समजूत करून दिली होती कीं, हा कायदेशीरच खर्च आहे असें त्यांना वाटे. याचप्रमाणें राजीनाम्याची फी ही आणखी एक बाब रयतेच्या अंगवळणीं पडली होती. क्षुल्लक कारणावरून तंटा झाल्यास गांवगुंड लोक तंटा करणाऱ्यांना फौजदारी काम

चालविण्यास प्रोत्साहन देत. नंतर उभय पक्षांची समजूत घालून राजीनामा देवविण्याची खटपट करीत. राजीनामा देण्याची वेळ आली म्हणजे राजीनाम्यास फी पडत असे. ही फी ठराविक नसे. फीचे दर ५ रुपयांपासून ५० रुपयांपर्यंत असत. ही फी दिलीच पाहिजे अशी समजूत झाली असल्यामुळें ती देण्यास फिर्यादी व आरोपी तक्रार करीत नसत. या फीच्या पायीं त्यांना कर्ज काढावें लागलें तरी त्याबद्दल कांहीं वाटत नसे. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यानंतर त्यानीं खालसांतील इसमाच्या नेमणुका केल्यावर 'दरबार खर्च' व 'राजीनाम्याची फी' या दोन्ही बाबी नाहीशा झाल्या. गांवगुंडाचें बंड बहुतेक मोडलें. श्रीमंत बाबासाहेबांच्या सुधारणांमुळें गांवगुंडांच्या पोटावर पाय आले, पण रयतेस सुख झालें. हल्लीं संस्थानांत कोठेहि फिरून तपास केला तर रयतेच्या तोंडून आम्हांस आतां बुडित खर्च करावा लागत नाहीं; योग्य न्याय मिळतो; तालुक्याच्या ठिकाणीं आमची लवकर दाद लागते अशा प्रकारचे उद्गार ऐकूं येतात.

## पोलिसखातें

कै. श्रीमंत रावसाहेब यांच्या कारकीर्दीत पोलिसखात्याची किती अधोगति झाली होती, तें सुधारण्याबद्दल इंग्रज सरकारांतून श्रीमंत रावसाहेबांना कशा सूचना येत होत्या व त्या खात्याची सुधारणा न झाल्यामुळें संस्थानांत उत्पन्न झालेली बंडाळी मोडणें किती कठिण झालें होतें हें मागें सांगण्यांत आले आहे. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर रयतेचीं प्रक्षुब्ध मनें शांत करण्याकरितां रयतेनें मागणी करण्यापूर्वींच त्यांच्या योग्य व न्याय्य तक्रारी लक्षांत घेऊन जाचक कर माफ केले होते व बऱ्याच तक्रारींचा समाधानकारक निकाल लावून काहीं तक्रारींची योग्य चौकशी करण्याचें आश्वासन दिले होतें, तरी संस्थानांतील वातावरण पूर्णपणें शांत झालेलें नव्हतें.

प्रजेच्या जीविताचें व मालमत्तेचें संरक्षण करणें हें राज्यकर्त्यांचें आद्य कर्तव्य असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांनीं पोलिसखातें सुधारण्याचें काम प्रथम हातीं घेतले. हेड क्वॉर्टर स्थापन करून बडोदें संस्थानांत लष्करी खात्यांत काम करून पेन्शन घेतलेल्या एका अनुभविक इसमाची हेड क्वॉर्टर फौजदार म्हणून नेमणूक केली व त्याच्याकडे पोलिस, शिबंदीकडील लोक व स्वार यांना कवाईत, शिस्त

व गोळीबार शिकविण्याचें काम दिले. स्वारांना नवीन घोडे खरेदी करून देण्यांत आले व पूर्वीच्या देशी जिनांऐवजीं विलायती कातडी जिनें घेऊन दिलीं. पुढें ३-४ वर्षांनीं नवीन २५ ब्रिजलोड बंदुका खरेदी करून त्या पोलिसांना देण्यांत आल्या व नवीन ड्रेस देण्यांत आले. जे नालायक लोक होते त्यांना कमी करण्यांत आलें. त्यांच्या जागीं नवीन इसमांची नेमणूक करण्यास सुरुवात झाली. जे वृद्ध झाले होते त्यांना पेन्शनें देण्यात आलीं. सन १९३० सालापर्यंत या खात्यांत बऱ्याच सुधारणा झाल्या व ब्रिटिश मुलुखांतील पोलिसखात्याप्रमाणें हें खातें कार्यक्षम होत चाललें होतें. सन १९३० सालीं चळवळ्या लोकानीं चळवळ सुरू केली तेव्हां ह्या खात्यांत अधिक सुधारणा करण्याची विशेष अवश्यकता भासूं लागली. म्हणून सन १९३१ सालीं ब्रिटिश हद्दींत पोलिस इन्स्पेक्टरच्या जागीं काम करीत असलेल्या एका इसमास ब्रिटिश सरकारांतून मागून घेऊन त्याची पोलिस सुपरिंटेंडेंट म्हणून नेमणूक केली व भोर येथें हेड-कॉर्टर पोलिसांत नवीन २५ इसमांची भरती करून पोलिसखातेंहि त्याच्या ताब्यांत दिलें. या वेळीं नवीन ७५ मस्केट्स् खरेदी करण्यांत आल्या. सन १९३१ सालापासून पोलिस सुपरिंटेंडेंटच्या जागीं ब्रिटिश हद्दींत पोलिसखात्यांत काम करून नांवलौकिक मिळविलेल्या लायक इसमाची नेमणूक करण्याचा प्रघात सुरू ठेवण्यांत आला आहे. हल्लीं हें खातें पूर्णपणें कार्यक्षम झाले आहे; व संस्थानांत दंगेधोपे उत्पन्न झाल्यास ते मोडून शांतता राखण्यास तें समर्थ आहे. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आले त्या वेळीं या खात्यावर वार्षिक खर्च सुमारें २८ हजार रुपये होत असे तो मध्यंतरीं ६९ हजारापर्यंत गेला होता. संस्थानच्या उत्पन्नाच्या मानानें हा खर्च फार होतो याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांना वाईट वाटत नाहीं असें नाहीं. म्हणून थोडीशी शांतता झाल्यावर हा खर्च रु. ५२००० वर आणण्यात आला असून जसजशी पूर्ण शांतता प्रस्थापित होत जाईल तसतसा हा खर्च आणखी कमी करण्याचा श्रीमंतांचा विचार आहे.

संस्थानच्या बँडमध्येंहि सुधारणा करण्यांत आली आहे. पूर्वी ६ इसमांचाच बँड असे. त्यांना बँडची विशेष माहितीहि नसे. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर त्यांनीं आणखी ६ नवीन इसम व बँड शिकविण्याकरितां

चित्रांक ७६



भोर येथें स्वार-शिबंदीची परेड चालू असतांना.

[ सं. पा. ४६९

एक बँडमास्तर नेमण्याची परवानगी दिली. त्याप्रमाणें नेमणुका झाल्या. नवीन ठेविलेल्या बँडमास्तरच्या हाताखालीं थोड्याच दिवसात बँडचे लोक तयार झाले. बँडमध्यें इंग्रज सरकारच्या राष्ट्रगीताबरोबरच संस्थानचे गीत वाजविण्याची पद्धत आता सुरू केलेली आहे. सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस याची नेमणूक झाल्यापासून दरसाल पोलिस लोकाचे स्पोर्टस् होत असतात; व त्यात विजयी होणाऱ्या इसमाना बक्षिसे दिलीं जातात. बक्षिसें देण्याची पद्धत सुरू केल्यामुळें लोक आपआपलीं कामें उमेदीनें व चढाओढीनें करीत असतात.

## समारंभानिमित्त कवाइती

हिंदु वर्षारंभ चैत्र शुद्ध १, बादशहाचा वाढदिवस व श्रीमंत बाबासाहेबाचा वाढदिवस या तीन दिवशीं प्रतिवर्षी सेरिमोनिअल परेडी (समारंभानिमित्त कवाइती) होत असतात. प्रत्येक परेडीस श्रीमंत बाबासाहेब, राजघराण्यातील मंडळी व अधिकारी हजर असतात.

शहराच्या दक्षिण अंगास असलेल्या उंचवट्यावरील विस्तीर्ण परेड-ग्राउंडवर ह्या परेडी होतात, त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब सर्व शिपायाची पाहणी करितात. वरील तीन दिवसाशिवाय विशेष प्रसंगींहि अशा परेडी घेण्यात येतात. सेरिमोनिअल परेडीची पद्धत पूर्वी नव्हती ती श्रीमंत बाबासाहेबानींच सुरू केली.

---

## प्रकरण ५ वें

# राज्यकारभारपद्धतींत सुधारणा

### एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल, लेजिस्लेटिव्ह कौन्सिल, लोकलबोर्डस् व स्थानिकस्वराज्य संस्था यांची स्थापना

कै. हिज हायनेस श्रीमंत रावसाहेब संस्थानांतील सर्व खात्यांचा कारभार स्वतःच्या जबाबदारीवर एकटेच चालवीत. राज्यकारभाराची ही एकतंत्री पद्धत श्रीमंत बाबासाहेबांना पसंत नव्हती. गादीवर आल्यानंतर त्यांनीं सन १९२५ सालीं एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल स्थापन केलें, व ह्या कौन्सिलच्या मदतीनें राज्यकारभार चालविला आहे. संस्थानच्या दिवाणासह या कौन्सिलचे तीन सभासद आहेत. दिवाणाशिवाय दप्तरदार व चीफ सेक्रेटरी हे दोन सभासद आहेत. राज्यकारभाराच्या सोईसाठीं जंगल, पब्लिक वर्क्स, मुलकी, शिक्षण, वैद्यक, छापखाना, रेजिस्ट्रेशन, दिवाणी व पोलिटिकल हीं निरनिराळीं खातीं कौन्सिलरांमध्यें विभागून देण्यांत आलीं आहेत. राज्यकारभाराच्या सर्व कामांवर दिवाण यांची देखरेख असते. आपआपल्या ताब्यांतील महत्त्वाच्या कामांचा निकाल करण्याकरितां कौन्सिलची बैठक भरते त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब स्वतः अध्यक्ष असतात व त्यांच्या अध्यक्षतेखालीं महत्त्वाच्या कामाची चर्चा होऊन कामाचा निकाल लावण्यात येतो. एखाद्या कामीं सभासदांचीं ( मंत्रिमंडळाचीं ) मतें भिन्न पडलीं तर श्रीमंत बाबासाहेब आपल्या स्वतःच्या मताप्रमाणें निर्णय देऊन कामाचा निकाल करतात. एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल स्थापन करून संस्थानांत रुढ असलेली एकतंत्री राज्यकारभारपद्धति मोडून टाकिली, यामुळें एकतंत्री राज्यकारभारपद्धतीपासून उत्पन्न होणारे दोष नाहींसे झाले. कामाची विभागणी झाल्यामुळें राज्यकारभाराची जबाबदारीहि वांटली गेली.

### प्रातिनिधिक संस्थांची स्थापना

श्रीमंत बाबासाहेब १९२२ सालीं गादीवर आल्यापासून राज्यकारभारांत हळूहळू सुधारणा करण्याचें (Hasten slowly) " हळूहळू पळा " हें धोरण ठेविले होतें. त्या धोरणास अनुसरून प्रातिनिधिक कायदेमंडळ ही संस्था स्थापन करण्याचा विचार श्रीमंत राजेसाहेब यांचे मनांत बरेच दिवस

चित्रांक ७७



ता. १८ ऑगस्ट १९२८ च्या राज्यारोहणदिनाचे दिवशीं श्रीमंतांनीं कायदेमंडळ स्थापन केल्याचें जाहीर केलें त्या दरबारकरितां आलेली पाहुणे मंडळी.
खुर्चीवर:–१ रा. ब. अंजनगांवकर; २ रा. ब. सातभाई; ३ आबासाहेब मोहिते; ४ मं. ह. बागळे; ५ वा. गो. पुराणीक; ६ श्रीमंत राजेसाहेब; ७ रा. कु. बापूसाहेब; ८ श्री. युवराज भाऊसाहेब; ९ चिं. वि. वैद्य; १० न. चिं. केळकर; ११ ग. भा. साने; १२ अ. वि. पटवर्धन; १३ सी. वि. टिळक. [सं. पा. ४७३ .

घोळत होता. त्या वेळीं औंध संस्थानखेरीज दक्षिणेंतील दुसऱ्या कोणत्याहि संस्थानमध्यें कायदेमंडळ अगर तत्सम अशा प्रातिनिधिक संस्थेची स्थापना झालेली नव्हती. त्या दृष्टीनें राज्यकारभारास हें नवीनच वळण लागणारे होतें. हा कायदेमंडळ स्थापन करण्याचा विचार मूर्त स्वरूपांत आणण्याऱ्या योग्य संधीची श्रीमंत बाबासाहेब वाट पाहत होते. ती संधि अनायासें लवकरच प्राप्त झाली. १९२७ च्या ऑगस्टमध्यें श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यास ५ वर्षें पूर्ण झालीं. या पांच वर्षांत श्रीमंत बाबासाहेब यानीं केलेल्या सुधारणा, सुव्यवस्थित कारभार पाहून त्यांच्या उज्ज्वल कारकीर्दीचा ब्रिटिश सरकारकडून १९२७ च्या नोव्हेंबर महिन्यांत, ९ तोफांच्या वंशपरंपरा सलामीचा मान बहाल करण्यांत येऊन गुणगौरव करण्यांत आला. त्यामुळें संस्थानचा दर्जा बराच वाढला. ब्रिटिश सरकारकडून करण्यांत आलेल्या आपल्या राजाच्या गौरवाबद्दल प्रजाजनांना वाटत असलेला आनंद श्रीमंतांना दरबारांत मानपत्रे अर्पण करून त्यानीं व्यक्त केला. श्रीमंत बाबासाहेबानाहि या गौरवानें विशेष हुरूप येऊन त्यांच्या मनांत घोळत असलेली कायदेमंडळाची कल्पना व्यक्त स्वरूपांत आणण्याची सुयोग्य संधि हातीं आलेली पाहून त्यांना फार आनंद झाला व ता. २९ जानेवारी १९२८ रोजीं भरलेल्या दरबारांत मानपत्राना उत्तर म्हणून त्यांनीं केलेल्या भाषणात आपण प्रातिनिधिक कायदेमंडळ स्थापन करणार आहों असें जाहीरपणें सांगितलें. त्याप्रमाणें पुढील ता. १८ ऑगस्ट १९२८ रोजीं राज्यारोहणाच्या सहाव्या वाढदिवशीं कायदेमंडळाची घटना लोकांपुढें मांडून त्या घटनेप्रमाणें २० सभासदांचें कायदेमंडळ स्थापन करण्याचें ठरविलें.

राज्यारोहणसमारंभाच्या प्रसंगीं श्रीमंत बाबासाहेबांनीं जें भाषण केलें तें वाचकांच्या लक्षांत असेलच. त्यांत त्यांनीं पुढील विचार व्यक्त केले होते. "राजाचें कर्तव्य दोन प्रकारचें असतें; एक धर्म व ईश्वर यांची सेवा व दुसरे प्रजापालन व तद्वारां जनतारूपी परमेश्वराची सेवा. हीं दोन्ही कर्तव्यें बिनकसूर करण्याचा माझा कृतसंकल्प आहे. बजेटची पद्धति सुरू करून लोकप्रतिनिधित्वाचें तत्त्व कारभारास लागू करण्याची माझी इच्छा आहे."

१९२५ सालीं एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलची स्थापना केल्यानंतर वरील जाहीर आश्वासनाप्रमाणें राज्यकारभारांत प्रजेचा हात असावा या हेतूनें श्रीमंत

बाबासाहेबांनीं सन १९२८ सालीं भोर कायदेमंडळ स्थापन केलें. हें साल भोर संस्थानच्या इतिहासांत सुवर्णाक्षरानीं लिहून ठेवण्याजोगें आहे. या सालीं भोर संस्थानच्या प्रजेस राज्यकारभारांत प्रथमच हक्क मिळाले.

## कायदेमंडळाची घटना

कायदेमंडळ स्थापन करण्याचें ठरल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांनीं अल्पारंभ या दृष्टीनें एकदम कायदेमंडळ ॲक्ट तयार न करिता कायदेमंडळ स्थापन करण्याचा हेतु जाहीर करण्याकरिता एक जाहीरनामा केला व कायदेमंडळाचे कामकाजाकरिता नियम तयार केले. कायदेमंडळाचे अध्यक्ष संस्थानचे दिवाण नेमिले. त्यांच्याशिवाय आणखी २० सभासद नेमिले. १० सरकारी सभासद व १० सरकारनियुक्त बिनसरकारी सभासद, याप्रमाणें २१ सभासदांचें कायदे-मंडळ तयार केले.

या नवीन कायदेमंडळाचे उद्घाटन श्रीमंत बाबासाहेबानीं आपल्या सहाव्या वार्षिक राज्यारोहणदिनसमारंभाच्या दिवशीं करण्याचें ठरविलें. दरसाल ता. १८ ऑगस्ट रोजीं राज्यारोहणदिन साजरा करण्यांत येतोच; परंतु वरील दिवशीं नवीन प्रयोगाचें उद्घाटन करावयाचें असल्यामुळें या समारंभाकरितां बाहेरच्या बऱ्याच पाहुण्यांना निमंत्रण करण्यांत आलें होतें. संस्थानचे त्या वेळचे पोलिटिकल एजंट मि. टयूडर-ओवेन यांनाहि सहकुटुंब येण्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांनीं आग्रहाची विनंति केली होती. मि. टयूडर-ओवेन यांनीं ता. १७ मार्च सन १९२८ रोजीं भोरास भेट दिली होती. संस्थानला ९ तोफांच्या सलामीचा वंशपरंपरेचा मान सन १९२७ सालीं मिळाला. त्यानंतर पोलिटिकल एजंट या नात्यानें मि. टयूडर-ओवेन यांची ही प्रथमच भेट होती. त्या वेळीं त्यांच्याबरोबर मिसेस टयूडर-ओवेन याहि आल्या होत्या. या वेळीं श्रीमंत बाबासाहेबानीं कायदेमंडळ स्थापन करण्याचा आपला हेतु प्रदर्शित केला होता. मि. टयूडर-ओवेन यानीं त्या वेळीं जें भाषण केलें तें फारच महत्त्वाचें असून त्यांत त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या हेतूबद्दल पुढील उद्गार काढले होते.

"You, Chief Saheb, are, I understand, making an interesting experiment in that direction (by introducing popular

assemblies and representative institutions ). All I can say is that "Slow and sure" is a good motto. Rulers and ruled have both to adapt themselves to new ideas and new conditions and this takes time and patience."

मि. टयूडर-ओवेन यांनीं हा जो इषारा दिला होता त्यास अनुसरून श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रथम निवडणुकीचें तत्त्व लागू न करिता वर लिहिल्या-प्रमाणें कायदेमंडळाची घटना केली होती. व ही घटना जाहीर करतेवेळीं मि. व मिसेस टयूडर-ओवेन यांनीं हजर राहून नवीन प्रयोगास शुभाशीर्वाद द्यावा या हेतूनें श्रीमंत बाबासाहेबानीं त्यांना येण्याबद्दल विनंति केली. मि. टयूडर-ओवेन यांनींहि हजर राहण्याचें कबूल केलें.

ता. १८ ऑगस्ट रोजी सकाळीं निमंत्रित मंडळी आली. मंडळींत कोण आले होते त्यांचा उल्लेख श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या भाषणांत केला आहे. तें भाषण पुढें दिलें आहे. याच समारंभसमयीं इनामदार-सभा, अखिल भोर संस्थान प्रजा परिषद व सुधागड तालुका सभा या संस्थांनीं आपापल्या शिष्ट-मंडळांचें म्हणणें ऐकून घेण्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांना विनंति केली होती. राज्यारोहणसमारंभापासून प्रतिवर्षी ता. १८ ऑगस्ट रोजीं राज्यारोहणदिन साजरा करण्यांत येतो. त्या दिवशीं दरबार भरून त्यांत संस्थानचे दिवाण वार्षिक अहवाल वाचून दाखवितात व श्रीमंतांचेंहि उत्तरादाखल भाषण होतें. वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, हा ६वा वार्षिक राज्यारोहणसमारंभदिन होता. नेहमींप्रमाणें श्रीराममंडपांत दुपारीं दरबार भरला. निमंत्रित मंडळी, शिष्ट-मंडळांचे सभासद, शहरातील प्रमुख नागरिक, अधिकारी वगैरे दरबारात येऊन आपआपल्या जागीं बसल्यावर श्रीमंत बाबासाहेब व युवराज श्रीमंत भाऊसाहेब दरबारांत येऊन स्थानापन्न झाले. प्रथम दिवाणानीं सालाबादप्रमाणें राज्य-कारभाराचा वार्षिक अहवाल वाचून दाखविला. मि. व मिसेस टयूडर-ओवेन यांना या समारंभाकरितां निमंत्रण पाठविण्यांत आलें होतें व त्यांनीं ४-३० वाजतां येण्याचें कबूल करून दरबारचा कार्यक्रम त्यांच्याकरितां उशीर न करतां ठरल्या वेळीं सुरू करण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें दरबार सुरू होऊन दिवाणसाहेब यांचें अहवालवाचन चालू असतां मि. व मिसेस टयूडर-ओवेन ठरल्या-प्रमाणें ४-३० वाजतां भोरास आले. तेव्हा अहवालवाचन थांबवून श्रीमंत

राजेसाहेब, श्रीमंत युवराज व रा. ब. दिवाणसाहेब यांनीं राजवाड्याच्या दरवाजांत जाऊन त्यांचें स्वागत केलें. गार्ड ऑफ ऑनर व ११ तोफांची सलामी दिल्यावर श्रीमंत राजेसाहेब त्यांना घेऊन दरबारांत आल्यावर रा. ब. दिवाणसाहेब यांनीं राहिलेला अहवाल वाचून दाखविला. नंतर शिष्टमंडळांच्या अध्यक्षांनीं आपआपलें म्हणणें वाचून दाखविलें. उत्तरादाखल श्रीमंत बाबा-साहेबांनीं इंग्रजींत भाषण केले, त्याचा मराठी तर्जुमा पुढें दिल्याप्रमाणें:—

## श्रीमंत बाबासाहेबांचें भाषण

"मि. व मिसेस टयूडर-ओवेन, शिष्टमंडळाचे सभासद व सभ्य गृहस्थहो,

आज आमच्या वार्षिक राज्यारोहणसमारंभाचे प्रसंगीं आपण आमचे-बद्दलची आपली सदिच्छा व्यक्त करण्याकरितां व आमचें अभिनंदन करण्याकरितां येथें जमला आहां, याबद्दल मला अत्यंत आनंद वाटत असून मी आपलें सर्वांचें अंतःकरणपूर्वक स्वागत करतों. आपल्यापैकीं बरेचजण स्वतःच्या अडचणी बाजूस ठेवून येथें आला आहा याची मला पूर्ण जाणीव आहे. मि. व मिसेस टयूडर-ओवेन यांना, आजच पुणें येथें बंगालचे गव्हर्नर सर स्टॅनले जॅक्सन यास टर्फक्लब हाउस येथें पार्टी झाली त्या पार्टीस हजर राहावयाचें होतें. त्या समारंभास ते हजर राहून तेथूनच परभारें येथें येण्याची त्यांनीं तसदी घेतली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. त्याचप्रमाणें येथें जी पाहुणेमंडळी आली आहेत त्यांचे व माझे सरदारबंधू पुरंदरे, मुतालिक, मुजुमदार व पोतनीस आणि रा. रा. चिंतामणराव वैद्य, नरसोपंत केळकर, दादासाहेब करंदीकर, वामनराव पटवर्धन व दादासाहेब साने या सर्वांचे मी आभार मानतों. यांपैकीं कांहीं मंडळी शिष्टमंडळांतील असून कांहीं माझ्या विनंतीस मान देऊन हा समारंभ साजरा करण्याकरिता आली आहेत.

सद्गृहस्थहो, संस्थानचे दिवाण यानीं आतांच गेल्या सालचा अहवाल आपणांस वाचून दाखविला तो आपण ऐकलाच आहे. त्यावरून गेल्या पांच वर्षांप्रमाणेंच राज्यकारभाराचें प्रगतिपर धोरण कसें ठेवण्यांत आलें आहे हें आपले लक्षांत आलेंच असेल. गेल्या बारा महिन्यात संस्थानास ९ तोफांचे सलामीचा वंशपरंपरेचा मिळालेला मान व गव्हर्नरसाहेबांचें भोरास त्या-संबंधानें दुसऱ्यांदा आगमन या दोन महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या व त्या

चित्रांक ७८

भोर संस्थानचें पहिलें कायदे-मंडळ, १९२८



खुचावरः—१ गा. रा. लिमये; २ अ. रा. जोशी; ३ म. हे. देव; ४ दा. बा. पोतनीस; ५ ग. भा साने; ६ धों. अ. शेटे; ७ श्री. राजेसाहेब; ८ रा. ब. अंजनगांवकर; ९ रा. बा. मोहिते; १० अ. वि. पटवर्धन; ११ वा. ना. देशपांडे; १२ स. कृ. शिंदकर; १३ ह. स. देशपांडे.

उभी रांगः—१ डॉ. भा. शं. जोशी; २ वि. अ. बावडेकर; ३ एस्. एस्. नेने; ४ वा. ना. जोशी; ५ न. गो. आंबेकर; ६ बा. रा. लोहकरे; ७ सी. गो. आंबेकर; ८ एच्. जी. ठकार; ९ डी. आर. तपस्वी; १० प्र. धों कानिटकर ( सेक्रेटरी ).

[ सं. पा. ४७८

भोरचे इतिहासांत चिरसंस्मरणीय राहतील हें मी आपणांस सांगावयास पाहिजे असें नाहीं.

शिष्टमंडळांबद्दल मला प्रथम सांगितलें पाहिजे कीं, शिष्टमंडळांच्या मुलाखती प्रायः दिवाणांनीं घ्याव्या असा दरबारनें नियम केला असल्याचें आपणांस माहीत आहेच. परंतु आम्हींच त्यांची भेट घ्यावी अशी त्यांची आग्रहाची विनंति असल्यामुळें व लवकरच राज्यकारभाराचे कामीं जी नवीन योजना सुरू करण्यांत येणार आहे ती सुरू झाल्यावर शिष्टमंडळांच्या भेटी घेण्याची आवश्यकता राहणार नाहीं असें वाटून, आजच्या प्रसंगीं अपवाद म्हणून शिष्ट-मंडळांच्या भेटी आम्हीं स्वतः घेण्याचें ठरविले. त्याप्रमाणें त्यांना आज येथें बोलावण्यात आलें आहे.

वर जी नवीन योजना म्हणून सागितली ती म्हणजे ता. २९ जानेवारी सन १९२८ रोजीं याच ठिकाणीं आम्हीं जें आश्वासन दिले होतें त्यास अनुसरून भोर संस्थान कायदेमंडळ स्थापन केल्याचें आज आम्हीं जाहीर करणार आहों हीच होय. आम्हांस व पर्यायानें संस्थानास ९ तोफांचे सलामीचा वंशपरंपरेचा जो बहुमान मिळाला त्याचे स्मरणार्थ, राज्यारोहण-समयीं व आम्ही युवराज असतांनाहि राज्यकारभाराचें जें ध्येय जाहीर केलें होतें तें साध्य करण्याकरितां पहिली पायरी म्हणून ही गोष्ट करण्याचें आम्हीं जाहीर केलें होतें, हें आपणांपैकीं कित्येकास स्मरत असेलच.

गेल्या जानेवारी महिन्यात भरलेल्या दरबारांत व मे महिन्यात नेकनामदार गव्हर्नरसाहेबाचे आगमनाचे वेळीं मीं आपणास सांगितलेंच आहे कीं, जें कायदेमंडळ स्थापन करण्यात येणार आहे तें प्रथम बाल्यावस्थेंत आहे व त्याची पुढील वाढ आमच्या प्रजेच्या सहकारितेवर अवलंबून राहणारी आहे. आपण जो नवीन प्रयोग करण्याचें ठरविलें आहे त्याचे यशःप्राप्तीकरिता आपल्या ज्या सहानुभूतीची मी अपेक्षा करीत आहें ती या नवीन प्रयोगाचे सुरुवातीचे प्रसंगीं आपलेकडून मला खास मिळेल याबद्दल मला शंका वाटत नाहीं.

आज जें कायदेमंडळ स्थापन करण्यांत येणार आहे त्या मंडळाचें यशः-चिंतन करण्यास आपले पोलिटिकल एजंट आज येथे हजर आहेत ही मोठ्या

आनंदाची गोष्ट असून उत्तेजनपर आहे. गेल्या मार्च महिन्यात त्यांनीं आपल्या येथील भाषणांत या कायदेमंडळाबद्दल जो इषारा दिला होता त्याची मला या वेळीं आठवण होत आहे. त्या वेळीं या नवीन योजनेबद्दल त्यांनीं असे उद्‌गार काढले होते कीं, हल्लींच्या नवीन कल्पनांना व नवीन परिस्थितीला अनुसरून राज्यकारभाराचे धोरणांत बदल करण्याचे पुष्कळ संस्थानिकाचे जे प्रयत्न चालू आहेत त्या प्रयत्नापैकींच हा एक मनोवेधक प्रयोग आहे.

सद्‌गृहस्थहो, निरनिराळ्या शिष्टमंडळांनीं आपआपलें म्हणणें आमचे-पुढें माडले आहे त्याबद्दल मी आता बोलणार आहें. प्रथम तिन्ही शिष्ट-मंडळांच्या मागण्यात जे सर्वसाधारण प्रश्न आहेत त्याबद्दल आमचे म्हणणें काय तें सागून, नंतर प्रत्येकाचे मागण्यांत जे निराळे महत्त्वाचे मुद्दे आहेत त्यांबद्दल सागण्याचा विचार आहे. मुख्य गोष्ट म्हणजे शिष्टमंडळानीं आपले म्हणणें सभ्य व भारदस्त भाषेंत मांडले असून आजपर्यंत लोकाचीं गाऱ्हाणीं दूर करण्याचे कामीं व राज्यकारभारांत कार्यक्षमता वाढविण्याचे कामीं दरबार-कडून जे प्रयत्न करण्यांत आले आहेत, त्याबद्दल पसंती दर्शविलेली आहे आणि सार्वभौम बादशहांबद्दल व आमचे घराण्याबद्दल राजनिष्ठापर उद्‌गार काढले आहेत. या सर्व गोष्टींबद्दल आम्ही शिष्टमंडळातील सर्व सभासदाचे आभार मानतों. त्याचप्रमाणें त्यांनीं आम्हाला तोफाचे सलामीचा जो बहुमान मिळाला त्याबद्दल व आमच्या चिरंजीवांना इंटर आर्ट्‌स् परीक्षेंत मिळालेल्या यशाबद्दल आमचें अभिनंदन केलें आहे, त्याबद्दलहि मी त्यांचा फार आभारी आहें. आमच्या प्रजेची मुख्य मागणी म्हणजे कायदेमंडळ स्थापन करण्याबद्दलची आहे, हें आपले लक्षांत आलेच असेल. लवकरच आम्हीं कायदेमंडळ स्थापन केल्याचें जाहीर करून पहिल्या कायदेमंडळांतील सभासदांचीं नांवेंहि जाहीर करणार आहोंत. यामुळें आमच्या प्रजेच्या मागणीप्रमाणें आम्ही करीत आहोंत हें आपण जाणलें असेलच. हें कायदेमंडळ स्थापन होत असल्यामुळें तालुका लोकलबोर्ड, प्राथमिक शाळांच्या इमारतींची सुधारणा, नवीन रस्ते, सारा देण्याच्या वेळा बदलणें, इनामदार-हक्कदार यांची स्थिती सुधारण्याची तजवीज करणें, इत्यादि गोष्टी करणेबद्दल शिष्टमंडळांचें म्हणणें आहे त्याबद्दल आतां विचार करण्याचें कारण नाहीं. कारण ह्या गोष्टी कायदेमंडळापुढें प्रश्न, ठराव किंवा बिलें या रूपानें माडून त्यांचा समाधानकारक निकाल लावून घेतां येणार आहे.

चित्रांक ७९

**भोर संस्थान द्वितीय कायदे-मंडळ, १९३२**



खुर्चीवरः—१ द. वा. जोशी; २ ल. ग. पटवर्धन; ३ शं. ल. लिमये; ४ नगरशेट रामदास; ५ ग. मा. पानसे; ६ रा. सा. हुल्याळ; ७ श्री. राजेसाहेब; ८ चं. गो. आगाशे; ९ म. हे. देव; १० आ. पा. कोंडे, देशमूख; ११ पां. ब. शिळिमकर; १२ के. अ. देशमूख.

उभे:—१ पाटणकर, वकील; २ वा. ना. जोशी; ३ वि. गो. रानडे; ४ बा. रा. लोहकरे; ५ वि. अ. बावडेकर; ६ मा. भि. कुळकर्णी; ७ वा. बा. टाकळकर; ८ कृ. सी. काळे (सेक्रेटरी).

[सं. पा. ५०८

संस्थानचा वार्षिक रिपोर्ट मिळणेबद्दल मागणी होती. त्याप्रमाणें गेल्या सालच्या रिपोर्टाच्या प्रती शिष्टमंडळांच्या ज्या संस्था आहेत त्याच्याकडे पाठविण्यांत आल्याच आहेत, व संस्थानच्या हिताबद्दल कळकळ बाळगणाऱ्या ज्या कोणांस रिपोर्टाची प्रत पाहिजे असेल त्यांसहि ती देण्यास हरकत पडणार नाहीं. कोर्ट फी, स्टँप फी व ग्रेझिंग फी, या बाबतींत सुधागड तालुका-सभेची तक्रार आहे. परंतु, या बाबतींत मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, आसपासच्या ब्रिटिश जिल्ह्यांपेक्षां ही फी जास्त नसून ग्रेझिंग फीचे बाबतींत तर विशेष सवलतीहि आहेत.

इनामदारतर्फेच्या व संस्थान प्रजापरिषदेच्या तर्फेच्या शिष्टमंडळांच्या मागण्यांत घाटावरील चार तालुक्यांतील लोकाच्या फॉरेस्टसंबंधीं तक्रारींचा प्रश्न आहे. याबद्दल मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, हा प्रश्न दरबारपुढें बरेच दिवस आहे व लवकरच या बाबतींत काय करावयाचें तें जाहीर करण्यात येईल.

अखिल भोर प्रजापरिषदेंतील सभ्य गृहस्थहो, आपल्या म्हणण्यापैकीं दोनच महत्त्वाचे मुद्दे आतां राहिले आहेत. पहिला मुद्दा खाजगी खर्चाकरितां जी रक्कम घेण्यात येते, ती ठराविक असावी हा आहे. यासंबंधीं मला इतकेंच सागावयाचें आहे कीं, उद्यां कायदेमंडळापुढें बजेट वाचून दाखविण्यांत येणार आहे. त्यावरून नित्याचे खर्चाकरितां आम्ही ठराविक रकमा घेत असतों हें आपणांस दिसून येईल. दुसरा मुद्दा कादवे येथील तंट्याचे निकालाबद्दल आहे. या बाबतींत कायद्यानें जें करणें जरूर होतें तेंच दरबारनें केलें आहे. यापेक्षां जास्त कांहीं केलेलें नाहीं. आणि या वेळीं मला आपणास हेंहि सांगितलें पाहिजे कीं, प्रजेला योग्य न्याय मिळून प्रजेचा कायद्यावरील विश्वास राखण्याकरितां दरबारकडून नेहमीं शक्य ते प्रयत्न करण्यांत येतील. मात्र लोकांनींहि कायदेशीर मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे.

सद्गृहस्थहो, आजच्या या मंगल प्रसंगीं आजरोजीं भोर कायदेमंडळाची स्थापना केल्याचें जाहीर करण्यास मला फार आनंद वाटत आहे. या कायदेमंडळाचे नियमहि करण्यांत आलेले आहेत. या कायदेमंडळांतील सर्व सभासद सरकारनियुक्त असून त्यांची संख्या दिवाणासह २१ आहे. दिवाण हे या मंडळाचे अध्यक्ष आहेत. दिवाणाशिवायकरून बाकीच्या २० सभासदात

सरकारी व बिन-सरकारी सभासदांची संख्या सारखीच आहे. पहिल्या तीन वर्षांकरितां कायदेमंडळाचे पुढील सभासद नेमण्यांत आले आहेत.

## १० सरकारी

( १ ) मे. ए. आर. जोशी, बी. ए., एलएल. बी., न्यायमन्त्रि व सभासद, कार्यकारीमंडळ.

( २ ) मे. एन्. जी. अंबेकर, बी. ए., प्रायव्हेट सेक्रेटरी व सभासद, कार्यकारी मंडळ.

( ३ ) मे. व्ही. ए. बावडेकर, चीफ रेव्हिन्यू ऑफिसर व सभासद कार्यकारी मंडळ.

( ४ ) मे. व्ही. एन्. जोशी, शाळाधिकारी.

( ५ ) डॉ. बी. एस्. जोशी, एम्.बी.बी.एस्.,चीफ मेडिकल ऑफिसर.

( ६ ) मे. एस. एस. नेने, फॉरेस्ट ऑफिसर.

( ७ ) मे. डी. आर. तपस्वी, स्टेट ओव्हरसियर.

( ८ ) मे. बी. आर. लोहोकरे, पोलिटिकल सेक्रेटरी.

( ९ ) मे. एस. जी. अंबेकर, मामलेदार, तालुके राजगड.

(१०) मे. एच्. जी. ठकार, मामलेदार, तालुके प्रचंडगड.

## १० बिन-सरकारी

( १ ) मे. जी. बी. साने, बी. ए., एलएल. बी., रहिवासी पाली, अध्यक्ष, तालुका-सभा सुधागड व चेअरमन, अखिल भोर संस्थान प्रजा-परिषद ( सन १९२४ ).

( २ ) मे. जी. आर. लिमये, खोत, जमीनदार व सभासद, सॅनिटरी बोर्ड, पाली.

( ३ ) मे. व्ही. एन्. देशपांडे, बी.ए., एलएल. बी., वकील सातारा, रहिवासी शिरवळ, व सभासद नोटिफाइड एरिया कमिटी शिरवळ.

(४) मे. एच्. एस्. देशपांडे, सभासद नोटिफाइड एरिया कमिटी शिरवळ.

( ५ ) मे. एस्. के. शिंदकर, इनामदार, संस्थान व खालसा मुलखांतील.

( ६ ) मे. डी. बी. पोतनीस, इनामदार उरवडें व अखिल भोर संस्थान प्रजापरिषदेंतील प्रमुख पुढारी.

( ७ ) मे. डी. ए. शेटे, मराठा जमीनदार, जोगवडीचे रहिवासी व अखिल भोर संस्थानप्रजापरिषदेचे प्रमुख पुढारी.

( ८ ) मे. ए. व्ही. पटवर्धन, बी. ए., सभासद, सर्व्हन्टस् ऑफ इंडिया सोसायटी व अध्यक्ष, अखिल भोर संस्थान प्रजापरिषद (३ व ४ सेशन.).

( ९ ) मे. एम्. एच्. देव, बी. ए., पिरंगूटचे रहिवासी व इनामदार, ट्रस्टी, चिंचवड संस्थान, व मेंबर देवास कौन्सिल, देवास ( ज्यूनियर ).

(१०) सरदार रामराव बापूजीराव ऊर्फ आबासाहेब मोहिते, असामीदार बडोदा संस्थान, वहिवाटदार जिल्हा नवसरी, जमीनदार भोर संस्थान.

कायदेमंडळाच्या सभासदांचीं नावें आपणांस वाचून दाखविण्यांत आलीं आहेत. त्यावरून प्रत्येक वर्गांतील ज्यांच्यावर लोकाचा विश्वास आहे अशाच इसमांच्या नेमणुका करण्यांत आलेल्या आहेत हें आपणांस दिसून येणार आहे. आम्हीं ज्या नेमणुका केल्या आहेत त्या आपणांस पसंत पडतील अशी आम्हास आशा आहे, हे सर्व सभासद आज येथें हजर आहेत व त्यांचें स्वागत करण्यास मला फार आनंद वाटत आहे. उद्यांच कायदेमंडळाची पहिली बैठक होणार आहे व संस्थानच्या हिताचे कामीं त्यांच्या चर्चेचा मला फार उपयोग होईल अशी मला आशा आहे.

शेवटीं आजच्या ह्या संस्मरणीय प्रसंगानिमित्त कांहीं गोष्टी मी जाहीर करीत आहें. माझ्या खाजगींतून ( प्रिव्ही पर्स ) २०,००० रुपये कायदे-मंडळाच्या स्वाधीन करण्याचें मीं ठरविलें आहे, व संस्थानात जे कायदेकानू चालू आहेत त्यांना अनुसरून कायदेमंडळानें या रकमेचें व्याज आपल्या तीन वर्षांच्या कारकीर्दींत ज्यायोगानें संस्थानच्या प्रजेचें कल्याण होईल अशा लोकोपयोगी कार्याकडे खर्च करावें अशी माझी इच्छा आहे.

दुसरी गोष्ट अशी आहे कीं, आमच्या वंशपरंपरागत चालत आलेल्या धर्मार्थ फंडापैकीं २०,००० रुपयांच्या प्रॉमिसरी नोटा घेऊन त्याचें जें सुमारें रु. १००० व्याज येईल त्या व्याजांतून संस्थानातील गरीब व लायक विद्यार्थ्यांस शिष्यवृत्त्या देण्याचें आम्हीं ठरविलें आहे. याबद्दलचे नियम लवकरच करण्यांत येतील.

यानंतर जी गोष्ट मी जाहीर करणार आहें त्या गोष्टीशीं माझा केवळ ट्रस्टी या नात्यानेंच संबंध आहे, व आजच्या प्रसंगींच ती गोष्ट जाहीर करण्याची मी संधि घेत आहें. आपले येथील सुप्रसिद्ध वैद्य रा. रा. श्रीधरशास्त्री गोखले यांची माहिती मीं आपणांस सांगण्याची आवश्यकता नाहीं. श्रीमंत असो वा गरीब असो, कोणीहि औषधोपचाराकरितां त्यांच्याकडे जावो, त्यास मोठ्या आस्थेनें मदत करण्यास ते सदैव किती तत्पर असतात हें आपणां सर्वांस माहीतच आहे. कोणत्याहि सार्वजनिक धर्मार्थ स्वरूपाच्या कार्याकडे खर्च करण्याकरितां त्यांनीं २००१ रुपये माझे स्वाधीन केले आहेत. ह्या रकमेच्या प्रॉमिसरी नोटा घेऊन त्याचें जें व्याज येईल त्याची एक शिष्यवृत्ति त्यांचे नांवानें ठेवण्याचें मीं ठरविलें आहे, व येथील जो गरीब व लायक विद्यार्थी कोणत्याहि चांगल्या रीतीनें चाललेल्या आयुर्वेदविद्यालयांत अध्ययन करील त्यास ती शिष्यवृत्ति देण्याचें मीं योजिलें आहे. शेवटीं पुनः एकवार मी आपणां सर्वांचे आभार मानून आपली रजा घेतों."

श्रीमंतांचें भाषण संपताच टाळ्याचा प्रचंड कडकडाट होऊन सभामंडप दणाणून गेला. श्रीमंत बाबासाहेबांनी कायदेमंडळाची घटना जाहीर करून शिष्यवृत्त्यांकरितां वाडवडिलापासून चालत आलेल्या धार्मिक फंडांतून वीस ( २०,००० ) हजार रुपयांची देणगी दिली, त्याचप्रमाणें कौन्सिलचे उपयोगार्थ खाजगी उत्पन्नांतून २०,००० रुपयांची देणगी दिली, हें श्रीमंतानीं राज्यकारभारास कालाला अनुसरून नवीन वळण लावलेलें पाहून नवीन वातावरणांत आपण प्रवेश करीत आहों असें श्रोत्याना वाटलें. श्रीमंत बाबासाहेबांच्या कारकीर्दींत राज्यकारभाराच्या दृष्टीनें ज्या अनेक महत्त्वाच्या गोष्टींमुळें त्यांचें नांव भोर संस्थानच्या इतिहासांत चिरस्मरणीय होणारें आहे त्या गोष्टींत कायदेमंडळ-स्थापनेस अग्रस्थान दिलें पाहिजे. श्रीमंत बाबासाहेबाचे भाषणानंतर मि. टयूडर-ओवेन यांनीं थोडक्या शब्दांत श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रजेच्या हितार्थ राज्यकारभारांत प्रगतिपर जें पाऊल टाकिलें त्याबद्दल प्रशंसापर उद्गार काढून हिंदूंच्या नमुनेदार एकत्र कुटुंबांत परस्परांचे जसे प्रेमळ संबंध असतात तशाच प्रकारचे संबंध संस्थानच्या राजा व प्रजा यांच्यांत राहोत अशी सदिच्छा व्यक्त केली. नंतर श्रीमंतांच्या अभिनंदनार्थ ज्यांनीं भाषणें केलीं त्यांचे

भाषणातील महत्त्वाचे भाग खाली दिले आहेत. श्रीयुत साने, केळकर, मुतालिक, पटवर्धन, देव, मोडक वगैरेंचीं भाषणें झालीं.

## श्रीयुत दादासाहेब साने यांचें भाषण

"या अपूर्व व आनंदाच्या प्रसंगीं श्रीमंतांचे आभार मानणे प्रजा या नात्यानें माझें कर्तव्य आहे. आजचा हा सोन्याचा दिवस सुवर्णाक्षरानी लिहून ठेवण्यासारखा आहे. भोर संस्थानच्या इतिहासात आजचा दिवस अत्युत्तम क्रातीचा म्हणून कायमचा नोंदून ठेवला जाईल. भोर संस्थानात प्रजेच्या सल्ल्यानें राज्यकारभार हें स्वप्न तरी यापूर्वी कोणास पडले असेल काय ? परंतु कालगति विचित्र आहे व त्यात अनेक महत्त्वाच्या गोष्टी कल्पनेच्या बाहेर घडून येतात व अनेक थोर विभूति निर्माण होतात. त्यात उदार राजरत्नेंहि अचानक लाभतात. प्रजेतील निरनिराळया घटकाच्या सल्ल्यानें राज्य चालविण्याचे उदात्त तत्त्व इंग्लंडच्या राज्यपद्धतीत फार प्राचीन काळापासून ग्रथित केले गेले आहे. त्या तत्त्वाच्या योगाने इंग्लंडची राज्यपद्धति सर्व जगात अत्युत्तम व नमुनेदार ठरली आहे. त्या राज्यपद्धतीचें शिक्षण उदार मनाने इंग्लिश लोक हिंदुस्थानांत आम्हास देत आहेत व त्याचा प्रभाव जिकडे तिकडे व्यक्त होत आहे. काळाची गति अगम्य आहे हें जरी खरे असले व काल गोष्टी घडवून आणतो असें जरी म्हटले तरी तेथें योजकाच्या धोरणाची जरूरीहि आहेच, हें विसरून चालावयाचें नाहीं. आताच श्रीमंतानीं आपल्या भाषणात मिश्र कायदे-मंडळ स्थापिल्याचें जें जाहीर केलें ती खऱ्या मुत्सद्दीपणाची योग्य वेळीं केलेली योग्य योजना आहे. योग्य काळीं आपले जहाज योग्य दिशेनें चालविणाऱ्या कॅप्टनची दूरदृष्टि त्यांत आहे व प्रजाकल्याणाची अंत:करणापासूनची खरी कळकळहि त्यात दिसून येत आहे.

हा पाया घातला गेला आहे. यावरील इमारत हळूहळू व्हावयाची आहे. त्याला आमची प्रजाजनाचीहि सहानुभूति, मदत, कर्तव्यनिष्ठा अवश्य पाहिजे हें आम्ही समजून असले पाहिजे. Rights naturally entail corresponding duties हे आम्ही विसरतां कामा नये. साराश, आमच्या कर्तव्यांची व जबाबदाऱ्यांची जाणीव ठेवून त्याप्रमाणें वर्तनहि आम्ही करूं इतकीच श्रीमंतांजवळ आमची विनंती आहे व हें कायदेमंडळ सर्वतोपरी

यशस्वी होवो अशी परमेश्वराजवळ आमची प्रार्थना आहे. हल्लींचे आपले दिवाणसाहेब म्हणजे कायदेमंडळाचे अध्यक्ष हे अत्यंत निस्पृह, सरळ, कार्यक्षम व सहानुभूतिपूर्ण असे आम्हांस लाभले आहेत. त्यांच्या नेतृत्वानें आमचें काम सुरळित चालून यशस्वी होईल यांत शंका नाहीं. श्रीमंतांच्या अमूल्य भाषणाचा जितका भाग आम्हा प्रजाजनास लागूं आहे त्यात आम्हांस अनेक महत्त्वाच्या गोष्टी दिसत आहेत. प्रथमत: तें भाषण अत्यंत सरळ व सभ्यपणाचें असून त्यात विनय ओतप्रोत भरलेला आहे. त्यांत अहंकाराचा अगर केवळ अधिकारयुक्त वाणीचा लेशहि नाहीं.

भाषणांतील दुसऱ्या महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे मुख्य कायदेमंडळाची स्थापना, फॉरेस्ट कमिटी नेमण्याविषयीं आश्वासन, अॅड्मिनिस्ट्रेशन रिपोर्ट प्रसिद्ध करून तो रयतेस मिळण्याची सोय केली ही गोष्ट, आपला खाजगी खर्च निश्चित निराळा घेण्याची पूर्वीपासून केलेली तयारी, डेप्युटेशनशी दाखविलेली सहानुभूति व सर्वांत प्रशंसनीय गोष्ट म्हणजे आपण होऊनच उदार मनानें दिलेल्या देणग्या या होत. एका देणगींत विद्येची अभिरुची व्यक्त होत आहे. स्वताच्या कुटुंबांत सरस्वतीची पूजा होत आहे हें श्रीमंत युवराज या वर्षी इन्टरमीजिएट पास होऊन पदवी मिळविण्याची पायरीच चढले यावरून स्पष्ट दिसत आहे व त्यांना या मिळालेल्या यशाबद्दल त्यांचें व सर्वांचें अभिनंदन करणें योग्य आहे. श्रीमंत युवराजांच्या अंगींहि विद्येला शोभेल असा विनय पूर्ण वसत आहे हें मीं आपल्या अल्प अनुभवावरूनच सागूं शकतों. व्यक्तिविषयक बोलावयाचें तर माझी निवड कायदेमंडळाचे सभासदांत श्रीमंतानीं केली याबद्दल मी श्रीमंताचा अत्यंत आभारी आहें. नृपतिजनपदांची सेवा एकाच वेळीं होणें दुर्घट असलें तरी ईश्वर करील तर काय होणार नाहीं !"

## श्री. नरसिंह चिंतामण केळकरांचें भाषण

"A perusal of the quinquennial review of the administration of your State clearly shows the purpose of progress which you, Chief Saheb, have placed before your eyes, and the gradual but determined process, by which that purpose is being realised. The new Council, though it consists at the beginning of only nominated and official members, may certainly develop

later on into another form more in conformity with the latest and most universally accepted forms of Legislative Bodies, designed for the expression and assertion of public opinion, among the tax-payers of a political State. But even in the present form, the Legislative Council of the State will, I am sure, open for the subjects an entirely novel avenue, through which they can usefully tread their way and realise the first fruits of direct association with the official mind in the affairs of the State. It is a matter of experience everywhere, that so long as direct contact has not been established between officials and non-officials, in deliberative and administrative matters, both regard each other with suspicion and fear. But actual work always proves the magic grinding stone which rubs off all the angularities of both the official and non-official mind, and smoothens and polishes its surface. Work, again, is a powerful solvent in which the dross of prejudice and prepossession melts away, leaving a residue of pure usefulness and efficiency.

Democracy is a new idea for practically the whole world, and India need not expect to escape from the welcome contagion and its good or evil consequences. I am, of course, one of those who believe that Indian States must be preserved. Indeed they are entitled even on their merits to survive and to endure for ever so long. I look upon Indian States as a cherishable concrete reminder of some of the virtues or at least the strong points which characterised Indian soldiers and statesmen of older times. But fashions of Government necessarily change with time and experience. And if the Rulers of the Indian States are assured of the general good-will and gratitude of their subjects, they must also on the other hand and in their turn come forward to take their subjects into greater confidence, ask them willingly and cheerfully to participate in the responsible work of administration and hopefully co-operate in the betterment of the lot of the State as a whole.

Coming back to the Bhor State itself, I once more congratulate you, Chiefsaheb, upon the courage and spirit of

reform you have shown in creating this Council. I will only conclude with the expression of my lively hope that its practical working will justify the wisdom of the step you have taken."

## श्री. अ. वि. पटवर्धनांचें भाषण

"भोर संस्थानचा प्रजाजन असण्याचा सुयोग मला जरी लाभलेला नाही तरी दक्षिणेंतील संस्थानापैकीं प्रजाजनाची उन्नती संस्थानाधिपतींच्या अधिपत्याखालीं व्हावी असें उद्दिष्ट ठेवून चालविलेल्या खटपटींतील एक सैनिक असल्यामुळें, भोर संस्थानात होणाऱ्या उपक्रमाबद्दल मला समाधान वाटत आहे व तें व्यक्त करण्याची संधी आजच्या प्रसंगी मला उपलब्ध करून दिल्याबद्दल मी आपला आभारी आहे. संस्थानी प्रजेस क्रमाक्रमानें खालसा मुलखातील प्रजाजनाच्या बरोबरीचा दर्जा मिळवून देण्याचे बाबतींत अवश्य असणारे शिक्षण भोर संस्थानच्या कायदेमंडळाच्या द्वारें भोर प्रजाजनांस आपण देण्याची तजवीज कायदेमंडळाची संस्था स्थापून केली त्याबद्दल कोणीहि आपलें अभिनंदन करीलच. खालसा मुलखात स्वराज्याची चळवळ चालविण्याच्या वेळीं संस्थानी हिंदुस्थानची प्रगति होणें कसें आवश्यक आहे याची कल्पना सर्व पक्षाच्या परिषदेच्या सब्-कमिटीच्या रिपोर्टावरून चांगली येणार आहे. खालसा मुलखातील लोक-पुढाऱ्याना हिंदी राष्ट्राच्या राजकीय उन्नतीस आवश्यक वाटणाऱ्या गोष्टी आपल्यासारख्या संस्थानिकाना विचारांतीं अवश्य वाटून कमिटीच्या रिपोर्टाच्या प्रसिद्धीकरण्याच्या पूर्वीं आपण केल्या हें आपल्या दूर दृष्टीची साक्ष पटवीत आहे. आजच्या प्रसंगी संस्थानचे पोलिटिकल एजंट यानीं हजर राहून या उपक्रमास वरिष्ठ सरकारची मान्यता पूर्ण आहे असें प्रत्यक्ष कृतीनें दाखविले याबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे."

## श्रीयुत म. हे. देव यांचें भाषण

" If we take a review of the last 6 years of his administration, we may say that on the whole the administration of the internal affairs of the State, to use His Excellency's words, is excellent. To my mind he is proceeding on progressive lines and is trying to have a good many changes befitting the times. It is, however, not possible to reach perfection in all

directions. "Changes", as Burke has said, "which are to endure, cannot be wrought in a day." It will take some time to see that Bhor is a model State. The most relieving feature is that our Ruler is a well-educated, well-meaning and a sympathetic gentleman, always intent upon the welfare of his subjects. He is a gentleman of a compromising nature and may, therefore, be called a politician, according to Lord Morley, who says that politics is a series of compromises. The use of power is social service and another definition of Politics which is the science of social service is also applicable to him. The task of running an administration efficiently is not an easy one. In my humble opinion we should try to have broad-minded sympathy rather than lynx-eye fault-finding.

It is a matter of joy and pride that our Ruler has today introduced a popular assembly here."

## श्री. महादेवराव मोडक यांचें भाषण

"कालातिपात झाला असल्यानें मी चार वाक्येंच बोलतों. जो कोणी जागा झाला म्हणजे ज्याला कळूं लागले त्याला असे वाटूं लागतें कीं, अमुक एक गोष्ट माझ्या हातीं असेल तर मी अशी करून दाखवीन कीं ज्याचें नाव तें. ही आकांक्षा अखिलजनसाधारण असून सहजातच असते. आमचे श्रीमंत युवराजदशेंत असतांनाच त्यांच्या ही गोष्ट ध्यानात येऊन चुकली होती. परंतु ती प्रगट करणें कालाधीन होतें. बीजात वृक्ष आहे खरा, पण तो प्रत्यक्ष वृक्षरूपानें प्रगट होण्यास कालापेक्ष पाहिजे तसाच प्रकार होता. पुढें ईशेच्छेने लवकरच श्रीमंत अधिकारारूढ झाले व संस्थानात जागोजागीं होणाऱ्या लोकसभा व वर्तमानपत्रांतील लेख याचे द्वारा ही जनतेची स्वायत्ततेबद्दलची आकांक्षा संघटित रूपानें व मोठ्या जोरानें पुढें येत आहे अशी श्रीमंतास स्वानुभवानें खात्री होताच आता आपला संकल्प पुरा करण्याचा उचित समय आला असें पाहून हें आजचें अधिकारदान दिलें आहे."

श्रीमंत बाबासाहेबानीं जाहीर केलेल्या घटनेबद्दल प्रशंसापर स्फुट केसरीच्या ता. २८ ऑगस्ट १९२८ चे अंकात आलें तेंहि खालीं दिलें आहे.

## श्रीमंत पंतसचिवांचा स्तुत्य उपक्रम

( ' प्रासंगिक बोल ' केसरी, ता. २८ ऑगस्ट १९२८ )

"श्रीमंत पंतसचिव, भोर, यांनीं आपल्या संस्थानांतील प्रजेला कायदे-कौन्सिल दिलें याबद्दल आम्ही त्यांचें मन:पूर्वक अभिनंदन करितों. श्रीमंत बाबासाहेब याची शांत समतोल वृत्ति व प्रगतिप्रियता याची खरी माहिती असणाराला अशी गोष्ट लवकर घडून येणार अशी अपेक्षा होती, व तीच सफळ झाली. या कायदेकौन्सिलांत आज लोकनियुक्त सभासद असे नाहींत, हा सकृद्दर्शनीं उणेपणाच होय. तथापि, त्यानीं स्वत: नेमलेले दहाहि सभासद असेच आहेत कीं, त्याच्याहून अधिक चागले सभासद प्रजेच्या भावनेच्या व हिताच्या दृष्टीनेंहि निवडणुकींत येणें शक्यच नव्हतें. प्रारंभीं निवडणुकीचा खटाटोप लोकांना तर पडूं नये आणि त्यांना सर्वस्वी मान्य होतील असे प्रतिनिधीच आपण नेमावे, असें दुहेरी चातुर्याचे धोरण बाबासाहेब यानीं ठेविले. यामुळें याच दिवशी रात्री भोर येथील जाहीर सभेत संस्थान-प्रजा-परिषदेच्या चळवळींतील जहालात जहाल अशा पुढाऱ्यांनीं प्रांजलपणें असें बोलून दाखविले कीं, श्रीमंतांनीं दिले तें आमच्याहि अपेक्षेबाहेर दिले. आता उलट चागलें काम करून दाखविण्याची जोखीम आमच्यावरच पडली आहे. ब्रिटिश इलाख्यांतील कौन्सिलात सरकाराकडून नेमले जाणणारे सभासद प्राय: त्यांचे बगलबच्चे असतात. पण श्रीमंत बाबासाहेब यांनीं त्याचे अत्यंत कडक टीकाकारच स्नेहभावानें बोलावून घेऊन त्यांची नेमणूक कौन्सिलांत केली. या त्यांच्या चातुर्यानें त्यांचे पूर्वीचे टीकाकारहि विस्मित होऊन गेले; व जें कौन्सिल दिलें तें श्रीमंतानीं खऱ्या भावनेंनेच दिले असे उद्गार त्याना काढावे लागले. आणि खरोखरच आज या कौन्सिलाचा उपयोग चागला करून दाखविण्याची पात्रता आपल्या अंगीं आहे हें सिद्ध करून दाखविण्याची जबाबदारी ज्याच्यावर आली ते ती पार पाडतील अशी आम्हांला उमेद आहे."

वरील भाषणें व केसरी पत्रातील उतारा हीं पाहिलीं असतां श्रीमंत बाबासाहेबाचें दूरदर्शित्व व राजकारणपटुत्व प्रत्ययास आल्यावांचून राहणार नाहीं. निवडणुकीचें तत्त्व लागू न करता प्रजेच्या विश्वासांतील पुढाऱ्याचीच बिनसरकारी सभासद म्हणून नेमणूक करण्यांत श्रीमंत बाबासाहेबानीं जें

कौशल्य दाखविले त्याबद्दल संस्थानात व संस्थानाबाहेरहि त्याच्या मुत्सद्देगिरीची तारीफ करण्यांत आली.

कायदेमंडळाची स्थापना झाल्यानंतर पुढील सालीं पाली येथें अखिल भोर संस्थान प्रजापरिषद भरली, त्या वेळीं परिषदेचे अध्यक्ष पुणें येथील लॉ कॉलेजचे प्रोफेसर व संस्थानाचे प्रगतीविषयीं विशेष आस्था बाळगणारे रा. जी. आर. अभ्यंकर, बी.ए., एलएल्.बी., यानीं जे भाषण केले त्यात संस्थानात झालेल्या सुधारणा व कायदेमंडळ यांबद्दल पुढील उद्गार काढले:—

## प्रो. जी. आर. अभ्यंकर यांचें भाषण

" Your Council has come into existence only in August 1928. I find from its proceedings that there is a spirit of co-operation between the officials and the non-officials in the State, and this indeed augurs well for the future. If you examine the history and growth of the British Indian Legislatures, there is no reason for you to be disappointed with the constitution given to you last year.

You have the budget before you and if you can show successfully the ways and means, many of your difficulties would be nearing solution very soon. The experience of the year and a half clearly shows that the Executive Government of your State has shown sympathy with your aspirations and if the representatives of the people conduct themselves with due sense of responsibility I have no reason to think that there would be any cause of your disappointment.

As a critic of the Indian States it has not very often fallen to my lot to praise the constitutional government of any ruler. But, long before I knew His Highness the Pant Saheb personally, I, as the President of the Sixth Session of the Deccan States Subjects' Conference, publicly stated about him as below:—

His Highness the Pant Saheb of Bhor has shown broad-minded statesmanship in not assuming a repressive attitude towards popular agitation and in taking the people into his confidence and in making honest efforts to redress their wrongs. I hope this ennobling conduct of H. H. the Chief

Saheb of Bhor would be emulated by his brother princes in the Deccan.

Four years have elapsed since I have made this statement. Since then I have come in closer contact with His Highness, with his institutions and with some of his officers and leaders of the people, and I feel proud to say that I stand by this statement even today. The constitutional instinct which His Highness has shown in associating his people with his Government and in taking them into his confidence and in dealing with popular disputes in a spirit of real, earnest and bona-fide compromise, has still more elevated him in my estimation, and I sincerely rejoice at his successful career."

## कायदेमंडळाची बैठक

कायदेमंडळ स्थापनेबद्दलचा जाहीरनामा व कामकाजपद्धतीचे नियम छापण्यात आले होते. बजेटावर चर्चा करणें, प्रश्न विचारणे, ठराव मांडणें, कायद्याचीं बिले आणणें हे अधिकार कायदेमंडळास देण्यांत आले. कोणत्या बाबींसंबंधीं चर्चा करावयाची नाहीं त्यासंबंधींहि नियम करण्यात आले. ठराव दरबारवर बंधनकारक नसून शिफारसवजा समजले पाहिजेत असेंहि ठरविण्यात आलें. कायदेमंडळाची मुदत ३ वर्षांची ठरविण्यात येऊन दरवर्षी दोन बैठका भरविण्याचें ठरलें.

या नवीन कायदेमंडळाची पहिली बैठक स्थापनेच्या दुसऱ्या दिवशींच म्हणजे ता. १९ ऑगस्ट रोजीं भरली. बैठकीचा कार्यक्रम तयार नसल्यामुळे या बैठकीत विशेष काम झाले नाहीं. आरंभी श्रीमंत बाबासाहेबानीं प्रास्ताविक भाषण करून संस्थानच्या प्रगतीकरिता व उन्नतीकरिता सभासदांनीं कशा प्रकारे सलोख्याचें धोरण ठेवावे हें सांगितलें. त्याचें सर्वच भाषण मननीय असल्यामुळें तें पुढें दिले आहे.

## श्रीमंत बाबासाहेबांचें प्रास्ताविक भाषण

" भोर संस्थानचे कायदेमंडळाचे अध्यक्ष व सभासदहो,

काल सहावा वार्षिक राज्यारोहण समारंभाचा दरबार झाला. त्या दरबारात भोर संस्थानच्या कायदेमंडळाची स्थापना केल्याचें जाहीर करण्यांत

आलेंच आहे; व सदर मंडळाचे घटनेस अनुसरून आजची ही आपली पहिली बैठक भरविण्यांत आलेली आहे. आजपासून भोरच्या राज्यकारभारास नवीन वळण लागत आहे. कोणत्याहि नवीन गोष्टीस आरंभ करण्यापूर्वी त्या गोष्टीच्या यश:प्राप्तीकरितां परमेश्वराची प्रार्थना करणें अत्यंत आवश्यक असतें. यास्तव श्रीरामचंद्रप्रभू आपणा सर्वांना आपल्या अंगीकृत कार्यांत काम करण्याचे कामी सुबुद्धि देऊन आपण हातीं घेतलेला प्रयोग यशस्वी करो अशी मी अनन्यभावानें प्रार्थना करतों. आपल्या कामाची आज सुरुवात करून देण्यास मला किती आनंद वाटत आहे हें शब्दानीं व्यक्त करून दाखविता येत नाहीं.

आपल्या या कायदेमंडळाबद्दल मला जें काय सांगावयाचे होतें तें कालचे भाषणात स्थूल मानानें मी सांगितलेंच आहे. यामुळे त्यासंबंधीं आणखी विस्तृत भाषण करून कायदेमंडळाचा वेळ घेण्याची आवश्यकता राहिलेली नाहीं. मला आपल्यास इतकेच सांगावयाचे आहे की, ता. १८ ऑगस्ट १९२२ रोजी भरलेल्या राज्यारोहणाचे दरबारात मी आपल्या भाषणात " गेल्या पिढींत व विशेषत: महायुद्धापासून काळ बराच पालटलेला आहे व त्या मानानें प्रजाजनाच्या आकांक्षा प्रत्यहीं वाढत आहेत, या गोष्टीकडे दुर्लक्ष करून भागावयाचें नाहीं." अशा आशयाचे उद्गार काढले होते हें आपणास स्मरत असेलच. त्यानंतर दुसरे दिवशीं मला जी मानपत्रें अर्पण करण्यात आलीं त्या सर्व मानपत्रास दिलेल्या उत्तरात मीं असें आश्वासन दिले होतें कीं, " कारभाराचे संघटितपणास कमीपणा न येईल अशा प्रकारे लोकप्रतिनिधित्वाचें तत्त्व राज्यकारभारास लागू करण्याची व सर्वतोपरी संस्थानचा उत्कर्ष करण्याची माझी आकांक्षा आहे." अशा प्रकारची वेळोवेळीं जी आश्वासनें आम्ही दिली आहेत त्याना अनुसरून गेल्या ६ वर्षांत संस्थानचा राज्यकारभार आम्ही प्रागतिक धोरणानें कसा चालविलेला आहे हें दरसाल राज्यारोहण समारंभाचे दरबारांत संस्थानचे दिवाण वार्षिक अहवाल वाचून दाखवीत असतात, व तो प्रसिद्धहि कण्यात येत असतो त्यावरून व विशेषत: भोर म्युनिसिपालिटी, शिरवळ नोटिफाइड एरिआ कमिटी आणि पाली सॅनिटरी बोर्ड या स्थानिक संस्थाची स्थापना केली आहे त्यावरून आपले लक्षांत आलेलेंच आहे. आम्ही जरी प्रगतीचें धोरण ठेविलें आहे तरी कित्येक असेहि

म्हणणारे सांपडतील कीं आम्ही जितकें जलद पाऊल टाकावयास पाहिजे तितकें टाकीत नाहीं. उलट असेंहि म्हणणारे कांहीं आहेत कीं, आम्ही भोरसारख्या लहान संस्थानच्या आवांक्याबाहेर प्रगतीचें धोरण अंगीकारीत आहों. तथापि, तें कसेंहि असलें तरी राज्यकारभाराचें धोरण आम्ही प्रागतिक असेंच ठेविलें आहे याविषयीं कोणाचेंहि दुमत असेल असें आम्हांस वाटत नाहीं. आमच्या या धोरणास अनुसरूनच गेल्या वर्षी संस्थानला जो वंशपरंपरेचा ९ तोफांचे सलामीचा बहुमान मिळाला त्या संबंधाचे आनंदोत्सवप्रसंगीं राज्यकारभाराचे कामीं आणखी एक पाऊल पुढें टाकण्याचें आम्हीं जाहीर केले व त्याप्रमाणें प्रत्यक्ष आज त्या नवीन प्रयोगास सुरुवातहि होत आहे हें पाहून मला विशेष आनंद वाटणें साहजिक आहे. परंतु या आनंदाबरोबरच आपला हा नवीन प्रयोग यशस्वी कसा होईल याबद्दल मनांत संशय येऊन मन किंचित् साशंक झाल्यावांचून राहत नाहीं. तथापि, मला पूर्ण भरंवसा आहे कीं, हा प्रयोग यशस्वी करण्याची शक्य ती खटपट आपल्या सर्वांकडून मनोभावानें झाल्याशिवाय राहणार नाहीं. किंबहुना कालचे दरबारांत रा. साने व रा. पटवर्धन वगैरे मंडळींनीं याबद्दल स्पष्ट आश्वासनहि दिले आहे, यामुळें या नूतन संस्थेचे भावी उत्कर्षाबद्दल मला मोठी उमेद वाटत आहे.

सद्गृहस्थहो, आपल्याला माहीतच आहे कीं, कायदेमंडळ स्थापन करण्याची सुरुवात औंध संस्थानाखेरीज महाराष्ट्रात दुसऱ्या कोणत्याहि संस्थानात अद्याप करणेंत आलेली नाहीं. तेव्हा आपणा सर्वांवर या बाबतींत केवढी मोठी जबाबदारी आहे याची आपणांस नेहमीं जाणीव राहील अशी मला आशा आहे.

बिनसरकारी सभासदाची जी निवड आम्हीं केली आहे तीबद्दल मला आपणांस दोन शब्द सांगितले पाहिजेत. ही निवड करतांना कोणत्याहि प्रकारची स्वार्थी दृष्टी ठेवलेली नसून प्रजेच्या कल्याणाची ज्यांना खरोखरीच कळकळ वाटत आहे अशाच गृहस्थांची निवड केलेली आहे व ती काळजीपूर्वक व योग्य झालेली आहे असेंच सर्वांना वाटल्यावांचून राहणार नाहीं, असें मला वाटतें. प्रजेपैकीं प्रत्येक वर्गांतून सभासदांची निवड केलेली आहे हें मी आपणांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. रा. पटवर्धन हे नेमस्त पक्षाचे व शांत वृत्तीचे वजनदार कार्यकर्ते आहेत व त्यांना औंध संस्थानच्या प्रातिनिधक

मंडळाचा प्रत्यक्ष अनुभव असून संस्थानी राजकारणाची त्यास दोन्ही बाजूंची माहिती आहे, व भोर संस्थान प्रजापरिषदेचे ते दोन वेळा अध्यक्षहि होते. यामुळें आपल्या कायदेमंडळाची नौका सुमार्गानें चालविण्याचे कामीं त्याचा फार उपयोग होणार आहे. तसेंच रा. साने याना बडोद्यासारख्या संस्थानचा बरेच वर्षांचा अनुभव असून भोर संस्थानच्या सार्वजनिक प्रश्नांत ते वेळोवेळीं स्वार्थत्यागपूर्वक मन घालतात. यामुळे त्यांचे अनुभवाचाहि फायदा मिळणार आहे. इतर सभासदहि कोणत्याहि कामांत हौसेनें मन घालणारे असून आपल्या संस्थानचे उत्कर्षाबद्दल कळकळ बाळगणारे आहेत हें मला माहीत आहे.

निवडणुकीचें तत्त्व जरी लागू केलें असतें तरी आम्ही नेमिलेलेच बहुतेक सभासद निवडून आले असते, असेच उद्‌गार काल जमलेल्या विचारी लोकाचे तोंडून निघाल्याचें आमचे कानीं आले व त्याबद्दल आम्हास आनंद वाटतो.

कायदेमंडळाच्या नियमाच्या प्रती आपल्यास देण्यात आलेल्या आहेत. हे नियम कित्येक बाबतीत अपुरे वाटतील हे मी जाणून आहें. परंतु कायदे-मंडळाच्या बाल्यावस्थेंत कोणतीहि मोठीशी अडचण न येता सदरचे नियमानीं सर्व काम तूर्त भागणार आहे अशी आमची समजूत आहे.

संस्थानात मुख्य मुख्य खातेवार जमाखर्चाचें अंदाजपत्रक ( बजेट ) आपणांस देण्यात आलेच आहे व तें रीतसर आपल्या बैठकींत यानंतर सादर करण्यांत येणार आहे. बजेटच्या नकला या वेळीं आगाऊ पाठविणें शक्य नव्हतें. बजेट जरूर तितकें आगाऊ मिळाले नाहीं. यामुळे त्याबद्दल आपल्या मतानें योग्य वाटणाऱ्या सूचना करण्यास पुरेसा अवसर सांपडणार नाहीं हें खरे आहे. तथापि त्यावरून संस्थानचे जमाखर्चाची स्थूल रूपरेषा आपल्या लक्षात येणारी आहे.

संस्थानचे जमाखर्चाचें वर्ष फसली म्हणजे मृगसाल असून त्याचा प्रारंभ ता. ७ जूनपासून होतो. संस्थानचें बजेट कायदेमंडळापुढें मांडावयाचें झाल्यास तें ऑगस्टच्या बैठकींत साधारणपणें माडण्याचें ठरविण्यात आले आहे; व त्या-पासून एक सोय विशेष आहे ती अशी कीं, त्या वेळेस आदल्या सालचे अंदाजी आंकडे आपल्यापुढें ठेवण्याची जरूर न राहता प्रत्यक्ष जमा व खर्च आपल्यास कळवितां येतील. या सरणीमुळें बजेट सादर करण्याचे वेळीं नवीन सालचे दोन

महिने गुदरून जातात. परंतु या दोन महिन्यांत चालचलाऊ खर्चाशिवाय साधारणपणें दुसरा खर्च होण्याचा संभव नसतो.

सद्गृहस्थहो, मला आपणांस आणखी असें सुचवावयाचें आहे कीं, आपला हा नवीन उपक्रम यशस्वी करून दाखविणें सर्वस्वीं तुमच्याच हातीं आहे.

संस्थानची परिस्थिति व खालसा मुलखांतील परिस्थिति भिन्न आहे, हें मीं आपणांस सागावयास पाहिजे असें नाहीं. तेव्हां संस्थानच्या कायदे-मंडळात व खालसांतील कायदेमंडळात भिन्नता असणें अगदीं स्वाभाविक आहे. संस्थानांत राजा व प्रजा या दोघाचेंहि हितसंबंध निगडित असल्यामुळें राजाचें जें हित तेंच प्रजेचें हित व प्रजेचें जें हित तेंच राजाचें हित असतें. दोघाचेंहि हित किंवा अनहित सारखेंच. त्यांत तिसऱ्याचा संबंध नाहीं. यामुळें खालसांतील कायदेमंडळाचें सर्वतोपरी अनुकरण करणें समंजसपणाचें होईल असें मला वाटत नाहीं. व आपणहि कोणतीहि आकाक्षा धरताना ती हितावह कीं अहितावह आहे याचा पूर्ण विचार करूनच ती धरावी, अशी माझी आपणांस सूचना आहे. संस्थानात राजाचे व प्रजेचे हितसंबंध एकच असतात, त्यांत तिसऱ्याचा संबंध नसतो, ही गोष्ट लक्षांत ठेवून सरकारी व बिनसरकारी सभासद शुद्ध भावनेनें वागून संस्थानच्या सर्वांगीण उत्कर्षाबद्दल मार्ग शोधून काढून राजा व प्रजा याचें हित साधण्याचा प्रयत्न करतील तरच या मंडळाचा खरा उपयोग आहे, असें माझें मत आहे.

दुसरी एक गोष्ट आपल्या नजरेस मला आणावयाची आहे ती ही कीं, सरकारी व बिनसरकारी सभासदानीं एकमेकाचा पाडाव करून एकमेकावर जय मिळविण्याची क्षुद्र आकांक्षा धरूं नये. संस्थानचा उत्कर्ष करणें हेंच ध्येय दोघांनींहि आपल्या डोळ्यांसमोर ठेवून त्या दिशेनें युक्तायुक्त गोष्टींचा विचार करून प्रत्येकानें आपलें कर्तव्य समजले पाहिजे. उभयतांत भिन्नभाव न होता सलोख्यानें काम चालावें अशी माझी इच्छा आहे. कर्तृत्वशक्तीचा भलतीकडे उपयोग न होईल याबद्दल आपण काळजी घ्याल अशी मला आशा आहे.

प्रश्न विचारणेच्या बाबतींतहि मला आपणांस कांहीं सूचना कराव्याशा वाटतात. नुसत्या ऐकीव माहितीवरून प्रश्न विचारले असतां किती गैरसमज

होत असतो याचे अनुभव आपणा सर्वांस प्रत्यहीं येत असतात. तरी जे प्रश्न विचारावयाचे असतील ते पूर्ण माहिती घेऊन विचारावेत, म्हणजे त्यापासून खरा फायदा होणार आहे. आपल्याकडे लोकांच्या तक्रारी येणारच. परंतु त्या खऱ्या आहेत कीं नाहींत याची आपण प्रथम चौकशी करावी. अशी चौकशी करताना जबाबदार अधिकाऱ्याशीं आपण विचारपूस केल्यास पुष्कळदा आपले संशय कायदेमंडळाच्या बाहेरच फिटूं शकतील. लोकाचे खरोखर कल्याणाचें कार्य कोणतें आहे व कोणतें आपणांस करिता येईल याचाहि आपण काळजीपूर्वक विचार करावा.

बिनसरकारी सभासदावर आणखीहि एक जबाबदारी आहे. ती म्हणजे त्यानी लोकांस योग्य मार्ग दाखविणें ही होय. लोकाच्या ज्या आकाक्षा असतील त्या तृप्त करणें शक्य आहे किंवा नाही याचा विचार करून लोकाची नीट समजूत करून देण्याचेंहि त्याचे कर्तव्य आहे.

आपण सर्वजण समंजस, सुविचारी, संस्थानच्या व प्रजेच्या हिताबद्दल आस्था बाळगणारे आहात; तेव्हा आपण आपले ज्ञानाचा, अनुभवाचा व समतोल बुद्धीचा फायदा या संस्थेस देऊन राज्यकारभाराचे कामीं निरलसपणें व आपलेपणाने मदत कराल अशी आशा करितों.

आपली रजा घेणेपूर्वी पुन्हा एकवार आपले प्रयत्नास श्रीरामचंद्र-कृपेनें पूर्ण यश येवो अशी प्रार्थना करून मी आपलें भाषण पुरें करितों."

श्रीमंत बाबासाहेब वरीलप्रमाणें भाषण करून निघून गेले. नंतर दिवाणाचे अध्यक्षतेखाली काम सुरू झाले. सभासदाना बजेटच्या प्रती देण्यांत येऊन तें समजाऊन देण्यात आले. श्रीमंत बाबासाहेबानीं कायदेमंडळ स्थापन केलें याबद्दल आभारप्रदर्शक ठराव मांडण्यांत येऊन तो सर्वानुमतें पास झाला. तो ठराव श्रीमंत बाबासाहेबांचेकडे पाठविण्याचा अधिकार अध्यक्षाना देण्यांत येऊन या पहिल्या बैठकीचें काम संपलें.

दुसरी बैठक सन १९२९ सालच्या एप्रिल महिन्यांत ता. ३ ते ता. ५ पर्यंत ३ दिवस भरली होती. या बैठकींत बरेच प्रश्न विचारण्यांत आले. त्यांचीं समाधानकारक उत्तरे देण्यांत आलीं. १७ ठराव मांडण्यांत आले होते.

त्यांपैकीं ९ पास झाले. त्यांत महत्त्वाचा ठराव म्हणजे श्रीमंत बाबासाहेबानी दिलेल्या वीस हजार रुपयांच्या देणगीच्या विनियोगाबद्दल होता. वीस हजार रुपयांच्या प्रॉमिसरी नोटा घेऊन त्याचें जें व्याज येईल ती व्याजाची रक्कम शेतकी, जंगल व उद्योगधंदे यांची काय सुधारणा करतां येईल हें पाहण्याकडे खर्च करावी असा ठराव बिनसरकारी सभासदांकडून माडण्यांत येऊन तो सर्वानुमतें पास झाला. तेव्हापासून कायदेमंडळांतील सभासदांच्या बहुमतानें ठरेल त्या कार्याकडे ही रक्कम खर्च करण्याचा अधिकार कायदेमंडळास मिळाला आहे.

वर्षांतून भरणाऱ्या दोन बैठकींपैकीं पहिल्या बैठकीस सुरुवात होण्यापूर्वी श्रीमंत बाबासाहेबानीं आरंभीं प्रास्ताविक भाषण करण्याचा प्रघात ठेविला आहे. त्याप्रमाणें त्याचीं भाषणें होत असतात. पहिल्या कायदेमंडळाच्या ३ वर्षांत ६ बैठकी झाल्या. या कायदेमंडळाची ३ वर्षांची मुदत सन १९३१ च्या ऑगस्ट महिन्यात पुरी होत होती; म्हणून सन १९३१ च्या मे महिन्यात जी सहावी बैठक झाली त्या बैठकीच्या अखेरीस कौन्सिलच्या अध्यक्षानीं नवीन नेमिल्या जाणाऱ्या दुसऱ्या कायदेमंडळाच्या घटनेंत काहीं फेरफार करण्याचें श्रीमंत बाबासाहेबाच्या मनात असल्यामुळें व लोकलबोर्डस् स्थापन करण्याचा विचार असल्यामुळें त्याचे वाटाघाटीस अवधि मिळावा या उद्देशानें नियमां-प्रमाणें चालू कायदेमंडळाची मुदत एक वर्ष वाढविल्याचें जाहीर केलें.

कायदेमंडळाच्या घटनेंत काही प्रगतिपर सुधारणा करण्याचें श्रीमंत बाबासाहेबाच्या मनात होतें. त्या वेळीं संस्थानातील अत्याचारी चळवळ नुकतीच मोडण्यांत आली होती. तथापि तिचा पूर्ण उपशम झालेला नव्हता. अशा स्थितींत काय सुधारणा करता येणें शक्य आहे याचा विचार करण्यास वेळ मिळावा म्हणून पहिल्या कायदेमंडळाचीच मुदत एक वर्ष वाढविण्यात आली. पुढें काहीं महिन्यानीं म्हणजे सन १९३१ सालच्या अखेरीस त्यांनीं कायदे-मंडळाचे सभासद, संस्थानातील व संस्थानाबाहेरील काहीं प्रतिष्ठित व लायक गृहस्थ याना भोरास मुद्दाम बोलाविलें. त्याच्याबरोबर २ दिवस कायदेमंडळाची घटना कशी असावी याबद्दल वरील मंडळींची श्रीयुत न. चिं. केळकर याच्या अध्यक्षतेखालीं चर्चा झाली. नंतर श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांनीं सभेस

आलेल्या मंडळींचें मत काय आहे तें नमूद करून व स्वतःचें व्यक्तिविषयक मत देऊन श्रीमंत बाबासाहेबांचेकडे रिपोर्ट सादर केला. संस्थानांत जी परिस्थिति निर्माण झाली होती ती लक्षांत घेऊन बहुतेकानीं प्रजेला निवडणुकीचा हक्क देण्याची अद्याप वेळ आली नाहीं असाच आपला अभिप्राय दिला होता. संस्थानांतील तालुकासभा, देशमुखसंघ व इनामदारसभा यांच्या शिष्टमंडळाच्या भेटी दिवाणसाहेबांनीं घेऊन त्याचेंहि मत घेण्यांत आलें होतें. निवडणुकीचें तत्त्व लागू करावें कीं नाहीं याबद्दल बराच मतभेद दिसून आला. तालुका लोकल-बोर्डस् स्थापन करण्याबद्दल मात्र बहुतेक एकवाक्यता दिसून आली. श्रीमंत बाबासाहेबांचेपुढें ही सर्व माहिती मांडण्यांत आली. अखेरचा निर्णय ठरविण्यास त्याना ही माहिती फारच उपयोगी पडली. सर्व गोष्टींचा साधकबाधक विचार करून त्यांनीं आपली योजना निश्चित केली. पहिल्याच कायदेमंडळाची सातवी व अखेरची बैठक सन १९३२ च्या जानेवारी ता. २५ ते ता. २७ पर्यंत ३ दिवस भरवून पुढील कायदेमंडळाची योजना जाहीर केली.

नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या बैठकीच्या प्रारंभीं भाषण न करितां बैठकीचे अखेरचे दिवशीं ता. २७ जानेवारी रोजीं श्रीमंत बाबासाहेबांनीं भाषण केले.

या बैठकीच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबाच्या निमंत्रणावरून श्रीयुत तात्यासाहेब केळकर व संस्थानचे माजी दिवाण कै. रावबहादुर अंजनगावकर हे हजर होते. रावबहादुर अंजनगावकर हे दिवाण असताना कायदेमंडळाची स्थापना होऊन त्याच्याच अध्यक्षतेखालीं पहिल्या ५ बैठकी झाल्या होत्या. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यांना सन १९३१ च्या मार्चमध्यें नोकरी सोडावी लागली. त्यानीं संस्थानची नोकरी ५ वर्षें उत्तम प्रकारें बजाविली. यामुळें श्रीमंतांच्या मनात त्यांच्याबद्दल आदर असून विशेष प्रसंगीं ते त्यांना मुद्दाम भोरास बोलावीत. वरील बैठकीच्या वेळीं श्रीमंतांना नवीन योजना जाहीर करावयाची होती, म्हणून त्यांनीं त्यांना बोलाविलें होतें. घटनेबाबत मागें श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं सभासदाची व इतर गृहस्थाची जी चर्चा झाली होती तीबद्दलचा रिपोर्ट त्यांनीं दिल्याचें मागें सांगितलेच आहे. त्या रिपोर्टांत यांनीं आपलें वैयक्तिक मतहि नमूद केलें होतें. वरील घटनेशीं त्यांचा संबंध असल्यामुळें त्यांनाहि निमंत्रण केलें होतें.

## श्रीमंत सरकार यांचें समारोपाचें भाषण

( कायदेमंडळ : बैठक ७ वी )

" कायदेमंडळाचे अध्यक्ष, श्रीयुत तात्यासाहेब केळकर, निमंत्रित मंडळी व सभासदहो,

या बैठकीचे वेळीं विशेष सांगण्यासारखें हें आहे की, श्रीयुत तात्यासाहेब केळकर हे आमचे विनंतीस मान देऊन आपले महत्त्वाचे वेळापैकीं काही वेळ खर्च करून येथें आले आहेत, याजबद्दल आम्हास फार आनंद वाटत आहे. तसेच, रावबहादुर अंजनगावकर हे आमचे विनंतीप्रमाणें आले आहेत, याबद्दल समाधान वाटत आहे. रावबहादुराच्या कामासंबंधी आमचें मत आम्ही पूर्वींच जाहीर केलें असल्यामुळें तें पुन्हा सांगून आपला वेळ घेत नाही.

श्रीरामकृपेनें कायदेमंडळाचे स्थापनेपासून तीन वर्षे पूर्ण होऊन गेलीं असून, नियमास अनुसरून वाढविलेल्या एक वर्ष मुदतींतील आजची बैठक चालू आहे. बैठकीचे प्रारंभीं आमची तब्बेत बरी नसल्यामुळे आम्हास भाषण करता आलें नाहीं. तथापि आपणा सर्वांची एकत्र भेट होऊन आमचे विचार आपल्यापुढें मांडतां यावे म्हणून ही सुसंधी आम्ही घेत आहोंत.

मागील अधिवेशनानंतर घडलेली महत्त्वाची गोष्ट म्हणजे कायदे कौन्सिलचे नियमाप्रमाणें संस्थानचे नवे दिवाण रावसाहेब हुल्याळ हे या बैठकीस अध्यक्षाचें काम करीत आहेत, हो होय. त्याचे ज्ञानाचा व खालसा मुलखांतील अनुभवाचा आपणास लाभ मिळणार आहे याबद्दल आम्हास आनंद वाटत आहे.

आतां आजपर्यंतच्या कौन्सिलच्या कामकाजाचें सिंहावलोकन केल्यास, कौन्सिलात पास झालेलीं बिलें व ठराव शक्य तितक्या लवकर व व्यवस्थेशीर रीतीनें अमलांत आणण्याचें दरबारचें धोरण असल्याविषयीं आपली खात्री झालीच असेल अशी आम्हांस उमेद आहे.

त्याप्रमाणें कौन्सिलांत विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें शक्य तितकीं सविस्तर दिली असून प्रश्नाचा हेतु लक्षांत घेऊन सुधारणेच्या दृष्टीनें शक्य तें सर्व केलें आहे, हेंहि आपणास कळून आलेंच असेल.

कौन्सिलात पास झालेल्या एकंदर बिलामध्ये या ठिकाणी मे. वाग्भटराव देशपांडे यांच्या दत्तकाबाबत व हिंदु विधवाच्या वारसा कायद्याबाबतच्या बिलासंबंधीं विशेष उल्लेख करणें आम्हास इष्ट वाटत आहे. या बिलावर आपआपल्या इच्छेप्रमाणें मतें देण्यास सरकारी सभासदास आम्ही मोकळीक टेविली होती. यावरून अशा सामाजिक अगर धार्मिक प्रश्नाचे संबधात दरबारचे धोरण कोणत्या स्वरूपाचें आहे हें आपणास कळून येईल, अशी आमची खात्री आहे. सदरहू बिलें या कौन्सिलचे बैठकीत सर्वानुमते पास झाल्याचे नुकतेंच आम्हांस कळलें आहे व त्याबद्दल आम्हास फार संतोष वाटत आहे; व या यशाबद्दल आम्ही मे. वाग्भटराव याचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

सद्गृहस्थहो, आपले हें कौन्सिल नियमाप्रमाणे ठराविक मुदतीने न भरतां थोड्या उशीरा भरविलें गेले, याचें कारण म्हणजे कौन्सिलच्या घटनेंत व राज्ययंत्राच्या रचनेंत काय सुधारणा करावी याविषयीं विचार करून काहीं-तरी जाहीर करण्यास आम्हांस अवसर मिळावा हेंच मुख्यतः आहे. त्याप्रमाणें आम्ही असे जाहीर करतों कीं, आमच्या संस्थानच्या प्रत्येक तालुक्यास एक एक तालुका लोकलबोर्ड देण्याचें आम्हीं ठरविले आहे. या प्रत्येक लोकल-बोर्डांत एकंदर नऊ मेंबर असतील व तालुक्याचे मामलेदार हे एक्स-ऑफिशिओ प्रेसिडेंट राहतील. यातील तीन सरकारी ऑफिसर व पाच बिनसरकारी म्हणजे नॉन-ऑफिशिअल असे सभासद सरकारकडून नेमण्यात येतील. यावरून, बोर्डांमध्यें नॉन-ऑफिशिअल सभासदाचें मताधिक्य राहील हें आपणास समजून येणार आहे. यासंबंधाचे नियम मागाहून लवकरच प्रसिद्ध करण्यांत येतील व बोर्डांची अंमलबजावणी येत्या फसली सालापासून म्हणजे ता. ७-६-१९३२ इ. पासून सुरू होईल. हें बोर्ड तीन वर्षेपर्यंत अमलात राहील व त्यानंतर इलेक्शनचे ( निवडणुकीचें ) तत्त्व बोर्डांस लागू करण्यात येईल. कौन्सिलचे घटनेबाबत आम्ही असें जाहीर करतों की, पुढील कौन्सिलचे घटनेंत हल्लींप्रमाणें २१ सभासद असून त्यात संस्थानचे दिवाण एक्स-ऑफिशिओ प्रेसिडेंट असतील. तसेंच हल्लींप्रमाणें दहा सरकारी सभासद म्हणजे ऑफिसर्स नेमण्यांत येतील. बाकी राहिलेले दहा सभासदापैकी प्रत्येक तालुका लोकल-बोर्डांतील सभासदानी एक एक नॉन-ऑफिशिअल मेंबर या कौन्सिलकरिता

निवडून देण्याचा आहे. तसेंच, भोर म्युनिसिपालटीनें आपलेपैकीं एक नॉन-ऑफिशिअल कौन्सिलर कायदेमंडळांत निवडून द्यावा. बाकी राहिलेले चार सभासद सरकारकडून नॉन-ऑफिशिअल निवडणेंत येतील.

असेंहि जाहीर करण्यास आनंद वाटतो कीं, आमचें राज्यकारभाराचें अंतिम ध्येय जबाबदारीची शासनपद्धति म्हणजे Responsible Government हें आहे व तें ध्येय किती लवकर अमलांत यावयाचें हें प्रजेच्या सहकार्यावर अवलंबून राहणार आहे. ज्याअर्थी राज्यकारभाराच्या सुव्यवस्थेसंबंधाची जबाबदारी आमच्यावर आहे, त्याअर्थीं पुढील सुधारणेचे हप्ते देणें सुरक्षित आहे अशी आमची खात्री होत जाईल तसतसे आमच्याकडून ते देण्यांत येतील, याविषयीं आपण खात्री बाळगावी.

याशिवाय, आज आम्ही असें जाहीर करतों कीं, दरबारकडून आम्ही खाजगी खर्चाकरिता ( एक्स्पेन्सेस ) घेत असलेल्या रकमेपैकीं साल मजकुरीं रु. १५,००० कमी घेण्याचें आम्हीं ठरविलें असून त्याचा विनियोग आम्हीं वर जाहीर केलेल्या लोकलबोर्डांचे कामाप्रीत्यर्थ कायमचा निधि म्हणून करण्यास ही रक्कम लोकलबोर्डांचे स्वाधीन करण्याचें ठरविलें आहे. त्याचें व्याज सालीना रु. १००० येईल अशा फेस व्हॅल्यूच्या रकमेच्या, जरूर तर तींत थोडीशी भर घालून गव्हर्मेंट सिक्युरिटीज घेण्याचें आम्हीं ठरविलें आहे. त्या व्याजाच्या रकमेचा विनियोग बोर्डानें आपल्या इच्छेप्रमाणें पांचहि तालुक्यांस सदर रक्कम विभागून अथवा सालपालटानें सर्वच रक्कम प्रत्येक बोर्डानें घेऊन करावयाचा, तें बोर्डांचे मर्जीवर राहणार आहे.

सद्‌गृहस्थहो, हल्लीं ब्रिटिश इंडिया व संस्थानें यांच्यापुढें जो फेडरेशन-संबंधीं महत्त्वाचा प्रश्न चर्चेस आहे, त्यासंबंधीं आमचे विचार ऐकून घेणेबद्दल आपली उत्कंठा असणें स्वाभाविक आहे. यासंबंधीं आमचे विचार थोडक्यांत असे आहेत कीं, British Crown म्हणजे बादशहांशीं कायमचे राजनिष्ठ राहून British India व संस्थानें यांचें फेडरेशन व्हावें असें आमचें मत आहे, व अशा फेडरेशनमध्यें त्याचा एक घटक म्हणून सामील होण्याचें आम्हांस पसंत आहे. असें फेडरेशन मूर्त स्वरूपांत येण्यास ब्रिटिश सरकारशीं प्रत्येक संस्थाननें सहकार्य करणें जरूर आहे, व या कामीं आमची प्रजा आम्हांस मदत करील

अशी दृढ आशा आहे. संस्थानांत काय किंवा ब्रिटिश इंडियांत काय शांतता नांदत असल्याविना खरे सहकार्य होणार नाहीं व सहकार्याच्या अभावीं ध्येयहि कदाचित् लांबणीवर पडणारे आहे. तसें न व्हावे. ब्रिटिश सरकारास हिंदुस्थानास डोमिनिअन स्टेटस देण्यास व आम्हासहि आमच्या संस्थानात जास्त जास्त सुधारणा करण्यास, सर्वत्र शातता असण्याची किती जरूरी आहे हें आपणास कळून येणार आहे. अशी शांतता राहून सहकार्यानें हें मोठे ध्येय साध्य झाल्यानें आम्हास अत्यंत आनंद वाटणार आहे.

या दृष्टीनें आज प्रामुख्यानें आपणांस दोन गोष्टी आम्हास सागाव्याशा वाटत आहेत. आपले व आमचें साध्य एकच असता, शक्याशक्यतेच्या विचारामुळे आम्हीं योजित असलेल्या साधनाच्या स्वरूपात फरक करून प्रगतीचें पाऊल थोडें सावकाश पडत आहे असे आपणास वाटलें, तरीहि आमच्या अंतिम सद्हेतूबद्दल व आम्ही जाहीर केलेल्या ध्येयाबद्दल व तें गांठण्याच्या आमच्या निश्चयाबद्दल आपण बिलकुल शंका मनांत उद्भवूं देऊं नका, असें आपणांस आमचें सागणें आहे. ज्या वृक्षाची वाढ सावकाश होते त्यांचींच मुळें खोल व लांबवर पसरून ते वृक्ष जोमदार होतात, हें आपणांस माहीत आहे. दुसरी गोष्ट ही कीं, सर्व सुधारणा द्रव्यमूलक आहेत हें आपणास माहीतच आहे. ब्रिटिश राज्यकर्त्यांस द्रव्यनिधि जमविण्याचीं जशी अनेक साधनें आहेत, तशी विशेषतः लहान संस्थानची स्थिति मुळींच नसते. अर्थात् साधनाच्या अपुरेपणामुळें साध्याला थोडीशी मुरड घालण्याचा क्वचित् प्रसंग येतो. ह्याच विषयाच्या अंगभूत म्हणून, आपणांस आम्हांस इतकेंच सांगावयाचें आहे कीं, हक्कांची मागणी करतांना कर्तव्याची जाणीव दूर होऊं देऊं नका व नवे मिळविण्याची आकाक्षा धरण्यापूर्वी, आहे तें जतन केले जाईल याची काळजी बाळगा. वैयक्तिक अडचणीचे प्रसंग असले, तरी नित्याची शातता व सुरक्षितता कायम राहण्यास राज्ययंत्र सतत व व्यवस्थित चालणें जरूर आहे. हें आमचें म्हणणें सूक्ष्म व व्यापक दृष्ट्या विचार केल्यास, योग्य व खरें असल्याचें आपणांस समजून येणार आहे असें आम्हास वाटतें; व या दृष्टीनें लोकांच्या विचारसरणीस आपण दिशा लावून द्याल व आम्हीं योजिलेले प्रगतीचें कार्य अकुंठ रीतीनें चालू ठेवण्यास आम्हास मदत कराल यांविषयीं

आम्हांस दृढ आशा व उमेद आहे. प्रभु रामचंद्र या कामीं आपल्यास सद्‌बुद्धि देवो व आपणां सर्वांचें उद्दिष्ट सफल होण्यास ईशेच्छा मदत करो, अशी प्रार्थना करून आम्ही आपले भाषण संपवितों."

वरीलप्रमाणें श्रीमंत सरकारचें भाषण झाल्यावर श्रीयुत तात्यासाहेब केळकर याचें भाषण झालें.

## श्रीयुत केळकर यांचें भाषण

"मी या कायदेमंडळाचा सभासद नसतांना मला निमंत्रण करून आज येथें भाषण करण्यास परवानगी दिली याबद्दल मी श्रीमंत सरकारचा फार आभारी आहें. ६ महिन्यापूर्वी याच ठिकाणीं खाजगी स्वरूपाची सभा भरविण्यांत आली होती. त्या सभेस कायदे-कौन्सिलचे सर्व सभासद व निमंत्रित मंडळी बरीच हजर होती. त्या वेळीं कौन्सिलच्या घटनेबद्दल सर्वांनीं मोकळेपणानें विचारविनिमय केल्यावर, त्याबद्दल मीं रिपोर्ट तयार करून तो येथें वाचून दाखविला होता. त्याचा अखेरचा निकाल कसा लागला याबद्दल संधि मिळेल त्याप्रमाणेंच मी चौकशी करीत होतों. त्या वेळीं वाटाघाटींत ठरल्याप्रमाणें कांहीं गोष्टींचा निकाल लागला आहे व काहींचा अद्यापि लागावयाचा आहे. सर्व गोष्टींचा निकाल होईल त्या वेळीं प्रसंग येईल त्याप्रमाणें योग्य तें आपण कराल अशी मला आशा आहे. आताच श्रीमंतानीं आपल्या भाषणात ज्या गोष्टी जाहीर केल्या त्यांत खाजगी खर्चांपैकीं १५,००० रुपये कमी करण्यापासून तें फेडरेशनपर्यंत दूरदृष्टि दाखविली याबद्दल मी आपले अभिनंदन करतों. खाजगी खर्चाची रक्कम श्रीमंतानी स्वयंस्फूर्तीनें कमी केली असावी. कदाचित् या बाबतींत काहीं सूचना आली असल्यास ती मला माहीत नाहीं. श्रीमंतांनीं तालुका लोकलबोर्डें दिल्याचें जाहीर केलें हीच स्थानिक स्वराज्याची पहिली पायरी आहे. ही योजना फार चांगली आहे. लोकलबोर्डें कौन्सिल देणेपूर्वीच मिळणें जरूर आहे. लोकलबोर्डें हींच प्राथमिक महत्त्वाचीं आहेत. आतां तालुका लोकलबोर्डें असावींत का जिल्हा लोकलबोर्डें असावींत हा एक प्रश्न आहे. हा प्रश्न पुढें अनुभवानें निर्णीत होणारा आहे. बडोदें संस्थानात प्रथम तालुका लोकलबोर्डें देण्यात आलीं होतीं; परंतु तालुका लोकल-

बोर्डांचा कारभार सुयंत्रित न चालल्यामुळे, तालुका लोकलबोर्डें मोडून जिल्हा लोकलबोर्डें स्थापन करण्यात आलीं आहेत. ब्रिटिश हद्दींतहि तालुका लोकल-बोर्डें व जिल्हा लोकलबोर्डें याची अधिकारवाटणी बरोबर झालेली नाहीं. तालुका लोकलबोर्डें, जिल्हा लोकलबोर्डांतून निर्माण होण्यासारखीं असतात. कायदे-कौन्सिलांत लोकनियुक्त सभासद निवडून देण्याचा अधिकार द्यावयास पाहिजे होता. त्याप्रमाणें तालुका लोकलबोर्डांस कौन्सिलचे सभासद निवडून देण्याचे अधिकार दिले आहेत. यामुळें, कौन्सिलांत सभासद निवडून येणेचें तत्त्व लागू झालें आहे, परंतु लोकलबोर्डांतील सभासद निवडून देण्याचा अधिकार मागाहून म्हणजे ३ वर्षांनीं मिळण्याचा आहे. कौन्सिलला निवडणुकीचें तत्त्व लागू करण्यास आपण विरुद्ध होता. परंतु मी आपल्या विरुद्ध जाऊन, निवडणुकीचें तत्त्व लागू करण्याबद्दल रिपोर्ट केला होता. श्रीमंत सरकारानीं माझ्या रिपोर्टाप्रमाणें तालुकानिहाय एक एक सभासद निवडून देण्याचा अधिकार दिला, ही फार चागली गोष्ट झाली आहे. आरंभीं सुधारणेच्या बाबतींत हें धिम्में पाऊल असले, तरी सुधारणेबद्दल आपण सर्वांनीं निःशंक राहावे. श्रीमंताचे धोरण प्रागतिक आहे. तीन वर्षांनीं तालुका लोकलबोर्डांस निवडणुकीचें तत्त्व लागू करण्याचें जाहीर केले आहे; कदाचित्, त्याचे मर्जीस आल्यास तें त्यापूर्वींहि लागू होईल अशी मला आशा आहे.

फेडरेशनबद्दल श्रीमंतांनीं व्यक्त केलेले आपले विचार सर्वस्वीं युक्त आहेत. फेडरेशन हा एक गहन विषय आहे. सर्व हिंदुस्थान एकजीव व्हावा, म्हणजेच ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानी हिंदुस्थान एकजीव व्हावेत ही उदात्त भावना आहे. प्रत्येक संस्थाननें, मग तें लहान असो अगर मोठे असो, फेडरेशनमध्यें सामील झाले काय किंवा न झालें काय, त्यांत Federal India चें नफा-नुकसान नाहीं. तरीपण, श्रीमत सरकारनीं फेडरेशनमध्यें सामील होण्याचें ठरविलें, त्यावरून त्यांचें उदात्त धोरण जाहीर झाले आहे. श्रीमंत सरकारानीं आपले खाजगी नेमणुकीपैकीं रु. १५,००० कमी करून त्या रकमेवरील व्याजाचा विनियोग लोकलबोर्डांनीं करावा असें ठरविलें ही फार समाधानाची गोष्ट आहे. हल्लीं Franchise Committee हिंदुस्थानांत आली असून, समानाधिकारा-बद्दल लौकरच वाटाघाट होणार आहे. त्यातून आपल्याला उपयुक्त कल्पना

निघण्याचा संभव आहे. तेव्हां लोकलबोर्डांचे निवडणुकीस श्रीमंतांनीं ३ वर्षांची मुदत ठेविली आहे हें एक तऱ्हेनें सोईचेंच झालें आहे.

आतां श्रीमंतांनीं जाहीर केलेल्या सुधारणांनीं आपलें समाधान होणार नाहीं, माझेंहि समाधान झालेलें नाहीं हें मी स्पष्टपणें बोलून दाखवितों. माझा स्पष्टपणा श्रीमंत सरकारांस माहीत असल्यामुळें, ते मजवर रागावणार नाहींत अशी माझी खात्री आहे; परंतु श्रीमंत सरकारांनीं सुधारणेचें पाऊल पुढें टाकलें आहे यात शंका नाहीं. १० वर्षांपूर्वी जेथें सभा भरविण्यास बंदी होती, त्या ठिकाणीं १० वर्षांत इतकी सुधारणा झाली आहे यावरून श्रीमंत सरकारचें धोरण प्रागतिक आहे हें आपणांसहि कबूल असेल असें मला वाटतें. खाजगी खर्च वगैरे बाबी सोडून बाकीचा कारभार रयतेसाठीं रयतेनें करावयाचा हीच खरी सुधारणा आहे व तशी श्रीमंताना आज नाहीं कांहीं कालानें सुधारणा करावीच लागेल. रयतेनें रयतेच्या सोयी करण्यांत गैर तें काय आहे? उलट तें लोकांना फायदे-शीर होऊन सरकारासहि सुखावह होणार आहे. उदाहरणार्थ, मे. वाग्भटराव देशपाडे यांनीं विधवांच्या पोटगीबद्दल व दत्तकाबद्दल अडचण लक्षांत येताच बिलें आणलीं, व एक बिल थोडें दुरुस्त होऊन व दुसरें तसेंच पास झालें. यावरूनहि मीं म्हणतों त्याप्रमाणें आपल्या हातानें आपल्या अडचणी दूर कशा करतां येतात हें सिद्ध झाले आहे. वास्तविक आपल्या शास्त्राप्रमाणें बहिणीचा मुलगा व आपला नातू (मुलीचा मुलगा) दत्तक घेण्यास हरकत नाहीं. पेशव्याच्या डायऱ्या पाहिल्या, तर असे दत्तक घेण्यास परवानगी होती हें कळून येईल. परंतु, ब्रिटिश सत्तेपासून निर्णय देणें आपले हातीं नसल्यामुळें या अडचणी येत आहेत. तिकडे असेंब्लींत सामाजिक बिलेंहि पास करून घेण्यास फार जिकीर होते. मी स्वतः ७ वर्षे असेंब्लीचा सभासद होतों. ना. सारडा यांना बिल पास करून घेण्यास किती यातायात पडली तें मला माहीत आहे. पण आपले येथें श्रीमंत सरकारची सहानुभूति व आपलें सहकार्य मिळाल्यानें बिलें लवकर पास झालीं, व म्हणून, मे. वाग्भटराव यांचें मी अभिनंदन करतों. मे. वाग्भटराव यांस सुधारक म्हणा अगर वाटेल तें म्हणा, पण त्यानीं खटपट करून समाजास भासणारी ही अडचण दूर करून घेतली आहे. तेव्हां, मी सांगितल्याप्रमाणें कारभार लोकांचे हातीं देण्यात नुकसान नाहीं. यापेक्षां

स्वराज्य तें काय ?" शेवटीं सदर प्रसंगीं बोलण्यास परवानगी दिल्याबद्दल श्रीमंत सरकारांचे आभार मानून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

त्यानंतर, रा. ब. अंजनगांवकर यांनीं पुढीलप्रमाणें थोडक्यात भाषण केले.

## रा. ब. अंजनगांवकरांचें भाषण

"आपलें कायदेकौन्सिल साडेतीन वर्षांपूर्वी स्थापन झालें व त्या वेळेपासून त्याचें संगोपन करण्याचा मान मला मिळाला. आज श्रीमंत सरकारांनीं जाहीर केलेल्या सुधारणा ऐकून मला अतिशय आनंद वाटत आहे. माझ्या कामगिरीबद्दल कौन्सिलनें ठराव पास करून मजकडे पाठविला, त्याजबद्दल आभारप्रदर्शक पत्र मीं पूर्वी पाठविलेंच आहे. परंतु, आज समक्ष आपले सर्वांचे आभार मानण्याची संधी मिळाली याबद्दल मला फार संतोष वाटत आहे. आज जाहीर झालेल्या या सुधारणांबद्दल आपले लोकमान्य पुढारी श्रीयुत केळकर यांनीं आपणां सर्वांस आता उपदेशपर अभिप्राय दिला आहे, त्याप्रमाणें आपण वागावें अशी विनंति आहे."

पहिल्या कायदेमंडळाची ही अखेरची ७ वी बैठक प्रगतीचे दृष्टीनें महत्त्वाची झाली. या बैठकीचे अखेरीस पहिलें कायदेमंडळ रद्द करण्यांत आले असून नवीन घटनेप्रमाणें लवकरच दुसऱ्या कायदेमंडळाची स्थापना करण्यात येईल असें अध्यक्षांनीं जाहीर केले.

## तालुका लोकलबोर्ड्स् व द्वितीय कायदेमंडळाची स्थापना

सन १९३२ च्या जानेवारींत संस्थानच्या पहिल्या कायदेमंडळाची ७ वी व शेवटची बैठक भरली. त्या वेळीं बैठकीच्या शेवटच्या दिवशीं श्रीमंत राजेसाहेब यानीं हजर राहून पुढील म्हणजे दुसऱ्या कायदेमंडळाची व तालुका लोकल बोर्डांची घटना जाहीर केली. त्या घटनेप्रमाणें पांच तालुक्यात पांच लोकल बोर्डें स्थापन करण्यांत आलीं. प्रत्येक लोकलबोर्डांत एकंदर नऊ सभासद सरकारी रीतीनें निवडून (प्रेसिडेन्टसुद्धां) नेमण्यांत आले. त्यांत तीन सरकारी व पांच बिनसरकारी सभासद व मामलेदार हे एक्स-ऑफिशिओ प्रेसिडेन्ट नेमण्यांत आले. म्हणजे बोर्डांत नॉन-ऑफिशिअल सभासदांचें बहुमत ठेवण्यात येऊन बिनसरकारी सभासदांपैकीं सर्वांनीं मिळून निवडलेला उपाध्यक्ष नेमावा असें ठरविण्यात आलें. याप्रमाणें पाचही तालुक्यांत लोकलबोर्डें ता. ७ जून

१९३२ पासून स्थापन करण्यांत आलीं आहेत. बोर्डांची मुदत तीन वर्षांची ठरविण्यांत आली. बोर्डांच्या दरसालचे खर्चाखेरीज कायमनिधि म्हणून रु. १५००० देण्याचे ठरविल्याचें मागें सागण्यांत आलेंच आहे. परंतु १००० रुपये व्याज येण्यास ही रक्कम अपुरी पडूं लागली म्हणून त्या रकमेंत रु. ६३२५ ची भर घालून एकंदर रु. २१३२५ च्या प्रॉमिसरी नोटी खरेदी करण्यांत आल्या. श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपले खाजगी खर्चांतून ही रक्कम दिली असून येणारें व्याज पाचही बोर्डांना विभागून देऊन त्याचा विनियोग बोर्डांनी आपल्या मर्जीप्रमाणें लोकोपयोगी कार्याकडे करण्याची परवानगी दिली. बोर्डांकडे तालुक्याचीं शिक्षण, दवाखाना, आरोग्य वगैरे खातीं सोंपविण्यात आलीं व त्या त्या खात्यात योग्य त्या व खर्चाचे आटोक्यात येतील अशा शक्य त्या सुधारणा करण्याची बोर्डाला पूर्ण मुभा दिली.

बोर्डांची स्थापना झाल्यावर लवकरच दुसरे कायदेमंडळ अस्तित्वात आले. त्या कायदेमंडळावर एक एक प्रतिनिधी निवडून पाठविण्याचा अधिकार प्रत्येक बोर्डास दिल्याप्रमाणें त्यानीं प्रतिनिधींची निवड केली.

सातव्या बैठकीत श्रीमंत बाबासाहेबानीं जाहीर केल्याप्रमाणें तालुका लोकल बोर्ड्स् व द्वितीय कायदेमंडळाच्या फेरफाराची योजना वर सागितली आहे. कायदेमंडळाच्या त्या योजनेंत विचार करून श्रीमंतानीं आणखी दोन सुधारणा केल्या. त्या म्हणजे सरकारी सभासद १० चे ऐवजीं ७ व बिन सरकारी १३ केले, व अध्यक्षासुद्धा २१ सभासद असावेत असें ठरविले. संस्थानचे दिवाण हे अध्यक्ष कायम ठेवून उपाध्यक्ष बिनसरकारी सभासदापैकीं निवडलेला देण्याचें ठरविले. १९२९ सालीं मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यानीं भोरास भेट दिली त्या वेळी भोर म्युनिसिपालिटीस श्रीमंत बाबासाहेबानीं निवडणुकीचे तत्त्व लागू केल्याचे जाहीर केलें होतें. त्याप्रमाणे या सालीं निवडणुकी होऊन म्युनिसिपालिटीची घटना झाली होती. या नवीन म्युनिसिपालिटीची ही तीन वर्षांची मुदत सन १९३२ सालीं पुरी झाली होती. म्हणून पुन्हा निवडणूक होऊन नवीन सभासद निवडून आले, त्यानींहि द्वितीय कायदेमंडळाकरिता आपला प्रतिनिधि निवडून दिला. ही सर्व तयारी १९३२ सालच्या ऑगस्टपूर्वी झाली. तेव्हा नवीन योजनेप्रमाणें दुसऱ्या

कायदेमंडळाची घटना करून ती दशम वार्षिक राज्यारोहणदिन समारंभाचे वेळीं म्हणजे ता. १८ ऑगस्ट सन १९३२ रोजीं जाहीर करण्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं ठरविले. या दरबारास तालुका लोकल बोर्डांचे सभासद, म्युनिसिपालिटीचे सभासद व दुसऱ्या कायदेमंडळाकरिता नेमलेले व निवडून आलेले सभासद या सर्वांना बोलाविले होतें. त्याप्रमाणें सर्व मंडळी हजर होती. रा. ब. अंजनगावकर हेहि निमंत्रणावरून आले होते.

पहिलें कायदेमंडळ स्थापण्याच्या वेळीं सन १९२८ सालीं ज्याप्रमाणें राज्यारोहण समारंभाचा दरबार मोठ्या प्रमाणावर भरविण्यात आला होता, त्याचप्रमाणें दुसऱ्या कायदेमंडळाची व तालुका लोकल बोर्डांची नवीन घटना जाहीर करण्यात येणार असल्यामुळे हा दशवार्षिक राज्यारोहण समारंभहि मोठ्या प्रमाणावर झाला. ता. १८ ऑगस्ट १९३२ या दिवशी सालाबाद-प्रमाणें दुपारीं दरबार भरविण्यात आला. दरबारात तालुका लोकल बोर्डांचे सभासद, दुसऱ्या कायदेमंडळाचे सभासद व इतर बडे लोक हजर होते. चौलीप्रमाणें प्रथम दिवाणानीं राज्यकारभाराचा दशवार्षिक अहवाल वाचून दाखविला. नंतर श्रीमंत बाबासाहेबानीं भाषण करून सुधारणाविषयक अनेक गोष्टी जाहीर केल्या. त्यांनीं पुढील भाषण केले.

## श्रीमंत बाबासाहेबांचें भाषण

''सद्‌गृहस्थहो, आज आमच्या दशमवार्षिक राज्यारोहणदिन समारंभाचे वेळीं आमच्याविषयीं आपल्या मनात वसत असलेला आदर व सदिच्छा व्यक्त कर-ण्यास येथें येण्याची तसदी घेऊन आपण जमलात याबद्दल मला अत्यंत आनंद वाटत असून मी आपणा सर्वांचें प्रथम अंतःकरणपूर्वक स्वागत करतों. आपले भिन्न भिन्न व्यवसाय बाजूस ठेवून आमच्या आनंदात अंशभागी होण्या-साठींच आपण येथें आज आलांत याची जाणीव आम्हास आहे. यास्तव त्याबद्दल आभार मानणें आम्ही आपलें कर्तव्य समजतों. या महत्त्वाच्या समारंभास आमच्या खास निमंत्रणास मान देऊन आलेल्या सद्‌गृहस्थाचे आम्ही फार आभारी आहोंत. तसेंच आमचे निमंत्रणावरून आपले संस्थानचे माजी दिवाण रा. ब. अंजनगांवकर हेहि आज आले आहेत याबद्दलहि आम्हास संतोष वाटत आहे. त्याचप्रमाणें आयुर्वेदाचार्य वैद्य नानलशास्त्री हेहि आजचे

समारंभास आल्यानें आम्हांला फार आनंद वाटत आहे. आमचे आजारीपणांत आम्हांला त्यांचा किती उपयोग झाला, हें आपण आतां ऐकिलेल्या अहवालावरून आपणांस कळून आलेच आहे, व त्यांचेबद्दल आणि आर्य वैद्यकाबद्दल आमचें मत, शेठ ताराचंद रामनाथ धर्मार्थ हॉस्पिटलमध्यें आमच्या परमपूज्य मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचे तैलचित्राचा अनावरण समारंभ ता. १७ जुलै रोजीं झाला त्या वेळीं आम्हीं जाहीर रीतीनें प्रदर्शित केलें असल्यामुळें आज त्याची पुनरावृत्ति करीत नाहीं.

सज्जनहो, संस्थानचे दिवाण यानीं आताच वाचून दाखविलेला गुदस्त सालच्या राज्यकारभारांतील महत्त्वाच्या गोष्टींचा अहवाल आपण ऐकलाच आहे. त्याचप्रमाणें त्यांतच त्यानीं निवेदन केलेला एकंदर आमच्या आतांपर्यंतच्या दहा वर्षांच्या कारकीर्दींतील राज्यकारभारविषयक ठळक बाबींचा त्रोटक वृत्तांत आपल्या श्रवणात आलाच आहे. त्यावरून आम्हीं राज्यकारभाराचें धोरण कसें ठेविलें आहे तें आपणास समजून येणार आहे.

सद्गृहस्थहो, आम्ही आपल्या षष्ठम वार्षिक राज्यारोहणाच्या दिवशीं म्हणजे ता. १८ ऑगस्ट सन १९२८ रोजीं भोर संस्थान कायदेमंडळाची स्थापना केली होती हें आपणास स्मरत असेलच. त्या कायदेमंडळाची नेहमींची त्रैवार्षिक व नियमानुसार विशेष वाढविलेली एक वर्षाची ही मुदत संपल्यानें तें पहिलें कायदेमंडळ कायद्याप्रमाणें खलास केल्याचें आपणांस अवगत आहेच. त्या कायदेमंडळाचे शेवटचे बैठकीचे वेळीं आम्ही नवीन कायदेमंडळाची केलेली योजना जाहीर केल्यावर नवीन कायदेमंडळात बिनसरकारी सभासदांची संख्या जास्त ठेवावी असें आम्हांस वाटून त्याप्रमाणें आज या आनंदाचे प्रसंगीं दुसऱ्या कायदेमंडळाची घटना जाहीर करण्याची आम्ही संधी घेत आहोंत. तें करण्यापूर्वीं गेल्या कायदेमंडळांत मे. वाग्भटराव देशपांडे यांनीं सामाजिक व धार्मिक स्वरूपाचीं दोन बिलें आणून तीं एकमतानें पास करून घेतलीं व सामाजिक आणि धार्मिक बाबतींत सुधारणा करण्याचा उपक्रम केला, याबद्दल मे. वाग्भटराव देशपाडे यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. या दोन्ही बिलांस ताबडतोब भोर दरबारकडून कायद्याचें स्वरूपहि देणेंत आलें आहे. मनोरंजन मासिकाच्या गेल्या जूनच्या अंकांत श्री.

के. वा. गजेन्द्रगडकर, बी.ए., एल्एल्.बी., यांनीं आपले लेखांत या कायद्याबद्दल भोर दरबारचें अभिनंदन केलेले आहे; तें आपले वाचनात आले असेलच. आजच हें प्रामुख्यानें येथें सागण्याचा हेतु इतकाच कीं, आता नवीन होणाऱ्या कायदेमंडळानें राजकीय बाबींप्रमाणेंच सामाजिक व धार्मिक बाबतींत सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करावा.

आतां कायदेमंडळाची नवीन घटना जाहीर करण्याम आम्हास आनंद वाटत आहे. प्रस्तुतच्या घटनेप्रमाणें कायदेमंडळात संस्थानचे दिवाण हे पूर्ववत् अध्यक्ष असून त्यांचेसह सभासदांची एकंदर संख्या २१ राहणारी आहे. मात्र सरकारी सभासद १० चे ऐवजीं ७ राहून बिनसरकारी सभासद १३ असतील व या तेरापैकीं तालुका लोकलबोर्डें व भोर म्युनिसिपल कमेटी यानीं निवडलेले ६ व सरकारनें नेमलेले ७ याप्रमाणें सभासद असतील असें आम्हीं ठरविले आहे. शिवाय कायदेमंडळाचा उपाध्यक्ष बिनसरकारी सभासदापैकीं निवडलेला असेल असेंहि आम्ही आज जाहीर करीत आहोंत. यावरून नव्या कायदेमंडळात बिनसरकारी सभासदांचें संख्याधिक्य व निवडलेला उपाध्यक्ष या दोन जादा सुधारणा केल्या असल्याचें आपल्या लक्षात येईलच. यापुढील तीन वर्षांकरिता कायदेमंडळाचे खालीलप्रमाणें सभासद असतील :

अध्यक्ष—रावबहादुर एम्. एन्. हुल्याळ, बी.ए., दिवाण, संस्थान भोर.

७ सरकारी सभासद--

१. रा. व्ही. जी. रानडे, एम्. ए., एलएल. बी., ज्युडिशिअल कौन्सिलर व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे मेंबर.
२. रा. व्ही. ए. बावडेकर, चीफ रेव्हिन्यू ऑफिसर व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे मेंबर.
३. रा. बी. आर. लोहोकरे, पोलिटिकल सेक्रेटरी.
४. रा. व्ही. एन्. जोशी, शाळाधिकारी.
५. रावसाहेब मार्तंड भिमाजी कुलकर्णी, मामलेदार, पौनमावळ.
६. रा. व्ही. एस्. पाटणकर, डिस्ट्रिक्ट प्लीडर व पब्लिक प्रॉसिक्यूटर, भोर.
७. रा. व्ही. बी. टाकळकर, बी. ए., मामलेदार, विचित्रगड.

१३ बिनसरकारी सभासदांपैकीं ६ निवडलेले सभासद—

१. रा. शंकर लक्ष्मण लिमये, बी. ए., एलएल. बी., हायकोर्ट वकील व सेक्रेटरी, विचित्रगड तालुका-सभा, व विचित्रगड तालुका लोकलबोर्डानें निवडलेले मेंबर.

२. रा. सी. जी. आगाशे, बी. ए., एलएल. बी., ॲडव्होकेट पुणें, हायकोर्ट वकील भोर, सल्लागार देशमुख-संघ, उपाध्यक्ष राजगड तालुका-सभा व राजगड तालुका लोकल बोर्डानें निवडलेले मेंबर.

३. रा. एल. जी. पटवर्धन, प्रचंडगड तालुका लोकलबोर्डानें निवडलेले मेंबर व त्या तालुक्यांतील लोकप्रिय पुढारी.

४. रा. दत्तो वामन जोशी, वकील, पिरंगूट, पौनमावळ तालुका लोकलबोर्डाने निवडलेले मेंबर.

५. रा. एच. जी. लागू, बी. ए., एलएल. बी., ॲडव्होकेट, पुणें, व हायकोर्ट वकील भोर, सुधागड तालुका-सभेनें निवडलेले मेंबर व सुधागड तालुक्याचे कार्यकारी मंडळाचे सभासद.

६. रा. जी. एम. पानसे, बी. ए,. एलएल. बी., हायकोर्ट वकील भोर, उपाध्यक्ष राजगड तालुका-सभा व भोर म्युनिसिपल कमिटीनें निवडलेले मेंबर.

७ सरकारनें नेमलेले—

१. रा. वा. ना. देशपांडे, बी. ए,. एलएल. बी., ॲडव्होकेट, लॅंडहोल्डर शिरवळ, संपादक-ऐक्य सातारा, अध्यक्ष, पौन-मावळ तालुका-सभा.

२. रा. महादेव हेरंब देव, बी. ए., इनामदार पिरंगूट, प्रेसिडेंट पौनमावळ तालुका-सभा.

३. कॅप्टन सखाराम रावजी जगताप, सरदारबहादुर, मिलिटरी पेन्शनर व सभासद, देशमुख कार्यकारी मंडळ.

४. रा. अण्णाजी पांडुरंग कोंडे, अध्यक्ष, देशमुख-संघ.

५. नगरशेट रामदास किसनदास, दानशूर व्यापारी, भोर.
६. पालीचे रा. केशव अप्पाजी देशमुख, संपादक-भारतसेवक, ठाणें.
७. राजगड तालुक्यापैकीं रा. पांडुरंग बळवंतराव शिळीमकर, देशमुख, अध्यक्ष राजगड तालुका-सभा.

याप्रमाणें कायदेमंडळातील सभासदांचीं नावें आपणास वाचून दाखवून तीं जाहीर करण्यास आम्हांस आनंद वाटत आहे. तसेंच भोर म्युनिसिपालिटीनें व तालुका लोकलबोर्डें यानीं निवडून दिलेल्या सभासदाचें आम्ही अभिनंदन करतों. आम्हीं केलेल्या नेमणुकाहि आपणास पसंत पडतील अशी आम्हास उमेद आहे. वर वाचून दाखविलेल्या सभासदाच्या यादीवरून कायदेमंडळात संस्थानातील सर्व हितसंबंधांचें योग्य तितकें प्रतिबिंब पडलें असल्याचें आपणास दिसून येईल अशी आमची खात्री आहे. इतकेंच नव्हे, तर लोकांच्या आदरास व विश्वासास पात्र असलेले व लोकमतनिदर्शक असेच सर्व सभासद असल्याचें आपणांस कळून येणार आहे व ह्या नव्या कायदेमंडळातील कामकाजाच्या संबंधाचा धागा कायम राहावा म्हणून पूर्वीच्या कायदेमंडळांतील काहीं सभासद आम्हीं नव्या कायदेमंडळात ठेविले आहेत. मागील कायदेमंडळातील सर्व सभासद कायम न ठेवण्याचें कारण आपणास उघडच कळून येणार आहे. कामाचा अनुभव इतरांनाहि मिळावा व पुष्कळ लोकाची, राज्यकारभाराशीं परिचय होऊन, लायकी वाढावी हाच हेतु, कांहीं नवीन सभासदांची नेमणूक करण्यात आम्हीं आपले दृष्टीसमोर ठेविला आहे. हा हेतु रास्त असून नेमलेले लोकहि मागील कौन्सिलांतील सभासदापेक्षा कमी योग्यतेचे नाहींत असें आपणास दिसून येणार आहे. शिवाय हे लोक रयतेच्या हितार्थ सार्वजनिक कार्यांत भाग घेत असतात हें आपणास माहीतच आहे. त्याचें काम अनुभवानेंच कळून येणार असलें तरी रयतेची बाजू योग्य रीत्या कौन्सिलात माडली जाऊन दरबार व प्रजा यांच्या हितानहिताच्या प्रश्नांचा समतोलपणें विचार करून कौन्सिलचा शकट सुरळीत चालवूं शकतील असे आस्थेवाईक, अनुभवी व हौसेनें काम करणारे लोकपुढारी नेमण्याची आम्हीं काळजी घेतली आहे. अर्थात्, हें कितपत साधलें आहे तें ठरविण्याचें काम आम्ही आपणावरच सोंपवितों. आज येथें हजर असलेल्या सर्व सभासदाचें स्वागत करण्यात आम्हास फार संतोष वाटत

आहे. उद्या संस्थानच्या दुसरे कायदेमंडळाची पहिली बैठक भरणार आहे. त्या वेळीं व पुढेंहि संस्थानच्या हिताचे कामीं वरील सर्व सभासदाच्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा आम्हास मिळेल अशी आम्हास दृढ आशा आहे.

सद्गृहस्थहो, आमच्या प्रजेस स्थानिक स्वराज्य-संस्थाचे कामकाजाचें शिक्षण घेण्यास जास्त विस्तृत क्षेत्र मिळावें म्हणून आम्हीं तसा कायदा करून तालुका लोकलबोर्डें स्थापन केल्याचें आपणास माहीत आहेच. प्रत्येक तालुका लोकलबोर्डांत सरकारी सभासद चार व बिनसरकारी सभासद पांच याप्रमाणें घटना आहे. लोकलबोर्डांकडे तालुक्यातील शिक्षण, सॅनिटेशन, दवाखाने वगैरे खातीं सोंपविली आहेत, व कायद्याप्रमाणें लोकल सेस वगैरेंचें उत्पन्न त्याना दिले आहे. यावरून तालुका लोकलबोर्डांतहि आम्ही बिन-सरकारी सभासदाचेंच संख्याधिक्य ठेविले आहे, हेंहि आपणास माहीत झालेलें आहे. आजच्या समारंभास आमच्या निमंत्रणावरून आलेल्या लोकल-बोर्डांच्या बिनसरकारी सभासदांचें आम्हीं आनंदानें स्वागत करीत आहों. तालुका लोकलबोर्डांच्या उपयोगाकरितां कायम फंड म्हणून १५००० रुपये आमच्या खाजगीपैकीं ठेवण्याचें आम्हीं पूर्वीं जाहीर केलेच आहे. त्यांत आणखी एक हजार रुपयांची (प्रत्यक्ष नोटीखरेदीच्या वेळीं आणखी ५३२५रु. लागले तीहि रक्कम श्रीमंतांनीं खासगींतून दिली ) आम्हीं भर घालून लोकल-बोर्डांना दरसाल व्याजाचे एक हजार रुपये खर्चास मिळतील अशी तजवीज आम्हीं केली आहे.

सद्गृहस्थहो, आपण सर्व संस्थानचे प्रजाजन व हितचिंतक आहात त्याअर्थीं आपणांस सांगण्यासारखी या सालातील आणखी विशेष गोष्ट म्हणजे भोर संस्थान-राज्यकारभाराबाबतचा आम्हीं केलेला कायदा ही होय. हा कायदा आम्ही आपल्या दशम-वार्षिक राज्यारोहण दिनाच्या स्मरणार्थ म्हणून करून आजच प्रसिद्ध केला आहे. सदर कायद्याचीं बुकें आपणांस मिळालींच असतील. त्यांवरून आमच्या राज्यकारभारविषयक अंतिम ध्येयाबद्दल व तें साध्य करण्याच्या ठराविक पद्धतीबद्दल आमच्या निश्चयाची आपणांस खात्री पटणार आहे. जबाबदार राज्यपद्धती ( Responsible Government ) हें आमच्या राज्यकारभाराचें परम उच्च व अंतिम ध्येय असून तें सावकाश परंतु

उत्तरोत्तर चढत्या प्रगतीच्या क्रमानें गाठण्याचा आमचा निश्चय आहे. हे या कायद्याच्या द्वारे पुन्हां एकवार आम्ही जाहीर करीत आहोंत.

आतां या नव्या कौन्सिलच्या घटनेबाबतच्या एका प्रश्नाचा थोडा विचार करूं. तो प्रश्न म्हणजे निवडणूक हा होय. निवडणूक हें हल्लीं प्रगत राज्यपद्धतीचें एक चिन्ह समजले जातें, हें आम्हास माहीत आहे. इतकेंच नव्हे, तर आपणापैकीं सर्वांस नसलें तरी कित्येकांस, निदान कौन्सिलात नसल्यापैकीं आमच्या प्रजाजनांमधील काहींना तरी कौन्सिल घटनेंत आम्हीं प्रत्यक्ष निवडणुकीच्या तत्त्वाचा काहीं प्रमाणांत तरी आताच शिरकाव केला असता तर बरे झालें असतें असें वाटत असलें पाहिजे, हें आम्हास माहीत आहे. आम्हीहि निवडणुकीच्या तत्त्वाच्या विरुद्ध आहोंत असें मुळींच नाहीं. भोर म्युनिसिपालिटीच्या घटनेंत प्रत्यक्ष निवडणुकीच्या तत्त्वाचा आम्हीं समावेश केलेलाच आहे, व लोकलबोर्डांच्या घटनेसहि हें तत्त्व तीन वर्षांनंतर लागू करण्याचें जाहीर आश्वासन आम्हीं दिलेंच आहे. यावरून हें आम्हांस संमत आहे, असेंच आपणांस समजून येणार आहे. तथापि, मताचा हक्क हा वस्तुतः हक्क नसून ती मोठीच जबाबदारीची गोष्ट असल्यानें या बाबतींत फार सावधगिरीनें पुढें पाऊल टाकलें पाहिजे, असें आम्हांस वाटतें. अर्थात् कायदेकौन्सिलच्या घटनेस निवडणुकीचें तत्त्व कधींच लावावयाचें नाहीं, किंवा कायदेमंडळास यांपेक्षाहि आणखी जादा अधिकार देण्याचा आमचा विचार नाहीं, असें आपण समजूं नये. योग्य वेळीं रयत लायक होईल तसें तेंहि होणार आहे. मात्र Slow but sure and solid ही म्हण या महत्त्वाच्या व जबाबदारीच्या संबंधांत आमच्या संस्थानच्या प्रजेच्या खऱ्या व टिकाऊ हितास्तवच आम्ही आपल्या नजरेसमोर ठेविली असल्यानें ही गोष्ट आम्ही पायरीपायरीनें व चढत्या क्रमानें हळूहळू पण निश्चित हितप्रद होईल अशा खबरदारीनें अमलांत आणूं याविषयीं आपण शंका बाळगूं नये. तोंपर्यंत लोकलबोर्डांच्या द्वारा निवडणुकीचें तत्त्व लागू करण्यास आवश्यक अशी प्राथमिक तयारी होऊन हा अनुभव कसा काय येतो तें समजून येणार आहे. आमचे हे विचार आपणांस बऱ्याच अंशीं पटतील अशी आम्ही उमेद बाळगतों. कारण महत्त्वाच्या बाबतींत जें करणें तें विचारपूर्वक न करितां घाई करून केलें व

त्यात एखादी चूक झाली, तर तिचे दुष्परिणाम दूरवर पोंचून ते दीर्घ काल भोगावे लागतात, ही गोष्ट सर्वांच्याच परिचयाची आहे. याचे उलट जे आज केलें तरी चालेल अशा बाबतींत आणखी सर्व बाजूंनीं पूर्ण विचार करून तें थोड्या अवधीनें केल्यानें काहीं बिघडत नाहीं, अशी नेहमींच्या अनुभवाची स्थिति असल्यानें आपण या बाबतींत अधीर होणार नाहीं, अशी आमची खात्री आहे. शिवाय तालुका सभांचीं जीं शिष्टमंडळें दरबारकडे आलीं त्यातील बहुमतहि कायदे-कौन्सिलात निवडणुकीचें तत्त्व लागू करण्यास फारसें अनुकूल दिसून आले नाही असे आम्हासहि वाटत असल्याने सध्यांच्या कौन्सिलची रचना निवडणुकीच्या पायावर आम्हीं केली नाहीं. या बाबतींत आपणास व आपल्या मार्फत आमच्या प्रजाजनास आमचे विशेष सुचविणें आहे कीं, त्यानीं या प्रश्नांचा विचार संस्थानची परिस्थिति ध्यानात घेऊनच स्वतः करावा. केवळ निवडणूक या शब्दावर जाऊं नये व बाहेरच्या मत-मतांतराचा व टीकाचा आपल्या सुविचारावर परिणाम होऊं देऊं नये.

It is not the number of members or the form of Council but the quality of members that matters most.

हें एका बड्या मुत्सद्याचें वाक्य या संबंधात त्यानीं सदैव लक्षांत ठेवावें.''

श्रीमंताच्या भाषणानंतर कायदेमंडळाच्या सभासदापैकी रा. चंद्रशेखर गोविंद आगाशे, बी, ए., एलएल. बी., उपाध्यक्ष, रा. वाग्भट नारायण देशपांडे, बी. ए., एल्एल्. बी., रा. महादेव हेरंब देव, बी. ए., रा. शंकर रंगनाथ जोगदेव वकील, रा. हरी गणेश लागू, बी. ए., एल्एल्. बी., याची श्रीमंतानीं कायदेमंडळाच्या घटनेंत प्रगति केल्याबद्दल प्रशंसापर भाषणें झालीं. तीं भाषणें परिशिष्ट ३ यांत दिलीं आहेत. त्याच्या भाषणांनंतर श्रीमंताना पुष्पहार, पानसुपारी, अत्तरगुलाब देण्यात येऊन दरबार बरखास्त करण्यांत आला.

## दुसऱ्या कायदेमंडळाची पहिली बैठक

राज्यारोहणसमारंभदिनाच्या दुसऱ्या दिवशींच म्हणजे ता. १९ ऑगस्ट सन १९३२ रोजीं नवीन कायदेमंडळाची पहिली बैठक भरविण्यात आली. या पहिल्या बैठकीच्या प्रारंभीं श्रीमंत बाबासाहेबांनीं पुढील भाषण केलें.

# श्रीमंत बाबासाहेबांचें भाषण

“ भोर संस्थान कायदेमंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व सभासदहो,

श्रीरामचंद्राच्या कृपेने संस्थानच्या दुसऱ्या कायदेमंडळाच्या या पहिल्या अधिवेशनप्रसंगीं नेहमींच्या वहिवाटीप्रमाणे प्रारंभीं भाषण करून बैठकीस सुरुवात करून देण्याची संधि मिळाल्याबद्दल आम्हास फार आनंद वाटत आहे. आज या सुसमयीं आपल्या कार्यांत आपणास उत्तम यशप्राप्ति व्हावी अशी प्रभूची आम्ही अनन्यभावें प्रथम प्रार्थना करून आपणा सर्वांचे मन:पूर्वक आम्ही स्वागत करतों. तसेंच, तालुका लोकलबोर्डांचे तर्फे व भोर म्युनिसिपालिटीतर्फे निवडून आलेल्या सभासदाचे अभिनंदन करण्यास आम्हास फार संतोष वाटत आहे. त्याचप्रमाणें आपण सर्वांनी कौन्सिलचे उपाध्यक्ष म्हणून रा. चंद्रशेखर गोविंद आगाशे याची निवड केली याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों.

सद्गृहस्थहो, आजच्या दशम वार्षिक राज्यारोहण-दिनानिमित्त काल भरविलेल्या दरबारांत आम्ही आपले भाषणात कायदे-कौन्सिलच्या घटनेत कोणते महत्त्वाचे व प्रगतिपर फेरफार केले आहेत, तें स्पष्टपणें सांगितलेच आहे. त्याचप्रमाणें निवडणूक, संस्थानातील चळवळ वगैरे विषयासंबंधींचे आम्हीं आपले विचार थोडक्यांत पण जाहीर रीत्या सर्वांसमोर काल मांडले असल्यानें, त्याचा आज येथें पुनरुच्चार करून आपला वेळ आम्ही घेत नाही. तथापि इतके मात्र अवश्य पुन्हा एकवार सांगितले पाहिजे कीं, संस्थानची प्रगति व प्रजेचे कल्याण हें ध्येय सतत मनश्चक्षूंपुढे ठेवून आम्ही आपल्या राज्य-कारभाराची नौका वल्हवीत असल्याचे कालच आम्हीं प्रसिद्ध केलेल्या Government of Bhor State Act वरून आपल्या लक्षात येईल. सदर कायद्याच्या १३ वे कलमान्वयें असलेले अधिकार चालवून व मागील कौन्सिलच्या कामकाजाच्या अनुभवावरून कायदेमंडळाचें काम चालविण्याचे पद्धतीसंबंधींचे नियमांत उणेपणा व दोष दिसून आले ते लक्षात घेऊन आम्ही कामाच्या सुव्यवस्थेच्या दृष्टीनें नियमावलींत इष्ट व आवश्यक असे फेरफार केले आहेत. सदरहूप्रमाणें दुरुस्त केलेल्या नियमाचें छापील पुस्तक आपणास मिळाले असेलच. त्यावरून योग्य त्या व जरूर तेथेंच दुरुस्त्या केल्या आहेत असें

आपणांस दिसून येणार आहे. या नियमाप्रमाणें पुढें आपल्या कायदेमंडळाचें काम चालणार आहे. लोकलबोर्डांतील नेमणुका, लोकलबोर्ड ॲक्ट, गव्हर्मेंट ऑफ भोर स्टेट ॲक्ट, कायदेमंडळाच्या सुधारणा व निवडणुक वगैरेसंबंधीं काल दरबारात लोकपुढाऱ्यांनीं जीं भाषणें केलीं त्यांवरून आम्हीं केलेल्या वरील गोष्टी त्यांना संमत आहेत व आमचें राज्यकारभाराचें एकंदर धोरणहि त्यांस पसंत आहे हें पाहून आम्हांस फार संतोष वाटत आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या भाषणांत आमच्याशीं पूर्ण सहकार्य करण्याबद्दल जें जाहीर आश्वासन दिलें त्यायोगें संस्थानांत उत्तरोत्तर प्रगति करण्याच्या कामीं आम्हांस उत्तेजन येत आहे हें जाहीर रीतीनें व्यक्त करण्यास आम्हांस फार आनंद होत आहे.

दुसरी गोष्ट आपणांस सांगणें अवश्य आहे. ती म्हणजे आतापर्यंतच्या वहिवाटीप्रमाणें संस्थानचें बजेट आतां आपणासमोर शक्य तितकें खुलासेवार मांडलें जाईल.

सद्गृहस्थहो, आतां मागच्या कायदेमंडळानें एकंदर काय काम केलें त्याचा या प्रसंगीं आढावा घेणें आपणांस उपयुक्त व मार्गदर्शक होणार असल्यानें तें आम्हीं करण्याचें योजिलें आहे. मागील कौन्सिलच्या एकंदर सात बैठकी झाल्या. या सात बैठकींतले एकंदर कामाचें पर्यालोचन केल्यास असें दिसून येतें कीं, कौन्सिलांत एकंदर प्रश्न त्यांच्या पोटभागासह ९२२ विचारले गेले, ठराव ९२ मांडले गेले व कायद्यांचीं बिलें ९ विचारास ठेवलीं गेलीं. मांडलेल्या ठरावांपैकीं ४१ संमत झाले, ३७ परत घेतले गेले, ११ वगळले गेले, २ नापास झाले व १ नामंजूर झाला. कायद्याच्या बिलांपैकीं ८ पास झालीं व १ तहकूब राहिलें. कायदेमंडळात पास झालेल्या ठरावान्वयें योग्य व शक्य त्या तजविजी दरबारनें ताबडतोब केल्या असून अलीकडील कित्येकांसंबंधीं विचार चालू आहे. पास झालेल्या सर्व कायद्यांच्या बिलांस आम्हीं मंजुरी देऊन तसे कायदे संस्थानांत जारी केले आहेत. मागील कायदेमंडळांत तहकूब राहिलेल्या ठरावांची आणि बिलांची व्यवस्था, या कौन्सिलपुढें तीं कामें नियमाप्रमाणें आल्यास, पुढें योग्य ती होणार आहे. प्रश्न व ठरावांची वर्गवारीनें आणखी छाननी केल्यास असें दिसून येईल कीं, राज्यकारभाराचे प्रत्येक शाखेशीं त्याचा संबंध आलेला आहे, सारांश, मागील कायदेमंडळाचें काम

चित्रांक ८०

भोर संस्थान तृतीय कायदे-मंडळ, १९३६



खुर्चांवरः—१ कों. रं. दबडघाव; २ ल. ग. पटवर्धन; ३ द. रा. मोडक; ४ वि. र. ठकार; ५ वि. वि. बावडेकर; ६ म. हे. देव; ७ श्री. राजेसाहेब; ८ श्री. युवराज; ९ रा. ब. हुल्याळ; १० वि. गो. रानडे; ११ वि. अ. बावडेकर; १२ नगरभूषण थोपटे; १३ अ. रा. उपाध्ये; १४ के. अ. देशमूख.

उभेः—१ रं. मा. कानडे (सेक्रेटरी); २ द. वा. जोशी; ३ सावळचंद शहा; ४ म. व्यं. शिंगरे; ५ ग. अं. गुळाणीकर; ६ र. वा. आपटे; ७ त्र्यं. र. स्वर्शीकर; ८ ग. बा. फडके; ९ र. के. देशपांडे; १० वा. स. पाटणकर; ११ पु. सी. जोशी; १२ त्र. ग. वाळिंबे.

[सं. पा. ५१५

अशा प्रकारें बहुविध महत्त्वाचें व उपयुक्त झाल्याचें आपल्या नजरेस येणार आहे."

वरील भाषणात श्रीमंत बाबासाहेबांनीं पहिल्या कायदेमंडळानें एकंदर काय काय केलें त्याचा आढावा घेतला आहे. म्हणून त्याची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. कायदेमंडळात कोणतीं बिले पास होऊन त्यास दरबारची मंजुरी मिळून त्यांना कायद्याचें स्वरूप देण्यात आले, ते कायदे पुढें एकत्र दिले आहेत.

दुसऱ्या कायदेमंडळाच्या एकंदर सात बैठकी झाल्या. शेवटची बैठक मार्च सन १९३५ मध्यें झाली. या कायदेमंडळाची तीन वर्षांची मुदत ऑगस्ट सन १९३५ मध्यें पुरी होत असल्यामुळे मार्चमध्यें भरलेल्या सातव्या बैठकीच्या अखेरच्या दिवशीं अध्यक्षानी चालू कौन्सिलची ही शेवटची बैठक झाली असें जाहीर केले.

## तिसरें कायदेमंडळ

दुसऱ्या कायदेमंडळाची मुदत संपल्यानंतर तिसऱ्या कायदेमंडळाच्या घटनेचा विचार चालू झाला. तालुका बोर्डांचीहि ३ वर्षांची मुदत संपली होती. अनुकूल परिस्थिति दिसताच प्रजेला निवडणुकीचा हक्क देण्याचा आपला हेतु असल्याचें श्रीमंत बाबासाहेबानीं पूर्वीं जाहीर केले होतें. परंतु, निवडणुकीचा हक्क देण्याजोगी अद्याप परिस्थिति निर्माण झालेली नाहीं, हा हक्क दिला असता उपयोग होण्याऐवजी दुरुपयोग होण्याचाच संभव जास्त, असे पाहून चालू असलेले नियम कायम ठेवून तालुका लोकलबोर्ड व कायदेमंडळ याची घटना पूर्वीप्रमाणेंच कायम करावयाची असे दरबारने ठरवून त्याप्रमाणें नवीन तालुका बोर्ड नेमून सन १९३६ च्या मार्च महिन्यात तिसरे कायदेमंडळ स्थापन केलें. त्यात पुढीलप्रमाणें सभासद होते.

### अध्यक्ष

१. मे. रा. ब. माधव नारायण हुल्याळ, बी. ए., दिवाण, संस्थान भोर.

### सरकारी सभासद

१. मे. विनायक गोविंद रानडे, एम्. ए., एल्एल्. बी., सेकंड कौन्सिलर.
२. मे. विश्वनाथ अनंत बावडेकर, रेव्हेन्यू मेंबर.

३. मे. अंबादास गणपत गुळाणीकर, बी. ए., एलएल्. बी.
४. मे. वासुदेव सदाशिव पाटणकर, पब्लिक प्रॉसिक्यूटर.
५. मे. गणेश बाळकृष्ण फडके, मामलेदार प्रचंडगड.
६. मे. त्रिंबक रघुनाथ खर्शीकर, बी. ए., फॉरेस्ट सेटलमेन्ट ऑफिसर.
७. मे. रघुनाथ वामन आपटे, एम्. ए., एल्एल्. बी., मुन्सफ.

## बिनसरकारी सभासद

८. मे. महादेव हेरंब देव, बी. ए , उपाध्यक्ष.
९. मे. मध्वराज व्यंकटेश शिगरे.
१०. मे. विनायक विश्वनाथ बावडेकर, बी. ए., एल्एल्. बी.
११. मे. साखळचंद खाचंदशेट शहा.
१२. मे. अच्युत रामचंद्र उपाध्ये, पेन्शनर.
१३. मे. पुरुषोत्तम सिताराम जोशी.
१४. मे. दत्तो वामन जोशी, वकील पिरंगूट.
१५. मे. केशव अप्पाजी देशमुख, नाडसूर.
१६. मे. कोंडो रंगनाथ दबडघाव, भोर.
१७. नगरभूषण नानाजी पाडुरंग थोपटे.
१८. मे. विनायक रघुनाथ ठकार, बी. ए., एल्एल्. बी.
१९. मे. लक्ष्मण गणेश पटवर्धन, वेळे.
२०. मे. दत्तात्रय रामचंद्र मोडक, पडधवली.

## पहिल्या बैठकीच्या वेळचें श्रीमंतांचें भाषण

"कायदेमंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व सभासद सज्जनहो,

श्रीरामप्रभूच्या कृपेनें आपल्या संस्थानच्या तिसऱ्या कायदेमंडळाच्या या प्रथमाधिवेशनसमयीं आजपर्यंतच्या शिरस्त्याप्रमाणें प्रास्ताविक भाषण करून बैठकीस प्रारंभ करून देण्याचा हा सुयोग आल्याबद्दल आम्हांस अतिशय आनंद वाटत आहे. या सुप्रसंगीं आपणां सर्वांचें स्वागत करण्यास आम्हांस फार संतोष वाटत आहे. आपल्या कायदेमंडळात भोर म्युनिसिपॅलिटी व तालुका लोकलबोर्डस् यांच्या तर्फे ज्यांची निवड करण्यात आली आहे, त्यांचें अभिनंदन करण्यास आम्हांस समाधान वाटत आहे. तसेंच कौन्सिलच्या

उपाध्यक्षांचे जागीं आपणा सर्वांकडून श्रीयुत महादेव हेरंब देव याची निवड करण्यांत आल्याचें समजून त्यांचेंहि मनःपूर्वक अभिनंदन करण्यास आम्हांस संतोष वाटत आहे. करिता ज्या कार्यारंभीं आपण आज येथें जमलां आहात त्या कार्यांत आपणांस सुयश मिळावे अशी कार्यारंभीं इच्छा प्रदर्शित करणें व तत्सिध्यर्थ श्रीची प्रार्थना करणें हें आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

दरबारच्या विनंतीस मान देऊन तालुका लोकलबोर्डांचे जे बिनसरकारी सभासद येथें आले आहेत त्याचेंहि आम्ही आनंदानें स्वागत करीत आहोंत.

सभासदहो, गेल्या कायदेमंडळांतील कामकाजाच्या अनुभवावरून कायदेमंडळाच्या नियमांत जो अपुरेपणा दिसून आला तो भोर संस्थान-राज्यकारभारविषयक कायद्याचे तेरावे कलमानुसार असलेले अधिकार चालवून नवीन नियम करून दूर करण्यात आला आहे. या नव्या नियमाची छापील प्रत आपणास मिळाली असेलच. त्यावरून कामकाज सुयंत्र चालण्याच्या दृष्टीनें हे नियम जरूर व हितकर असेच असलेविषयीं आपली खात्री होईल अशी आम्हास उमेद आहे. या नियमावलीस अनुसरून आपलें यापुढें काम चालणार आहे.

सद्गृहस्थहो, कौन्सिलच्या एकंदर कामकाजाचे समालोचन करणें आपल्या पुढील कार्याची दिशा दर्शविण्याच्या दृष्टीनें अत्यावश्यक व उपयोगी असल्यानें त्याकडे आम्ही आता वळतों. दुसरे कायदेमंडळाच्या एकंदर सात बैठकी झाल्या. पहिली बैठक साहजिकच बरीचशी औपचारिक होती. कामाच्या दृष्टीनें खरें व भरीव असें काम त्यानंतरच्या सहा बैठकींतच झालें. त्यात एकंदर प्रश्न त्यातील भागांसह ४८७ विचारले गेले, ठराव २१३ मांडले गेले व कायद्यांचीं बिलें ४ विचारास घेतलीं गेलीं. ठरावापैकीं ६२ संमत झाले, २ असंमत झाले, १ गळाला, १२८ परत घेतले गेले व २० नामंजूर केले गेले. तसेच बिले सर्व पास झालीं. संमत झालेल्या बहुतेक ठरावांची शक्य तों अंमलबजावणी झाली असून पास झालेलीं बिले कायद्याचेच रूपांत संस्थानांत कायदे म्हणून दरबारनें अमलांत आणलीं आहेत हें आपणास अहवालावरून दिसून येणार आहे. त्याचप्रमाणें विचारलेल्या प्रश्नांची माहितीहि दरबारनें शक्य तितकी सत्वर व संपूर्ण दिल्याचेंहि आपणांस समजून येणार आहे.

सज्जनहो, सन १३४५ फसली सालचें संस्थानचें जमाखर्चाचें अंदाजपत्रक आपणांपुढें माडलें जाईलच. त्यावरून संस्थानच्या सांपत्तिक स्थितीची कल्पना येईल. सदरहू बजेटाची मागील कांहीं वर्षांच्या बजेटांशीं तुलना केली तर आपणांस असें दिसून येईल कीं, संस्थानच्या उत्पन्नाच्या बाबी ठराविक असून त्याचें उत्पन्नहि वाढत्या स्वरूपाचें नाहीं. उलट अबकारीचें उत्पन्न दरसाल रु. ७० हजार येत होतें तें यापुढें निम्याचे वर घटलें आहे. उत्पन्नांत हा मोठाच खड्डा पडला आहे. खर्चाच्या बाबीहि कायम अशाच आहेत व त्यांवरील खर्चहि अत्यंत अवश्य व मर्यादित असाच आहे. इतकेंच नव्हे तर बारा वर्षांपूर्वीच्या खातेंनिहाय खर्चाशीं हल्लींच्या त्याच खात्यांवरील खर्चाचें मान कांहीं बाबींत दिढीच्या सुमारात वाढले आहे असें कळून येणार आहे. उत्पन्नांत वाढ न होतां हा खर्च वाढलेला आहे हें लक्षांत घेणें जरूर आहे. रयतेच्या सुखसोयी व सुधारणासंबंधीच्या वाढत्या आकाक्षा ध्यानात घेऊन व कालमानास अनुसरून उचित अशी वाढ खर्चांत करण्यात आली आहे. तथापि उत्पन्नात वाढ झाल्याविना असे वाढते खर्च फार दिवस हल्लींप्रमाणें चालू ठेवणें आर्थिक सुस्थितीच्या म्हणजे जमाखर्चाच्या, निदान तोंडमिळणीच्या दृष्टीनें अशक्यच नव्हे तर अश्रेयस्करहि होणार आहे हें विचारातीं आपणास समजून येणार आहे. वतनदार, हक्कदार व देवस्थान धर्मादाय ह्यांसंबंधींचे ठराविक खर्च वजा जाता संस्थानची एकंदर जमा ठोकळ मानानें जितकी आहे, तितकाच खातेंनिहाय होणारा एकूण खर्च नेहमींचा व कमींत कमी जरूर असा अदमासें आहे. खर्चाचे सदरांत हल्लीं कारणपरत्वें पोलिसखात्यावर होत असलेला दहा पंधरा हजारांचा जादा खर्च विचारात न घेता नेहमींचा मध्यम मानाचा म्हणजे पूर्वींचा खर्च लक्षात घेऊनच आम्हीं वरील खर्चाचा आकडा सांगितला आहे. यावरून संस्थानच्या आर्थिक परिस्थितीची खरी जाणीव आपणास होईल अशी आमची खात्री आहे. मिळवावें तेवढें जवळ जवळ खर्च करावे ही स्थिति कोणीहि स्पृहणीय आहे असें म्हणणार नाहीं. तसेंच नेहमींच्या खर्चाकरितां शिलकेस हात लावणें जरूर पडावें ही गोष्टहि कोणी चागल्यांत गणणार नाहीं. राजकीय अर्थशास्त्राप्रमाणें दरसाल ठराविक प्रमाणांत शिल्लक राहिलीच पाहिजे असे आहे व तिचा विनियोग

अनपेक्षित कारणीं, मोठ्या खर्चाच्या कामीं मधून मधून करावयाचा असतो हें आम्हीं आपणांस विशेष सांगितलें पाहिजे असें नाहीं. ही स्थिति इतक्या विस्तारानें आपणांपुढें मांडावयाचा हेतु इतकाच कीं, आपणांस खरी स्थिति कळून यावी व त्या दिशेनें विचार करण्यास व उपाय सुचविण्यास शक्य व्हावे.

सभासदहो, उत्पन्न वाढलें नाहीं तर खर्चाचा हात पुष्कळच आखडावा लागेल व त्या मानानें सुधारणा झाल्यावर पाहिजे तसा खर्च करतां येणार नाहीं. असें होणें योग्य नाहीं हें आम्हीं जाणून आहोंत. परंतु दरबारचा त्या कामीं नाइलाज होणार आहे. सुधारणेचें गाडें चालू ठेवण्यास पैसा पाहिजे. स्टेट बजेटावर ताण पडूं नये व सुधारणाहि अडून पडूं नयेत या हेतूनें आम्हीं कायदे-मंडळ, लोकलबोर्डे, हायस्कूलची इमारत, हॉस्पिटल वगैरेच्या खर्चास एकंदर मिळून आजपावेतों सुमारें एक लाख रुपये मदत खाजगींतून केली आहे हें सर्वश्रुत आहेच. त्याचप्रमाणें संस्थानच्या खर्चास मदत व्हावी म्हणून असाच क्रम यापुढेंहि चालू ठेवणार आहोंत. ब्रिटिश इंडियन अबकारी वगैरे खात्यातील उत्पन्नाची घट, तंबाखू, साखर, काड्याच्या पेट्या, कार्डे व पत्रें, पेट्रोल वगैरे वस्तूंवर कर बसवून भरून काढण्याचा यत्न केला आहे. आपणहि त्या दिशेनें कांहीं उपक्रम करणें अवश्य व इष्ट होणार आहे. शिवाय शक्य तेथें आणखी काटकसर करून तुटीची कांहीं अंशांनीं भरपाई अप्रत्यक्षपणें होण्याकडेहि आमचें धोरण आहे. तात्पर्य, उत्पन्नाच्या बाबींत घट ३५ हजाराची लवकरच भरून निघाली पाहिजे. हें साध्य असून तें कसें घडवून आणता येईल हा आपल्यापुढें सध्या महत्त्वाचा व निकडीचा प्रश्न आहे. तूट भरून काढण्याचे तीन मार्ग आम्हीं वर दिग्दर्शित केले आहेतच. राज्यकारभाराचें प्रगतिपर धोरण न सुटतां व खातेनिहायच्या कार्यक्षमतेस बाध न येतां हा प्रश्न सोडविण्याचें कौशल्याचें काम आपणांपुढें आहे. त्याचा विचार सखोल व व्यापक दृष्टीनें करून आपण योग्य मार्ग सुचवाल अशी उमेद बाळगिल्यास ती अस्थानीं होईल असें आम्हांस वाटत नाहीं. मागील कौन्सिलच्या दुसऱ्या बैठकीच्या सुरुवातीच्या भाषणांत त्याचप्रमाणें पांचव्या बैठकीच्या प्रारंभीं 'ग्रामसुधारणा' या विषयावर आम्हीं आपले विचार प्रदर्शित करतांना संस्थानच्या बजेटाची ताणाताणीची स्थिति निवेदन केलीच आहे. तीच गोष्ट आज पुन्हा आपणासमोर ठेविली आहे.''

श्रीमंतांचें भाषण झाल्यावर कायदेमंडळाचे उपाध्यक्ष रा. महादेव हेरंब देव, बी. ए., व सभासद रा. विनायक विश्वनाथ बावडेकर, बी.ए.,एल्एल्.बी., रा. अच्युत रामचंद्र उपाध्ये व रा. विनायक रघुनाथ ठकार, बी. ए., एल्एल्. बी., यांनीं भाषणें करून कौन्सिलचें काम पूर्वीच्या कौन्सिलाप्रमाणेंच एकजुटीनें करूं असें आश्वासन दिलें. त्यांचीं भाषणें परिशिष्ट ४ यांत दिलीं आहेत.

या कायदेमंडळाची दुसरी बैठक ता. २४ नोव्हेंबर सन १९३६ पासून तीन दिवसपर्यंत भरली. या बैठकींत ग्रामोद्धाराबाबत व बादशहा आठवे एडवर्ड याच्यावर ता. १६ जुलै सन १९३६ रोजीं करण्यात आलेल्या हल्ल्याचा निषेधदर्शक असे दोन महत्त्वाचे ठराव पास करण्यांत आले.

या कायदेमंडळाची जादा बैठक ता. ३ फेब्रुवारी सन १९३७इ. रोजीं भरली. त्या बैठकींत बादशहा सहावे जॉर्ज इंग्लंडचे गादीवर बसल्याबद्दल अभिनंदनपर ठराव पास करण्यात आला.

तिसरी बैठक ता. ३ एप्रिलपासून दोन दिवस चालली. बैठकीच्या सुरुवातीस श्रीमंत राजेसाहेब यांनीं भाषण केलें. त्यांत ते म्हणाले, "ग्रामोद्धाराबाबत विचारविनिमय करून संस्थानात कशा प्रकारे सुधारणा करता येईल हें ठरविण्याकरिता ग्रामोद्धारकमिटी नेमण्यांत आली होती. त्या कमिटीनें केलेल्या शिफारशींप्रमाणे 'ब्रिटिश इंडियन बॉंबे व्हिलेज पंचायत ॲक्ट' संस्थानांत लागू केला असून, त्या कायद्याप्रमाणें तालुक्यांतील मामलेदार यांचे अध्यक्षतेखालीं स्थानिक ग्रामोद्धार-कमिटया तालुकानिहाय स्थापन करण्यात आल्या आहेत, व त्याना तालुक्याच्या परिस्थितीच्या मानानें ग्रामोद्धारासंबंधी काय सुधारणा करतां येतील त्यांजबद्दल दरबारकडे शिफारस करून त्याप्रमाणें सुधारणा घडवून आणण्यास दरबारची मंजुरी घ्यावी असें सुचविण्यांत आलें आहे. श्रीमंत राजेसाहेब याच्या भाषणावरून व त्यानीं त्याबाबत ग्रामपंचायत कायदा लागू करण्यांत जी तत्परता दाखविली तीवरून ग्रामोद्धाराबाबत श्रीमंतांना किती कळकळ वाटत आहे व संस्थानसुधारणेबाबत किती काळजी लागून राहिली आहे हें उत्तम प्रकारें व्यक्त होतें. याच बैठकींत मुंबई इलाख्यांतील वजना-मापांचा कायदा संस्थानांत योग्य ते फेरफार करून लागू करण्यांत आला आहे.

चवथी बैठक ता. १९ ऑगस्ट १९३७ पासून तीन दिवस चालली. या बैठकींत मांडण्यात आलेल्या ठरावामध्यें श्रीमंत राजेसाहेब विलायतच्या दुसऱ्या सफरीहून सुखरूप स्वदेशीं परत आले त्याबद्दल अभिनंदनपर ठराव सर्वानुमतें पास करण्यात आला.

पाचवी बैठक ता. ३ एप्रिल १९३८ पासून दोन दिवस चालू होती. Indian Matches and Mechanical Lighter's Act सर्व दुरुस्त्यासह लागू करण्याबाबतचे बिल दरबारतर्फे कौन्सिलपुढें माडण्यात आले, तें बिल पास होऊन ॲक्ट संस्थानास लागू करण्यात आला आहे.

सहावी बैठक जानेवारी १९३९ मध्यें ता. ५ ते ८ पर्यंत भरून चार दिवस काम चालले होतें. या बैठकींत श्रीमंत राजेसाहेब गेल्या सप्टेंबरमध्ये मोठ्या आजारातून ईशकृपेनें पूर्ववत् बरे झाल्याबद्दल अभिनंदनपर ठराव पास करण्यात आला. दुसरा ठराव असा होता कीं, श्रीमंताच्या षष्ट्यब्दिपूर्तीच्या स्मरणार्थ संस्थानच्या बजेटात ‘ प्रगति ’ असें एक सदर ठेवून त्या सदरात दरसाल काही रक्कम राखून ठेवावी व त्या रकमेचा विनियोग प्रौढ शिक्षणाकडे करण्यांत यावा. हा ठराव सर्वानुमतें पास झाला. ता. ८ रोजी श्रीमंतानी कौन्सिलमध्यें जाऊन समारोपाचे भाषण केले. त्या भाषणात कौन्सिलने पास केलेल्या ठरावास अनुसरून प्रौढ शिक्षणाकरिता रु. १००१ आपल्या खाजगींतून देणगी देऊन निधिस सुरुवात करून दिल्याचें जाहीर केले. या बैठकींत Indian Trusts Act and Indian Companies Act पास करण्यात येऊन ते संस्थानास फेब्रुआरी १९३९ पासून लागू करण्यांत आले आहेत.

तिसऱ्या कायदेमंडळाच्या वर उल्लेख केलेल्या एकूण सहा बैठकी आतापावेतों झाल्या असून त्या सर्वांत मिळून एकूण २४१ ठराव मांडण्यात आले. त्यांपैकी ५५ पास झाले; १३६ परत घेतले आणि ४७ पुढील बैठकी-वर ठेवण्यात आले; ३ असमंत झाले. एकूण ३२० प्रश्न विचारण्यात आले. त्यापैकीं ३१७ चीं उत्तरे दरबारतर्फे देण्यांत आलीं व ३ परत घेतले गेले. याप्रमाणें कायदेमंडळाचें एकंदर कामकाज झाले आहे.

संस्थानास कायदे करण्याचा आणि ब्रिटिश हद्दीतील व इतर संस्थानां-तील कायदे लागू करण्याचा अधिकार संस्थान अस्तित्वात आल्यापासून आहे.

परंतु कायदेमंडळ स्थापन होण्याच्यापूर्वी हा अधिकार नुसत्या हुजूर हुकमानें अंमलांत येत असे. कायदेमंडळ स्थापन झाल्यापासून त्याच्या संमतीनें हुजूर हुकमानें या अधिकाराची अंमलबजावणी करण्यांत येते. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यापासून त्यानीं लागू केलेले व कायदेमंडळ अस्तित्वांत आल्यानंतर त्याच्या संमतीनें लागू करण्यात आलेले कायदे खालीं दिले आहेत.

## श्रीमंत सरकार राजेसाहेब गादीवर आल्यापासून नवीन लागू करण्यांत आलेले कायदेकानू

(१) सन १८६०चा ४५वा इंडियन पिनल कोड सुधारण्याबाबतचा सन १९२३चा २० वा, व १९२४चा ५ वा सुधारणांसह १५-१०-१९२९ पासून लागू.

(२) सन १९२६चा ३रा, कोर्ट-फी ॲक्ट सुधारण्याबाबतचा ( पूर्वीचा ॲक्ट नं. १, १९२२चा) व १९२२चा ॲक्ट नं. २, १८९९चा हिंदुस्थानचा जनरल स्टँप ॲक्ट सुधारण्याबाबतचा ता. ७ जून १९३० पासून लागू.

(३) सन १८९८चा ५वा, क्रिमिनल प्रोसीजर कोड सन १९३२ इ.च्या ५व्या कायद्यानें व तत्पूर्वीच्या ता. ३०-४-१९३१ पर्यंत झालेल्या दुरुस्त्यांसह ता. ६ जून १९३१ पासून लागू.

टीपः—कायदेमंडळानें नेमलेल्या कमिटीच्या शिफारशींप्रमाणें संस्थानांत अमलांत असलेले बहुतेक सर्व कायदे ( लॅन्ड रेव्हेन्यू कोड, वतन ॲक्ट, फॉरेस्ट ॲक्ट व खोती सेटलमेंट ॲक्ट शिवाय करून ) त्यांत ३० एप्रिल १९३१ पर्यंत झालेल्या सुधारणांसह संस्थानांत लागू केले आहेत.

(४) सन १९०१ चा ३ रा मुंबईचा डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल ॲक्ट ता. २४–१०–१९२२ पासून लागू.

(५) सन १८७६ चा १९ वा सार्वजनिक नाटकांसंबंधींचा हिंदुस्थानचा ॲक्ट ता. ७ जून १९२३ पासून लागू.

(६) सन १९२० चा १७ वा हिंदुस्थानचा मोटार वाहनांबाबतचा ॲक्ट ता. ७ जून १९२३ पासून लागू.

(७) सन १९१४ चा ७ वा हिंदुस्थानचा मोटार वाहनांबाबतचा ॲक्ट ता. ७ जून १९२३ पासून लागू.

(८) सन १८७८ चा २ रा हिंदुस्थानचा आर्म्स् अॅण्ड अॅम्युनिशन-संबंधींचा दुरुस्त्यांसह ता. ७ जून १९२३ पासून लागू.

(९) सन १८८६ चा ६ वा जन्म-मृत्यु रेजिस्ट्रेशन अॅक्ट हिंदुस्थानचा ता. १ जुलै १९११ पर्यंतच्या दुरुस्त्यासह ता. १-१-१९२५ पासून लागू.

(१०) सन १८८२ चा ९ वा इंडियन मेजॉरिटी अॅक्ट हिंदुस्थानचा ता. १ जानेवारी १९२५ पासून लागू.

(११) सन १८८२ चा ५ वा ईजमेन्ट अॅक्ट हिंदुस्थानचा ता. १ जानेवारी १९२५ पासून लागू.

(१२) सन १९०५ चा १ ला मुंबईचा कोर्ट ऑफ वॉर्ड्स् अॅक्ट ता. १५–१०–१९२५ पासून लागू.

(१३) सन १८८९ चा १ ला मुंबई सरकारचा व्हिलेज सॅनिटेशन अॅक्ट (फक्त सुधागड तालुक्यांतील पाली गांवास) ता. ५–२–१९२७ पासून लागू करण्यांत आला आहे.

(१४) सन १९१० चा ९ वा विजेसंबंधींचा अॅक्ट ता. १ नोव्हेंबर १९२९ पासून लागू व त्यासंबंधींचे दुरुस्तीचे कायदे १९२२ चा १ ला व १९२३चा ४० वा व १९२५चा ३० वा या सुधारणासह ता. २१ ऑक्टोबर १९२९ पासून लागू.

(१५) सन १९०३ चा १५ वा इंडियन एक्स्ट्रॅडिशन अॅक्ट कलम ८ मधील पोटकलम ४ हे ता. १५–११–१९२९ पासून लागू.

(१६) सन १९२९ चा १० वा हिंदुस्थानचा सेन्सस अॅक्ट ता. १६ डिसेंबर १९३० पासून लागू.

(१७) सन १८६७ चा २५ वा हिंदुस्थानचा बुकें नोंदण्याचा व छापखान्यांबाबतचा अॅक्ट ता. ३० नोव्हेंबर १९३० पर्यंतच्या सुधारणांसह ता. १६ डिसेबर १९३० पासून लागू.

(१८) सन १८८४ चा १२वा शेतकऱ्यांस कर्ज देण्याबाबतचा हिंदुस्थानचा अॅक्ट ता. ३० एप्रिल १९३१ पर्यंतच्या सुधारणासह ता. ६ जून १९३१ पासून लागू.

(१९) सन १९१२ चा ४ था वेड्यांबाबतचा अॅक्ट ता. ३० एप्रिल १९३१ पर्यंतच्या सुधारणांसह ता. ७ जून १९३१ पासून लागू.

(२०) सन १९२० चा ५ वा नादारीचा ॲक्ट ता. ३० एप्रिल १९३१ पर्यंतच्या सुधारणांसह ता. ६ जून १९३१ पासून लागू.

(२१) भोर स्टेट ॲक्ट सन १३४१ फसलीचा ४ था ( १९३१-३२ ) पिनल कोड दुरुस्त करणेबाबतचा, ता. १-३-१९३२ पासून लागू.

(२२) भोर स्टेट ॲक्ट सन १३४१ फसलीचा १ ला ( १९३१–३२ ) हिंदुस्थानचा १८९९ चा ॲक्ट नं. ८ इंडियन पेट्रोलिअम ॲक्ट संस्थानास ता. १-३-१९३२ पासून लागू.

(२३) भोर स्टेट ॲक्ट सन १३४१ फसलीचा ५ वा (१९३१–३२) दि भोर स्टेट लोकलबोर्डस् ॲक्ट ता. १८ ऑगस्ट १९३२पासून लागू.

(२४) भोर स्टेट ॲक्ट सन १३४२ फसलीचा १ ला (१९३२-३३) गव्हर्न्मेंट ऑफ भोर स्टेट ॲक्ट ता. १८ ऑगस्ट १९३३ पासून लागू.

(२५) भोर स्टेट ॲक्ट सन १३४५ चा २ रा ( १९३५–३६ ) मुंबईचा ॲक्ट नं. ३ सन १८७५चा टोल्स ॲक्ट संस्थानात ता. ७-६-१९३५ पासून लागू.

(२६) भोर स्टेटचा सन १३४१ फसलीचा ॲक्ट नं.२ (१९३१-३२ हिंदुधर्मशास्त्रांतील दत्तकासंबंधींचा कायदा दुरुस्त केलेला संस्थानास ता. १-३-१९३२ पासून लागू.

(२७) भोर स्टेटचा सन १३४१ फसलीचा ॲक्ट नं.३ (१९३१-३२) हिंदुधर्मशास्त्रातील स्त्रियांचे वारसा व पोटगीबाबतचा कायदा दुरुस्त करणेचा. ता. १-३-१९३२ पासून लागू.

(२८) भोर स्टेटचा सन १३४४ फसलीचा ॲक्ट नं. १ ( १९३४–३५ ) हिंदुधर्मशास्त्रांतील वारसासंबंधींचा कायदा दुरुस्त करणेबाबतचा. ता. ७-६-१९३४ पासून लागू.

(२९) भोर स्टेटचा सन १३४४ फसलीचा २ रा ( १९३४–३५ ) बालविवाहप्रतिबंधक कायदा, ता. ७-६-१९३४ पासून लागू.

(३०) भोर स्टेटचा सन १३४४ फसलीचा ॲक्ट नं. ३ (१९३४-३५) इंडियन खिश्चन मॅरेज ॲक्ट, सन १८७२ चा १२ वा संस्थानास ता. ७-६-१९३४ पासून लागू.

(३१) भोर स्टेटचा सन १३४४ फसलीचा ॲक्ट नं. ४ (१९३४-३५) इंडियन मॅचेस ॲक्ट, सन १९३४चा १६वा संस्थानास ता. १-१०-१९३४ पासून लागू.

(३२) भोर स्टेटचा सन १३४६ फसलीचा १ला (१९३६-३७) ग्राम पंचायतीचा कायदा, १९३३चा ६वा १५ मार्च १९३०च्या सुधारणासह संस्थानास ता. ७-६-१९३७ पासून लागू.

(३३) भोर स्टेटचा सन १३४६ फसलीचा ॲक्ट नं. २ (१९३६-३७) मुंबईचा वजना-मापाबाबतचा ॲक्ट १९३२चा १५वा, १९३६च्या २२ व्या ॲक्टानें दुरुस्त केलेला, परिशिष्ट व नियमासह संस्थानास ता. १-६-१९३७ पासून लागू.

(३४) भोर स्टेटचा सन १३४८ फसलीचा १ला (१९३८-३९) इंडियन कंपनीज् ॲक्ट १९१३चा १७ वा, १९३७ व १९३८च्या कायद्या-अन्वयें झालेल्या दुरुस्त्यासह ता. १-२-१९३९ पासून लागू.

(३५) भोर स्टेटचा सन १३४८ चा २ रा (१९३८-३९) इंडियन ट्रस्टस् ॲक्ट १८८२चा २रा १९३४च्या १८व्या कायद्यानें १५ सप्टेंबर १९३७ पर्यंत दुरुस्त केलेला, ता. १ फेब्रुवारी १९३९ पासून लागू.

भोर संस्थानात लोकलबोर्डस् १९३२ सालीं स्थापन करण्यात आली. त्यांची घटना कशा प्रकारें करण्यात आली याबद्दल माहिती मागे दिलीच आहे. तालुका लोकलबोर्डांकडे भोर शहर शिवायकरून त्या त्या तालुक्यातील पुढील कामें देण्यात आलीं आहेत. तीं म्हणजे प्राथमिक व दुय्यम मराठी शाळा, दवाखाने, आरोग्य, देवी, स्वच्छता, पाणीपुरवठा, कोंडवाडे, नावा, धर्मशाळा याबद्दलचीं कामें होत. या सर्व कामावर डिस्ट्रिक्ट लोकलबोर्डचे अध्यक्ष या नात्यानें दिवाणांची देखरेख असते. बोर्डांना आपआपल्या तालुक्याचें बजेट करण्याचा अधिकार आहे. बजेटाची तपासणी करून तें मंजूर करण्याचा अधिकार दिवाणांना आहे. बोर्डांचे खर्चाकरिता पुढील बाबींचे उत्पन्न देण्यांत आलें आहे—लोकलफंड, कोंडवाडा फी, शाळातील फीचें उत्पन्न, नावांचें उत्पन्न, मासे धरण्याची लायसेन्स फी, वाळू-दगड-विक्री उत्पन्न, व इतर किरकोळ उत्पन्न.

श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यापासून १७ वर्षांत त्यानी राज्यकारभारपद्धतींत कोणकोणत्या सुधारणा केल्या त्या थोडक्यात सांगितल्या. ज्यात फेरफार करून सुधारणा केल्या नाहींत असें एकहि खातें नाहीं. नवीन कालाला अनुसरून कायदेमंडळ, तालुका लोकलबोर्ड व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल या संस्था निर्माण करून आधुनिक पद्धतीचें नवीन राज्ययंत्र त्यांनीं तयार केले.

श्रीमंत बाबासाहेबांनीं स्वत:चें खासगी उत्पन्न ठराविक ( Moderate privy purse) म्हणजे संस्थानचे उत्पन्नाचे मानानें माफक ठरवून घेतलें. ( असें ठराविक उत्पन्न घेऊनसुद्धा संस्थानच्या प्रजाहिताच्या कामाकरिता मोठमोठ्या रकमा संस्थानचे उत्पन्नावर खर्चाचा फार बोजा पडूं नये म्हणून, आपल्या खासगी खर्चांतून वेळोवेळीं दिलेल्या आहेत. ) श्रीमंत बाबासाहेबानीं आपल्या अनेक भाषणांतून जबाबदारीची शासनपद्धति सुरू करण्याचे आपलें ध्येय असल्याचें जाहीर केलें होतें. त्याप्रमाणें त्याचे हातून अद्याप विशेष कृति झाली नाहीं म्हणून त्याचेवर टीका होत असते. परंतु ही टीका निरर्थक आहे. गादीवर आल्यापासून, प्रजेनें शांतता ठेवावी म्हणजे आमचें ध्येय साध्य करण्याचा आमचा मार्ग सुलभ होईल, असा इषारा श्रीमंत बाबासाहेबानीं प्रजेस व प्रजेच्या पुढाऱ्यांना अनेक वेळां दिला होता. त्यांचे हेतूप्रमाणें न वागतां संस्थानांत विध्वंसक चळवळीस काहीं अत्याचारी पुढाऱ्यांनीं प्रोत्साहन दिलें. याचा परिणाम साहजिकच असा झाला कीं, प्रगतीचे मार्गावर प्रत्येक पाऊल टाकतांना श्रीमंत बाबासाहेबांना फारच दक्षता व सावधगिरी बाळगावी लागली. तालुका लोकलबोर्ड व कायदेमंडळ याना निवडणुकीचें तत्त्व लागू न करण्यास वरील चळवळच कारणीभूत झाली. या चळवळीची साद्यंत हकीगत एका स्वतंत्र प्रकरणांत देण्याचे योजिले आहे. ती पाहिली म्हणजे श्रीमंत बाबासाहेबांनीं ध्येय साधण्याचे कामीं विलंब कां लाविला हें वाचकाचे लक्षात येणार आहे. प्रजेला अधिक अधिकार देण्याचें श्रीमंत बाबासाहेबानीं लाबणीवर कां टाकलें, याचें उत्तर सुधागड तालुका-परिषदेच्या दहाव्या अधिवेशनाचे अध्यक्ष श्रीयुत गहिनीनाथ माधव पानसे, बी.ए., एल्एल्. बी., हायकोर्ट वकील, भोर, याच्या अध्यक्षीय भाषणांत मिळणारें आहे. हें अधिवेशन सुधागड तालुक्यांत पाली येथें ता. २७ डिसेंबर सन १९३६ इ.

चित्रांक ८१
भोर संस्थान तृतीय कायदे-मंडळ ( बैठक सहावी १९३८ )



खुर्चीवर:—१ कॉ. रं. दवडघाव; २ वि. गो. रानडे; ३ न. गो. आंबेकर; ४ कॉ. म. कुमठेकर ( दिवाण व अध्यक्ष ), ५ श्री. राजेसाहेब; ६ म. हे. देव, ( उपाध्यक्ष ); ७ द. रा. मोडक; ८ नगर-भूषण थोपटे; ९ अ. रा. उपाध्ये.
उभी रांग:—१ रं. मा. कानडे ( सेक्रेटरी ); २ डॉ. जोशी; ३ पाठणकर, वकील; ४ के. अ. देशमूख; ५ वि. वि. बावडेकर; ६ वि. प. कान्हेरे; ७ म. त्र्यं. शिंगरे; ८ र. वा. आपटे; ९ वि. र. ठकार; १० द. बा. जोशी; ११ ब. ग. वाळिंबे.

[ सं. पा. ५२१

रोजीं भरलें होतें. श्री. पानसे यानीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत राज्यकार-भारास प्रतिगामी स्वरूप येत असल्याचें दाखविण्याच्या भरात त्यानीं सत्य गोष्ट प्रांजलपणें कबूल केली; ती त्याना लपवून ठेवता येणें शक्यच नव्हतें. प्रजेला जास्त अधिकार देण्यास श्रीमंत बाबासाहेब का कचरतात यासंबंधीं श्री. पानसे आपल्या भाषणात म्हणतात :

" घाटावर (संस्थानातील चार तालुक्यांत) जी चळवळ चालली होती, ती विध्वंसक स्वरूपाची असून विधायक स्वरूपाची नव्हती. त्यामुळें जनतेंत क्षोभ उत्पन्न होऊन अशातता मात्र पसरली व लाभाचे दृष्टीनें प्रजेच्या पदरांत काहीं न पडता राजा व प्रजा यांचे दरम्यान वितुष्ट मात्र वाढलें. हा बहुजन-समाजाचा तोटा झाला. दरबारचा सर्व लोकावरील विश्वास उडाला.

श्रीमंत राजेसाहेब हे अंतःकरणाचे सरळ असून प्रगतिप्रिय व उदार-मनस्क आहेत. दुसऱ्या कौन्सिलच्या वेळींच त्यांनीं लोकप्रतिनिधींना बहुमत दिले. त्यानंतर जबाबदारीचें राज्य देण्याबद्दल आपला संकल्प भोर स्टेट ॲक्ट पास करून जाहीर केला. मग हें औदार्य कां मावळलें अशी शंका उद्भवते. त्यावर एवढेंच उत्तर देतां येण्यासारखें आहे कीं, घातुक स्वरूपाच्या चळवळी-मुळें त्याचें मन बिथरलें असावें. "

जबाबदारीची राज्यपद्धति सुरू करण्याचें लांबणीवर पडत आहे याचा दोष श्रीमंत बाबासाहेबांचेकडे नसून प्रजेकडेच आहे, याजबद्दल वाचकांची खातरी पटविण्यास वरील उतारा पुरेसा आहे.

परिस्थिति प्रतिकूल असतांहि ध्येयावर नजर ठेवून अल्पावधींत सर्व खात्यांत लायक इसमाच्या नेमणुका करून त्याच्यांत शक्य तितकी कार्यक्षमता उत्पन्न केली, व राज्यकारभाराची एकतंत्री पद्धत मोडून तिला प्रातिनिधिक स्वरूप देण्याचा उपक्रम केला, या गोष्टी त्यांच्या प्रगतिपर धोरणाच्या निदर्शक नाहींत असें कोण म्हणेल ? अडचणींतून व अनेक बिकट प्रश्नाना तोंड देऊन त्यांनीं राज्यकारभारास अर्वाचीन पद्धतीचें नवीन वळण लाविले हें त्यानीं मोठेच कार्य केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

राज्यशासनपद्धति सुधारीत असतांना त्यांचें लक्ष प्रजाहिताकडे नव्हतें असें नाहीं. प्रजेच्या हिताकरितां त्यांनीं अनेक कामें केलीं आहेत. तीं यापुढें

क्रमाक्रमाने सांगण्याचें योजिलें आहे. या प्रकरणात राज्यकारभारविषयक तेवढ्याच सुधारणा सांगितल्या आहेत.

## स्थानिक स्वराज्य-संस्था

### भोर म्युनिसिपालिटी

श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर १९२२ इ. च्या ऑक्टोबरमध्यें मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड भोरास आले. त्या वेळीं संस्थानांत बॉम्बे डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल ॲक्ट लागू करून त्याचे हस्तें भोर म्युनिसिपालिटीचा उद्‌घाटनसमारंभ करून संस्थानात प्रथमच स्थानिक स्वराज्य-संस्थाचा उपक्रम केला, ही हकीकत प्रकरण ३ मध्यें येऊन गेली आहेच. यानंतर १९२७ मध्यें ९ तोफांचे वंशपरंपरा सलामीच्या मानाची प्राप्ति संस्थानास झाली. तत्प्रीत्यर्थ भोरचे रहिवाश्याना म्युनिसिपालिटीच्या कार्यसमितीवर १६ सभासदापैकीं ८ सभासद निवडून देण्याचा हक्क दिला. त्याप्रमाणें पहिली निवडणूक १९२८ सालीं झाली, व दुसरी १९३६ मध्यें झाली. अशा प्रकारे निवडणुकीच्या तत्त्वाचा समावेश प्रथम करण्यात आला. १९३२ मध्यें भोर कायदेमंडळावर एक सभासद लोकनियुक्त सभासदापैकीं पाठविणेचा हक्क म्युनिसिपालिटीस श्रीमंत बाबासाहेब यांनीं दिला.

भोर म्युनिसिपालिटीनें सन १९३७ सालीं रु. १०,००० खर्च करून म्युनिसिपालिटीकरिता नवीन भव्य इमारत बांधली आहे. या इमारतीचा उद्‌घाटन-समारंभ ता. ९ डिसेंबर १९३७ रोजीं दक्षिणेंतील संस्थानाचे रेसिडेंट ले.-क. जी. पी. मर्फी यांच्या हस्तें मोठ्या थाटानें झाला.

### शिरवळ नोटिफाइड एरिया कमिटी

१९२७ पावेतों शिरवळ येथें स्थानिक स्वराज्य-संस्था अस्तित्वात आली नव्हती. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर प्रथमच नोटिफाइड एरिया कमिटी १९२७ मध्यें स्थापन केली. ह्या कमिटीवर ७ सरकारी व ६ बिनसरकारी असे १३ सभासद असून त्यापैकीं एक्स-ऑफिशिओ अध्यक्ष तालुक्याचे मामलेदार यांना नेमण्यांत आलें, व त्या कमिटीकडे दिवाबत्ती, आरोग्य, साफसफाई, रोडदुरुस्ती वगैरे कामें सोंपविलीं.

चित्रांक ८२



भोर म्युनिसिपालिटीची इमारत. ही इमारत सन १९३७ इ. साली बांधण्यांत आली.

[सं. पा. ५२८

# पाली नोटिफाइड एरिया कमिटी

भोर संस्थानच्या सुधागड तालुक्याचे ठाण्याचें गाव पाली येथें १९२७ मध्यें ४ सरकारी ऑफिसर व ३ बिनसरकारी अशा ७ सरकारनियुक्त सभासदाचें सॅनिटरी बोर्ड स्थापन केलें व त्याकडे दिवाबत्ती, रस्तादुरुस्ती, साफसफाई, पाणीपुरवठा वगैरे कामें सोंपविण्यात आली.

ता. १ जून १९३८ पासून पाली येथील सॅनिटरी बोर्डाचें रूपातर नोटिफाइड एरिया कमिटींत करण्यांत आले आहे. या कमिटीवर ७ सरकारी व ६ बिन सरकारी असे १३ सभासद असून सरकारी सभासदापैकी एक्स-ऑफीशिओ अध्यक्ष तालुक्याचे मामलेदार याना नेमिले आहे.

श्रीमंत बाबासाहेब यानी गादीवर आल्यावर ज्या लोकहिताच्या सुधारणा केल्या त्यात प्रामुख्यानें वरील सुधारणाचा समावेश होतो. वरील सर्व संस्थाना त्याचें उत्पन्न अपुरे असल्यामुळे खर्च भागावा म्हणून दरसाल स्टेटकडून अनुक्रमें रु. ३०००, रु. ५०० व रु. ५०० अशा देणग्या देण्यात येत असतात.

भोर म्युनिसिपालिटीस सुरवातीचीं काहीं वर्षे श्रीमंत बाबासाहेब यानी रु. ५००० ग्रँट दिली. पुढें काहीं वर्षे ४००० रु. प्रमाणें ग्रँट म्हणून देण्यांत आले व हल्लीं वर उल्लेख केल्याप्रमाणे रु. ३००० दरसाल ग्रँट देण्यांत येत असते.

भोर म्युनिसिपालिटीस भोर येथें विजेच्या दिव्याची सोय करण्यात आल्यापासून इलेक्ट्रिक दिव्याचा खर्च व याखेरीज रोगाच्या साथी व इतर आकस्मिक कारणें याकरिता जादा देणगी वर उल्लेखिलेल्या रु. ३,००० खेरीज श्रीमंत बाबासाहेब वेळोवेळीं देत असतात.

भोर येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाल्यापासून तिनें आजपर्यंत ज्या ज्या सुधारणा केल्या त्याचा उल्लेख म्युनिसिपालिटीने मे. रेसिडेंटसाहेब कोल्हापूर याना दिलेल्या मानपत्रात पुढील एका प्रकरणात आला आहे.

---

# प्रकरण ६ वें

# संस्थानांतील रयतेच्या तक्रारींचा निकाल

## १. सभाबंदीचा कायदा रद्द केला

कै. श्रीमंत रावसाहेब यांचे कारकीर्दीत भोर संस्थानात सार्वजनिक सभा भरविण्यास जाहीरनामा काढून बंदी करण्यात आली होती. त्याचे परिणाम त्यांचे कारकीर्दीचे शेवटीं शेवटीं वरील कायदा मोडून ठिकठिकाणीं सभा भरविण्यांत येऊन संस्थानांत चळवळ करण्यास लोकप्रवृत्ति बनविण्यांत झाले, हें मागें आलेंच आहे. सार्वजनिक सभा भरविणें व आपलीं गाऱ्हाणीं असतील तीं जनतेपुढें माडणें हा नागरिकाचा हक्क आहे. त्या हक्कावर वरील अन्याय्य कायद्यामुळे गदा येते, ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेब याचे लक्षात आली होती. गादीवर आल्यावर त्यानीं जमाबंदीच्या फिरतीवर असतांना सुधागड तालुक्यात पाली येथील नागरिकांतर्फें देण्यांत आलेलें मानपत्र स्वीकारून त्यास उत्तरादाखल भाषण केलें, त्या वेळीं सुधागड तालुक्यापुरती सार्वजनिक सभांवरील बंदी उठविली असल्याचें जाहीर केले व त्यानंतर लौकरच पुढें बाकीच्या तालुक्यांत असलेली सभाबंदी उठविली व अशा रीतीनें नागरिकाच्या हक्काची आपणास जाणीव असल्याबद्दल लोकांची खात्री पटविली.

## २. हिरडा

रयतेच्या मालकी नंबरातील हिरडाफळांवर मालकी संस्थानची कीं रयतेची, याबद्दलचा वाद कै. श्रीमंत रावसाहेबांचे कारकीर्दीत चालू होता. या बाबतींत पूर्वी अनेकवार तंटे होऊन पोलिटिकल एजंटपर्यंत तक्रारी गेल्या होत्या. मालकी नंबरांतील हिरडेफळांवर संस्थानचा हक्क संस्थान अस्तित्वांत आल्यापासून असल्याबद्दल दरबारनें लेखी पुरावा पोलिटिकल एजंटकडे सादर केल्यावरून पोलिटिकल एजंटांनीं दरबारतर्फें निकाल दिला होता. तथापि काहीं स्वार्थी पुढाऱ्याच्या प्रोत्साहनानें ही चळवळ मधून मधून डोकें वर काढीत असे.

कै. श्रीमंत रावसाहेबाचे कारकीर्दीपासून सरकारी जंगलांतील व मालकी नंबरातील हिरडेफळाचा लिलाव करण्याची पद्धत होती. रयतेपासून मक्तेदारानें

दर रुपयास १० पायलीप्रमाणें हिरडा घेतला पाहिजे, जास्त घेता कामा नये, अशी लिलांवांत शर्त असे. या पद्धतीप्रमाणें रयतेचें खरोखर नुकसान नव्हतें. कारण लोकांना मालकी नंबरांतील फळांप्रमाणेंच सरकारी जंगलांतीलहि हिरडा गोळा करण्यास परवानगी असे.

ही पद्धत रयतेला नुकसानकारक आहे, असें पुढारी लोक रयतेला भासवीत. ते म्हणत, लिलांवाची पद्धत बंद झाली म्हणजे लोकांना आपला हिरडा बाजारांत नेऊन वाटेल त्या भावानें विकतां येईल. अशी सवलत दिली असती तर लोकाना अर्थातच सरकारी जंगलातील हिरडा गोळा करता आला नसता व त्यामुळें त्याचें नुकसान झालें असतें. खरें हित कशांत आहे हेंच लोकाना कळेना.

जंगल हक्कासंबंधींहि रयतेच्या आणखी कांहीं तक्रारी होत्या. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर त्यांनीं या सर्व प्रश्नाचा निकाल लावण्याचें ठरविलें. सन १९२४ सालीं या सर्व वादग्रस्त प्रश्नांची चौकशी करून रिपोर्ट करण्याकरिता त्यानीं सर्व्हेखात्याची पूर्ण माहिती असलेले ब्रिटिश पेन्शनर रावबहादुर अंजनगावकर याची नेमणूक केली. त्यांनीं गांवोंगावीं हिंडून पूर्ण चौकशी करून रिपोर्ट केला व तो रिपोर्ट पोलिटिकल एजंट याजकडे पाठविल्यावर त्यांनाहि मान्य झाला होता.

या रिपोर्टानें रयतेचें समाधान झाले नाहीं. हक्कांबद्दल पुरावा मागितला असता तो देण्याचें रयतेनें नाकारलें. रयतेजवळ पुरावाच नव्हता, तेव्हां तो देणार कोठून? पुरावा न देतां मालकी नंबरातील हिरडाफळावर आमचाच हक्क असला पाहिजे, लिलांव केला असतां आम्ही लिलांवदारास हिरडा गोळा करूं देणार नाहीं असा लोकांनीं आग्रह चालविला. सन १९२५ सालीं बंडाळी उद्भवून दंगेधोपे होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. कोणत्याहि बिकट प्रश्नाचा निकाल तडजोडीनें व सामोपचारानें लावण्याचें आपलें धोरण श्रीमंत राजेसाहेबांनीं अनेक वेळां बोलून दाखविलें होतें. त्यास अनुसरून त्यांनीं लोकांच्या कांहीं समंजस पुढाऱ्यांची व कांहीं अधिकाऱ्याची एक कमिटी नेमून त्या कमिटीकडे या प्रश्नाचा सलोख्यानें मार्ग काढण्याचें काम सोंपविलें.

कमिटीनें पुष्कळ चर्चा करून श्रीमंत राजेसाहेबांस अशी शिफारस केली कीं, लोकाचा ठिलावाचे पद्धतीस विशेषतः विरोध असल्यामुळें ती पद्धत बंद करावी व मालकी नंबरांतील हिरडेफळांवरील संस्थानच्या हक्काबद्दल दर खंडीस रॉयल्टी म्हणून २ रुपये फी घेऊन सरकारी फॉरेस्टांतील व मालकी नंबरांतील हिरडा जमा करून तो वाटेल तेथें नेऊन विकण्यास लोकांना परवानगी द्यावी. या पद्धतीनें लोकाचें समाधान होऊन सरकारचें उत्पन्नाचेंहि फारसें नुकसान होणार नाहीं. याकरिता ही पद्धत सुरू करण्यास हरकत नाहीं. कमिटींतील सरकारी व बिनसरकारी सभासदांनी ही शिफारस एकमतानें केली होती.

श्रीमंत राजेसाहेबांचा स्वभाव दुराग्रही व हेकेखोर नसल्यामुळे त्यांनी ही शिफारस मान्य केली व सन १९२६ सालापासून खंडीमागें २ रुपये ड्यूटी भरून हिरडा वाटेल त्या ठिकाणीं नेऊन विकण्यास सर्वांना परवानगी देण्यांत आली. अशा रीतीनें या तंट्याचा निकाल लावण्यांत आला. सरकारचें हक्कसंरक्षण होऊन रयतेचें समाधान झालें.

## ३. भाटघर धरणाकरितां नेलेल्या दगडाबद्दल वेळवंड खोऱ्यांतील रयतेची तक्रार

भाटघर धरणाचें नवीन काम सुरू झाल्यानंतर धरणाकरितां लोकाच्या मालकीच्या जमिनींतून कॉंपेन्सेशन न देता दगड काढून नेले होते. लोकाच्या लागवडीच्या जमिनीचें नुकसान झालें होतें. लोकांनीं भाटघर येथील अधिकाऱ्याकडे बऱ्याच तक्रारी केल्या होत्या. परंतु त्याची जेव्हा दाद लागेना तेव्हा त्यांनीं सत्याग्रह करण्याची तयारी चालविली. भाटघरचे कामात अडथळा उत्पन्न होणें हें बरें नव्हे असें पाहून श्रीमंत राजेसाहेबांनीं गादीवर येताच रयतेची बाजू घेऊन त्यांची दाद लावण्याचें ठरविलें, व त्यानींच पुढाकार घेऊन लोकांच्या नुकसानीची चौकशी करून त्यांना कॉंपेन्सेशन देण्याबाबत एक कमिटी नेमण्याची इंग्रज सरकारकडे शिफारस केली. श्रीमंत राजेसाहेबांचे प्रयत्नास यश येऊन त्याचे शिफारशीप्रमाणें भोर दरबारतर्फे १, भाटघर अधिकाऱ्यांतर्फे १, रयतेतर्फे १ अशी तीन इसमांची कमिटी सन १९२३ सालीं म्हणजे श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर एक वर्षाचे आंतच नेमण्यांत आली.

चित्रांक ८३



भोर म्युनिसिपालिटीच्या इमारतीचा उद्घाटनसमारंभ ले.-क. जी. पी. मर्फी, रेसिडेंट कोल्हापूर, यांचे हस्तें ता. ९ डिसेंबर १९३७ रोजीं झाला.
१ श्री. राजेसाहेब; २ ले.-क. जी. पी. मर्फी; ३ मिसेस् मर्फी; ४ मेजर बझलगेट.

[ सं. पा. ५२८

कमिटीनें फार बारकाईनें व काळजीपूर्वक नुकसानीची चौकशी करून लोकांना भरपाई म्हणून बारा हजार रुपयांची रक्कम ठरविली, व ही रक्कम देण्याबद्दल एकमतानें ब्रिटिश सरकारकडे रिपोर्ट केला. ब्रिटिश सरकारनें कमिटीची शिफारस मान्य करून ती रक्कम दिली. श्रीमंत राजेसाहेबांनींच पुढाकार घेतल्यामुळे रयतेला वरील रक्कम मिळाली. यानंतर कोणत्याहि प्रकारें अडचण न येता भाटघर धरणाचें काम अखेरपर्यंत सुरळित चालले होतें.

हिरड्यासंबंधीं व भाटघर येथील कॉंपेन्सेशनसंबंधीं तंट्याचा निकाल लाविल्यानंतर संस्थानचे पोलिटिकल एजंट मि. एफ. जी. एच. अँडरसन यानीं ता. २५ मार्च १९२५ इ. रोजीं भोरास भेट दिली. त्या वेळीं त्यानीं दरबारात जें भाषण केलें त्यांत त्यानीं वरील तंट्यांचा मोठ्या मुत्सद्देगिरीनें व प्रजाहित-दक्षतेनें श्रीमंत राजेसाहेबानीं जो निकाल लाविला त्याबद्दल पुढील प्रशंसापर उद्गार काढिले. ते म्हणाले :

" Shrimant Pant Saheb, I am delighted to see that you have ably settled the Hirda question which caused you much anxiety of late. The way in which you have settled the question testifies to your love for your subjects. One of the leaders of what I may call the opposition party, met me yesterday and remarked that he and his party were thoroughly satisfied with the wise steps you have taken in connection with the hirda trouble including the appointment of a committee to settle the question permanently and I hope there will be no such trouble in future.

Another complicated question is that of the Bhatghar compensation. This question has already been smoothly settled as far as the ryots' loss is concerned. It is true that a few hundreds on this side have suffered in various ways but it must be conceded on the other hand that lakhs of people in the famine districts will be benefitted by the waters of Bhatghar. There is also no doubt that Shrimant Pant Saheb has made great sacrifices in connection with its construction. The demands made by Shrimant Pant Sachiv for the loss of the submerged lands have received due consideration at the hands

of Government and have been, I trust, settled to the satisfaction of all. I trust you will not grudge this loss in consideration of the boon the work has conferred on hundreds and thousands of people who will be insured againt famines."

## ४. भाटघर तलावाच्या दोन बाजूंच्या रस्त्यांसंबंधीं तक्रार

भाटघर तलावाच्या दोन्ही बाजूंचे रस्ते व गाडीवाटा पाण्यात बुडाल्यामुळें तलावाकांठच्या गांवांतील लोकांचे रहदारीचे मार्ग नाहींसे झाले. त्यामुळे लोकांची ही अडचण भोर दरबारला ब्रिटिश सरकारपुढें मांडावी लागली. याहि बाबतींत संस्थान दरबारला बरेच नेटाचे प्रयत्न करावे लागले. शेवटीं इरिगेशन खात्यामार्फत दोन्ही बाजूंच्या रस्त्यांची पाहणी करून लोकांना रहदारीकरिता रस्ता तयार करून देण्यास १९००० रुपयांचें एस्टिमेट तयार करण्यांत आले व तें मंजूर होऊन ब्रिटिश सरकारांतून वेळवंडी नदीच्या उत्तर तीराकडील हर्णस गांवापासून वरचे ( पश्चिम ) भागाचा रस्ता तयार झाला आहे व हर्णस पासून पूर्वेकडील भोर-कापूरवहाळ सडकेला मिळणारा रस्ता तयार होण्यासंबंधींचें काम चालू आहे. ब्रिटिश सरकारकडून तलावाचें काम करण्यांत आलें असल्यामुळें ज्या गाडीवाटा तलावांत बुडून गेल्या त्या नवीन तयार करून देणें हें ब्रिटिश सरकारचेंच वास्तविक काम होतें, त्याप्रमाणें तें काम करण्याचें चालू आहे.

## ५. धरणाच्या पाण्यासंबंधीं हक्क

भाटघर तलावांत जमिनी गेल्या त्याचे मोबदल्यांत दोन गावें देण्यात आलीं. त्यांसंबंधीं संस्थान व ब्रिटिश सरकार यांच्या दरम्यान एक कारारनामा करण्यांत आला. अशा प्रकारचा एक करारनामा १८९७ सालीं पूर्वीचें भाटघर तलावाबाबत संस्थान व ब्रिटिश-सरकार यांचे दरम्यान करण्यांत आला होता व त्या करारनाम्यांत तलावात बोटी-नावा चालविणें, कांठावरील गांवांतील लोकानीं स्वतः पिण्याकरितां तलावाचें पाणी आणणें व गुरांढोरांना पाण्यावर नेणें वगैरे हक्कांबाबत ७ व ८ नंबरचीं दोन कलमें होतीं. वर म्हटल्याप्रमाणें नवीन करार करण्याचे वेळीं हीं दोन्ही कलमें गाळण्याचा ब्रिटिश

सरकारचा उद्देश होता. परंतु हीं कलमें रयतेच्या हिताकरितां असल्यामुळे भोर दरबारनें तीं न गाळण्याबद्दल हेका धरला, व बऱ्याच वाटाघाटीनंतर सरकारनें दरबारचें म्हणणे कबूल करून तीं नवीन करारात कायम ठेवण्यात आलीं आहेत.

## ६. जांभळीचे झाडांबद्दल तंटा

प्रचंडगड तालुक्याची सर्व्हेसेटलमेंट होण्यापूर्वीपासून कांहीं गांवातूनच मालकी नंबरांतील जाभळीच्या झाडावर सरकारची मालकी राखण्यात आली होती. इतर गांवात या झाडावर लोकाचा हक्क आहे. ज्या गावांत हीं झाडें राखून ठेवण्यांत आलीं होतीं त्या गावांतील लोकांना घर पडलें तरी आपल्या शेतातील जांभूळ तोडून घरास घालण्याचा हक्क नाहीं ही स्थिति त्याना फार जाचक वाटे. जाभळींवर आमचा हक्क असावा ही त्यांची फार दिवस मागणी होती. श्रीमंत राजेसाहेबांना ही मागणी न्याय्य वाटून व इतर गावचे लोकाना या झाडांवर हक्क असून काहीं गावचे लोकांना तो नसावा ही विषमता पाहून त्यानीं सदर झाडावरील संस्थानचा हक्क सोडून दिला.

## ७. राजगड तालुक्यांतील बारा गांवांची जंगलसंबंधीं तक्रार

राजगड तालुक्यात राजगड किल्ल्याचे पायथ्यासभोंवतीं १२ गांव आहेत. संस्थानात माजी हिज हायनेस सरकारचे कारकीर्दीत सरकारी फॉरेस्ट राखिलें त्या वेळीं राखीव फॉरेस्टच्या हद्दी वरील १२ गावाचे अगदीं जवळ येऊं लागल्या होत्या. हद्दी अगदीं गावानजीक आल्यामुळे आमची फार गैरसोय होते, अशी या गांवांतील लोकांची फार दिवसांपासून तक्रार होती. या तक्रारीची दाद न लागल्यामुळें पूर्वी दंगेहि झाले होते. रावबहादुर अंजनगावकर यांनीं हीं गावें समक्ष पाहून लोकाच्या तक्रारी ऐकून घेतल्या व लोकांची गैरसोय होत आहे, याकरितां राखीव जंगलांतून कांहीं जमिनी काढून त्या रयतेला देण्यास हरकत नाहीं अशी त्यांनीं शिफारस केली होती.

सन १९२४ सालीं जमाबदीनिमित्त तालुक्यातून हिंडत असताना श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वतः जाऊन वरील बारा गांवांची स्थिति समक्ष पाहिली. तेव्हां फॉरेस्टांतून कांहीं जमिनी काढून त्या रयतेला शेतकीच्या उपयोगाचे दृष्टीनें दिल्या पाहिजेत अशी त्यांची खातरी झाली. लोकांची तक्रार न्याय्य होती हें त्याच्या लक्षांत आलें. राखीव जंगलांतून लोकांच्या जरुरीपुरत्या जमिनी काढून त्या सन १९२५ चे जानेवारींत त्यांना देण्यात आल्या.

## ८. सुधागड तालुक्यांतील मालकी नंबरांतील झाडांबद्दल तक्रार

सुधागड तालुक्यात सन १८८४ इ. सालीं प्रथम सर्व्हे सेटलमेंट झाली त्या वेळी मालकी नंबरांतील १६ प्रकारच्या झाडांवर सरकारी मालकी ठेवण्यांत आली होती. तीं झाडें—१ साग, २ शिसवी, ३ ऐन, ४ चंदन, ५ खैर, ६ हेड, ७ हिरडा, ८ माड, ९ धावडा, १० किंजळ, ११ नानट, १२ बिबला, १३ जाभूळ, १४ भोरप, १५ बाबू, १६ शिकेकाईच्या वेलानें वेष्टिलेलीं झाडें. कोंकणात भाताचे रोपाकरितां जमिनीची भाजकट फार करावी लागते व त्याकरिता टाहाळयांची फार जरूर असते. कोंकणात मुख्य पीक भाताचें. जमिनीची चागली भाजकट केल्याशिवाय रोप पिकत नाहीं. वरील सोळा प्रकारच्या झाडावर रयतेची मालकी नसल्यामुळें टाहाळ मिळण्याची फार पंचाईत पडे. टाहाळ तोडण्याबद्दल सरकारांतून काहीं सवलती मिळत; परंतु त्याकरिता फॉरेस्टखात्यातील अंमलदाराची मनधरणी करावी लागे. यामुळे मालकी नंबरातील झाडावर आमची मालकी असावी अशी माजी हिज हायनेस श्रीमंत रावसाहेबांकडे रयतेची फारा दिवसापासून मागणी होती.

या प्रश्नाचा निकाल लावण्याकरितां श्रीमंत राजेसाहेबानीं आपल्या नेहमींच्या सामोपचाराच्या धोरणास अनुसरून सरकारी व बिनसरकारी सभासदाची एक मिश्र कमिटी नेमिली. या कमिटीनें गावोगांव हिंडून लोकाच्या अडचणी समजावून घेतल्या. वरील १६ प्रकारच्या झाडावर मालकी नसल्यामुळे रयतेच्या तक्रारी चुकीच्या नाहीत, रयतेची गैरसोय होऊन नुकसान होत आहे ही गोष्ट कमिटीचे लक्षात आली. कमिटीनें एकमतानें रिपोर्ट करून अशी शिफारस केली कीं, घाटावरील तालुक्यातील मालकी नंबरांतील हिरड्याचे झाडावरील मालकी प्रश्नाचा अद्याप निकाल लागला नसल्यामुळें तें झाड

बगळून बाकी धावडा, माड, किंजळ, बांबू, नानट, बिबला, जाभूळ, हेड, भोरप व शिकेकाईच्या वेली असलेली झाडें या १० जातींच्या झाडावरील सरकारी हक्क अजिबात सोडून द्यावा व साग, चंदन, शिसवी, ऐन व खैर ही पाच जातींचीं झाडें राखून ठेवून त्यावरील कांहीं हक्क रयतेस द्यावा.

कमिटीच्या शिफारशीप्रमाणें श्रीमंत राजेसाहेबानी १० जातींच्या झाडावरील सर्व हक्क सोडून देण्याचें मान्य केलं, व घाटावरील पद्धतीप्रमाणें साग, शिसवी, ऐन व खैर या झाडाची तिजाई घेऊन त्यांचे तोडीस परवानगी देण्याचें व चंदनाच्या खोडाच्या घेराचे मानानें फी घेऊन त्याचे तोडीस परवानगी देण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें वरील हक्क रयतेस सन १९२७ चे जानेवारीत देण्यात आले. अशा प्रकारे या प्रश्नाचा निकाल लावल्यामुळे रयतेच्या अडचणी व गैरसोयी दूर होऊन प्रजेत संतोप उत्पन्न झाला. वरीलप्रमाणे या प्रश्नाचा निकाल लाविल्यामुळे संस्थानचे उत्पन्नात सालिना रु. ३५०० ची तूट आली. परंतु, त्यामुळें रयतेच्या या फार दिवसाच्या तक्रारींचा निकाल झाल्यामुळें ते संतुष्ट होणार असल्यानें वरील तूट सोसण्याचे श्रीमंत राजेसाहेबानीं उदार अंत:करणानें ठरविले.

सन १९२७ च्या फेब्रुवारी महिन्यात श्रीमंत राजेसाहेब जमाबंदीनिमित्त या तालुक्यांत गेले त्या वेळीं झाडाच्या मालकीहक्कासंबंधाने श्रीमंत राजेसाहेबांनीं जो समाधानकारक निकाल लाविला त्याबद्दल कृतज्ञता दर्शविण्याकरिता सुधागड तालुका-सभेनें श्रीमंत राजेसाहेबास ता. ५ फेब्रुवारी १९२७ इ. रोजीं पुढील मानपत्र दिले. त्यात वरील गोष्टीचा पुढीलप्रमाणे प्रामुख्यानें उल्लेख केला आहे.

"या तालुक्यातील मालकी नंबरातील झाडोऱ्याच्यासंबंधीं प्रजेची मागणी पुष्कळ वर्षें चालू होती, परंतु तिचा निकाल लागत नव्हता. त्या मागणीचा सहानुभूतिपूर्वक विचार करून उत्साहजनक निकाल करण्याचें श्रेय श्रीमंतानी घेतले, याबद्दल श्रीमंतास आम्ही धन्यवाद देत आहोंत. प्रजेच्या ज्या अडचणी व गैरसोई होत्या त्या बऱ्याच अंशानें दूर करून उदार अंत:करणानें प्रजेला महत्त्वाचे हक्क देऊन श्रीमंतांनीं आमच्या आकांक्षाबद्दल जी सहानुभूति व कळकळ दाखविली त्याबद्दल आम्ही कृतज्ञता या मानपत्रद्वारे व्यक्त करीत

आहोंत. श्रीमंतांनीं दिलेली ही देणगी आम्हीं आनंदानें व संतोषानें स्वीकारीत आहोंत.

राज्यारोहणप्रसंगीं श्रीमंतांनीं जीं उदार आश्वासनें दिलीं आहेत तीं हळू-हळू पुरीं करण्याविषयीं श्रीमंतांचे विचार चालू आहेत असें आमच्या निदर्शनास येत आहे व या पवित्र कामीं श्रीमंतांस आम्ही प्रजेनें योग्य साहाय्य करणें व श्रीमंतांच्या शुद्ध हेतूस अनुसरून आस्ते आस्ते सुधारणा घडवून आणणें हें आमचेंहि तितकेंच पवित्र कर्तव्य आहे याची जाणीव आम्हांस आहे."

श्रीमंत राजेसाहेबानीं प्रजेच्या योग्य तक्रारींची दाद लाविल्यामुळें प्रजेंत संतोष उत्पन्न होऊन श्रीमंत राजेसाहेबाबद्दल प्रजेच्या अंतःकरणांत कोणत्या भावना उत्पन्न झाल्या हें दर्शविण्याकरितांच प्रजेनें स्वयंस्फूर्तीने दिलेले हें मानपत्र येथें मुद्दाम दिले आहे. वरील मानपत्रास श्रीमंत राजेसाहेबांनींहि समयोचित उत्तर देऊन तालुका-सभेच्या आत्मीयतेबद्दल सभेचे आभार मानिले.

## ९. संस्थानांतील फॉरेस्ट सेटलमेंट कामाची पूर्तता

सन १८७९ पर्यंत भोर संस्थानांत फॉरेस्टखातें विशेष महत्त्वाचें असें नव्हतें. जें होतें त्यामार्फत फॉरेस्टसंबंधीं किरकोळ चालचलाऊ कामें होत. संस्थानात ब्रिटिश सरकारच्या इरिगेशनखात्यानें भाटघर व खडकवासले येथें धरणें बाधण्याचें ठरविल्यावर धरणांत पावसाचे पाण्याचा भरपूर पुरवठा सतत होण्याकरितां व झाडें तुटलीं गेल्यास गाळ सांचून धरणें भरून जाण्याची भीति असल्यामुळे संस्थानांत जंगल राखण्याची आवश्यकता ब्रिटिश सरकारला भासूं लागली, व संस्थानांत धरणाचे भागांत जंगल राखण्यांत यावे असें सक्तीनें ब्रिटिश सरकारकडून संस्थानचे अधिपति कै. श्रीमंत रावसाहेब याना कळविण्यांत आलें. पंतसचिव घराण्याच्या वरिष्ठ सत्तेस राजनिष्ठ राहण्याच्या पारंपरिक पद्धतीस अनुसरून श्रीमंत रावसाहेब यानीं फॉरेस्टखात्याची जरूर ती सुधारणा करून त्याचेमार्फत फॉरेस्ट सेटलमेंटचें काम संस्थानांतील कांहीं भागाचें केलें. बाकी राहिलेल्या भागाचें सेटलमेंटचें काम श्रीमंत रावसाहेब यांच्या हातून पुरें न झाल्यामुळे त्याच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं त्याच्या व प्रजाजनांमधील विरोध विकोपास जाऊन अराजक चळवळीचा उद्‌भव होण्यांत शेवटीं त्याचें पर्यवसान झालें.

श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यानंतर या चळवळीपासून त्याना प्रथम प्रथम फार त्रास झाला. याची हकीकत पुढें एका प्रकरणात सविस्तर देण्यात आलीच आहे. श्रीमंत बाबासाहेब यानीं प्रजाजनाचीं गाऱ्हाणीं ऐकून घेऊन त्यांच्या म्हणण्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करून दोहों पक्षी वेळेला स्वत: झीज सोसून समाधानकारक निकाल लावण्याचे धोरण ठेविल्यामुळे चळवळीचा बऱ्याच प्रमाणात उपशम होऊन प्रजाजनाना पुष्कळ सवलती लाभल्या. अनेक तक्रारींचा विचार करण्यात त्याच्या कारकीर्दीचीं १४ वर्षे गेलीं. त्यानंतर थोडी स्वस्थता लाभल्यावर फॉरेस्ट सेटलमेन्टचे काम श्रीमंत बाबासाहेब यानी सन १९३६ सालीं हातीं घेतले. त्याकरिता ब्रिटिश हद्दींत हुजूर मामलेदाराचे जागेवर काम केलेल्या, सेटलमेन्टच्या कामाची माहिती असलेल्या एका पेन्शनर अधिकाऱ्याची नेमणूक केली. त्यानीं स्थानिक अधिकाऱ्याच्या माहितीनें शिल्लक राहिलेल्या सर्व गावाची योग्य पाहणी करून सरकारला व प्रजेला दोघानाहि नुकसान येणार नाही अशी काळजी घेऊन सर्व गावाचे सेटलमेन्टचे काम १९३७ सालीं पुरे केले व अशा रीतीने ५०-६० वर्षें भिजत पडलेल्या या प्रश्नाचा समाधानकारकपणें निकाल लागला.

वर सागितल्याप्रमाणें फॉरेस्ट सेटलमेन्टच्या कामाची पूर्तता झाली असताना कांहीं लोकाच्या पुन: तक्रारी उपस्थित झाल्याचें श्रीमंत बाबासाहेबाचे नजरेस आल्यावरून ता. १६ डिसेंबर १९३८ रोजीं षष्ठ्यब्दिपूर्ति-समारंभा-निमित्त केलेल्या घोषणेंत जंगलसबंधीं तक्रारीची चौकशी करण्याकरिता एक सरकारी व बिनसरकारी सभासदांची मिश्र कमिटी नेमणार असल्याचे त्यानीं जाहीर केले असून ती कमिटी लवकरच नेमण्यांत येणार आहे.

लोकाच्या न्याय्य मागण्या असतील तर त्या पुरवून त्याच्या सुखसोई वाढविण्याकडे श्रीमंत राजेसाहेबाचें किती लक्ष असतें हें त्यांनीं रयतेच्या ज्या अनेक तक्रारी, अडचणी व गैरसोयी दूर केल्या त्यावरून स्पष्टपणे कळून येते.

---

## प्रकरण ७ वें

# भोर संस्थानांतील चळवळ

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आले त्या वेळीं संस्थानात चळवळी सुरू असून एकंदर संस्थानचें वातावरण किती क्षुब्ध झालेले होतें, हें मागें सांगण्यात आलेंच आहे. हिरडा, जंगल वगैरे तक्रारींचा निकाल पूर्वींचे कारकीर्दींत न लागल्यामुळें तंट्याचें बीजारोपण त्या कारकीर्दींत झालें. त्या वेळीं मधून मधून चळवळीचें डोकें वर येत असे, परतु तो काल भिन्न असल्यामुळे ताबडतोब ती चळवळ दडपून टाकण्यांत येई. तथापि, मागील कारकीर्दींचे अखेरीस चळवळ जोरांत येऊन संस्थानात असंतोषाग्नि भडकला होता.

या चळवळींचें यथार्थ स्वरूप श्रीमंत राजेसाहेबांचे नजरेसमोर असल्यामुळें गादीवर येताच त्यानीं सभाबंदीचा कायदा रद्द करून जाचक कराची माफी देऊन असंतोष बऱ्याच अंशीं नाहींसा केला. पुढें क्रमाक्रमानें तंट्यांचीं मुळें नाहीशीं करण्याकरिता हिरडा, जंगल वगैरे प्रश्नांचा समाधानकारक रीतीनें निकाल लावला. कोणत्याहि प्रकारच्या तक्रारीची दाद लावून घेण्याकरिता शातता राखून सनदशीर रीतीनें चळवळ करण्यास आमची कधींहि आडकाठी येणार नाहीं, असें श्रीमंत राजेसाहेबानीं अनेकवार बोलून दाखविले होतें व त्याप्रमाणें ते वागतहि होते. श्रीमंत राजेसाहेबाच्या राज्यकारभाराच्या धोरणाचा एकंदर सुपरिणाम होऊन सन १९३० सालापर्यंत संस्थानात शांतता प्रस्थापित झाली होती.

कै. हिज हायनेस श्रीमंत रावसाहेब याच्या कारकीर्दींचे अखेरीस जी चळवळ सुरू झाली होती त्या चळवळया लोकात संस्थानातील रहिवासी रा. शेटे व पोतनीस यानीच प्रामुख्यानें पुढाकार घेतला होता. त्याच्या योग्य तक्रारींची दाद श्रीमंत राजेसाहेबांनीं लावली होती. जोंपर्यंत हे पुढारी सनदशीर मार्गानें कार्य करीत होते तोंपर्यंत, त्यांचे चळवळीमुळें दरबारास जरी बराच त्रास सोसावा लागला तरी त्यांचेबद्दल श्रीमंत राजेसाहेबांचे मनांत मुळींच रोष नव्हता. श्रीमंत राजेसाहेबांनीं जेव्हां कायदेमंडळाची स्थापना केली तेव्हां सर्व सभासद जरी सरकारनियुक्त होते तरी, लोकाचे वतीनें त्यांनीं ज्या

चित्रांक ८४



ता. ५ फेब्रुवारी १९२७ रोजीं पाली येथें सुधागड तालुक्याच्या रयतेनें श्रीमंतांना मानपत्र दिलें त्या वेळचा फोटो.

**उभेः—१ पु. स.** आठवले; ३ अ. रा. जोशी; ४ म. ह. मोडक; ५ श्री. राजेसाहेब; ६ रा. ब. सातभाई; ७ रा. ब. अंजनगांवकर; ९ बापूसाहेब लिमये.

[सं. पा. ५३७

सभासदाची निवड केली तींत रा. शेटे, त्याचे सहकारी व लोकाचे जे इतर आणखी पुढारी होते त्याचेपैकींच सभासद निवडून त्याना नेमण्यात आलें. पहिल्या कायदेमंडळातील बिनसरकारी सभासदाची यादी पाहिली तर तींत रा. शेटे व इतर पुढारी मंडळी याचीं नावें दिसून येतील. " निवडणुकीचा हक्क प्रजेस दिला असता तर जे लोक निवडून आले असते त्याचीच श्रीमंत राजेसाहेबार्नी नेमणूक केली यांत त्याचा दिलदारपणा व दूरदर्शित्व दिसून आल्यावाचून राहणार नाहीं" अशा प्रकारचे श्री. न. चिं.केळकर यानी त्या वेळी उद्गार काढले होते. लोकाच्या पुढाऱ्याना योग्य मान देऊन त्याच्या सहकार्यानें राज्यकारभार चालविण्याचें जें धोरण त्यानीं आरंभींच जाहीर केलें त्या धोरणानेंच ते नेहमी वागतात.

रा. शेटे व त्याचे सहकारी यांचें लोकावर चागलें वजन होतें. सनदशीर मार्गानेंच चालण्याचा आपला हेतू असल्याबद्दल त्यानी अनेक वेळा बोलून दाखविलें होतें. तेव्हा त्यांच्या सहकार्याची चागली मदत होईल अशी श्रीमंत राजेसाहेबाची भावना असल्यामुळेंच त्याची कायदेमंडळात नेमणूक करण्यात आली.

रा. शेटे व त्याचे काहीं सहकारी याची कायदेमंडळात नेमणूक झाल्यावर त्याचें लोकहिताचें खरे स्वरूप बाहेर पडण्यास सुरुवात झाली. राज्यकारभाराची सर्व सूत्रे आपले हातात असलीं पाहिजेत, आपण म्हणू त्याप्रमाणेंच दरबारने वागलें पाहिजे अशा तऱ्हेची भाषा त्याच्या तोंडून मधून मधून ऐकू येत असे असे पुढें समजलें. तथापि, सन १९३० सालापर्यंत त्यांनीं आपलें खरे स्वरूप प्रकट न करिता सनदशीर मार्गानेंच आम्ही चालत आहोंत असें वरकाती भासविण्याचा प्रयत्न चालविला होता. संस्थानात सर्वत्र शातता आहे असें पाहून सन १९३० साली श्रीमंत राजेसाहेबानी विलायतची सफर करण्याचा आपला फार दिवसाचा मनोरथ पूर्ण करण्याचें ठरविलें. त्या वेळीं कायदेमंडळाचे सभासदानीं मुद्दाम सभा भरवून तींत श्रीमंत राजेसाहेबांनीं निर्धास्तपणें आपला हेतु सिद्धीस न्यावा, त्यांचे गैरहजेरींत संस्थानांत सर्वत्र शांतता राखण्यात येईल, अशा तऱ्हेचीं आश्वासनें रा. शेटे व त्याचे सहकारी यानीं दिलीं होतीं. सन १९३० सालचे मे महिन्यांत श्रीमंत राजेसाहेब विलायतच्या प्रवासास

गेले. त्याचे गैरहजेरीचा फायदा घेण्याचें रा. शेटे व पोतनीस यानीं अगोदरच ठरविले असावे, असें त्यांनीं पुढे जी अराजकता उत्पन्न करण्याची चळवळ सुरू केली तीवरून दिसून येतें. रा. शेटे व पोतनीस याचेशिवाय इतर प्रजेच्या सर्व पुढाऱ्यानीं व कायदेमंडळांतील बिनसरकारी सभासदांनीं शाततेचें वातावरण ठेवण्याकडेच लक्ष दिलें होतें.

श्रीमंत राजेसाहेबांनीं फॉरेस्ट शिवायकरून रयतेच्या तंट्याचीं सर्व कारणें त्या वेळेस दूर केलीं असल्यामुळें व फॉरेस्टबद्दलहि चौकशी कमिटी नेमिली असल्यामुळें रा. शेटे व त्यांचे सहकाऱ्याना चळवळ सुरू ठेवण्यास जागा राहिली नव्हती. तेव्हां त्यांनीं ब्राह्मण-ब्राह्मणेतरात तंटा उपस्थित करून सावकारवर्गावर मोहीम सुरू करण्याचें ठरविले व त्या दिशेनें प्रयत्न सुरू झाले. सन १९३० सालीं ब्रिटिश इंडियांत कायदेभंगाची चळवळ सुरू झाली, व प्रभात फेऱ्याचा सुळसुळाट सुरू झाला. या संधीचा फायदा घेऊन संस्थानांतहि दंगल माजविण्याचा प्रयत्न सुरू झाला. याच सालीं ब्रिटिश हद्दींत महाड येथें कायदेभंग केल्यामुळे गोपिनाथपंत पोतनीस याना शिक्षा होऊन ते तुरुंगात गेले. संस्थानांत आपण काहीं केले तरी दरबार आपलें कांहीं करूं शकणार नाहीं, अशी रा. शेटे यांच्या अनुयायाची भावना होती; कारण रा. शेटे हे कायदेमंडळाचे सभासद होते.

संस्थानांतील हिरडस मावळ व मोसेंखोरें हे दोन लहान भाग अगदी डोंगराळ असून त्यांतल्या त्यांत मोसेंखोरे हा भाग तर अगदीं एका बाजूला आहे. त्या भागात दळणवळणाचीं साधने कमी. सर्व वस्ती मावळे लोकांची. हे लोक जात्या गरीब व अगदीं अशिक्षित, परंतु भावनावश असून कोणीं काहींहि गोष्ट सागितली तर त्यांत आपलें खरे हित आहे कीं नाहीं याचा विचार न करतां त्याच्या नादीं लागणारे आहेत. सर्वच लोक अशा वृत्तीचे आहेत असें नाहीं. त्याच्यांतहि कांहीं समंजस व विचारवंत आहेत, पण असे लोक फार थोडे. या दोन भागांशिवाय संस्थानांत इतर कोणत्याहि ठिकाणीं वरील चळवळ्या लोकाची डाळ शिजणारी नव्हती. या दोन भागांतच रा. शेटे व त्यांचे सहकारी यांचें प्राबल्य असून त्यांच्या अनुयायांची संख्या बरीच मोठी होती. यामुळे तेथें पुंडावा माजविण्यास त्याना अनुकूल स्थिति होती.

संस्थानांतील मराठा व मावळे लोकांचे खरे पुढारी आम्हीच, त्याचें खरें हित आमच्याशिवाय कोणी करूं शकणार नाहीं, सावकार लोक कुळांना अनीतीनें बुडवितात, त्यांच्या कचाटींतून कुळांना सोडविण्याकरिता व ब्राह्मणांचें वर्चस्व नष्ट करण्याकरितांच आमचा अवतार आहे, वगैरे मोहक शब्दानीं वरील भागांतील गावोंगांवीं अशिक्षित मावळ्यापुढें रा. शेटे व त्याचे सहकारी यांनीं व्याख्यानें देऊन गरीब रयतेची दिशाभूल करण्याचे प्रयत्न सुरू केले. दरबारनें रयतेच्या न्याय्य तक्रारींची दाद लावली असल्यामुळें वरील चळवळ्या लोकांना संस्थानाविरुद्ध चळवळ करण्यास जागा नव्हती. तथापि कोणत्यातरी मार्गानें संस्थानास संकटांत आणून, राज्यकारभार आपण म्हणूं त्याप्रमाणें चालला पाहिजे अशी वरील पुढाऱ्यांची महत्त्वाकाक्षा असल्यामुळे, प्रजेंत असंतोप उत्पन्न करण्याकरिता त्यानीं वरील मार्गाचें अवलंबन केले. त्याचा अनिष्ट परिणाम होऊन पुढील प्रकार घडला.

रोज प्रभातफेऱ्या निघून ब्राह्मणाविरुद्ध, अधिकाऱ्याविरुद्ध व सावकारा-विरुद्ध लोकांना चिथावणी देण्यास सुरुवात झाली.

सन १९३० सालच्या ऑक्टोबरच्या आरंभीं विचित्रगड तालुक्यांतील हिरडस मावळ भागांतील कारी गांवीं एक सावकार आपल्या कुळावर जप्तीचा हुकूम बजाविण्याकरितां भोरचे मुनसफ कोर्टांतील बेलिफास घेऊन गेला असता तेथील लोकांनीं जमाव करून सावकार व बेलिफ यांचे डोळ्यात तिखट फेंकून त्याना बरीच मारहाण केली व नंतर त्यांना नागवे उघडे करून हांकून दिलें. सावकार व बेलिफ आश्रयार्थ शेजारचे गांवीं गेले. भोरास ही बातमी कळल्यावर मॅजिस्ट्रेट पोलिस घेऊन गुन्हेगाराना पकडण्याकरिता कारीस गेले. परंतु ते पळून गेले होते.

या वेळीं श्रीमंत राजेसाहेब विलायतच्या सफरीवर होते. ते या सफरीवर गेल्यानंतरच वरील अत्याचाराच्या चळवळी सुरू झाल्या होत्या. श्रीमत राजेसाहेबांची स्वारी प्रकृतिस्वास्थ्याकरितां विलायतेस गेली असल्यामुळें, त्या वेळचे संस्थानचे दिवाण रावबहादुर अंजनगांवकर यानीं इतर जबाबदार अधिकाऱ्यांचे संमतीनें, श्रीमंत राजेसाहेबाचें मन:स्वास्थ्य बिघडून त्याना चिंता उत्पन्न होईल अशी संस्थानांतील कोणतीहि बातमी कळवावयाची नाहीं व प्रजेंत

जास्त क्षोभ उत्पन्न होईल अशा प्रकारच्या कडक उपायाची योजना न करिता शक्य तितकी शातता राखावयाची असें धोरण ठेविले होतें. प्रभात-फेऱ्या इंग्रजी हद्दींतहि चालू होत्या. तिकडेहि त्याना प्रतिबंध करण्यात येत नव्हता. इंग्रज सरकारहि कायदेभंगाची चळवळ व प्रभात-फेऱ्या बंद करण्यास काय उपाययोजना करावी या विचारातच होतें. संस्थान दरबारनें तेंच धोरण ठेविलें होतें.

श्रीमंत राजेसाहेब विलायतचे सफरीहून ता. २२ ऑक्टोबर सन १९३० रोजीं परत आले. त्या वेळीं त्याना आपल्या गैरहजेरींत संस्थानांत अत्याचारी चळवळ सुरू झाली असल्याचे कळलें. तेव्हा त्याना वाईट वाटले. श्रीमंत राजे-साहेबाची स्वारी नंतर भोरास आली. कारी गावीं अत्याचार केलेल्या गुन्हे-गाराच्या तपासाचे काम चालूच होतें. याच महिन्यात कारी गावचे लोक बाजाराकरिता भोरास आले असता त्यातील दोन इसम गुन्हा करणाऱ्यापैकी असल्याचें ओळखल्यावरून त्यांना पकडण्यांत आलें. रा. शेटे याच्या सहकाऱ्यानीं ही बातमी कारी व आसपासचे गावांतून आपले हस्तक पाठवून कळविली व अधिकारी व नागरिक याचे मनांत दहशत उत्पन्न करून पकडलेल्या दोन इसमांना बेकायदा सोडवून नेण्याकरिता वरील गांवांतील लोकाना भलत्याच भुलथापा देऊन भोरास जमा केले. सुमारे चारपाचशे मावळे जमा झाले. त्यानी वाड्याभोंवतीं गराडा देऊन "पकडलेल्या लोकांना सोडून द्या," अशी मागणी केली. रा. शेटे हे भोरातच बसून चळवळीची सर्व सूत्रे हालवीत होते. वाड्याभोंवती लोक जमा झाल्यानंतर पुण्याहून 'संस्थानी स्वराज्य' पत्राचे संपादक व त्या वेळचे भोर कायदेमंडळाचे सभासद व लोकांचे पुढारी कै. श्री. वामनराव पटवर्धन ह्याना मुद्दाम भोरास श्रीमंतानीं बोलावून घेतले. त्याच्या अगोदर श्रीमंतानीं रा. शेटे याना बोलावून दोन समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. त्या वेळेस रा. शेटे यांनीं श्रीमंतास सागितले कीं, ह्या लोकास सोडून न दिले तर परिणाम भयंकर होईल. त्या वेळीं कै. बापुराव लोहोकरे यानीं शेटे यास खरपूस उत्तर दिलें. सायंकाळचे वेळीं जेव्हां वाड्याभोंवतीं बराच मोठा जमाव जमला, तेव्हा श्रीमंत राजेसाहेबांनीं श्री. वामनराव पटवर्धन यांचेसह वाड्याबाहेर येऊन लोकांना समजावून सांगितलें कीं, तुम्ही आपआपल्या घरीं परत जा, पकडलेल्या इसमाची योग्य चौकशी होईल; निरपराधी ठरल्यास त्यांना सोडून देण्यात येईल;

चित्रांक ८५



**राजा** रघुनाथराव हायस्कूलच्या इमारतीचा उद्घाटनसमारंभ ता. ३-२-१९३७ रोजीं ले.-क. के. ए. जी. इव्हॅन्स-गॉर्डन, रेसिडेंट कोल्हापूर, यांचे हस्तें झाला; त्या वेळीं तेथें घेतलेला फोटो.

[ सं. पा. ५५३

अटकेत असतांना त्यांना कोणत्याहि प्रकारचा त्रास होणार नाही. अशा प्रकारे त्यांची अनेक प्रकारे समजूत घालण्याचा प्रयत्न केला. श्री. पटवर्धन हे जरी संस्थानच्या विरुद्ध टीका करणारे होते तरी ही खेदजनक स्थिति पाहून त्यांनींहि लोकाना अत्याचार न करितां परत जाण्यास सागितलें. परंतु लोक ऐकेनात, वाड्यापुढें धरणें धरून बसले. तेव्हां बिकट प्रसंग आल्यास त्याला तोंड देतां यावे व संस्थानावर दोष येऊं नये म्हणून पोलिटिकल एजंट-कडून पोलिसची मदत मागविण्यांत आली. पोलिटिकल एजंट मि. पेरी यानीं ताबडतोब दुसरे दिवशीं सकाळीं २५ हत्यारबंद पोलिसांची एक पार्टी पाठविली. ब्रिटिश पोलिस येणार अशी वदंता कळतांच ते येण्यापूर्वी लोक वाड्यापुढून निघून गेले होते.

श्रीयुत वामनराव पटवर्धन याना प्रथमपासून संस्थानातील चळवळीबद्दल सहानुभूति होती, परंतु त्यानीं जेव्हा समक्ष भोरच्या वाड्यापुढील अनिष्ट प्रकार पाहिला, तेव्हा चळवळ्या लोकाचा सनदशीर मार्ग सुटून त्यांची वृत्ति अत्याचाराकडे वळली याबद्दल त्याची खातरी होऊन त्यांनीं आपल्या वर्तमान-पत्रात या लोकाच्या वर्तनाच्या निषेधार्थ एक स्फुटहि प्रसिद्ध केले, केसरी-पत्राचे प्रसिद्ध संपादक श्रीयुत तात्यासाहेब केळकर याचाहि भोर प्रजापरि-षदेला पाठिंबा असे. त्यानीहि आपल्या पत्रात पुढील स्फुट प्रसिद्ध केले.

## केसरी पत्रांतील स्फुट

" चळवळीच्या पुढाऱ्यानीं केलेला हा प्रकार सर्वस्वी गैरशिस्त आहे, असें स्पष्ट म्हटल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. संस्थानांतील स्वराज्याचा हेतु जातिविद्वेषक तर नसलाच पाहिजे, पण नेहमींच्या कायद्याचा हेतु अम्मल-बजावणीला व न्यायदानाला विघातकहि असता कामा नये. संस्थानी प्रजेचा पक्ष घेऊन आम्ही संस्थानिकावर त्यांच्या अन्यायाबद्दल प्रखरपणें आघात करावयाला केव्हांहि माघार घेतली नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या सनदशीर चळवळीला हरएक प्रकारें उत्तेजनच देत आलों आहों. पण प्रजा बेताल होऊन अन्याय करूं लागेल तर तिचाहि निषेध कठोरपणानें केल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं. प्रजेनें कायदा हातीं घेणें हें अनिष्ट आहे. अशानें अनवस्था प्रसंग येईल, व स्वराज्याची चळवळ म्हणजे बेबंदशाहीची किंवा अराजकतेची

चळवळ असें तिला स्वरूप येईल. भोर संस्थानातील चळवळीच्या पुढाऱ्यानीं उद्योगशीलता व धैर्य दाखविलें याबद्दल आम्ही पूर्वी त्यांचा तो मोठा गुण घेतला. परंतु, त्या चळवळींत मिळालेल्या यशानें डोळे फिरून लाभलेल्या लोकसत्तेचा जर ते असा दुरुपयोग करतील तर त्याना ही आत्मघातकी बुद्धि सुचली असेंच म्हणावें लागेल.''

वरील अनिष्ट प्रकार घडल्यानंतर पुढें या चळवळीचे पुरस्कर्ते रा. शेटे व त्यांचे सहकारी मिळून ५ जणांवर रीतसर खटले होऊन त्यांना शिक्षा देण्यांत आल्या. त्याचप्रमाणें कारी येथील पकडलेल्या दोन इसमांवर गुन्हा शाबीत होऊन त्यांनाहि शिक्षा झाल्या. शेटे व त्यांचे सहकारी तुरुंगात गेल्यामुळे सुमारे १ वर्ष शांतता होती. पुढें मोसें खोऱ्यांत रा. शेटे यांचे जे अनुयायी होते त्याच्यापैकीं काहींनीं त्या भागात आपल्या पुढाऱ्यांची मुक्तता करण्याकरिता साराबंदीची चळवळ सुरू केली. भोरास सरकारी वाड्यापुढें तो प्रकार घडला त्याच वेळीं पोलिसांची संख्या वाढविण्याची आवश्यकता भासून त्याप्रमाणें ती वाढविण्यांत आली व मोसेंखोऱ्यात आडमाळ येथें प्रथम २८ पोलिसांचें एक ठाणें ठेवण्यांत येऊन सन १९३३ सालीं त्याची संख्या ४० करण्यांत आली.

मोसेंखोरें हा भाग अगदीं एका बाजूला असून चोहों बाजूंनीं डोंगर, दऱ्यांखोऱ्यानीं वेष्टिलेला आहे. पावसाळ्यात नद्या भरल्या म्हणजे त्या भागांत जाणें अत्यंत कठिण आहे. म्हणूनच तेथें नवीन पोलिसठाणे ठेवण्यात आलें. या भागातील पुढाऱ्यांनीं लोकाची अशी समजूत करून दिली होती कीं, मोठ्या जमावानिशीं आपण येथें कांहीं केले तरी अधिकारी विशेषत: पावसाळ्यात तेथें येऊन आपले कांहीं करूं शकणार नाहींत. या पुढाऱ्यांचे चिथावणीवरून लोकानीं बेकायदा जंगल तोडण्यास व सरकारी जमिनींत लागण करण्यास सुरुवात केली. एकदां एका इसमानें जेथें पोलिसाचे ठाणें होतें तेथें येऊन त्यांचा दारुगोळा पाणी ओतून खराब केला. सदर इसमास पकडून पोलिस त्यास तालुक्याचे ठिकाणीं नेत असतां लोकांनीं मोठ्या जमावानिशीं येऊन त्यास सोडवून नेलें. या लोकांपैकीं मुख्य बारा पुढाऱ्यांना पकडण्याबद्दल वारंटें देण्यांत आलीं तेव्हां ते पळून गेले. कांहीं काल त्यांचा पत्ता लागेना. त्याबाबत क्रि. प्रो. कोड कलम ८७ प्रमाणें जाहीरनामा

चित्रांक २६



राजा रघुनाथराव हायस्कूल इमारतीचे उद्घाटनानंतर हायस्कूलनजीक घेतलेला फोटो.

खुर्चीची रांग:—१ कॉं. म. कुमठेकर; २ रा. कु. बापूसाहेब; ३ मे. बझलगेट; ४ रेसिडेन्ट ले.-क. इव्हॅन्स-गॉर्डन; ५ श्री. राजेसाहेब; ६ श्री. युवराज; ७ रा. कु. रावसाहेब; ८ रा. कु. पद्मावतीराजे; ९ रा. ब. हुल्याळ.

उभे:—२ गोपूकाका रानडे; ३ वि. प. कान्हेरे; ५ वि. गो. रानडे; ६ वि. के. सामक.

[ सं. पा. ५५३

काढण्यात आला होता. कांहीं दिवसानीं १२पैकी ४ इसमाना पोलिसानी मोठ्या चातुर्यानें पकडले. बाकीचे ८ आपण होऊन स्वाधीन झाले. ह्या १२ इसमांवर खटले होऊन त्यांना शिक्षा देण्यांत आली. त्यानंतर रा. शेटे यांचे परममित्र रा. गोपीनाथपंत यांनीं पुढाकार घेऊन सन १९३३चे अखेरीस या भागांतील लोकांना बेकायदा जंगल तोडण्यास, सारा न देण्यास व कॉंग्रेसच्या असहकारितेच्या चळवळींत सामील होण्यास उपदेश करून अराजकता उत्पन्न करण्याचें सुरू केलें. परंतु रा. पोतनीस याना सन १९३३चे जानेवारींतच पकडण्यात आल्यामुळे ही चळवळ मुळातच नाहींशी झाली. रा. पोतनीस यांचेवर खटला होऊन त्यानाहि शिक्षा झाली.

याप्रमाणें सन १९३० सालीं सुरू झालेल्या चळवळीचा सन १९३३ सालीं पूर्णपणें बींमोड करण्यात आला. या तीन वर्षांचे अवधींत ब्रिटिश हिंदुस्थानातहि कायदेभंगाची चळवळ व प्रभातफेऱ्या बंद करण्याचे कामीं कडक उपायांची योजना करण्यांत येऊन त्या चळवळी दडपून टाकण्यांत आल्या. यामुळेहि संस्थानातील चळवळ्यांना बाहेरचा पाठिंबा मिळण्याचें बंद झाले. सन १९३० सालापर्यंत तडजोडीचें व सामोपचाराचें धोरण ठेविलें होतें व प्रजेच्या तक्रारींची दाद लावून त्याच्या रास्त मागण्या शक्य तितक्या पुरविल्या होत्या. सन १९३० सालीं संस्थानातील चळवळीला जेव्हा अनिष्ट वळण लागलें तेव्हां नुसत्या तडजोडीच्या व सामोपचाराच्या उपायानीं राज्यकारभार सुरळीत चालावयाचा नाहीं ही गोष्ट लक्षांत येऊन, कायदेभंग करून संस्थानांत अराजकता निर्माण करणाऱ्या लोकाचा बंदोबस्त करण्याकरिता श्रीमंत राजेसाहेबानीं पोलिसांची संख्या वाढविण्याचें ठरविलें व पोलिसाची संख्या २२३ होती ती ३०६ करण्यात येऊन नवीन १०० ब्रिजलोड बंदुका खरेदी करण्यात आल्या. पूर्वीचे दिवाण रावबहादुर अंजनगावकर याची सन १९३० सालापर्यंत सामोपचाराचे धोरणानें संस्थानात शातता राखण्याचे कामीं भोर दरबारास जशी बहुमोल मदत झाली, त्याचप्रमाणें त्यांचेमागून आलेले दिवाण रावबहादुर हुल्याळ याची कडक उपाय योजून शातता ठेवण्याचे कामीं मदत झाली.

हल्लीं पोलिसखात्याचा खर्च जवळ जवळ दुपटीनें वाढला आहे. संस्थानांत शांतता राखण्याकरिता हा खर्च वाढविणें भाग पडलें. श्रीमंत राजेसाहेबानीं गादीवर आल्यापासून आपल्या अनेक भाषणातून संस्थानात शातता ठेवण्याबद्दल प्रजेला उपदेश केला. त्यांच्या उपदेशाप्रमाणें जर शांतता राहिली असती तर पोलिसखात्यावर खर्च वाढविण्याचें कारण नव्हतें. तो पैसा शिक्षण, आरोग्य, प्रजेच्या सुखसोयी इत्यादि कामाकडे खर्च करिता आला असता. परंतु काहीं अविचारी, आतताई पुढाऱ्यांच्या गुंडगिरीमुळे संस्थानला हा खर्च करावा लागत आहे.

आतापर्यंत भोर संस्थानातील चळवळीची जी थोडक्यात माहिती दिली तीवरून ही चळवळ श्रीमंत राजेसाहेबाच्या राज्यकारभारांतील दोषामुळें उत्पन्न झालेली नसून तिचीं पाळेंमुळे पूर्वीच्या कारकीर्दीपासून रुजलेलीं होती असें दिसून येईल. तीं नाहींशीं करण्यातच श्रीमंत राजेसाहेबाना बराच त्रास सोसावा लागला. हल्लीं संस्थानात शातता नादत आहे व ती अशीच यापुढे कायम राहावी हीच सर्वांची इच्छा आहे.

यासंबंधानें भोर द्वितीय कायदेमंडळाचे उपाध्यक्ष श्री. चंद्रशेखर गोविंद आगाशे, बी.ए.,एल्एल्.बी., याचे ता. २०–६–१९३३ च्या भाषणातील, व दक्षिणेंतील संस्थानाचे पहिले ए. जी. जी. लेफ्टेनंट-कर्नल एच. विल्बरफोर्स-बेल यानीं ता. १७ ऑगस्ट सन १९३४ रोजीं भोरास भेट दिली त्या वेळीं त्यानीं केलेल्या भाषणातील उतारे विशेष उद्बोधक असल्यानें येथे उद्धृत केले आहेत. ते येणेप्रमाणें:—

## श्री. आगाशे यांचें भाषण

"Ladies and gentlemen, it will not be proper, if I fail to allude here to one more point, the omission of which is likely to create a misunderstanding in the minds of strangers who have not got first-hand knowledge about the State affairs. I believe you may be knowing that unfortunately in recent years the Bhor State has not been quite free from agitation which has occasionally shown a tendency to intimidation and violence. You will, however, be glad to know that this kind of agitation affects only a small corner of the State, while

there is in general peace and order everywhere throughout the rest of the State. I am also delighted to tell you that our kind and humane Ruler has promptly taken adequate measures to check the undesirable agitation with the fullest concurrence and co-operation of the Legislative Council and I have every hope that, by the grace of the Almighty, all lawlessness will soon disappear and complete order will be restored to the great relief and joy of all law-abiding subjects. I am also confident that Shrimant Pant Saheb will have the fullest support of H. E. the Viceroy and your own self in all his efforts to establish tranquillity and rehabilitate confidence in the administration."

## ले.-क. विल्बरफोर्स-बेल यांचें भाषण

"This is scarcely the time for me to refer to the doing of yourself, Chief Saheb, and your State during the past 17 months, during which time we have been co-operating for the mutual welfare of the Bhor State and of the Agency. I have been particularly interested in the steps taken by you to suppress a certain amount of mischievous propaganda which had been circulated in your State. I know you have had certain difficulties to encounter in this connection, and I congratulate you upon the success of your endeavours. Attempts have been made in certain quarters to traduce you and your administration, and I would suggest your treating these subversive efforts with the contempt which they deserve. Let me assure you that interested calumny recoils generally upon its perpetrators."

## प्रकरण ८ वें

# लोकोपयोगी कार्य

## १. शिक्षण

कै. श्रीमंत रावसाहेबांनीं घाटावरील ४ तालुक्यांतील प्राथमिक शिक्षण मोफत केले होतें, परंतु घाटाखालील सुधागड तालुक्यात प्राथमिक शिक्षण मोफत केले नव्हतें. त्या तालुक्यातील प्राथमिक शिक्षण श्रीमंत राजेसाहेबांनी गादीवर येताच मोफत केले व तेव्हापासून प्रजेला प्राथमिक शिक्षण मोफत मिळत आहे. कै. श्रीमंत रावसाहेबाचे कारकीर्दीचे अखेरीस पगाराचे बाबतींत शिक्षकवर्गांत असंतुष्टता पसरली होती. श्रीमंत बाबासाहेबांनीं संस्थानातील सर्वच नोकरलोकाचे पगारात वाढ केली, त्या वेळीं शिक्षकाचेहि पगारात वाढ केली. त्यामुळें त्यांना झटून काम करण्याचा हुरूप आला, व शिक्षणाचे कामांत नवीन जोम उत्पन्न झाला. राज्यकारभाराच्या इतर खात्यातून सुधारणा करण्याकडे श्रीमंत बाबासाहेबानीं जसें लक्ष पुरविले त्याचप्रमाणें लोकोपयोगी कार्याकडेहि त्यानीं दुर्लक्ष केले नाहीं. सर्व प्रजा साक्षर झाल्याशिवाय खरी सुधारणा होणार नाहीं याची त्याना पूर्ण जाणीव असल्यामुळें त्यांनीं प्राथमिक शिक्षण तालुका लोकलबोर्डांकडे दिले. त्यामुळे प्रत्येक तालुक्यातील लोकलबोर्ड उत्पन्नाचे मानाने परिस्थिति व गरजा लक्षात घेऊन प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्याचे कामी शक्य ते प्रयत्न करीत आहे.

### भोर येथील शिक्षणाची सोय

भोर शहरातील हायस्कूल, मराठी व मुलीची शाळा याचा खर्च लोकल फंडातून भागण्यासारखा नसल्यामुळे या शाळाचा खर्च स्टेट-फंडातून होत असून त्या शाळा दरबारचे देखरेखीखालीं आहेत. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यापासून गेल्या १७ वर्षांत भोरातील मुलामुलींची संख्या दुपटीपेक्षा जास्त वाढली आहे. सन १९२२ सालीं हायस्कुलात मुलामुलीची संख्या १८३ होती. ती हल्लीं २५३ असून त्यात मुलींची संख्या ४२ आहे. पूर्वी मुलींचे शाळेत २ शिक्षक असून मुलींची संख्या सुमारे ६० होती व ४ इयत्तापर्यंतच शिक्षण दिले जात असे. हल्लीं मुलींची संख्या सुमारे २००पर्यंत गेली आहे. या शाळेवर

चित्रांक ८७




राजा रघुनाथराव हायस्कूलची इमारत ( ही इमारत सन १९३७ सालीं बांधली ).

[ सं. पा. ५५३

पूर्वी पुरुष शिक्षक असत. त्याचे जागीं स्त्री-शिक्षक नेमण्यास सुरुवात करून हल्लीं त्यांची संख्या ६ आहे. मुलींना शिवणकाम, विणकाम, गायन वगैरेंचें शिक्षण देण्याची सोय करण्यांत आली आहे. मराठी संपूर्ण व्हर्न्याक्युलर फायनल परीक्षेपर्यंत कोर्स शिकविण्याचीहि सोय झाली आहे. मराठी शिक्षण पुरें झाल्यानंतर मुली हायस्कुलात जातात व तेथून कांहीं मुली मॅट्रिक परीक्षेसहि बसतात. स्त्री-शिक्षणाची ही जी झपाट्यानें वाढ झाली तिचें सर्व श्रेय कै. श्री. सौ. लक्ष्मीबाई राणीसाहेबांना आहे. त्याच्या अकालीं निधनामुळे स्त्रीशिक्षणाची फार हानि झाली.

भोर मराठी शाळेंतहि मुलांची संख्या वाढून व्हर्न्याक्युलर फायनल परीक्षेस बसण्याची मुलांची सोय झाली आहे. पूर्वी या शाळेत मराठी ४ थ्या इयत्तेपर्यंतच शिक्षण दिले जात असे. ४ इयत्ता झाल्या म्हणजे अनुकूलता असेल तों मुलें हायस्कुलात जात. ज्यांना इंग्रजी शिक्षण घेण्याचे सामर्थ्य नसे अशा मुलांना शाळा सोडावी लागे. गरीब विद्यार्थ्यांची ही गैरसोय दूर करण्याकरितां ट्रेन्ड शिक्षकांच्या नेमणुका करून मराठी ७ इयत्तापर्यंत शिक्षण मिळण्याची सोय करण्यात आली. यामुळे ज्या मुलाना इंग्रजी शिक्षण घेण्याची ऐपत नाहीं त्यांना व्ह. फा. परीक्षा देऊन चरितार्थ मिळविण्याचा मार्ग मोकळा झाला आहे. हल्लीं शाळेंत मुलाची संख्या ३६७ असून शिक्षक १३ आहेत.

## राजा रघुनाथराव हायस्कूल

'लक्ष्मी ब्रिज' चें काम पुरें झाल्यानंतर दुसरें मोठे खर्चाचें काम म्हणजे 'राजा रघुनाथराव हायस्कूल' हें होय. सरकारी वाड्याजवळची हायस्कूलची इमारत आहे ती मागील कारकीर्दीत ५० वर्षांपूर्वी बांधिली होती. मुलाची संख्या वाढत चालल्यामुळें ही इमारत अपुरी पडूं लागली. शिवाय ही इमारत जुन्या पद्धतीवर बांधली असल्यामुळें ती फार गैरसोयीची होती. नवीन इमारतीची आवश्यकता बरेच दिवस भासत होती. परंतु पुलाचे काम पुरें झाल्याशिवाय नवीन इमारतीचें काम हातीं घेता आलें नाहीं.

पुलाचें काम पुरें झाल्यावर श्रीमंत राजेसाहेबानीं हायस्कूलकरिता नवीन इमारत बांधण्याचें ठरविलें. इमारत कोठे बांधावी याबद्दल वाटाघाट सुरू झाली. शहरात शाळेसारख्या इमारतीस लागणारी प्रशस्त जागा नाहीं. शाळेजवळच

क्रीडांगण असले पाहिजे, असें श्रीमंत राजेसाहेबाचें मत असल्यामुळे त्यांनीं पुलापलीकडील म्हणजे भोलावड्याचे हद्दींत असलेला प्रशस्त माळ पसंत केला व त्या ठिकाणीं इमारत बाधण्याचे ठरविले. कांहीं लोकांचा या जागेस विरोध होता. त्यांचें म्हणणें, शाळा शहरातच असली म्हणजे मुलाना लाब जावे लागणार नाहीं. या त्यांच्या म्हणण्यात काहींच अर्थ नव्हता. कारण पूर्वीच्या शाळेपासून म्हणजे वाडयापासून नवीन इमारतीपर्यंत जाण्यास फक्त दहा मिनिटेंच लागतात. शहरातून नवीन इमारत दोन फर्लांगपेक्षा जास्त लाब नाही. दोन फर्लांगहि चालण्याचे श्रम मुलाना पडू नयेत अशी पालकाची इच्छा. त्याना खुल्या जागेचें व मोकळया हवेचें महत्त्वच कळत नसल्यामुळे त्याची अशी इच्छा असणें स्वाभाविक होतें. परंतु इमारत तयार झाल्यानंतर श्रीमंत राजेसाहेबानी जी जागा पसंत केली तीच योग्य होती असें लोकाना आता वाटत आहे.

इमारतीची जागा पसंत केल्यानंतर श्रीमंत राजेसाहेबांनीं पुण्यांतील बहुतेक हायस्कुलांच्या इमारती स्वतः जाऊन पाहिल्या. नंतर त्यांनीं आपल्या कल्पनेप्रमाणे इमारतीचा नमुना कसा असावा हें स्टेट एंजिनिअर यांना समजावून देऊन प्लॅन एस्टिमेट करण्यास सांगितले. त्याप्रमाणें त्यांनीं प्लॅन एस्टमेट करून तें हुजूर पाठविले. श्रीमंत राजेसाहेबाना प्लॅन पसंत पडला. नंतर या इमारतीचे काम ज्यांनीं पुलाचे काम केले होतें त्यांनाच म्हणजे रानडे कॉन्ट्रॅक्टर याना देण्यात आले.

सन १९३४ च्या डिसेबरात संकेश्वरमठाचे अधिपति जगद्गुरु शिष्य-स्वामी श्रीशंकराचार्य याचें वास्तव्य भोरास होतें. या अमूल्य संधीचा फायदा घेऊन श्रीमंत राजेसाहेबानीं त्याचे हस्तें इमारतीच्या पायाचा उत्खननसमारंभ ता. १० डिसेंबर सन १९३४ रोजीं करून इमारतीचे कामास सुरुवात करून दिली.

दक्षिणेंतील संस्थानचे पहिले ए. जी. जी. ले.-क. एच्. विल्बरफोर्स-बेल हे बदलून गेल्यामुळें त्याचे जागीं लेफ्टेनंट-कर्नल जे. सी. टेट याची नेमणूक झाली होती. त्यानीं प्रथम भोरास भेट दिली, त्या वेळीं त्याचे हस्तें ता. २ जानेवारी सन १९३५ इसवी रोजीं इमारतीची कोणशिला बसविण्याचा समारंभ झाला.

सन १९३६ अखेर इमारतीचें काम पुरें झाले. पहिल्या हायस्कुलातील मामान पुरेसें नसल्यामुळे नवीन जास्त सामान खरेदी करण्यांत आले. नंतर

१९३७ इ. चे फेब्रुवारी महिन्यात नवीन रेसिडेंट लेफ्टेनंट-कर्नल के. ए. जी. इव्हॅन्स-गॉर्डन हे भोरास आले, तेव्हा त्याचे हस्तें ता. ३ फेब्रुवारी रोजी या इमारतीचा उद्‌घाटनसमारंभ मोठ्या थाटानें साजरा करण्यात आला. इमारतीचे काम सुरू झाल्यावर कायदेमंडळाच्या बिनसरकारी सभासदानीं या नवीन होणाऱ्या इमारतीस 'राजा रघुनाथराव हायस्कूल' असें नाव देण्याबद्दल ठराव आणिला होता व तो बिनसरकारी सभासदाच्या एकमताने पास झाला होता. इतर लोकानींहि अशीच इच्छा प्रदर्शित केली होती. यामुळें श्रीमंत राजेसाहेबानी ठरावास मान्यता दिली.

उद्‌घाटनसमारंभ ता. ३ फेब्रुवारी १९३७ रोजी लेफ्टेनंट-कर्नल इव्हॅन्स-गॉर्डन याचे हस्तें झाला. समारंभास श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज भाऊसाहेब, श्रीमंत राजकुमार बापूसाहेब व रावसाहेब, श्रीमंताचे स्नेही दादासाहेब कुमठेकर व भोर येथील प्रमुख नागरिक, प्रतिष्ठित सद्‌गृहस्थ, शेट-सावकार, कायदेमंडळाचे सर्व सभासद वगैरे मंडळी हजर होती. सर्व मंडळी स्वस्थानी विराजमान झाल्यावर प्रथमतः रावबहादुर दिवाणसाहेबानी शाळाधिकारी व कौन्सिलचे सभासद याची रेसिडेंटसाहेबाना ओळख करून दिली. शाळाधिकारी यानीं शिक्षणखात्याचे प्रगतीचा अहवाल वाचून दाखविला. नंतर कायदेमंडळाचे उपाध्यक्ष रा. महादेव हेरंब देव, बी. ए., यानीं श्रीमंत राजेसाहेब याच्या प्रगतिपर राज्यकारभाराचें व विशेषतः शाळाखात्याच्या प्रगतीचें थोडक्यांत सिंहावलोकन करून मे. रेसिडेंटसाहेबाना इमारतीस 'राजा रघुनाथराव हायस्कूल' असें नांव देऊन इमारत खुली करण्याची विनंति केली. त्या विनंतीस अनुसरून ले.-कर्नल इव्हॅन्स-गॉर्डन यानी थोडक्यात भाषण करून इमारतीस 'राजा रघुनाथराव हायस्कूल' असें नाव देऊन इमारत खुली केल्याचें जाहीर केलें. त्यानीं आपल्या भाषणात श्रीमंत राजेसाहेब याच्याबद्दल पुढील गौरवपर उद्गार काढले:—

## रेसिडेंटसाहेब यांचें भाषण

" It has given me great pleasure to come here today to name 'Raja Raghunatharao High School' and declare open this fine new High School Building.

It is clear from what the Superintendent of Education and the Vice-President of the Legislative Council have told us, that the people of Bhor State are fortunate in having for their Raja a Ruler who not only encourages the spread of education but encourages it in the most practical way by providing out of his own pocket a considerable portion of the money required.

That his munificence has borne fruit is apparent from the great increase in the number of students in the last 15 years and from the very satisfactory proportion of successes obtained in the Matriculation Examination last year."

हायस्कूलची इमारत 'लक्ष्मीबाई' ब्रिजजवळ भाटघरहून भोरास येणाऱ्या सडकेच्या कडेला आहे. इमारत दुमजली असून दर्शनी भाग फारच प्रेक्षणीय आहे. इमारतीचे मागें विस्तीर्ण क्रीडांगण तयार करण्यात आलें असून पुढें बगीचा केलेला आहे. इमारत, नवीन सामान, क्रीडागण वगैरे सर्वांस सुमारे १,००,००० रुपये खर्च आला. इतक्या मोठ्या रकमेचा बोजा स्टेट-फंडावर पडूं नये म्हणून व या पवित्र कार्यास खासगींतून कांहीं हातभार लावावा म्हणून श्रीमंत राजेसाहेबानीं आपल्या खासगी उत्पन्नांतून २०,००० रुपये इमारतीचे खर्चाकडे देणगी म्हणून दिले. या त्यांच्या उदार देणगीमुळेंच इमारतीचें काम लवकर झालें.

'लक्ष्मीबाई ब्रिज' व 'राजा रघुनाथराव हायस्कूल' ही दोन्ही कामें प्रेक्षणीय झालीं असून त्यांमुळे भोर शहरास शोभा आली आहे.

हायस्कूलमध्यें विद्यार्थ्यांकडून बारा आण्यांपासून जास्तींत जास्त एक रुपया आठ आणेपर्यंत फी घेण्यात येते.

श्रीमंत राजे बाळासाहेब अधिपति संस्थान मिरज यांनीं १९३७ इ. च्या नोव्हेंबर महिन्यात भोरास आल्यावेळीं राजा रघुनाथराव हायस्कूलमध्ये श्रीशंकराजी नारायण शिष्यवृत्ति ठेवण्याकरितां रु. २६०० ची देणगी दिली. त्यांच्या हेतूप्रमाणें शिष्यवृत्ति ठेवण्याची लवकरच तजवीज करण्यात येणार आहे.

## हायस्कूलच्या विद्यार्थ्यांचीं संमेलनें

श्रीमंत बाबासाहेब गादीवर येण्यापूर्वी भोर हायस्कूलमध्यें विद्यार्थ्यांचें वार्षिक संमेलन भरविण्याची अनेक कारणामुळें पद्धति सुरू नव्हती. परंतु

चित्रांक ८८



विलिंग्डन कॉलेज, सांगली. या कॉलेजला श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. १०,००० ची देणगी दिली. [ सं. पा. ५५७

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यानंतर इतर ठिकाणाप्रमाणें भोर हायस्कुलातहि जुन्या व नव्या विद्यार्थ्यांचें संमेलन भरवावें अशी त्यानीं हायस्कूलच्या हेड-मास्तराना सूचना केली. त्याप्रमाणें वार्षिक संमेलनें भरविण्यात येत असतात. त्यांपैकी ज्या ज्या संमेलनास श्रीमंत राजेसाहेब अध्यक्ष होते तीं पुढें दिलीं आहेत.

## १९२५

भोर हायस्कूलमधील विद्यार्थ्यांनीं १९२५ च्या जूनमध्यें ८ तारखेस हायस्कूलचे संमेलन भरविलें. संमेलनाचे शर्यती, खेळाचे चढाओढीचे सामने, संभाषणें, नाटक वगैरे विविध कार्यक्रम २—३ दिवस चालूच होते. ता. ९ रोजीं श्रीमंताना विनंति केल्यावरून ते स्वत: संमेलनास हजर राहिले. त्याच्या हस्तें चढाओढींत यशस्वी झालेल्या विद्यार्थ्यांना बक्षिसे वाटण्याचा समारंभ झाला. प्रथमत: मुलाची स्वागतपर पद्ये व संभाषणें झाल्यावर हायस्कूलचे हेडमास्तर रा. व्ही. के. सामक यानीं हायस्कूलचा रिपोर्ट वाचून दाखविल्यावर श्रीमंत राजेसाहेबांनीं, निरनिराळ्या खेळात प्रावीण्य दाखविल्याबद्दल, विद्यार्थ्यांचें कौतुक करून उपदेशपर भाषण केलें. यशस्वी विद्यार्थ्यांना बक्षिसें दिल्यावर हा समारंभ समाप्त झाला.

## १९३२

ता. ११ डिसेंबर १९३२ रोजीं भोर हायस्कूलचें संमेलन श्रीमंत राजेसाहेब याचे अध्यक्षतेखालीं झाले. या संमेलनास पुणें येथील सर परशुरामभाऊ कॉलेजचे प्रोफेसर एम्. आर. पराजपे, एम्. ए., बी. एस्सी., याना पाहुणे म्हणून बोलाविण्यात आलें होतें. प्रथमत: श्रीमंत राजेसाहेब यांनीं छोटेंसें भाषण करून वक्त्याची ओळख करून दिल्यावर प्रो. पराजपे यांनीं भाषण केलें. त्यानीं आपल्या भाषणात विद्यार्थ्यांना उपदेश करतांना सागितलें कीं, प्रत्येक विद्यार्थ्यानें आपलें शरीर आरोग्यपूर्ण राखून त्याची योग्य वाढ कशी होईल, स्वभाव चागला कसा बनेल, आपला बौद्धिक विकास कसा होईल याची काळजी घेतली पाहिजे व लोकांनीं प्रतिपादन केलेलीं मतें सर्वच खरीं आहेत असें न समजता, तीं खरीं अगर खोटीं याचा निवाडा करण्याची स्वत:च्या बुद्धीची शक्ति वाढविण्याचा प्रयत्न प्रत्येकानें केला पाहिजे. या आशयाचें उद्‌बोधक व्याख्यान

झाल्यावर हायस्कूलचे हेडमास्तर यांनीं वक्त्यांचे आभार मानले व हा समारंभ आटोपला.

## १९३४

१९३४ सालच्या डिसेंबरमध्यें झालेल्या हायस्कूलचे संमेलनास श्रीमंत राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधि, अधिपति संस्थान औंध, हे आले होते. संमेलनप्रसंगीं श्रीमंत बाळासाहेब यांनीं उपदेशपर भाषण करून विद्यार्थ्यांना बक्षिसें वाटलीं. या संमेलनास श्रीमंत बाबासाहेब हेहि उपस्थित होते.

## १९३८

भोर येथील राजा रघुनाथराव हायस्कूलचें वार्षिक संमेलन श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं मोठ्या थाटानें ता. १३ जानेवारी १९३८ रोजीं पार पाडण्यांत आलें. विद्यार्थ्यांचे कांहीं खेळ, पद्यगायन, संभाषणें वगैरे झाल्यावर विद्यार्थ्यांना श्रीमंत राजेसाहेब याचे हस्तें बक्षिसें वाटण्यांत आलीं. हारतुरे झाल्यावर हा समारंभ आटोपला.

## १९३९

ता. ४ जानेवारी १९३९ रोजीं राजा रघुनाथराव हायस्कूलचें संमेलन श्रीमंत राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं झाले. त्या वेळी श्री. युवराज भाऊसाहेब, दिवाणसाहेब, अधिकारीवर्ग व भोरची प्रमुख मंडळी उपस्थित होती. विद्यार्थ्यांचे खेळ, संभाषणें वगैरे झाल्यावर यशस्वी विद्यार्थ्यांना श्रीमंतानी बक्षिसें वाटलीं.

## भोरखेरीज संस्थानांत इतरत्र शिक्षणाची सोय

भोरखेरीज शिरवळ व पाली येथें मराठी ७ इयत्तांपर्यंत शिक्षणाची सोय असून त्यांतून व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेस विद्यार्थी पाठविण्यात येतात. पाली येथें शाळेस सरकारी इमारत आहे. या शाळेंतील मुलांमुलींची संख्या वाढल्यामुळे जागा अपुरी पडूं लागली. तेव्हां या इमारतीशेजारींच आधुनिक पद्धतीवर एक लहान इमारत बाधण्यात आली. या इमारतीस सुमारे ८००० रु. खर्च आला. याशिवाय एकंदर संस्थानांत ५८ प्राथमिक शाळा आहेत व त्या सर्वांत मुले व मुली मिळून ३०५४ मुले शिक्षणाचा फायदा घेत आहेत. या सर्व शाळातून शिक्षण मोफत देण्यात येतें.

## मोफत उच्च शिक्षणाच्या सोयी

हायस्कुलातील गरीब विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण मिळण्याकरिता श्रीमंत बाबासाहेबांनीं बऱ्याच सोयी करून ठेविल्या आहेत. गादीवर आल्या-नंतर दुसऱ्याच वर्षी त्यानीं डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या वुइलिंग्डन कॉलेजला १०,००० रुपयाची देणगी दिली. त्याचप्रमाणें फर्ग्युसन कॉलेजातील हॉस्टेलकरिता १५०० रुपये दिले. या देणग्यांचे मोबदला म्हणून डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें फर्ग्युसन अगर वुइलिंग्डन कॉलेजांत भोर हायस्कुलातील दरवर्षी ४ विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण देण्याचें मान्य केलें. त्याप्रमाणें सन १९२४ सालापासून भोर हायस्कुलातील दरसाल ४ विद्यार्थी फर्ग्युसन कॉलेजात मोफत शिक्षणाचा फायदा घेत आहेत.

हॉस्टेलकरिता रु. १५०० दिले त्याचा निदर्शक असा प्रस्तर-फलक हॉस्टेलमधील खोली नंबर ३२५ वर लाविला आहे. त्यावरः—

"Donated by Shrimant Raghunathrao Shankarrao alias Babasaheb Pant Sachiv, Chief of Bhor."
अशीं अक्षरे कोरलेलीं आहेत.

## प्रजाजन व गरीब विद्यार्थ्यांकरितां शिष्यवृत्त्या

भोर संस्थानच्या पहिल्या कायदेमंडळाची स्थापना ता. १८ ऑगस्ट मन १९२८ इ. रोजीं श्रीमंत बाबासाहेबानीं केली, त्या वेळीं त्यानीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत संस्थानांतील प्रजाजनापैकीं गरीब व होतकरू विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण संपादन करतां यावे म्हणून त्याना शिष्यवृत्त्या देण्याकरितां खासगींतून रु. २०,००० ची रक्कम निराळी काढून ठेवणार असल्याचें जाहीर केले होतें. त्याप्रमाणें सन १९३० सालीं २०,००० रुपयाच्या प्रॉमिसरी नोटा खरेदी करून त्याच्या व्याजातून दरमहा ७५ रुपयाच्या ४ शिष्यवृत्त्या ठेविल्या. पहिली दरमहा २५ रुपयाची, त्याच्या परमपूज्य मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब याच्या नावची, दुसरी २० रुपयाची त्यांच्या द्वितीय पत्नी कै. श्री. सौ. लक्ष्मीबाईसाहेब याच्या नांवची, तिसरी दरमहा १५ रुपयाची त्यांची कन्या कै. श्री. सौ. काशीताईसाहेब बुध्याळकर यांच्या नांवची, व चौथी दरमहा १५ रुपयाची त्यांचा पुत्र

कै. रामनाथसाहेब याच्या नावची, याप्रमाणें ४ शिष्यवृत्त्या ठेविल्या; व त्या आर्ट कोर्स शिवायकरून दुसरा कोणताहि उच्च कोर्स घेणाऱ्या संस्थानच्या प्रजाजनापैकीं गरीब व होतकरू विद्यार्थ्यांस देण्यांत येत असतात.

सातारा येथील आर्यांग्लवैद्यक विद्यालयाचा वार्षिक बक्षिससमारंभ श्रीमंत राजेसाहेब याच्या हस्तें ता. २३ जून १९२८ रोजीं झाला. त्या वेळीं रु. १०५० च्या दर्शनी किंमतीच्या प्रॉमिसरी नोटा खरेदी करून त्यांचें व्याज दरसाल वरील विद्यालयास देण्याचें श्रीमंतांनीं जाहीर केलें. त्या देणगीप्रीत्यर्थ चालकांनीं भोर संस्थानचा एक विद्यार्थी वरील विद्यालयांत शिक्षणाकरितां घेण्याचें ठरविले.

आर्यवैद्यकास उत्तेजन देण्याकरिता राजवैद्य कै. श्रीधरशास्त्री गोखले यानीं २००० रुपयाची रकम श्रीमंत राजेसाहेबाचे स्वाधीन केली होती. तींत थोडी भर घालून त्या रकमेच्या प्रॉमिसरी नोटा घेऊन त्याचे व्याजातून दरमहा ८ रुपयांची एक शिष्यवृत्ति कै. श्रीधरशास्त्री गोखले वैद्य याचे नांवची ठेविली व ती आर्यवैद्यकाचें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांस देण्यांत येत असते.

## वाचनालयें

शिक्षणप्रसाराचे कामीं शाळांप्रमाणेंच वाचनालयांचाहि उपयोग फार होतो, ही गोष्ट श्रीमंत राजेसाहेबास माहीत असल्यामुळे अशा संस्थाना त्याचे हातून सढळ हातानें मदत देण्यात येते. सार्वजनिक वाचनालयांस मदत देण्याचे नियम करण्यांत आले आहेत. या मदतीचा फायदा पाली येथील सार्वजनिक वाचनालय व शिरवळ येथील वाचनालय या दोन्ही संस्था घेत आहेत.

### कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय

श्रीमंत राजेसाहेब युवराज असतांना त्यांच्याच प्रोत्साहनानें व सक्रिय सहानुभूतीनें वरील संस्था स्थापन झाल्याचें १ ल्या खंडात सागण्यांत आलेच आहे. या संस्थेला स्वतःची इमारत नव्हती. ही उणीव श्रीमंत राजेसाहेबांचे लक्षांत होती. ते गादीवर आल्यावर ही उणीव दूर करण्याचें त्यांनीं ठरविलें व शहराचे मुख्य रस्त्यावर सुंदर इमारत बांधतां यावी म्हणून त्यांनीं २५,००० रुपयांची देणगी दिली. या उदार देणगीमुळें संस्थेच्या चालकांना उमेद येऊन त्यांनींहि या इमारतीकरिता २००० रुपयांची वर्गणी जमा केली. श्रीमंत

चित्रांक ८९



श्री. सौ. गंगुताईसाहेब पंतसचिव वाचनालयाची कोनशिला बसविण्याचा समारंभ मि. जी. डब्ल्यू. हॅच, कमिशनर सी. डी., यांचे हस्तें झाला. [ सं. पा. ५५९

राजेसाहेबांचे देणगीपुढें ही रक्कम कांहींच नव्हती. वाचनाल्याची जी नवीन सुंदर सुशोभित इमारत बांधण्यांत आली आहे ती श्रीमंत राजेसाहेबांनींच बाधून दिली असें म्हणण्यास काहींच हरकत नाहीं. त्यानीं जर येवढी मोठी रक्कम दिली नसती तर संस्थेला अशी इमारत बांधता येणें शक्यच नव्हतें. या इमारतीच्या पायाची कोणशिला त्या वेळचे कमिशनर मि. हॅच यांनीं ता. १८ जानेवारी सन १९२८ इ. रोजीं बसविली. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब याचे भाषणास व सेक्रेटरींनीं वाचून दाखविलेल्या रिपोर्टास उत्तर देतांना ते म्हणाले:—

"It is indeed very gracious of Shrimant Pantsaheb, to invite me to perform the pleasant ceremony of laying the Corner-Stone of the Public Library here today and thus permanently associate my name with it.

I do not really know what I have done for the State to deserve such an honour. But this much is true that I take a special interest in your present Ruler whom I know for about 14 years and more intimately since his accession. It is needless for me to tell you anything about the great utility of institutions like Public Libraries, as there is unanimity about it all over the world.

Many a person in western countries and more especially in America like Mr. Carnegie, who do not know what to do with their superfluous money, spend it in founding free libraries or providing money for them."

या इमारतीचें काम पुण्याचे प्रसिद्ध कॉन्ट्रॅक्टर रानडे याचेकडे दिलें होतें. त्यांनीं ती इमारत ४ महिन्यात बांधून पुरी केली.

मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांनीं भोरास प्रथम १ नोव्हेंबर १९२४ रोजीं भेट दिली होती. त्या त्याच्या भेटीच्या स्मरणार्थ श्रीमंत राजेसाहेब यानी कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब वाचनालयाकरितां देणगी रु. ५००० देण्याचें त्या वेळीं जाहीर केलें होतें. त्यानंतर पुढील ३ वर्षांत पुरेशी रक्कम जमवून वरील वाचनाल्याची इमारत बांधण्यांत आली. त्या इमारतीचा उद्घाटनसमारंभ नेक नामदार सर लेस्ली विल्सन याच्याच हस्तें व्हावा अशी श्रीमंत राजेसाहेब याची

नच्या हिताकरिता विशेष काळजी घेत असल्याचें दिसून आलें होतें. त्याच्याचमुळें नेक नामदार व्हाइसरॉय याना संस्थानचे हद्दींत स्वागत करून त्यांना चहापार्टी देण्याचा भोरसारख्या लहान संस्थानाना न मिळणारा मान प्राप्त झाला. इतकेंच नव्हे, तर केवळ त्याच्याच शिफारशीमुळें भोर संस्थानला वंशपरंपरा ९ तोफांचे सलामीचा अपूर्व मान प्राप्त झाला. वरील महत्त्वाच्या गोष्टींमुळें श्रीमंत राजेसाहेबांना सर लेस्ली याच्याबद्दल आपलेपणा वाटणें साहजिक होतें. त्यामुळें श्रीमंत राजेसाहेबानीं त्याना भोरास येऊन वाचनालयाच्या इमारतीचा उद्‌घाटनसमारंभ करण्याबद्दल विनंति केली व त्यांनींहि कामकाजामुळें त्याना सवड नव्हती तरी एक दिवस भोरास येऊन उद्‌घाटनसमारंभ करण्याचें कबूल केले. महाबळेश्वर येथें नेक नामदारसाहेबाचा मुक्काम असताना ता. ८ मे १९२८ रोजीं ते सदर समारंभाकरिता भोरास आले. त्यांचें भोर येथें श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज, भोरचे पोलिटिकल एजंट मि. ट्यूडरओवेन व अधिकारी यानीं स्वागत केले. दुपारीं २—१५ वाजतां नेक नामदारसाहेब यांना लायब्ररीच्या नवीन इमारतीचे जागीं उद्‌घाटनसमारंभाकरितां आणण्यात आले. तेथें लायब्ररीचे अध्यक्ष रा. ब. अंजनगांवकर, दिवाण संस्थान भोर, यानीं व कार्यकारी समितीचे सभासद यानीं त्याचें स्वागत करून त्याना दरबार-मंडपात नेण्यात आले. तेथें सर्व स्थानापन्न झाल्यावर वाचनालयाचे अध्यक्ष रा. ब. अंजनगावकर यानीं वाचनालयाचा पूर्वेतिहास वाचून दाखविला. अध्यक्षाचे भाषणानंतर श्रीमंत राजेसाहेब यानीं थोडेंसें भाषण करून सदर इमारतीकरिता आणखी रु. ५००० देणगी जाहीर केली व इमारत उघडण्याबद्दल नेक नामदारसाहेबाना विनंति केली. तेव्हा नेक नामदार यानी इमारतीचे दरवाज्याजवळ जाऊन कुलूप उघडून इमारत उघडल्याचे जाहीर केले. सर्व इमारत पाहून परत स्वस्थानी आल्यावर त्यानीं भाषण केले.

## गव्हर्नरसाहेबांचें भाषण

"Chief Saheb, Ladies and Gentlemen,

It has been a great pleasure to me to come here this afternoon and open this very fine library, which has been erected mainly through the great generosity of the Chief himself, aided by the efforts of some of the enlightened people of the

चित्रांक ९०



श्री. सौ. गंगुताईसाहेब पंतसचिव, यांच्या स्मरणार्थ श्रीमंत राजेसाहेबांनीं भोर येथें वाचनालयाची इमारत सन १९२८ सालीं बांधली. [सं. पा. ५६०

State. The building which I have just inspected appears to me to be admirably suited to the purpose for which it is intended, and I have no doubt that it will become a meeting place for those of your citizens who are interested in the spread of literature, and the diffusion of sound learning throughout the State.

The establishment of this Library is but one further example of the many proofs I have seen of your Chief Saheb's solicitude for the welfare of his subjects, and I hope that, with the aid of the very generous additional donation which he has been good enough to announce to-day, in honour of my visit, the Library will soon be completed and ready for use.

The setting up of a Library here makes the beginning of a movement which is sure to spread as its usefulness becomes more apparent to the public. One of the greatest problems of education in India and especially of primary education, is to prevent the wastage that occurs when the pupils give up their schooling and return to their homes, forgetting, in a short time, in too many cases, almost all they have learnt at school. This great waste can only be prevented by the growth of the habit of reading books and papers, and this is impossible unless the necessary literature is brought within the reach of all classes. The provision of libraries even on a small scale, is a work of merit that may be commended to all who have the means to perform it, and I should be glad indeed to see the Chief Saheb's generous example emulated on a wide scale in all parts of the Bombay Presidency.

To the readers who will resort to this Library for their mental improvement or recreation I would offer one word of advice, and that is, not to believe everything because they see it in print and to remember that there are two sides to almost every case. It should never be forgotten that, "a little learning is a dangerous thing", and that the object of all reading should be an intense desire to get at the real truth. If the treasures which this Library contains, and which will, I am sure, be added to in the future, are approached in this spirit

of search after truth, the Library is sure to be, as I, for one, hope it will be, a source of lasting pleasure and profit to the people of Bhor State.

I congratulate you again, Chief Saheb, on this far-sighted and generous effort for the welfare of your subjects, and I wish the President and Managing Committee of the Library all success in their work for the public good, which this handsome building will enable them to carry out in increasing measure."

आपली प्रजा सुशिक्षित व्हावी ही श्रीमंत राजेसाहेबांची इच्छा असल्यामुळें नवीन वाचनालयें सुरू करण्यास त्यांचेकडून प्रोत्साहन देण्यात येतें.

सर लेस्ली विल्सन यांचे मागून आलेले मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यांनीं श्रीमंत राजेसाहेबांचे विनंतीस मान देऊन ता. २३ एप्रिल सन १९२९ रोजीं भोरास पहिली भेट दिली. दुसरे दिवशीं म्हणजे ता. २४ रोजीं वाचनालयाचे इमारतीच्या पहिल्या मजल्यावरील असेंब्ली हॉलमध्यें श्री. सौ. गंगूताईसाहेब यांचे तसबिरीचा अनावरणसमारंभ सर फ्रेडरिक साइक्स यांचे हस्तें झाला. त्या वेळीं वाचनालयाचे सभासदांना व नागरिकांस उद्देशून ते म्हणाले:—

" Shrimant Pant Saheb, Mr. President, Ladies and Gentlemen,

I am very pleased to have been able to-day to perform a ceremony which completes in such an appropriate and graceful manner the Gangutai Saheb Pant Sachiv Library. I have read with much interest the history of this institution, and how it was conceived as fitting memorial to the distinguished lady whose name will always be associated with this building. All those who remember how she herself was a lover of literature and art will be glad that her portrait now adorns this library which is such a valuable addition to the educational facilities of Bhor. I am glad to know that this institution has been so fortunate in securing at the outset a valuable collection of books handed over to it by the Chief Saheb, whose generosity is also so largely responsible for the excellent building in which they are available to the public. I have

चित्रांक ९१



मुंबईचे गव्हर्नर नेक नामदार सर लेस्ली विल्सन यांनीं ता. ८ मे १९२८ रोजीं भोरास भेट दिली, त्या वेळीं घेतलेला फोटो.

खुर्चीवरः—१ ए. डी. सी.; २ कॅ. के. सी. प्रेव्हिट, मि. से.; ३ मि. सी. बी. पूली, एक्झि. एंजि.; ४ ने. ना. सर लेस्ली विल्सन; ५ श्री. राजेसाहेब; ६ मि. डब्ल्यू. सी. ट्यूडर-ओवेन; ७ श्री. युवराजसाहेब; ८ मि. एन्. जी. फ्रॅंक्स.

[ सं. पा. ५६०

been studying the report of your Library and I find that you already have a collection representing most departments of literature I see that a substantial amount was spent in the last year on the purchase of books, and I hope that this will always be so and that the books purchased will be selected with the care they need. For one of the most difficult and at the same time most important tasks falling to the Managing Committee of a library lies in the selection of new books in such a way that students may be able to keep in touch with the best modern thought in each different field. I am sure that with the interest which Shrimant Pant Saheb takes in this institution you will always strive to keep your Library worthy of this building and worthy of the lady whose portrait I have unveiled, so that it may, as far as your resources permit, justify Carlyle's saying that " The true University of these days is a Collection of Books ".

I wish all success to this institution, and I hope it may be a means of preserving and spreading the habits of reading and study among the educated public of Bhor."

## शारीरिक शिक्षण

श्रीमंत राजेसाहेब आपल्या प्रजेच्या बौद्धिक शिक्षणाची जशी काळजी घेतात त्याचप्रमाणें प्रजेच्या शारीरिक शिक्षणाचीहि ते काळजी घेतात. शरीर सुदृढ नसेल तर बौद्धिक शिक्षण व्यर्थ आहे. " शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् " हें तत्त्व ते नेहमीं संधि मिळेल तेव्हां प्रजेच्या मनावर बिंबवीत असतात.

भोर येथें सरकारी तालीम असून तींत शाळेतील विद्यार्थी जोर, जोडी, मलखांब, कुस्ती वगैरे अनेक प्रकारचे तालमींतील व्यायाम करतात. शिकविण्याकरिता एका तालीम-शिक्षकाची स्वतंत्र नेमणूक करण्यांत आली आहे. शहराबाहेर रामबाग ओढ्यानजीक श्रीराम-क्रीडाभुवनावर टेनिस खेळण्याची व्यवस्था केली आहे. माळावरील विस्तीर्ण पटागणावर विद्यार्थी फुटबॉल व क्रिकेट खेळत असत. विद्यार्थ्यांना स्वतंत्र असें क्रीडांगण नव्हतें. हल्लीं शहराचे उत्तरेस पुलापलीकडे हायस्कूलकरितां भव्य इमारत बांधण्यांत येऊन इमारतीचे मागें विस्तीर्ण असें क्रीडागण तयार करण्यांत आले आहे. या इमारतीचें वर्णन

मार्गे देण्यांत आलेच आहे. भोर येथील विद्यार्थ्यांकरिता देशी-विदेशी सर्व प्रकारच्या खेळाची सोय करण्यात आली आहे.

## बालवीर शिक्षण-संस्था

मुंबई इलाख्यात बालवीर शिक्षण-संस्था सुरू करण्याचें ठरल्यानंतर पुण्यास पुणें शहर बालवीर संस्था स्थापन झाली. या संस्थेची उपयुक्तता श्रीमंत राजेसाहेबांना पटली आहे. सदर संस्थेस १९२३ सालीं श्रीमंतानीं ५०० रुपयाची देणगी दिली. पुढें संस्थेच्या चालकांनीं श्रीमंत बाबासाहेबांना त्या संस्थेचे अध्यक्ष निवडले. शाळातून मिळणारें शिक्षण केवळ बौद्धिक असून विद्यार्थ्यांची एकांगी वाढ होते. बालवीर शिक्षण-पद्धति विद्यार्थ्यांची सर्वांगीण वाढ करून त्यांना उत्तम नागरिक बनविणारी असल्याची श्रीमंत राजेसाहेबाची खात्री झाल्यामुळें त्यांनीं तें शिक्षण भोर येथील हायस्कुलातील विद्यार्थ्यांना देण्याचें ठरविलें व सन १९२४ सालीं एका बालवीर शिक्षकाची नेमणूक करून तें शिक्षण सुरू केलें. या कामीं पुण्यांतील प्रो. हर्डीकर व इंग्लंडला जाऊन बालवीर शिक्षणपद्धतीचा अभ्यास करून आलेले मुंबई इलाख्यांतील स्काउट ऑर्गनायझर श्रीयुत डी. पी. जोशी, यानीं निःस्वार्थी बुद्धीनें मदत केली.

मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांनीं भोरास ता. १ नोव्हेंबर सन १९२४ इ. रोजीं पहिली भेट दिली. त्या वेळीं त्यांना बालवीरानीं नाना-प्रकारचे खेळ करून दाखविले. भोरास बालवीर शिक्षण सुरू होऊन थोडेच महिने झाले होते. तथापि, अल्पावधींत बालवीरानीं केलेली प्रगति पाहून गव्हर्नरसाहेब फार खूष झाले. हायस्कुलात त्यांचे हस्तें बक्षिससमारंभ झाला. त्या वेळीं त्यांनीं जें भाषण केलें त्यांत ते म्हणाले:—

"I am pleased to say that the boy scouts are being encouraged by the State, for I feel that this movement under proper guidance can do nothing but good and I consider the smart and alert appearance of the scouts I have just seen outside most satisfactory. I trust that the movement will continue to prosper under the guidance of the Chief Saheb and I greatly appreciate the genuine interest which he has taken in its promotion within the State as well as the liberal assist-

चित्रांक ९२



श्री. सौ. गंगुताईसाहेब पंतसचिव वाचनालय, भोर. ही इमारत सन १९२८ सालीं बांधली.

[ सं. पा. ५६०

ance and the personal help he has rendered to the movement in the Poona District."

सर लेस्ली विल्सन याचे कारकीर्दीत मुंबई इलाख्यांत त्यांच्या प्रोत्साहनामुळे या शिक्षणपद्धतीचा फार जोरानें प्रसार झाला. भोरातहि पांचसहा वर्षें ही चळवळ जोरांत चालू होती. या संस्थेच्या ब्रिटिश हिंदुस्थानातील प्रगतीस स्वयंसेवक-संघासारख्या दुसऱ्या संस्था निर्माण झाल्यामुळें शैथिल्य आलें. त्याचा परिणाम भोर सस्थानातील संस्थेवरहि झाल्यावाचून राहिला नाहीं. सन १९२७ सालचे डिसेंबरांत मुंबईस अखिल भारतवर्षीय बालवीराचा मेळावा भरला होता. या मेळाव्यास श्रीमंत राजेसाहेबांनीं संस्थानचे खर्चानें भोर येथील २० बाल-वीराचें एक पथक व बालवीर शिक्षक पाठविले होते. या बालवीर मेळाव्याची सुरुवात हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यानीं ता. १२ डिसेंबर रोजी मुंबईतील शर्यतीचे मैदानावर करून दिली. त्या समारंभाचे वेळीं श्रीमंत राजेसाहेबहि हजर होते. या मेळाव्याकरितां हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतून सुमारे बारा हजार बालवीर एकत्र जमले होते. त्याचे कार्यक्रम ३।४ दिवस चालू होते. श्रीमंत राजेसाहेबांचा मुक्काम त्या वेळीं सरदारगृहात होता. भोरचे बालवीर ज्या कँपात राहत होते तेथें मुद्दाम मनुष्य पाठवून श्रीमंत राजेसाहेब त्यांची चौकशी करीत व त्यांच्या अडचणी दूर करीत.

## रघुनाथराव स्वयंसेवक-संघ

ब्रिटिश हिंदुस्थानांत तरुण विद्यार्थ्यांना शारीरिक कवाईत वगैरे शिक्षण देऊन त्याच्यामध्यें शिस्त व स्वदेशाभिमान जागृत करण्याच्या उच्च हेतूनें आदर्श ध्येयात्मक अशी राष्ट्रीय स्वयंसेवक-संघ ही संस्था प्रसिद्ध प्रोफेसर डॉ. हेडगेवार यानीं १९३६ सालीं प्रथम सुरू केली. संस्थेचें ध्येय लोकांना पटून ब्रिटिश हिंदुस्थानात गावोगावीं या संस्थेच्या शाखा निर्माण झाल्या. या संस्थेच्या पुणें-शाखेंतील शिक्षण घेतलेले स्वयंसेवक भोरास येऊन त्यांनी तेथील हायस्कुलांतील व गावातील मुलाना शिक्षण देण्यास सुरुवात केली. भोर येथील उत्साही वकील रा. शंकर रंगनाथ जोगदेव यांनीं भोर शाखेचें चालकत्व पत्करिलें आहे. त्यांनीं या संस्थेला मान्यता देण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांना विनंति केली. भोर येथें स्काउट शिक्षण देणारी संस्था श्रीमंत राजेसाहेबानीं

१९२४ सालींच निर्माण केली होती. स्वयंसेवक-संस्थेच्या व स्काउट शिक्षणाच्या ध्येयांत पुष्कळसें साम्य आहे. तथापि हिंदू लोक स्काउटच्या धर्तीवर स्वतंत्र नवीन संस्था स्थापून ते युरोपियनांच्या बरोबरीनें चालवूं शकतात, इतकेच नव्हे, तर संघाच्या शिक्षणाचा प्रसारहि फार झटपट होत आहे हें पाहून व संघानें पुढें ठेविलेले ध्येय फार चांगलें असल्याची खात्री पटल्यामुळें आपलेपणानें रा. जोगदेव यांचे म्हणण्यास श्रीमंतांनीं मान्यता दिली. संघास संस्थानचा भगवा झेंडा दिला व रा. जोगदेव यांच्या विनंतीवरून संघास 'रघुनाथराव स्वयंसेवक-संघ' असें नांव दिलें. नामकरणसमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांचेच हस्तें ता. १२ डिसेंबर १९३७ रोजीं झाला. त्या वेळीं संघांतील स्वयंसेवकाची कवाईत व इतर कामें अत्यंत चांगलीं करून दाखविल्याबद्दल संघचालकांचा श्रीमंत राजेसाहेब यानीं उचित शब्दानीं गौरव केला.

## धार्मिक शिक्षण

बौद्धिक व शारीरिक शिक्षणाप्रमाणेंच विद्यार्थ्यांना धार्मिक व नैतिक शिक्षण मिळणें आवश्यक आहे ही गोष्ट लक्षात घेऊन श्रीमंत राजेसाहेबांनी गादीवर येतांच भोर येथें एका वैदिक शिक्षकाची नेमणूक करून वेदविद्या शिकण्याची सोय केली. संस्थानांतील सर्व प्राथमिक शाळातील अभ्यासक्रमात धार्मिक विषय आवश्यक केला.

## भोर वस्तुसंग्रहालय

भोर संस्थानच्या संग्रहीं अनेक जुनीं नाणीं, ताम्रपत्रें, हत्यारें व इतर अनेक प्रेक्षणीय वस्तू होत्या. परंतु त्या इतस्ततः कोठेंतरी धूळ खात पडलेल्या होत्या. त्यापैकीं काहीं विकत घेतलेल्या होत्या; कांहीं संस्थानाधिपतीना प्रसंगानुरूप नजर म्हणून आलेल्या होत्या व कांहीं संस्थानांत सांपडलेल्या ऐतिहासिक महत्त्वाच्या अशा होत्या. त्या सर्व एकत्र करून व्यवस्थितपणें मांडून राजवाड्यात अजब वस्तुसंग्रहालय बनविल्यास त्यांची नासधूस होणार नाहीं, व भोरला कोणी पाहुणा आल्यास त्यानें भेट देण्यास योग्य अशा स्थानांत आणखी या नवीन स्थळाची भर पडेल ही कल्पना श्रीमंत राजेसाहेबांना येऊन त्यांनीं राजवाड्याच्या पुढचे चौकांतील दक्षिण बाजूचा सोपा वरील वस्तुसंग्रह व्यवस्थितपणें ठेवतां येईल अशा जरूर त्या दुरुस्त्या रु. ४६००

**चित्रांक ९३**



मुंबईचे गव्हर्नर ने. ना. सर लेस्ली **विल्सन यांच्या** भेटीनिमित्त भरविण्यांत आलेला दरबार. या **वेळीं भोर** येथील विद्युत्-उद्घाटनसमारंभ त्यांचे हस्तें झाला.
(८ मे १९२८)

[सं. पा. ५६२

खर्च करून तयार केला. पूर्वी बांधलेली जागा पुरेनाशी झाल्यामुळें शेजारची मोकळी जागा आंत घेऊन इमारत वाढविण्यांत आली आहे. त्यास खर्च रु. २६३० लागला आहे. ह्या दोन्ही रकमा श्रीमंताच्या खाजगींतून खर्च करण्यांत आल्या आहेत. या नवीन बांधलेल्या जागेंत काचेचीं सुंदर कपाटें हारीनें मांडून त्यांतून क्रमवार वरील सर्व वस्तूंची माडणी एका तज्ज्ञाचे देख-रेखीखालीं करविली. या वस्तुसंग्रहावर एक क्युरेटर नेमण्यांत आला असून त्याला कोणीहि पाहुणा अगर अभ्यासू आल्यास हा वस्तुसंग्रह दाखविण्याची पूर्ण परवानगी दिली आहे. या संग्रहाच्या वर्णनाचें एक छोटेखानी माहितीपूर्ण पुस्तक तयार करण्यात आलें आहे. त्याचा पाहुण्यांना फार उपयोग होतो. ह्या संग्रहात बरींच जुन्या काळचीं हत्यारे आहेत, तीं राजवाड्याचे याच चौकात पश्चिम बाजूस लांकडी कपाटांतून प्रेक्षकाचे सहज नजरेस येतील अशा रीतीनें नामाभिधानासह ठेवण्यांत आलीं आहेत. यामुळे राजवाड्याचे वैभवात बरीच भर पडली आहे, यात शंका नाहीं.

या संग्रहास वर्षांतून बाहेरचे अनेक गृहस्थ भेट देतात व संग्रह एकं-दरींत चांगला असल्याबद्दल आपला अभिप्राय व्यक्त करितात. या संग्रहांत दरसाल काहींतरी नवीन भर घालण्याची श्रीमंत राजेसाहेब याची प्रवृत्ति असल्यामुळें हल्लीं हा संग्रह बराच वाढला आहे.

पुणें येथें १९३५ सालीं अखिल भारतीय अर्वाचीन इतिहास-परिषद भरली होती. या परिषदेचे श्रीमंत राजेसाहेब स्वागताध्यक्ष होते. परिषदेच्या दिवसांत ऐतिहासिक वस्तूंचे एक प्रदर्शन चालकांनीं भरविलें होतें. या प्रदर्शनांत भोरच्या वस्तुसंग्रहापैकीं ऐतिहासिक महत्त्वाच्या–जुनीं नाणीं, ताम्रपट, हत्यारें वगैरे–वस्तू भोर संस्थानकरिता एक खास विभाग ठेवण्यात येऊन, त्या व्यवस्थितपणें मांडण्याची व्यवस्था केली होती. या विभागांतील ऐतिहासिक वस्तूंच्या महत्त्वाबद्दल वर्णनात्मक लेख तत्कालीन नियतकालिकांतून आले होते. त्यांत ज्ञानप्रकाशाच्या ता. १९ जून १९३५ च्या अंकात पुढील मजकूर होता:

### टिळक स्मारक मंदिर भाग–भोर प्रदर्शन विभाग

दोन ताम्रपट.—ऐतिहासिक प्रदर्शनांत भोर संस्थानचा स्वतंत्र विभाग-हि पाहण्यासारखा आहे. ह्या विभागांत विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या वस्तू

म्हणजे भोर संस्थानांत उपलब्ध झालेले दोन प्राचीन ताम्रपट होत. हा पहिला ताम्रपट शके ७०२ सिद्धार्थ संवत्सर म्हणजे इ. स. ७८० मधील आहे. ह्या ताम्रपटांत नीरासंगमावर राष्ट्रकूट वंशांतील ध्रुवराजानें लघुविंग ( सध्याचें विंग गाव ) कऱ्हाडच्या वासुदेव भट्ट नांवाच्या ब्राह्मणास दान दिल्याचा उल्लेख आहे. ह्या ताम्रपटांत श्रीमालपत्तन ( हल्लींचें शिरवळ ) व लयणगिरी ( शिरवळजवळचीं बौद्ध लेणीं ) असे उल्लेख आहेत; व ताम्रपटाची भाषा संस्कृत असली तरी ती बरीच अशुद्ध आहे. यानंतरचा दुसरा एक ताम्रपट श. १००१ म्हणजे इ. स. १०७९ मधील आहे. ह्यात मागील 'विंग' गावाचे पुन: दानपत्र दिलेलें आढळतें. 'सिरिवलय' व विंग अशा दोन स्थलनामाचा ह्या ताम्रपटात उल्लेख आहे. 'सिरिवलय' हे मागील श्रीमालपत्तन अर्थात् शिरवळ होय, चालुक्य वंशातील खंबदेव याच्या कारकीर्दींत हा ताम्रपट देण्यात आला आहे. या दोन ताम्रपटांवरून महाराष्ट्रातील शिरवळ, कऱ्हाड, विंग हीं गावे किती प्राचीन आहेत आणि या ताम्रपटामधील माहितीमुळें महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात त्याच्याविषयीं कशी भर पडत आहे हें इतिहासज्ञास सागावयास पाहिजे असें नाहीं. अशा प्रकारचे दोन प्राचीन ताम्रपट भोरच्या राजेसाहेबाच्या संग्रहात आहेत हें पाहून इतिहासज्ञास फार कौतुक वाटेल. ह्या ताम्रपटाची माहिती आताच नव्याने प्रसिद्ध होत आहे.

नाणीं:—भोर संस्थानच्या विभागांत सोन्या-रुप्याचीं व ताब्याचीं नाणीं संग्रहित करण्यांत आलीं आहेत. त्यातील बरींच नाणी 'पद्मटंक' अशी संज्ञा ज्याना नाणकशास्त्रज्ञांनीं दिली आहे अशा प्रकारचीं आहेत. मुहम्मद तुघ्लक, दुसरा इब्राहिम अदिलशहा, मुहम्मद अदिलशा व नेपाळ सुरेंद्र विक्रम साहदेव आणि स्वरूपसिंग ( उदयपूर ) वगैरे राजांनीं आपल्या टांकसाळींत पाडलेलीं अशीं अनेक नाणीं या संग्रहात आहेत.

चित्रसंग्रह:—या विभागाचा दुसरा विशेष म्हणजे प्राचीन रंगीत चित्रांचा संग्रह हा होय. या संग्रहात एकंदर ३४ जुनीं चित्रें आहेत. त्यापैकीं १६ खरीं काल्पनिक मनुष्यांचीं व बाकीचीं १८ रागदारीचीं आहेत.

काल्पनिक चित्रांत दिसून येणारी ढब, भावदर्शन आणि रंग चांगला आहे. रागरागिणींच्या चित्रांवर वर्णनपर श्लोक दिलेले आहेत. ह्या संग्रहांत

एक चित्रमय हठयोगाची हस्तलिखित गुंडाळी आहे. हठयोगांतील तात्त्विक वर्णनाला चित्राची जोड दिल्यामुळें विषय समजण्याला जास्त सोईचें झाले आहे.

संस्थानांतील राजगड, तोरणा वगैरे सर्व किल्ल्याचीं तीन-रंगी चित्रे काढविलेलींहि ह्या ठिकाणीं माडण्यात आलीं आहेत.

याशिवाय सती-शीला, वीर-शीला, वगैरे शीला या प्रदर्शनात माडलेल्या आहेत.

संस्थानातील जुनीं निरनिराळ्या प्रकारचीं बजुम, बोथाटी, बाण, साल, माडू, रंजकदाणी, शिंगडा वगैरे ४०।५० शस्त्रास्त्रेंहि पाहण्यासाठीं येथें माडून ठेवण्यात आलीं आहेत. प्राचीन काळी कोणती शस्त्रास्त्रे होती त्याची माहिती हा प्रकार पाहिल्यावर सहज होणार आहे.

याशिवाय प्राचीन रंगीबेरंगी वेलबुट्टीने सजविलेल्या जुन्नरी कागदावर काढलेल्या भागवतादि पोथ्याहि पाहण्यासारख्या आहेत."

## पॅलेस लायब्ररी

भोर वस्तुसंग्रहालयाप्रमाणेंच वाड्याचे पुढील चौकाचे उत्तर बाजूस असलेल्या सोप्याची जरूर ती दुरुस्ती करून १९३६ सालीं श्रीमंत राजेसाहेबानीं नवीन पुस्तकालय बनविले आहे. कै. श्रीमंत रावसाहेब याचे वेळचा हस्तलिखित संस्कृत पोथ्याचा संग्रह बराच मोठा होता. त्यांत कित्येक अत्यंत दुर्मिळ अशीं हस्तलिखितेंहि आहेत. श्रीमंत राजेसाहेबांना निरनिराळ्या विषयावरील उत्कृष्ट ग्रंथ विकत घेऊन ते वाचण्याचा शोक असल्यानें त्याचाहि संग्रह असाच फार मोठा झाला होता. हे दोन्ही संग्रह एकत्र आणून त्याचे एक नमुनेदार पुस्तकालय बनविल्यास सर्व ग्रंथसंग्रह सुरक्षित राहून अभ्यासकांना त्यापासून शक्य तो फायदा घेतां येईल या उच्च हेतूनें प्रेरित होऊन वरील पुस्तकालय श्रीमंत राजेसाहेबानीं तयार केलें. या लायब्ररींत भोर संस्थान-विषयक सर्व प्रकारची ऐतिहासिक माहिती एकत्र मिळावी या हेतूनें एक स्वतंत्र विभाग ठेवलेला असून त्यांत तद्विषयक सर्व पुस्तकें क्रमवार लावण्यांत आलीं आहेत. या इमारतीकरितां रु. ४००० खर्च लागला आहे. ही रक्कम श्रीमंतांचे खाजगींतून खर्च करण्यांत आली आहे. आता सर्व पुस्तके विषयवार लावण्यात आली असून त्याचा वाचकाना फायदा होत आहे. ही

पुस्तकें प्रसिद्ध अमेरिकन, ग्रन्थालय-शास्त्रज्ञ Mr. Melwell Dewey यांच्या पद्धतीस अनुसरून लावण्यांत आलीं आहेत. पुस्तकें लावण्याचे कामीं पुणें येथील फर्ग्यूसन कॉलेजच्या वाडिया लायब्ररीचे अ. लायब्रेरियन मि. आर. एस्. पारखी यांचा फार उपयोग झाला.

श्रीमंत राजेसाहेब फलटण यानीं भोरला ता. २६-४-१९३६ रोजीं भेट दिली. त्या वेळीं त्याना लायब्ररी व म्यूझियम हीं दाखविलीं. ते फलटणला परत गेल्यावर त्यांनीं ता. २७ रोजीं श्रीमंत राजेसाहेबाना आभारप्रदर्शक पत्र पाठविलें. त्यांत लायब्ररी व म्यूझियमबद्दल ते म्हणतात.—

"It gave me and my party highest pleasure to have had this opportunity of personally seeing the various beneficent activities of Your Highness and Darbar. We had also the pleasure to know the fine taste and culture of the Ruling family, from the beautiful Statues at the Palace-gate. There was evidence of it in increasing degree as one saw the interior of the Palace. The Armoury, the Museum and the Library fully illustrate my point."

## २. वैद्यकीय खातें

पूर्वीं संस्थानांत भोर येथेंच फक्त एक दवाखाना होता. श्रीमंत राजेसाहेब युवराज असतांना शिरवळ तालुक्याचा कारभार चालवीत होते त्या वेळीं सन १९१५ सालीं त्यांच्याच प्रयत्नामुळें शिरवळ येथें एक दवाखाना सुरू करण्यात आला. श्रीमंत राजेसाहेब गादीवर येईपर्यंत संस्थानात भोर व शिरवळ या दोन ठिकाणींच दवाखाने होते. इतर ४ तालुक्यात रयतेला औषधोपचाराची सोय नव्हती.

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यानंतर त्यांनीं रयतेच्या आरोग्यरक्षणाकडे प्रथम लक्ष दिलें. पहिल्याच सालीं त्यांनीं सुधागड तालुक्यात पाली येथें दवाखाना सुरू केला. नंतर श्रीमंत राजेसाहेबांनीं क्रमाक्रमानें राजगड, प्रचंडगड, व पौनमावळ या तालुक्यांत तालुक्याचे ठाण्यांचे ठिकाणीं म्हणजे नसरापूर, वेलें व कोळवण येथें दवाखाने सुरू करून सर्व संस्थानांत प्रजेला औषधोपचार मिळण्याची सोय केली. प्लेग, कॉलरा, वगैरे सांथीचे रोग उद्भवले असतां ताबडतोब प्रतिबंधक उपाय योजण्यांत येतात. सर्व दवाखाने

चित्रांक ९४



भोर येथें सन १९२४ सालीं स्काउट संस्था स्थापन करण्यांत आली, त्या वेळीं घेतलेला फोटो. मध्यभागीं श्री. राजेसाहेब आणि श्री. युवराज स्काउटचे पोषाखांत आहेत.

[ सं. पा. ५६४

मोफत आहेत, यामुळें गरिबांची उत्तम सोय झाली आहे. श्रीमंत राजेसाहेबाची आर्यवैद्यकावर श्रद्धा असल्यामुळे व विलायती औषधापेक्षा देशी औषधें घेण्याकडे बऱ्याच लोकांची प्रवृत्ति असल्यामुळे काहीं दवाखान्यावर आर्य-वैद्यकाचा शास्त्रोक्त अभ्यास करून परीक्षा पास झालेल्या इसमाच्या नेमणुका करण्यांत आल्या आहेत. यामुळें आर्यवैद्यकाला उत्तेजन मिळून ज्याना विलायती औषधें नकोत त्याची सोय झाली आहे. प्रजेच्या आरोग्याकडे श्रीमंत राजेसाहेबांचें नेहमीं लक्ष असतें. संस्थानचा उत्कर्ष व भरभराट हीं प्रजेचे आरोग्य व शिक्षण यावर अवलंबून आहेत असें ते नेहमीं म्हणत असतात. एखाद्या ठिकाणीं एखादी सांथ उद्‌भवल्याची बातमी कळताच त्याचें मन अस्वस्थ होऊन साथीचा ताबडतोब प्रतिबंध करण्याबद्दल हुकूम देण्यात येतात. या कामीं कितीहि पैसा खर्च करावा लागला तरी ते मागेपुढें पाहत नाहींत.

सन १९२३ सालीं भोर येथें प्लेगची साथ आली होती. त्यानंतर १९३६ मध्ये कॉलऱ्याची सांथ उद्‌भवली. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब ह्याचा मुक्काम पुण्यास होता. तरी दोन्ही साथींच्या वेळीं भोरला श्रीमंत बाबासाहेब दोन वेळा जाऊन आले. या प्रसंगीं औषधोपचाराची कशी काय तजवीज होत होती ती समक्ष पाहून व लोकांना स्वच्छतेनें राहण्याचा उपदेश करून व धीर देऊन कांहीं औषधाबाबत सूचना देऊन ते परत येत. यामुळे लोकानाहि धीर येऊन साथीबद्दल वाटणारी भीति पुष्कळ अंशीं कमी होई. यावरून दु:ख-पीडितांबद्दल श्रीमंताना किती कळकळ वाटते व त्याचे अंत:करण किती मृदु आहे हें सहज दिसून येतें.

## भोर दवाखान्याचें पंचम जॉर्ज सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटलमध्यें रूपांतर

भोर येथील दवाखान्यांत सन १९३५ पावेतों रोग्यांची दवाखान्यात राहण्याची सोय नव्हती व तशी सोय संस्थानात कोठेच नसल्यामुळे संस्थानच्या रोग्यांना पुणें अगर वाईसारख्या ब्रिटिश हद्दींतील हॉस्पिटलमध्यें जावे लागे. ही गैरसोय दूर व्हावी, आपल्या संस्थानच्या रयतेची सोय व्हावी असें श्रीमंत बाबासाहेबांना फार दिवसांपासून वाटत होतें. सन १९३५ मध्यें हिंदुस्थानचे बादशहा पांचवे जॉर्ज यांचे कारकीर्दीस २५ वर्षें पुरीं झालीं तेव्हां लंडनमध्यें व हिंदुस्थानांत प्रांताच्या मुख्य ठिकाणीं त्याचप्रमाणें संस्थानांतून त्यांच्या

कारकीर्दीचा रौप्यमहोत्सव साजरा करण्यांत आला. ( या समारंभाची हकीकत पुढें सविस्तर देण्यांत आली आहे.) रौप्यमहोत्सवानिमित्त हिंदुस्थानचे त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यानी रौप्यज्युबिली-फंड उभारला. त्या फंडाचा विनियोग आरोग्यरक्षणार्थ काहीं संस्थांकडे करावा अशी बादशहांनीं आपली इच्छा प्रदर्शित केली होती. फंडास जी देणगी प्रांतांकडून अगर संस्थानातून देण्यात येईल त्यातून ७० टक्के रक्कम ज्यांची त्यांस परत करण्यांत येईल व तिचा उपयोग ज्या त्या प्रातानीं अगर संस्थानानीं स्थानिक लोकाच्या आरोग्यार्थ खर्च करण्यात यावा असे बादशहानीं आगाऊच जाहीर केले होतें. ही संधि अनायासेंच मिळाली व श्रीमंत राजेसाहेबांनी त्या संधीचा योग्य उपयोग करून घेतला. व्हाइसरॉयनीं उभारलेल्या फंडास श्रीमंत राजेसाहेबानीं दरबारचे रु. १०००, त्यानीं आपल्या खासगी उत्पन्नातून रु. १००० व संस्थानातील सर्व तालुक्यांतील मिळून रु. ६००० अशी एकंदर ८००० रु. देणगी म्हणून दिली; व त्यातील परत आलेली रक्कम रु. ५६०० चा उपयोग भोर दवाखान्याचें रूपांतर 'पंचम जॉर्ज सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल'-मध्यें करण्यात केला. दवाखान्याचें रूपांतर करण्याचा आपला हेतु आगाऊच व्हाइसरॉयसाहेबांना कळवून त्या गोष्टीस श्रीमंतानी त्याची संमति मिळविली होती.

भोर येथें ता. ६ मे सन १९३५ रोजीं सिल्व्हर ज्युबिली-समारंभ साजरा झाला. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबानीं केलेल्या भाषणात भोर हॉस्पिटलकरितां कायम निधि म्हणून खाजगींतून रु. १०,००० व स्टेट-फंडातून रु. १०,००० अशी देणगी देऊन तिचे व्याजातून हॉस्पिटलचा खर्च करण्याचे ठरविलें असल्याचें जाहीर केलें. हॉस्पिटलचा उद्‌घाटनसमारंभ दक्षिणेतील संस्थानाचे ए. जी. जी. लेफ्टेनंट-कर्नल जे. डी. गॉर्डन याचे हस्तें ता. २४ एप्रिल सन १९३६ इ. रोजीं मोठ्या थाटानें करण्यांत आला. प्रथम श्रीमंत राजेसाहेबाचें स्वागतपर भाषण झाल्यावर दरबार-सर्जन डॉ. बी. एस्. जोशी, एम्. बी. बी. एस्., यानीं भोर संस्थानांतील मेडिकल खात्याची हें खातें सुरू झाल्यापासून कसकशी प्रगति होत गेली हें सागितले. नंतर त्यांनीं ए. जी. जी. साहेबाना हॉस्पिटलचें उद्‌घाटन करण्याबद्दल विनंति केली. त्या विनंतीप्रमाणे ए. जी. जी.

चित्रांक ९५




किंग जॉर्ज दि फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल, भोर. याचा उद्घाटनसमारंभ ले.-क. जे. गॉर्डन, रेसिडेण्ट कोल्हापूर, यांचे हस्तें ता. २४-४-१९३६ रोजीं झाला.
१ श्री. रावसाहेब; २ श्री. युवराज; ३ कॅ. ग्रीनवे; ४ श्री. राजेसाहेब; ५ ले.-क. जे. गॉर्डन; ६ श्री. बापूसाहेब.

[ सं. पा. ५७२

साहेबांनी हॉस्पिटलचें उद्घाटन करून भाषण केले. त्या वेळीं मे. गॉर्डन-साहेबानीं श्रीमंत राजेसाहेबाच्या औदार्याची व दूरदर्शीपणाची प्रशंसा करून पुढील उद्गार काढले :

## ए. जी. जीं.चें भाषण

" It had been a very real pleasure to hear all that has been done in the State both by the Rajasaheb and the people themselves to alleviate the distress of the poor and the sick.

Now-a-days great progress is being made in the treatment of the many ills to which all humanity is subject, but such progress calls for heavy expenditure, and I am much impressed by the Rajasaheb's notable and generous gifts from his privy purse for the establishment and endowment of this Hospital.

The account we have just heard from the Chief Medical Officer of the growth of the medical services of the State is impressive, and must be a source of satisfaction to you, Rajasaheb, and to all your people.

Finally, Raja Saheb, I would like to congratulate you on what you have achieved and wish again to thank you so much for according me the privilege of performing this ceremony. With your permission I have now much pleasure in naming this Hospital 'The King George V Silver Jubilee Hospital', and trust it will remain for ever to commemorate the name of our late beloved Sovereign, and that those doctors who will be privileged to serve humanity within its walls will strive to emulate his example of service."

ज्याचे नावानें हें हॉस्पिटल सुरू करण्यात आलें ते ही आनंदाची बातमी ऐकण्यास दुर्दैवानें हयात राहिले नाहींत याबद्दल या वेळी प्रत्येकाला दुःख वाटत होतें.

## हॉस्पिटलला देणगी

भोर येथील किंग जॉर्ज दि फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटलला पुणे येथील प्रसिद्ध कॉंट्रॅक्टर व इमारतीच्या लाकडाचे दानशूर व्यापारी व पुणें शहर म्युनिसिपालिटीचे माजी अध्यक्ष मे. शंकरराव नानासाहेब करपे ( भोरचे

व्यवसाय-विभूषण ) यांनीं रु. १००० ची देणगी दिली आहे. त्याचप्रमाणें हॉस्पिटलकरितां शस्त्रक्रियेचीं उपकरणें खरेदी करण्याकरितां भोरचे नागरिक व व्यापारी नगरशेट रामदास किसनदास यांनीं रु. ५०० दिले आहेत.

## क्षयरोगनिवारणास मदत

हिंदुस्थानचे बादशहा सहावे जॉर्ज यांचा राज्यारोहणसमारंभ मे १९३७ मध्यें झाला. त्याचे स्मरणार्थ बादशहाच्या संमतीनें हिंदुस्थानातील क्षयरोगाचे निवारणार्थ हिंदुस्थानचे हल्लींचे व्हाइसरॉय याच्या पत्नी मार्चिऑनेस ऑफ लिनलिथगो यांनीं फंड उभारला. या फंडास श्रीमंत राजेसाहेब यानीं रु. ३००० देणगी दिली आहे. संस्थानांतील प्रजाजनांकडून फंडाकरितां वर्गणी गोळा करण्यांत येऊन रु. ११८८ मदत म्हणून पाठविण्यात आले आहेत. क्षयरोगनिवारणार्थ हा जो फंड उभारण्यांत आला आहे त्याला संस्थानातून देण्यांत आलेल्या रु. ४१८८ देणगीपैकीं ५ टक्के रक्कम मध्यवर्ति फंडात ठेवण्यात येऊन बाकीची एकूण रक्कम रु. ४००९ संस्थानास स्थानिक क्षयरोगनिवारणार्थ उपयोग करण्याकरिता परत करण्यांत येणार आहे, असें वरील संस्थेतर्फे प्रसिद्ध करण्यांत आलें आहे.

## वेड्यांच्याकरितां सोय

पूर्वीं संस्थानांतील वेड्याना ब्रिटिश हद्दींतील वेड्यांच्या इस्पितळात पाठवावे लागत असून त्यांचा खर्च संस्थानला द्यावा लागे. ही गैरसोय दूर करण्याकरितां सन १९३३ सालीं भोर संस्थानातील वेड्यांना ठेवण्याकरितां भोर येथील तुरुंगांतच स्वतंत्र व्यवस्था करण्यात आली.

## पोस्ट-मॉर्टेमची सोय

अपघातानें मृत पावलेल्या मनुष्याची तपासणी करण्याकरितां भोर येथें स्वतंत्र अशी जागा तयार करण्यांत आली नव्हती. भोर येथें असलेल्या तुरुंगांतच शवच्छेदनाकरिता एक खोली ठेवली होती. वर्षांतून १०-५ तरी अशा केसेस येतात व तुरुंगांत हें काम करण्यानें घाण होत असे. ती अडचण लक्षात घेऊन नदीचे कांठीं एक शवविच्छेदन-रूम ( Post-mortem room ) बांधून ही गैरसोय दूर करण्यात आली आहे.

**चित्रांक ९६**

**भोर संस्थानचे संग्रहातील प्राचीन हत्यारें**



१ खंजीर ( म्यानासह ); २ मोठा खंजीर; ३ जंबिया; ४, ५, १३ खंजीर; ६ तलवार; ७ अंकुश; ८ मांडू; ९ सवाल; १० गुरुज; ११ ढाल ( कातडी ); १२, १४ दस्तान; १५ कट्यार; १६ तलवार; १७ पट्टा; १८ काठीमधील गुप्ती.

[ सं. पा. ५६७

## संस्थानाबाहेर भोर संस्थानचे प्रजाजनांकरितां सोय

कै. श्रीमंत रावसाहेब यांनीं पुणें येथील किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल या संस्थेस रु. ५०,००० ची उदार देणगी दिली होती. त्या संस्थेच्या चालकानीं विनंति केल्यावरून संस्थेच्या कार्यकारी मंडळावर भोर संस्थानतर्फे एक प्रतिनिधि श्रीमंत राजेसाहेब यानीं नेमला आहे व या संस्थेत भोरच्या प्रजाजनांकरिता मोफत औषधपाण्याची सोय केली आहे. त्याचा फायदा संस्थानचे कित्येक गोरगरीब घेत असतात.

पुणें येथील प्रसिद्ध व्यापारी रा. ब. शेट हणमंतराम रामनाथ यानीं आपल्या पित्याचे स्मरणार्थ पुणें येथें एक हॉस्पिटल काढले. या हॉस्पिटलचे मदतीकरिता श्रीमंत राजेसाहेब यानीं रु. १२,००० ची देणगी दिली. या देणगीप्रीत्यर्थ श्रीमंताच्या मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचे नावें एक वॉर्ड ठेवण्यांत आला असून २ कॉट्स ठेवण्यात आल्या आहेत व भोरच्या कोणाहि प्रजाजनांकरिता मोफत औषधपाण्याची व बाळंतपणाची सोय करण्यात आली आहे.

प्रजेच्या आरोग्याकरिता संस्थानच्या उत्पन्नाच्या मानानें श्रीमंत राजेसाहेब शक्य तितकी काळजी घेत असतात.

## ३. पब्लिक वर्क्स डिपार्टमेंट

कै. हिज हायनेस श्रीमंत रावसाहेबाचे कारकीर्दींत नवीन सडका तयार झाल्या होत्या. तालुक्याचे ठिकाणीं व भोरास नवीन इमारती बांधण्यात आल्या होत्या. धर्मशाळा, शाळागृहें वगैरे इमारती बांधिल्या होत्या. परंतु रस्ते, इमारती वगैरे दुरुस्तीकरितां वार्षिक खर्च करावा लागतो, तो नियमितपणें न केला गेल्यामुळें सडका व इमारती नादुरुस्त स्थितींत होत्या. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर नवीन कामें हातीं न घेता त्यांना प्रथम दुरुस्तीच्या कामांकडे लक्ष द्यावें लागलें.

### रस्ते

संस्थानांतील सर्व सडकाची लांबी १०४ मैल आहे. इतक्या मैलांची दुरुस्ती एकदम करणें शक्य नव्हतें. म्हणून दरसाल खडी घालून ठराविक मैलांची

दुरुस्ती करण्याचे ठरविण्यात आलें. त्याप्रमाणें गेल्या १७ वर्षांत सर्व सडका उत्तम स्थितींत ठेवण्यात आल्या. यापुढें सडका नादुरुस्त स्थितींत राहूं नयेत म्हणून वार्षिक दुरुस्तीच्या खर्चाची तजवीज करण्यात आली आहे. पूर्वीपेक्षा या खात्यावरील खर्च पुष्कळ वाढला आहे.

सन १९२६ सालीं महाड-पंढरपूर सडकेपैकीं वरंधा घाटांतील जो भाग संस्थानचे ताब्यांत आहे, त्यापैकीं सुमारें ५ मैल रस्ता जोराच्या पर्जन्य-वृष्टीनें वाहून गेला. तो दुरुस्त करण्यास सुमारें २०,००० रुपये खर्च करावे लागले.

### पाली-नागोठणा रोड

पालीपासून नागोठणा सुमारे ६ मैल आहे. ही ६ मैलाची सडक नसल्यामुळें बैलगाड्यानाहि हा रस्ता अत्यंत अडचणीचा व बिकट होता. जागजागीं दरडी, खडक, खडे असल्यामुळे गाडीचें एक चाक आकाशात तर एक पाताळात अशी स्थिति होत असे. गाड्या वरचेवर उलटत. हा ६ मैलाचा रस्ता ब्रिटिश हद्दींत असल्यामुळे संस्थानचा या रस्त्याशीं संबंध नाहीं. तथापि सुधागड तालुक्यांतील लोकाचा नागोठण्याशीं व मुंबईशीं फार संबंध येत असल्यामुळें त्याना याच मार्गानें जावें लागतें. बैलाचे अतोनात हाल होत असत व ही स्थिति श्रीमंत सुधागडास सन १९२२ सालीं राज्यारोहणानंतर गेले होते त्या वेळेस स्वतः पाहिली. हे हाल दूर करण्याकरिता पालींतील काहीं सधन प्रतिष्ठित लोक व ब्रिटिश हद्दीतील काहीं लोक यानीं एक पाली-नागोठणा रोड-कमिटी स्थापन केली. या कमिटीनें कुलाबा डिस्ट्रिक्ट लोकल-बोर्डाचे मदतीनें ही सडक करण्याचें काम हातीं घेतलें. बराचसा रस्ता तयार झाला, पण पुढें पैसा संपल्यामुळें सडकेचें काम अर्धवट सोडून देण्याचा प्रसंग आला. डिस्ट्रिक्ट लोकलबोर्डाजवळ या सडकेवर खर्च करण्यास पैसा नव्हता. काम अर्धवट सोडून द्यावें तर झालेलें कामहि फुकट जाणार असें पाहून पाली-नागोठणा रोड-कमिटीनें डिस्ट्रिक्ट लोकलबोर्डास देण्याकरिता श्रीमंत राजेसाहेबाजवळ २५,००० रुपये कर्जाऊ देण्याबद्दल विनंति केली. श्रीमंत राजेसाहेब यानी कमिटीची अडचण लक्षात घेऊन व रोड तयार झाला असता

**चित्रांक ९७**

**भोर संस्थानचे संग्रहांतील प्राचीन हत्यारें**




१ ऑटोमॅटिक रिव्हॉल्व्हर; २ कुकरी; ३ खंजिरी; ४, ५, ११ खंजीर; ६ ढाल ( पोलादी ); ७ चाकू; ८ विटण्याचें फळ; ९, १० धनुष्य, तीर; १२ बरचीचें फळ; १३ परशु; १४ शिरस्त्राण; १५ तलवार; १६ मांडू· १७ मरी

संस्थानच्या प्रजेचा फायदा होणार आहे असें पाहून तत्काल लोकलबोर्डास देण्याकरिता कमिटीला पांच वर्षांत परतफेडीच्या करारानें २५,००० रुपये बिनव्याजी दिले. वेळेवर ही मदत मिळाल्यामुळें सडकेचे काम ताबडतोब पुरे झालें. या सडकेचा उद्‌घाटनसमारंभ रोड-कमिटीनें श्रीमंत राजेसाहेबांचेच हस्तें ता. २५ डिसेंबर सन १९२४ रोजीं केला. श्रीमंत राजेसाहेबांनीं वेळेवर मदत केली नसती तर सडकेचें काम पुरें झालें असतें कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं.

या रस्त्याचें काम पुरे झाल्यावर त्या रस्त्यावर भोर संस्थानच्या वेळेवर देण्यात आलेल्या मदतीचें कृतज्ञतादर्शक स्मारक म्हणून एक शिलालेख लावण्यात आला आहे. त्याचा अनावरण समारंभ कुलाबा डिस्ट्रिक्ट बोर्डाचे मि. डोंगरे याचे विनंतीवरून श्रीमंत राजेसाहेब याची स्वारी सुधागड तालुक्यात फिरतीवर गेली असताना त्यानीं ता. २३ जानेवारी सन १९३१ रोजीं त्याचे हस्तें केला.

मुठेखिंड रोड

मुठेखिंडीचा एक भाग ब्रिटिश हद्दींत असून एक भाग संस्थानचे हद्दीत आहे. रॉयल बॉंबे सॅपर्स व मायनर्स यांना मुठेखिडीस रस्ता तयार करावयाचा होता. भोर दरबारनें या संधीचा फायदा घेऊन मिलिटरी ऑफिसर्सना संस्थानचे हद्दींतहि रस्ता करण्याची परवानगी देऊन इतर सवलतीहि दिल्या. यामुळें सॅपर्स व मायनर्सनीं सडकेच्या कामास सन १९३२ साली सुरुवात केली. व दरसाल थोडी थोडी सडक तयार करून हल्लीं खिंडीतील सडकेचें काम पुरे झाले आहे. ही सडक तयार झाल्यामुळे मुठेखोऱ्यातील गाड्यांची वाहतुकीची सोय होऊन मुठेखोऱ्यांतील लोकांना फार दिवस भासत असलेली रस्त्याची उणीव दूर झाली आहे. श्रीमंत राजेसाहेबाच्या दूरदर्शित्वामुळें संस्थानला या सडकेचा थोड्या खर्चांत लाभ झाला आहे.

## पूल

सन १९२२ सालीं सुधागड तालुक्यातील अंबानदीस महापूर येऊन पेहेडली येथील पुलाचा बराच भाग वाहून गेला. तो पूल पुन्हा बाधण्यास ९००० रुपये खर्च आला.

नसरापूर-वेलें रस्त्यावर वेल्याजवळ कादी नदीस पूल नसल्यामुळें पावसाळ्यांत दळणवळण जवळ जवळ बंद पडे. वेलें हें तालुक्याचें ठिकाण आहे. म्हणून वेल्याजवळ कांदी नदीस एक लोखंडी लहान पूल बांधिला आहे. त्याचप्रमाणें या रस्त्यावर आंबवणें येथील ओढ्यामुळें कांहीं दिवस रस्ता बंद राही म्हणून या ओढ्यास कॉजवे तयार केला आहे. कांदी नदीवरील पूल व आंबवणें येथील कॉजवे या दोन्ही कामांस सुमारें ७००० रुपये खर्च आला. या दोन्ही कामांमुळें नसरापूरपासून वेल्यापर्यंत आतां पावसाळ्यांतहि रहदारीस मार्ग खुला झाला आहे.

## लक्ष्मीबाई ब्रिज

भोरजवळ निरा नदीस पूल नसल्यामुळें पावसाळ्यांत ४ महिने नदी-पलीकडे राहणाऱ्या लोकांचे फार हाल होत असत. नदीपलीकडील भागांत राहणाऱ्या लोकांना नोकरीनिमित्त, बाजाराकरितां व कोर्टांतील वगैरे काम-काजाकरितां नेहमीं भोरास यावें लागतें. पावसाळ्यात नदी उतरून येतांना पूर्वीं दरसाल एक दोन तरी माणसें वाहून मृत्युमुखीं पडत. ही आपत्ति टाळण्या-करिता सन १९१३ सालींच या पुलाची आवश्यकता किती आहे हें श्रीमंत राजेसाहेबांनीं कै. श्रीमंत रावसाहेबांचे नजरेस आणिलें होतें, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर संस्थानात अशांतता माजली होती, यामुळें त्यांना कांहीं काल हें काम हातीं घेतां आलें नाहीं. भाटघर धरण पुरें होऊन धरणावरून गाड्यांचे रहदारीस परवानगी मिळाली तेव्हां या पुलाचें काम लवकर करणें जरूरीचें भासूं लागलें. कारण हा पूल झाल्यानें भोर ते पुण्यापर्यंतचें अंतर ५-६ मैलानें कमी होणारें होतें. म्हणून श्रीमंत राजेसाहेबांनीं हें मोठ्या खर्चाचें काम करण्याचें ठरविलें. नवीन कामा-करितां एका बी. ई. पास झालेल्या अनुभवी एंजिनिअरची नेमणूक केली व त्याजकडून प्लॅन एस्टिमेट करवून पुण्याचे प्रसिद्ध रानडे कॉन्ट्रॅक्टर यांना सन १९३० सालीं हें काम दिले.

श्रीमंत राजेसाहेब यांचे विनंतीस मान देऊन मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यानीं भोरास दुसऱ्यांदा भेट देऊन या पुलाची कोणशिला

चित्रांक ९८



श्री. लक्ष्मीबाई-पुलाची कोनशिला नेक नामदार सर फ्रेडरिक साइक्स यांच्या हस्तें ता. ६ नोव्हेंबर १९३१ रोजीं बसविण्यांत आली त्यावेळचा फोटो.

[सं. पा. ५७९

ता. ६ नोव्हेंबर सन १९३१ रोजीं बसविली. या वेळीं गव्हर्नरसाहेबांनीं पुढील आशयाचें भाषण केले. ते म्हणाले,

" It gives me special pleasure on this occasion to associate myself with a work of public utility the advantages of which, as you have pointed out, will be shared not by your own subjects but by travellers from longer distances and remove one of the obstacles now interrupting the shortest route between Poona and Mahad. I have long been aware, Chief Saheb, of your laudable ambition to provide and extend those public advantages which, as you rightly realise, provide their own best return in developing the resources of your State and the welfare and prosperity of its inhabitants and I congratulate you to-day in seeing the inception of a scheme which, as you have stated, has long been among your most cherished ambitions, but, for the very good reasons explained in your speech, has had to await the present favourable opportunity.

It has given me great pleasure, Shrimant Pant Saheb, to lay the Corner-stone of this New Bridge over the River Nira and I sincerely hope that this project, now commenced, will speedily rise to a successful completion and will prove a lasting benefit to the people of Bhor."

या पुलाचें काम सन १९३३ सालीं पुरें झालें. याच सालीं दक्षिणेंतील संस्थानांचा मुंबईसरकारशीं असलेला संबंध तोडून तो हिंदुस्थान सरकारशीं जोडण्यात आला; व दक्षिणेंतील संस्थानांकरिता पहिले एजंट टू दि गव्हर्नर-जनरल म्हणून लेफ्टेनंट-कर्नल एच्. विल्बरफोर्स-बेल यांची नेमणूक झाली. पुलाचा उद्घाटनसमारंभ त्याचे हस्तें करावा म्हणून श्रीमंत राजेसाहेबांनीं त्याना भोरास भेट देण्याबद्दल विनंति केली. या विनंतीस मान देऊन ए. जी. जी. साहेब ता. २० जून सन १९३३ रोजीं भोरास आले. त्या वेळी त्यांचें मोठ्या थाटानें स्वागत करण्यात आले.

त्याच दिवशीं दुपारीं ४ वाजतां त्यांचे हस्तें पुलाचा उद्घाटनसमारंभ झाला. प्रथम श्रीमंत राजेसाहेबांनीं प्रास्ताविक स्वागतपर भाषण केलें. नंतर कायदेमंडळाचे उपाध्यक्ष श्रीयुत सी. जी. आगाशे, बी. ए., एल्एल्. बी., यांनीं

भाषण करून ए. जी. जी. साहेबाना पुलाचें उद्घाटन करण्यास व श्रीमंत राजेसाहेबाच्या द्वितीय पत्नी कै. श्री. सौ. लक्ष्मीबाई याचें नाव ह्या पुलास देण्याबद्दल कायदे-मंडळात बिनसरकारी सभासदाचा ठराव झाला होता त्याप्रमाणें 'लक्ष्मीबाई ब्रिज' हें नांव देण्याबद्दल विनंति केली. रा. आगाशे याच्या विनंतीस अनुसरून ए. जी. जी. साहेबानीं पुलाचें उद्घाटन करून पुलास 'लक्ष्मीबाई ब्रिज' असें नाव दिल्याचें जाहीर केले. नंतर त्यानी जें भाषण केलें त्यांतील महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे.

## ले.-क. विल्बरफोर्स-बेल यांचें भाषण

" Chief Saheb, Ladies and Gentlemen,

I have been much interested in the speeches which I have heard this afternoon, and there are one or two points raised in them to which I would like briefly to refer. In the first place, I should like at this my first visit to this State to say what pleasure it gives me to find the excellent relationship which exists between the State Legislative Council and the State Government. This is a *sine qua non* for the good government of the people of the State as well as for the happiness of the Chief Saheb's subjects. Another point is the eulogium which we have heard of the noble lady after whom this bridge that we are opening this afternoon is to be named. It was never my pleasure nor my privilege to know the lady whose name is so prominently associated now with this bridge and whose life has been so obviously bound up with the Chief Saheb and the State. I cannot say more. The reader of the last speech has said all that could be said about that lady, and it only remains to be seen that the bridge that has been erected in her name is worthy of its object.

My connection directly with yourself, Chief Sahib, has been more recent but I have been much interested in all that I have seen and heard of the progress of your State and also in your connection with the material progress of this part of the Deccan. Many States in India have shown their willingness to co-operate in beneficent works which the British

चित्रांक ९९



लक्ष्मीबाई पुलावरील रस्त्याचा देखावा. या पुलाचा उद्घाटनसमारंभ ता. २० जून १९३३ रोजीं दक्षिणेंतील संस्थानांचे ए. जी. जी. ले.-क. विल्बरफोर्स-बेल यांचे हस्तें झाला.

[ सं. पा. ५७९

Government has desired to undertake and in which their co-operation has been sought. Bhor is one of those Sates, and your connection with the Bhatghar Dam has brought you very prominently into, what I may term, business relations with the British Government. It is in this, as well as in connection with political relations, that I have known the Bhor State in the past.

To-day's Ceremony is the result of something much more important than the accident of my being able to accept your kind invitation, for it marks the conclusion of the project which embodied the conception of the famous Bhatghar Dam. This bridge is an adjunct to that important work, and without it that work would not have been complete. We are met, therefore, to-day to set the seal officially upon the magnificent work of the engineers who have been responsible for this important achievement in the cause of irrigation and progress. For my own part, I am very gratified to be associated with it, even though I come into the picture right at the tail-end. It is fitting here that I offer to you, Chief Sahib, my sincere congratulations upon the success of the undertaking, and in so far as this bridge is concerned my felicitations go forth both to Mr Kanhere, the State Engineer of the Bhor State, who designed and executed its construction, and to the Construction Engineers, Messrs. V. R. Ranade & Sons, who arranged the actual work upon Mr. Kanhere's plans. The bridge has taken two years to build and has cost nearly a lack and a half of rupees, and I am sure that all those responsible for it must feel gratified at the results of their labours. A bridge always appears to me to resemble the short span of our lives in this world. It connects the two sides of a gap, and just as a life is useful in proportion to the good which it performs, so is a bridge useful in proportion to the people and the interests which it serves. In its ethical sense, therefore, a bridge is a symbol, and one of those symbols from which a valuable moral precept can be drawn. The Lakshmibai Bridge embodies the idea of the administrative progress and conse-

quently of the continuing welfare of the people which the Rulers of the Bhor State have always sought."

ए. जी. जी. साहेबांचा मुक्काम भोर येथें ३ दिवस होता. त्या अवधींत त्यांना म्युनिसिपॅलिटीचें मानपत्र देण्यांत येऊन दरबार, शाळेंतील बक्षिस-समारंभ, दवाखाना, लायब्ररी वगैरे पाहणें हे नेहमींचेच कार्यक्रम झाले.

'लक्ष्मीबाई ब्रिज'ला सुमारे १,५०,००० रुपये खर्च आला. संस्थानांत इतक्या मोठ्या खर्चाचें हें पहिलेंच काम झालें. भोरसारख्या लहान संस्थानास हें काम डोईजडच होतें. परंतु फार दिवस मनांत बाळगलेला हेतु सिद्धीस नेण्याचा श्रीमंत राजेसाहेबांचा दृढ निश्चय असल्यामुळें त्यांनीं खर्चाकडे पाहिले नाहीं. पुलाचा उद्घाटनसमारंभ होऊन जेव्हां पुलावरून गाड्या, घोडीं, मोटारी वगैरे वाहनांची रहदारी सुरू झाली तेव्हां त्यांना आपल्या आयुष्यांतील एक महत्त्वाकांक्षा पुरी झाल्यानें किती समाधान वाटले असेल याची कल्पनाच करणें बरे. पहिल्याच पावसाळ्यात नदीला पूर आला असताहि पुलावरून जेव्हां मावळे लोक निर्भयपणें जात तेव्हां त्यांचे तोंडून श्रीमंत राजेसाहेबांच्या दयार्द्र बुद्धीबद्दल धन्योद्गार ऐकूं येत असत.

लक्ष्मीबाई पुलाचें काम सुरू करण्यांत आल्याचें समजल्यावर लॉर्ड सिडेनहॅम हे ता. १ डिसेंबर १९३१ रोजीं लंडनहून पाठविलेल्या आपल्या पत्रांत म्हणतात :

"I am glad to hear of the new bridge which will not only be very useful but an honour to your State and a memorial to be proud of."

त्याचप्रमाणें सर लेस्ली विल्सन हे बार्किंगहॅम येथून पाठविलेल्या पत्रात म्हणतात :

"A wise project of the greatest assistance to passengers and trade."

### अंबवडें झुलता पूल

भोरचे दक्षिणेस सुमारें ९ मैलांवर अंबवडें हें गांव आहे. या ठिकाणीं सचिव घराण्याचे मूळ पुरुष श्रीशंकराजी नारायण यांची समाधि आहे. हें स्थान अत्यंत रमणीय असून सृष्टिसौंदर्याविषयीं प्रसिद्ध आहे. या गांवच्या

चित्रांक १००



निरा नदीवरील लक्ष्मीबाई पूल, भोर.

[ सं. पा. ५७९

अलीकडे ओढा असून तो ओढा ओलांडून पलीकडे गांवांत जावें लागतें. त्यामुळें गांवचे रहिवाश्याची पावसाळ्यांत फार गैरसोय होई. ती गैरसोय दूर करण्याकरितां एक पूल बाधण्याचा श्रीमंत राजेसाहेबाचा बरेच दिवसापासून हेतु होता. सन १९३३ मध्यें श्रीमंत राजेसाहेब हरिद्वारला गेले होते त्या वेळीं त्यांनीं तेथील गंगा नदीवरील 'लक्ष्मण झूला' नावाचा झुलता पूल पाहिला. तेव्हां अंबवडें येथें बांधण्याचा पूल दगडी न बाधतां झुलता पूल बांधावयाचा व तेथील रमणीयतेंत आणखी भर टाकावयाची असें त्यांच्या मनानें घेतलें व त्यांनीं आपल्या मताप्रमाणें प्लॅन तयार करवून त्याचे खर्चाचें एस्टिमेट मागविलें व त्या एस्टिमेटा-प्रमाणें रु. ९००० खर्च करून सुमारें १५० फूट लांब व ४ फूट रुदींचा पूल बांधिला. या पुलाच्या वरील स्मारकफलकाचा उद्घाटनसमारंभ व पुलाचा नामकरणसमारंभ श्रीमंत सर गंगाधरराव बाळासाहेब पटवर्धन यानी १५ ऑक्टोबर सन १९३७ रोजीं भोरास भेट दिली त्या वेळीं त्याचे हस्तें झाला, व श्रीमंताच्या मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांच्या स्मरणार्थ 'श्री. जिजीसाहेब झुलता पूल' असें श्रीमंत राजेसाहेब यांच्या इच्छेवरून नांव देण्यांत आलें. या समारंभास श्रीमंत राजेसाहेबाच्या भाची श्री. सौ. जान्हवीबाई, हैद्राबाद येथील श्रीमंत राजे शामराज यांच्या पत्नी, याहि आल्या होत्या.

प्रथमतः श्रीमंत राजे बाबासाहेब यानी आपल्या भाषणात श्रीमंत राजे सर बाळासाहेब याचें स्वागत करून नंतर ज्यांचें स्मारक म्हणून फलकाचा अनावरणसमारंभ करावयाचा त्या आपल्या परमपूज्य मातुःश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब पंतसचिव यांचेसंबंधीं माहिती सांगितली व शुद्ध आचरण, ईश्वरनिष्ठा, सात्त्विक वृत्ति इत्यादि गुणांमुळें 'गृहलक्ष्मी' त्या कशा होत्या तें सांगितलें व त्यांचें स्मारक श्रीमंत सर बाळासाहेबांसारख्या ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध अशा सन्मान्य राजगृहस्थांच्या हस्तें होण्याचा योग आल्याबद्दल अत्यंत समाधान व्यक्त केलें, व आपले विनंतीस मान देऊन त्यांनीं उत्सवास येण्याची तसदी घेतली त्याबद्दल त्यांचे हार्दिक आभार मानून त्यास स्मारकफलकाचें अनावरण करण्याची विनंति केली.

त्यानंतर राजे सर बाळासाहेब यांनीं पुढील भाषण करून पुलास 'श्री. जिजीसाहेब झुलता पूल' असें नांव दिल्याचें जाहीर केलें. ते म्हणाले :

## श्री. सर बाळासाहेबांचें भाषण

"युवर हायनेस राजे बाबासाहेब, युवराजसाहेब, राजघराण्यांतील मंडळी आणि सभ्य गृहस्थहो,

आताच राजे बाबासाहेब यांनीं आपले भाषणांत आम्ही या पवित्र समारंभाचे वेळीं येण्याची तसदी घेतली व परमपूज्य कै. सौ. जिजीसाहेब याच्या स्मारकाच्या फलकाचे कार्यक्रमात प्रमुख भाग घेण्याबद्दल आम्हीं आपली संमति दर्शविली याबद्दल त्यानी आमचे आभार मानले व आमचा गौरव केला, त्याजबद्दल त्याचे आम्ही अत्यंत आभारी आहों. आपले संस्थानांत ज्या ठिकाणीं मराठी राज्याची स्थापना झाली आणि जेथें श्रीशिवाजी-महाराजाच्या आणि त्याचे मागाहून श्रीराजाराममहाराज वगैरेच्या प्रारंभींच्या महत्त्वाच्या हालचाली झाल्या तो हा प्रदेश आपणास अखिल महाराष्ट्रीयास अत्यंत पवित्र वाटतो. या ठिकाणी येण्याबद्दल आमचा मनोदय पूर्वी झालेला होता. परंतु त्यानंतर अनेक कारणें घडून आल्यामुळे आमचा येथें येण्याचा योग यापूर्वीं घडून आला नाहीं. तथापि, ती संधि आज थोड्या उशीरा का होईना पण आम्हांस प्राप्त झाली याबद्दल आम्हास अत्यंत आनंद वाटत आहे.

आपले पूर्वज म्हणजे या संस्थानचे संस्थापक यानीं पराक्रम करून महाराष्ट्राचे इतिहासात अत्यंत मोठी कामगिरी केलेली आहे, हें सर्वविश्रुत आहे. स्वामिसेवा करून आपलें कर्तव्य करून ते ब्रह्मीभूत झाले. महाभारतात वर्णन केलेल्या महान् ब्राह्मण योग्याप्रमाणें त्याचा पराक्रम झाला.

अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः ।
इमं ब्राह्ममिदं क्षत्रं शापादपि शरादपि ॥

अशा तऱ्हेची त्यांची वृत्ति होती. असे ते थोर पुरुष होते. अशा महान् थोर अशा आपल्या पूर्वजाच्या पुण्यस्मृतीस अनुसरून अगोदरच पवित्र असलेल्या या क्षेत्रीं आपण त्याच्या समाधीचा वगैरे जो जीर्णोद्धार केला, तो त्याचेबद्दल आपल्या अंतःकरणांत वसत असलेल्या योग्य आदरास साजेसा आहे. आपल्या पराक्रमी पूर्वजांनीं ज्याप्रमाणें मराठी राज्याच्या स्थापनेच्या काळात स्वामिसेवा केली त्याप्रमाणें आमच्याहि पूर्वजानी पेशवाई काळात पराक्रम गाजविला. असो.

आपण महाराजाच्या अष्टप्रधानापैकीं आहांत. आम्ही पेशव्यांचे सेवक म्हणजे महाराजाच्या सेवकांचे सेवक म्हणून आपणास आम्ही जास्त श्रेष्ठ मानतों.

ज्या साध्वीचें पवित्र स्मारक करण्याच्या प्रसंगीं या पुलाचे उद्घाटन करण्याचा, राजेसाहेब, आपण आम्हास मान दिलात आणि ही सुसंधि प्राप्त करून दिलीत त्याचे शुद्ध आचरण वगैरेबद्दल आपणाप्रमाणे आपल्या वडिलाकडून प्रशंसनीय उद्गार आम्हीं स्वतः ऐकलेले आहेत. त्या दिवंगत झाल्यानंतर आपल्या थोर वडिलानी "आमची आज गृहलक्ष्मी गेली" असें खेदानें जे उद्गार काढले ते यथार्थ होते. स्त्रियाना गृहलक्ष्मीचें पद विवाहाबरोबरच प्राप्त होत असतें. पण सद्वर्तन, ईश्वरनिष्ठा, निरपेक्ष अपत्यप्रेम वगैरे स्त्रीजातीस उचित अशा खरोखरीच्या गृहलक्ष्मीपदाचा अनुभव घेणाऱ्या त्या असल्यामुळे आपल्याप्रमाणें आमचेहि अंतःकरणात त्याचेबद्दल अत्यंत आदर वसत आहे व अशा सत्त्वशील साध्वीच्या स्मारकाचे उद्घाटन करण्याची जी आपण पवित्र संधि आम्हास दिलीत, त्याबद्दल आम्ही आपले फार आभारी आहोंत.

आपण आमचा गौरव करताना आमच्या अंगच्या गुणाचा उल्लेख केलात. ते गुण कदाचित् आमचे अंगीं असतील अगर आमचेबद्दल आपले ठिकाणीं वसत असलेल्या स्नेहभावामुळें ते आमच्या ठिकाणी आहेत असें आपणास वाटत असेल. असो.

ज्या आपल्या थोर पूर्वजानीं इतिकर्तव्यता संपादन करून नंतर ते ब्रह्मीभूत झाले त्याच्या कृपेची छाया आपणावर व आपल्या कुटुंबियावर असणारच व असावी व त्याप्रमाणेंच ती कृपा आमच्यावरहि व्हावी एवढी या पावन क्षेत्रीं याचना करून आम्ही आपलें भाषण संपवितों."

## वळकी नदीवर पूल

कोळवणास जाणाऱ्या पुणें-पौड रस्त्यावर पौड गांवानजीक वळकी नांवाची नदी आहे. उन्हाळ्याचे व हिवाळ्याचे दिवसात नदीस पाणी नसल्यामुळे नदींतून पलीकडे जाता येई. परंतु पावसाळ्याच्या दिवसात नावातूनच जावे लागे. त्यामुळें पायीं प्रवास करणारांची फार गैरसोय होई. तेव्हा या नदीवर चाले गांवानजीक रु. ४२०० खर्च करून सुमारें १५० फूट लांब व ४ फूट रुंद असा पायीं जाणाऱ्या प्रवाशाकरितां सन १९३७ सालीं पूल बांधण्यात आला आहे.

## भोर शहरास व राजवाड्यास विद्युत्पुरवठा

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर ज्या अनेक लोकहिताच्या गोष्टी करण्याचें त्यांनीं योजिलें होतें त्यातच भोर शहरास सर्वत्र विद्युत्-दीप लावून लोकांची ही गैरसोय दूर करावी असें फार दिवसांपासून त्यांच्या मनांत घोळत होतें. भाटघर येथें धरणाच्या पाण्यावर तेथील धरण बाधण्याचे कामाकरिता विद्युद्गृह बांधण्यांत आलें होतें व तेथें विजेचा पुरवठाहि भरपूर होता. परंतु त्या वेळीं धरण बाधण्याचें काम पुरें झालें नव्हतें व भोरास तेथील वीज आणल्यास ती बरीच महाग पडेल असें वाटत होतें. तेव्हा भोर येथें एखादें पॉवर-हाउस बांधून भोरास विजेचा पुरवठा करण्यास एखादा धाडशी मनुष्य पुढें आल्यास त्या खर्चास लागणारी रक्कम योग्य तारणावर अल्प व्याजानें देण्यात येईल असें जाहीर करण्यात आलें. "प्रजानुरंजको राजा" या उक्तीप्रमाणें, लोकहितार्थ श्रीमंत राजेसाहेब झीज सोसण्यास तयार झाले हें पाहून भोर येथील प्रसिद्ध कॉंट्रॅक्टर रा. नानाजी पाडुरंग थोपटे यानीं पुढें येऊन हें काम करण्यास आपण तयार असल्याचें सांगितलें. श्रीमंत राजेसाहेब यांनींहि रा. थोपटे याना अल्प व्याजानें रु. १५,००० कर्जाऊ दिले व म्युनिसिपॅलिटीच्या सहकार्यानें रा. थोपटे यानीं हें काम जोमानें चालविलें. रु. १५,००० अपुरे पडल्यामुळें आणखी रु. ५००० देण्यांत आले. भोर गावांत पॉवर-हाउस बांधण्यांत आले. त्याचा उद्घाटनसमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांनीं ता. २२ एप्रिल सन १९२८इ. रोजीं केला. पुढें १ महिन्यांत शहरच्या रस्त्यावर व राजवाड्यांत फिटिंगचें काम पुरे करण्यांत आलें. ता. ८ मे रोजीं नेक नामदार सर लेस्ली विल्सन हे भोरास आले त्या वेळीं त्यांचे हस्तें विद्युत्-दीपाचा उद्घाटनसमारंभ करण्यांत आला. या समारंभाकरिता राजवाड्यांत श्रीराममंडपात दरबार भरविण्यात आला होता. दरबारांत श्रीमंतांचें स्वागतपर भाषण झाल्यावर म्युनिसिपॅलिटीच्या अध्यक्षांनीं मानपत्र वाचून दाखविलें.

त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबाना आपल्या संस्थानच्या प्रजाजनाविषयीं किती कळकळ वाटते व भोर शहरांत वीज आणण्याचे बाबतींत त्यांनीं कसा प्रयत्न केला त्याचा गौरवपूर्वक पुढील शब्दांत उल्लेख केला. ते म्हणाले—

चित्रांक १०१



श्रीमंत सर बाळासाहेब पटवर्धन, राजेसाहेब संस्थान मिरज (सी.), यांच्या हस्तें कै. हर हायनेस जिजीसाहेब झुलत्या पुलाचा उद्घाटनसमारंभ ता. १५-११-१९३७ रोजीं झाला. श्री. बाळासाहेब उद्घाटनाकरितां पायरीवर उभे आहेत. [सं. पा. ५८२

" Before we conclude, we may be permitted to take this opportunity of succinctly referring to the scheme of the electrification of the Palace and the town which Your Excellency will be soon solicited to open. It was the long cherished desire of Shrimant Pant Saheb to provide electric light to the Palace and other State Buildings. But the idea of doing so without at the same time making a provision for supplying electric light to the Municipality and the people of Bhor appeared to be unpalatable to his noble mind. Shrimant Pant Saheb, therefore, purposely postponed the electrification of the Palace which could have been otherwise long ago carried out at a comparatively very small cost. He therefore ordered his P.W.D. officers to prepare a general scheme and submit its estimate. The estimate came to about Rs. 50,000 which was rather a heavy sum to sanction all at once. Then enquiries were made if any businessman was ready to undertake the work with some concessions from the Durbar. We are glad to say Mr. N. P. Thopate, Contractor at Bhatgar, and a subject of this State came forward with certain proposals which were ultimately agreed upon. Under this scheme the State was not required to undergo any initial expenses except those of internal fittings. All that the State had to do was to give a loan of Rs. 15,000 on cheap terms and to guarrantee a minimum monthly expenditure of Rs. 500. This was to be borne equally by the Palace Department, and the Municipality and Durbar. Besides the Municipality has been promised an extra grant equal to the additional expenditure it will have to bear on account of the electrification of the streets. Mr. Thopate has expeditiously and satisfactorily carried out his own part so far and deserves to be congratulated for his enterprise and business capacity."

मानपत्रवाचन झाल्यावर तें नेक नामदारांना अर्पण केले व विद्युद्दीप लावण्याची त्याना विनंति केली. नेक नामदार यानीं स्विच दाबून दिवे लावल्याचें जाहीर केलें व भाषण केले. त्यात ते म्हणाले :

" I feel sure that the citizens fully appreciate the work which you, gentlemen, often at the sacrifice of a considerable

time and trouble, are performing for their welfare, and the electric lighting scheme which I have the pleasure of inaugurating to-day is a valuable addition to the amenities of life in your town for which the Chief Saheb and the Municipality deserve the fullest credit. The convenience of such a system has only to be seen to be realised and I have little doubt that, in a few years, there will be a great and growing demand for the extension of the system to all the shops and the houses in the town."

इलेक्ट्रिक कॉन्ट्रॅक्टर रा. नानाजी पांडुरंग थोपटे यांनीं भोर येथें वीज आणण्याचे कामीं स्वार्थत्यागपूर्वक खटपट करून भोर शहराचें सौंदर्य वाढविण्यास मदत केली. या त्याच्या कामगिरीचा, श्रीमंत राजेसाहेब यानीं त्याना 'नगर-भूषण' ही बहुमानाची पदवी व त्याबद्दलचें मेड्ल् देऊन, गौरव केला.

या उद्घाटनसमारंभानंतर सुमारे ५-६ वर्षेपावेतों ऑइल एंजिनवर चालविलेल्या पॉवर-हाउसपासून भोर शहरात उत्तम तऱ्हेनें वीज-पुरवठा होत होता. परंतु या योजनेची वीज फार महाग पडत असे. त्यामुळे गावातहि घरोघर फारसा प्रसार झाला नाहीं; व जरी तसा प्रसारहि झाला असता तरी ५० हॉर्स-पॉवरच्या एंजिनपासून इतका पुरवठा होण्यास पुरेशी वीज मिळेल कीं नाहीं हीहि शंका होतीच; व घरखर्चास पुरेसा पुरवठा नसल्यामुळें विजेवर चालणारे कारखाने काढण्यास उत्तेजन मिळणें अशक्यच होतें. या दरम्यानचे कालात भाटघर धरणाचें काम संपलें. तेथें धरणाचे कामाकरिता बांधण्यात आलेलें पॉवर-हाउस २००० हॉर्स-पॉवरचें असून त्यापासून उत्पन्न होत असलेली वीज कोणीकडे उपयोगात आणावी हा मुंबई सरकारला प्रश्न पडला. मि. थोपटे यांनाहि ही बातमी होतीच व भोर शहराकरितां भाटघर येथून लाइन आणून पुरवठा केल्यास ऑइल एंजिनपेक्षा वीज स्वस्त मिळेल व तेथील वीज रात्रंदिवस मिळूं शकून मागासारखे लहानसहान उद्योगधंदे काढणें झाल्यास वीज पुरवितां येईल, पंपांचे साहाय्यानें आसपासच्या गांवची कांहीं जमीनहि भिजविता येईल, या दूरदृष्टीनें व ब्रिटिश सरकारहि वीज वाया जाण्यापेक्षां कांहीं उत्पन्न तरी निघेल या दृष्टीनें तेथील पॉवर सवलतीनें देईल, असा सर्व साधक-बाधक विचार करून, मि. थोपटे यांनीं या कामीं श्रीमंत राजेसाहेब यांची

चित्रांक १०२



भाटघर येथील ' लॉइड धरण ' व इलेक्ट्रिक पॉवर-हाउस.

[ सं. पा. ६०७

संमति घेऊन मुंबई सरकारशीं वाटाघाट करून सवलतीच्या दराने भाटघर येथील वीज भोर येथें नेण्यास परवानगी मिळविली. त्याबाबत चालीप्रमाणे मि. थोपटे व ब्रिटिश सरकार यांचे दरम्यान करारमदारहि करण्यात आले. पुढें १ महिन्याच्या अवधींत भाटघरपासून भोरपर्यंत नवीन खाब रोवून नवीन लाइन टाकण्याचें काम झाल्यावर लक्ष्मीबाई पुलाशेजारीं मुद्दाम बाधण्यात आलेल्या सब-स्टेशन पॉवर-हाउसचा उद्घाटनसमारंभ श्रीमंत राजेसाहेब याच्या हस्तें ता. २२ जून १९३४ रोजी झाला. त्या वेळी मि. थोपटे यानीं वरील लाइन टाकून पॉवर आणण्याची सविस्तर हकीकत सागून पॉवर-हाउस खुले करण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबाना विनंति केली. श्रीमंत राजेसाहेब यानीं श्री. थोपटे याचा हें धाडस केल्याबद्दल गौरव करून सब-स्टेशन उघडल्याचें जाहीर केले. भाटघर येथून भोर येथें वीज आणण्यास लागलेल्या खर्चाकरिता श्रीमंत राजेसाहेबानीं मि. थोपटे यास आणखी रु. २०,००० अल्प व्याजानें कर्जाऊ दिले. ही वीज आल्यावर युनिटचा चार्ज पूर्वी आठ आणे होता तो सहा आणे करण्यात आला, त्यामुळे गांवातील आणखी बऱ्याच नागरिकांनीं आपापल्या घरीं नवीन दिवे घेतले. तसेंच ही वीज चोवीस तास असल्यामुळे एखादा कारखाना उभारण्याचें कोणी मनात आणल्यास त्यालाहि विशेष सवलतीनें वीज देण्याचे मि. थोपटे यानीं ठरविलें आहे. या सवलतीचा फायदा घेऊन पुणें येथील गिरणीमालक मि. शुक्ल यानीं भाटघरनजीक भोरच्या हद्दींत नुकतीच कापडाची गिरणी इलेक्ट्रिक पॉवरवर चालणारी सुरू केली आहे. त्याची हकीकत पुढे दिली आहे.

विजेच्या वाढत्या खपाबरोबर विजेचें फिटिंग योग्य तऱ्हेने झाले आहे कीं नाहीं यावर देखरेख ठेवण्यास एक बोर्ड नेमण्यात आले आहे. तसेच १९१०चा इंडियन इलेक्ट्रिसिटी ॲक्ट ( Indian Electricity Act ) हाहि भोर संस्थानास लागू करण्यांत आला आहे.

इलेक्ट्रिक लाइटसंबंधी सर्व खर्च खाजगी व स्टेटमधून विभागून करण्यात येतो. इलेक्ट्रिक कॉन्ट्रॅक्टर यास १९३५ इसवीपावेतों राजवाड्यातील व शहरातील सर्व वीज-पुरवठ्याबद्दल रु. ६००० सालिना देण्यात येत असत. अलीकडे २ वर्षांत धर्मशाळेपासून नवीन लाइन टाकून रामबागेंत व शहरातून

नव्या शाळेचे इमारतीपर्यंत वीज पुरवठा करण्यांत आला. त्याबद्दल आणखी रु. ७२० ची वाढ करण्यांत आली आहे. एकूण हल्लीं रु. ६७२० देण्यात येतात. म्युनिसिपालिटीला दरसालच्या रु. २००० च्या ग्रँटखेरीज विजेकरिता सुमारें १६०० रुपये देण्यात येतात. त्याचाहि समावेश वरील ६७२० रुपयांत झालेला आहे.

अशा प्रकारे विद्युत् पुरवठ्याबरोबर रेडिओ, पंप व अन्य सुखसोयी श्रीमंत राजेसाहेबानीं प्रजाजनांस सुलभ करून दिल्या आहेत.

चित्रांक १०३



भाटघर येथील ' लॉइड धरणा 'चा व त्यावरून जाणारे सडकेचा देखावा.

[ सं. पा. ६०९

## प्रकरण ९ वें

# अस्पृश्यतानिवारणार्थ प्रयत्न

केवळ रूढीमुळें हिंदुसमाजात ज्या कित्येक अनिष्ट चालीरीती शिरल्या, त्यांचें निर्मूलन करण्याच्या हेतूनें कै. आगरकर यांनीं समाजसुधारणेचा प्रश्न हातीं घेऊन अंध परंपरेनें चालणाऱ्या धार्मिक लोकांच्या विरोधास मोठ्या धैर्यानें तोंड देऊन समाजातील अनिष्ट व घातकी रूढींवर हल्ला चढविण्यास सुरुवात केली. तेव्हापासून समाजातील घाण काढून टाकण्याकडे सुशिक्षित वर्गाचें लक्ष वेधलें.

अस्पृश्यता हा हिंदुसमाजास लागलेला एक मोठा कलंक असून तो नाहींसा केल्याशिवाय हिंदुसमाजास उज्ज्वलता प्राप्त होणार नाहीं, असेंहि कित्येकांना वाटत होतें. परंतु समाजात जागृति करून हा कलंक धुऊन टाकण्याचा प्रयत्न करणें फार धाडसाचें काम असल्यामुळें सार्वजनिक रीतीनें असा प्रयत्न फार कोणीं केला नाहीं. बरेच सुशिक्षित लोक आपल्यापुरते अस्पृश्यता पाळीत नसत. पण अशा व्यक्ति फारच थोड्या होत्या.

महात्मा गाधी आफ्रिकेतून हिंदुस्थानात आल्यावर प्रथम त्यानीं सामाजिक सुधारणेचा प्रश्न हातीं घेतला. हिंदुसमाजावरील अस्पृश्यतेचा कलंक धुऊन टाकून भेदाभेद नाहींसा केल्याशिवाय हिंदुसमाज संघटित होऊन त्याला खरें उज्ज्वल स्वरूप प्राप्त होणार नाहीं, अशी त्याची ठाम समजूत झाली असल्यामुळें व त्याचें मनोधैर्य अलौकिक असल्यामुळें त्यानीं या प्रश्नास चालना दिली. तेव्हापासून हिंदुस्थानात अस्पृश्यतानिवारणाचे प्रयत्न सुरू झाले.

अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीला खरा जोर सन १९३१ सालीं आला. या सालीं हिंदुसमाजांतील अस्पृश्यता नष्ट झाली नाहीं तर राजकीय दृष्ट्याहि हिंदुसमाजाची किती हानि होणार आहे याचें भेसूर चित्र महात्मा गाधींसारख्या विचारवंत पुढाऱ्याचे नजरेसमोर दिसूं लागलें व त्याच्या प्राणान्तिक प्रयत्नांमुळें या चळवळीची मोठ्या जोराची लाट सर्व देशभर उसळली. तात्त्विक अगर व्यावहारिक कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी हिंदुसमाजातील अस्पृश्यता नष्ट झालीच पाहिजे, असें मत सर्वत्र प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें. महाराष्ट्रात

पुणे हें चळवळीचें केंद्र असल्यामुळें तेथें या चळवळीस चागलेंच स्वरूप आलें. धर्म बुडणार अशी बाबावाक्यं प्रमाणं म्हणणाऱ्या सनातनींची हाकाटी सुरू झाली.

श्रीमंत राजेसाहेब युवराज असतांना त्यांचा बहुतेक काळ पुण्यासच गेला. कै. आगरकराचें ‘ सुधारक ’ पत्र ते वाचीत असत. त्यातील विचाराचा पगडा त्याच्या मनावर बसल्यावांचून राहिला नाहीं. विचित्रगड तालुक्याचा राज्यकारभार पाहत असतांना त्यानीं जमाबंदीनिमित्त गावोगाव दौरे काढले होते. त्या वेळीं प्रत्येक गांवीं अस्पृश्यांना गावकऱ्याकडून किती तुच्छतेनें वागविलें जातें हें त्यानीं समक्ष पाहिले होतें. सार्वजनिक चावडीच्या पायऱ्याहि चढण्यास त्यांना मनाई करण्यात येत असलेली पाहून त्याना वाईट वाटे. परंतु त्या वेळीं त्यांचे हातीं सत्ता नसल्यामुळें त्याना काहीं करता येणें शक्य नव्हतें व प्रथम धार्मिक लोकाचे मतात परिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न केल्याशिवाय अस्पृश्यतानिवारण करण्याचे बाबतींत उपाययोजना करणें इष्टहि नव्हतें.

श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यानंतर त्यानीं राज्यारोहण समयींच अस्पृश्याचे बाबतींतील आपले उदारपणाचें धोरण कसें प्रगट केले हें मागें सागण्यात आलेच आहे. पुण्याहून राज्यारोहण समारंभाकरितां ते भोरास आले त्या वेळीं शहरातून त्यांची मिरवणूक काढण्यांत आली होती. त्या वेळीं रस्त्याने त्याचे गळ्यांत हार घालण्यात आले. त्यात महारानीं हार घालण्याची इच्छा दर्शविल्यावरून श्रीमंत राजेसाहेबानीं मोठ्या आनंदाने त्याचे हस्तें हाराचा स्वीकार केला. कालमानानें बदलणाऱ्या परिस्थितीप्रमाणें सामाजिक व धार्मिक बाबतींत इष्ट त्या सुधारणा झाल्याच पाहिजेत, ही गोष्ट त्याना पटलेली होती. गादीवर आल्यावर पहिलीं काहीं वर्षें राज्यकारभारांत सुधारणा करण्यांत, लोकांच्या तक्रारी मिटविण्यात व संस्थानांत शांतता राखण्यांत गेलीं, यामुळें त्यांना अस्पृश्यांच्या प्रश्नाकडे लक्ष देण्यास फारसा वेळ मिळाला नाहीं. तथापि या प्रश्नाकडे त्याचें दुर्लक्ष झालें होतें असें नाहीं. सन १९२४ सालीं दलित-वर्गाचे शिष्टमंडळानें आपले म्हणणे ऐकून घेण्याबद्दल भोर दरबारास विनंति केली. श्रीमंत राजेसाहेबाचे आज्ञेवरून संस्थानचे कारभारी व इतर काहीं बडे अधिकारी यानीं पुणें येथें श्रीमंत राजेसाहेबांच्या वाड्यांत वरील शिष्टमंडळाची

भेट घेतली. श्रीमंत राजेसाहेबाच्या सूचनेप्रमाणें वाड्यातच शिष्टमंडळाच्या फराळाची व चहाची वगैरे व्यवस्था ठेवण्यांत आली होती. अधिकाऱ्यानीं शिष्टमंडळास एका बैठकीवर आपले शेजारीं बसवून त्यांचें म्हणणें शातपणें ऐकून घेतलें व त्यांनीं दाखविलेल्या अडचणी सहानुभूतिपूर्वक दरबारकडून दूर करण्याचा प्रयत्न करण्यांत येईल असें त्यांना श्रीमंत राजेसाहेबांच्या आज्ञेप्रमाणें आश्वासन देण्यांत आले. नंतर शिष्टमंडळातील सभासद व अधिकारी यानीं एकत्र बसून फराळ व चहापान केलें. यावरून श्रीमंत राजेसाहेबाची अस्पृश्याविषयीं मनोभावना कशी होती हें दिसून येईल. हिंदुसमाजातील अस्पृश्यता पूर्णपणें जरी नाहींशी करतां आली नाहीं तरी त्याना समाजात मिसळूं देण्यास व इतर हिंदूंप्रमाणें सामाजिक बाबतींत समानतेचे हक्क देण्यास काहीं हरकत नाहीं असें त्यांना वाटे. परंतु समाजातील निदान सुशिक्षित वर्गाची अनुकूलता असल्याशिवाय केवळ अधिकाराचे जोरावर कायद्यानें अस्पृश्यता नाहींशी करण्याचा प्रयत्न केल्यास अनिष्ट परिणाम होऊन बंडाळी माजण्याचा जास्त संभव आहे असें श्रीमंत राजेसाहेबांचें मत होतें. ते अनुकूल कालाची वाट पाहत होते.

पुण्यांत जेव्हां सन १९३१ सालीं अस्पृश्यतानिवारणाची चळवळ सुरू झाली तेव्हा संस्थानातील सुशिक्षित समाजावरहि त्या चळवळीचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. आपल्या संस्थानांतून ही अस्पृश्यता नाहींशी झाली पाहिजे असें संस्थानातील सुशिक्षित पुढाऱ्याना वाटूं लागलें, व त्या दिशेनें प्रयत्न करण्यास सुरुवात झाली. तसेंच सरकारनें या कामीं लक्ष घालावे अशी पुढाऱ्याची इच्छा असल्याचें दिसून आले. श्रीमंत राजेसाहेबांनीं या अनुकूल संधीचा ताबडतोब फायदा घेण्याचें ठारविलें. अस्पृश्यता समूळ नाहींशी करणें हें काम काहीं सोपें नाहीं. प्रजेचें जसजसें मतपरिवर्तन होत जाईल त्या मानानें तो नाहींशी होणारी आहे, अशी श्रीमंत राजेसाहेबाची दृढ समजूत असल्यामुळे अस्पृश्यांना सामाजिक बाबतींत प्रथम कांही हक्क देऊन त्यांजवर ह्या बाबतींत होत असलेला अन्याय दूर करण्याचें त्यानीं ठरविले, व अपृश्यतानिवारणार्थ पसरलेल्या सार्वत्रिक चळवळीमुळे हरिजनात जागृति होऊन त्याचेकडून मागणी येण्यापूर्वींच श्रीमंत राजेसाहेबानीं ता. १७ ऑक्टोबर सन १९३२ इ. रोजीं

भरलेल्या दुसऱ्या कायदेमंडळाच्या दुसऱ्या बैठकीचे वेळीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत अस्पृश्यतेबद्दल आपलें धोरण जाहीर केलें. त्यांत ते म्हणाले:—

## श्रीमंतांचें अस्पृश्यतानिवारणासंबंधीं भाषण

" सद्गृहस्थहो, आता आम्ही दुसऱ्या एका महत्त्वाच्या व प्रचलित विषयाकडे वळतों. बोर्डाच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या शाळा, दवाखाने, आरोग्य, पाणीपुरवठा, वगैरे बाबींशीं दिवसानुदिवस यापुढें कदाचित् जास्त रीतीनें संबंध येणाऱ्या एका सार्वजनिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाच्या बाबतींत आम्ही आपलें वैयक्तिक मत व आमच्या दरबारचें सामान्य धोरण कसें आहे व राहील तें आपणांस आजच्या या सुसंधीचा फायदा घेऊन जाहीर रीत्या सांगण्याचें योजिलें आहे. तो प्रश्न म्हणजे हल्लीं आपल्या हिंदुसमाजापुढें विशेष प्रामुख्यानें असणारी 'अस्पृश्यतानिवारणाची बाब' हा होय. अस्पृश्यवर्गाची म्हणजेच अस्पृश्यतेच्या कल्पनेची उत्पत्ति समाजोत्क्रांतीच्या दृष्टीनें पूर्वीं अधर्म्य अगर निषिद्ध मानलेल्या आर्य व अनार्य यांच्या मिश्र विवाहांपासून अथवा आर्यांच्याचमधील धर्मास असंमत असलेल्या प्रतिलोभ विवाहांपासून उत्पन्न झालेली असो, किंवा अशास्त्र विहित कर्माचरणामुळें भोगाव्या लागणाऱ्या जातिभ्रष्टतेसारख्या प्राचीन काळच्या समाजव्यवस्थेतील नियमाप्रमाणें गलिच्छ धंद्याच्या स्वीकारामुळें स्वाभाविकरीत्याच अंगीं चिकटणाऱ्या अस्वच्छतेच्या राहणीपासून प्रचलित झालेली असो, किंवा तत्कालपरिस्थितिजन्य अन्य कांहीं कारणापासून प्रादुर्भाव झालेली असो, ही कल्पना व तशी आचारपरंपरा निदान दोन हजार वर्षे तरी आपल्या समाजांत चालत आलेली आहे हें खास, हें जितकें सत्य आहे, तितक्याच सत्यतेनें व निश्चयानें असेंहि सांगता येतें कीं, हे स्पर्शास्पर्शाचे आचारविचार आपल्या समाजात मुळींच नव्हते असाहि एक काळ होता. आपल्या परमपूज्य व प्राचीनतम श्रुतिवाङ्मयांत ह्या विचारास आधार नाहीं असें तज्ज्ञ लोक खात्रीशीर रीतीनें सांगतात. जगन्नियंत्या परमेश्वरासंबंधींची आपली उदात्त कल्पना आहे. तिच्याशींहि ही समजूत न जुळणारी आहे. तसेंच धर्मतत्त्वाच्या शुद्ध स्वरूपापुढें मानवाच्या उच्च व व्यापक कल्पनेमध्यें अंतर्भूत असणाऱ्या समता, बंधुभाव, स्वातंत्र्यादि उदार ध्येयापुढेंहि केवळ जन्मामुळें अमुक इसम स्पृश्य व अमुक अस्पृश्य हा भेदभाव टिकूं शकत नाहीं,

इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष आजच्या रूढींच्या दृष्टीनेंहि या विषयाकडें पाहिलें तरी, विचारांत नसेना कां, पण आचारांच्या क्षेत्रांत पूर्वींपेक्षां आपल्या देशांत याविषयीं सध्यां बरीच क्रांति झाली आहे व ती पुष्कळशी अनिच्छेनें असली तरी व्यवहाराच्या सौकर्यार्थ घडून आली आहे हें स्पष्ट दिसून येणार आहे. तेव्हा, पुरातन कालच्या कारणांकडे न पाहतां किंवा रूढीलाच प्राधान्य न देता, आपणास प्रस्तुत कालच्या आपल्या हिंदु समाजाच्या सुस्थितीच्या व अभिवृद्धीच्या दृष्टीनें या विषयाचा विचार करून, या स्पर्शास्पर्शविषयासंबंधीं आपण आपल्या विचारात निदान सामाजिक आचारात तरी कालमानास अनुसरून इष्ट व अवश्य तेवढा फरक करणें प्राप्त आहे, असें आमचें व्यक्तिशः प्रामाणिक मत आहे व आमच्या दरबारचेंहि धोरण यास अनुसरून राहणार आहे. अर्थात् आमच्या प्रजाजनांपैकीं सर्व स्पृश्य बहुजनसमाजास आमचें इतकेंच सांगणें आहे कीं, त्यांनींहि या विषयाचा उदार मनानें विचार करून आपल्या समाजाची सध्याची बिकट परिस्थिति पूर्णतः व दूरवर पोहोंचणाऱ्या आणि खोल व व्यापक दृष्टीनें लक्षांत घेऊन, आपल्या सनातन समाज-धर्माच्याच उन्नत्यर्थ, सामाजिक व्यवहाराच्या बाबतींत तरी आपली वागणूक कालाच्या ओघास उचित अशीच ठेवण्याची प्रवृत्ति असू द्यावी. सत्य व शाश्वत धर्म आणि प्रसंगोपात व रूढ आचार यामधील भेद समजून घेऊन, जरूर तेथें व तितक्या प्रमाणांत अशा आचारास मुरड घालण्यास तयार असले पाहिजे. इतर धर्मीयाशीं वागताना आपण जितक्या प्रमाणात स्पर्शास्पर्श विचार चालवितों, त्यापेक्षां काहींतरी जास्त, निदान तितकें तरी, उदारतेनें व आपुलकीच्या भावनेनें, आपण आपल्याच धर्मांतील अस्पृश्य मानलेल्या बाधवाना वागविले पाहिजे हें थोड्या विचारातीं सर्वांस पटेल अशी आमची खात्री आहे. राज्यकर्ते या नात्यानें सर्व प्रजाजनांच्या धार्मिक व सामाजिक समजुतीस योग्य तो मान देण्याविषयी व त्या इतरांकडून दुखविल्या न जाण्याची तजवीज करण्याची जी जबाबदारी आमच्यावर आहे, ती लक्षात घेऊनच, स्पृश्य व अस्पृश्य हे दोन्ही समाज एकाच धर्माचे अनुयायी असल्यानें आम्ही ही सूचना आमच्या प्रजाजनापैकीं स्पृश्य हिंदुधर्मीयांना मुद्दाम करीत आहोंत; तिचा ते सुज्ञपणें योग्य तो विचार करतील असें आम्ही समजतों.

स्पृश्यांना आम्ही हें सागत आहोंत त्याचप्रमाणें आमच्या अस्पृश्य प्रजाजनांनाहि याविषयीं आम्हांस योग्य वाटतो तो सल्ला देण्याचें आमचें कर्तव्य असल्यानें, आम्ही तें आतांच करीत आहोंत. त्याकडे तेहि दुर्लक्ष करणार नाहींत अशी आमची खात्री आहे. कोणतीहि रूढी, मग ती चांगली असो वा वाईट असो, एकदम नाहींशी होत नाहीं. ‘ कळतें पण वळत नाहीं ’ अशीच स्थिति मानवी मनाची, वागणुकीच्या संबंधांत तरी, काहीं दिवस स्वभावतःच राहते. खुद्द अस्पृश्यामध्येंहि ज्या अनेक जाती व पोटजाती आहेत, त्याना सुद्धां आप्रसांतील वर्तणुकीचे अशा स्वरूपाचे भेद व उच्चनीच कल्पनेचे प्रकार ताबडतोब नष्ट करणें किती पंचाइतीचें होतें हें अस्पृश्यांच्याच पुढाऱ्याना कळून येत असल्यानें, जरा सबूरीनें घेण्याबद्दल त्यांना व त्याच्या अनुयायांना आज आम्हीं इषारा देत आहोंत. त्याची उपयुक्तता व युक्तता त्यांना सहजीं पटणार आहे. कोणतीहि सुधारणा एखाददुसऱ्याच व्यक्तीस तत्क्षणीं आपल्या आचारविचारात घडवून आणणें शक्य असलें तरी, बहुजनसमाजाच्या मतांत व वागणुकींत तिला अनुकूल असा बदल घडवून आणवून प्रस्थापित करण्यांत साहजिकरीत्याच कालावधि लागतो. इतिहासाची शिकवण तीच आहे. सर्वसामान्य मानवी मनाची घडण अशी करण्यात ईश्वराचा सद्धेतुच असला पाहिजे. करणें तें सावधपणें करण्यानें त्यांत पुढेंमागें चूक होण्याचा संभव कमी असतो. मात्र, यात हेतुपुरःसर दिरंगाई अगर टाळाटाळीचा प्रकार नसावा म्हणजे झाले. याच्या उलट, आपले विचार दुसऱ्यावर केवळ सामर्थ्यानें अगर अडवणुकीच्या वगैरे मार्गानें लादूं लागल्यास, अशा मार्गानें कायमची व हितपरिणामी सुधारणा होत नाहीं. क्रमाक्रमानें लोकांच्या समजुतींत सलोख्यानें व उपदेशानें पाहिजे तो बदल घडवून आणवून जें साध्य होईल तें उभयपक्षीं खऱ्या हिताचें व टिकाऊ स्वरूपाचें होईल. तेव्हां अस्पृश्य मंडळींनीं व त्यांच्या नेत्यांनीं सर्वच बाबतींत एकदम घाई अथवा उतावीळपणा करूं नये, किंवा दुराग्रह धरूं नये व समंजसपणाहि सोडूं नये. त्यानीं आपली वागणूक स्वच्छ ठेवावी व मेलेल्या जनावरांचें मांस खाण्याचें सोडून द्यावें, आपल्या पोटजातींमधील उच्चनीच भाव होईल तितका कमी करण्याचा प्रयत्न करावा. त्यांची मनःस्थिति आम्हास समजत नाहीं असें नाहीं, त्यांच्या

अडीअडचणी आम्ही पूर्णतः जाणत आहोंत. त्यांच्याविषयीं आमच्या मनांत सहानुभूति खरीखुरी आहे, आपलेपणा आहे; म्हणूनच, किंचित् काल वाट पहा, इतकेंच आमचें म्हणणें आहे; स्वस्थ बसा, असें नाहीं. कालाचें आनुकूल्य बरोबर घेऊन चाला, इतकाच आमच्या सांगण्याचा तात्पर्यार्थ आहे. कालाचा म्हणजेच कालोत्पन्न विचाराचा अंमल सर्वत्र व सर्वांवर चालतोच. कालाच्या ओघापुढें अनिष्ट, निरर्थक व निरुपयोगी रूढींस कितीहि चिकटून राहावयाचें एखाद्यानें म्हटलें, तरी तें चालणारच नाहीं. अशा रूढी कालांतरानें नामशेष होणारच. फक्त जरा दमानें घेतलें पाहिजे व थोडें धीरानें वागण्याचा त्यांनीं निश्चय मात्र केला पाहिजे. इतकेंच आमचें त्याना सागणें आहे. कार्यसिद्धीस विवेकाची जरूरी आहे. ध्येय यशस्वी व्हावें म्हणूनच आम्ही हें सागतों. त्याची सयुक्तता, परिस्थितीचा विचार केल्यास, त्याना पटेल अशी आमची मनोदेवता आम्हास सागत आहे.

या महत्त्वाच्या व निकडीच्या प्रश्नासंबंधीं आमचें वैयक्तिक मत काय आहे तें आम्हीं आपणास वरती स्पष्ट सांगितलेंच आहे. अस्पृश्यता कायमची नष्ट व्हावी, निदान सार्वजनिक व्यवहारात तरी तिचें नाव ऐकूं येऊं नये, असेंच आमचें ध्येय आहे. हें ध्येय शुद्ध धर्म, ईश्वरी इच्छा व माणुसकीची कल्पना या त्रयीशीं सुसंगत कसें आहे आणि तें आपण क्रमानें परंतु नेटाच्या प्रयत्नांनीं व पूर्ण अंतःकरणपूर्वक कळकळीनें, शक्य तितक्या लवकर साध्य करून घेण्याची इष्टता व जरूरी का आहे तेंहि आम्हीं आपणास थोडक्यांत परंतु स्वच्छ रीतीनें सांगितलें आहे. या प्रश्नास कायदेशीर बाजू असल्यास, त्या दृष्टीनें आमचें हें सांगणें नाहीं; किंवा असें करण्यानें आमच्या प्रजाजनापैकीं कोणाहि व्यक्तीच्या धार्मिक समजुतीस किंवा खाजगी आचारविचारास बाध आणावा अशीहि आमची इच्छा नाहीं. कायद्याचे प्रश्न यात उपस्थित झाल्यास, राज्यकर्ते या नात्यानें योग्य असेल तेंच आम्ही करूं.

वरती जो आम्हीं या प्रश्नाचा ऊहापोह केला आहे तो हिंदुधर्माभिमानी व हिंदुसमाजाच्या उन्नतीविषयीं आस्था वाटणारी आपल्यापैकींच एक व्यक्ति या नात्यानें केला आहे व या नात्यानें इतर जनाप्रमाणेंच आम्हास जें वाटतें व अभिप्रेत आहे तें लोकास सागणें व पटविणें व त्या बाजूनें अवश्य व इष्ट ती

समाजसुधारणा घडवून आणण्याचा यथाशक्ति प्रयत्न करणें हें एक आमचें पवित्र कर्तव्य असल्यानें तें आम्हीं केलें आहे. त्याचा योग्य तो विचार आमच्या सधर्मी प्रजाजनानीं करण्यांतील आहे.

सज्जनहो, येथपर्यंत आमचे विचार आम्हीं सांगितले. या बाबतींत आम्हीं सध्या प्रत्यक्ष काय कृति करण्याचें ठरविलें आहे, तें सांगितल्यावाचून या विषयाची सांगता होणार नाहीं ह्याची जाणीव आम्हास असल्यानें, आम्ही आज असें जाहीर करतों कीं, **अस्पृश्यता-निवारण करण्याची सुरुवातीची पायरी म्हणून, यापुढें आमच्या राज्यांत सरकारी शाळा, कोर्टें, कचेऱ्या, ( देवळांशीं संबंध नसलेल्या ) चावड्या व धर्मशाळा या ठिकाणीं स्पर्शा-स्पर्श विचार पाळला जाणार नाहीं.** यासंबंधींचा जाहीरनामा आम्ही लवकरच काढणार आहोंत.

कायदेमंडळाचे सभासदहो, वरील प्रश्नास विवेचनाची व कार्याची परिपूर्ति होण्याच्या दृष्टीनें व त्यास आनुषंगिक म्हणून आपणांसहि आम्हीं या बाबतींत केवळ दिग्दर्शन म्हणून काहीं सांगण्याचें योजिलें आहे. अंतिम साध्य व त्याची इष्टता व आवश्यकता आम्हीं सांगितलीच आहे. आपणास तें पटल्यास साधनाची गोष्ट बहुतांशीं आपल्याच हातीं असल्यामुळें त्याकडे आम्ही आपले लक्ष मुद्दाम वेधीत आहोंत. आपण प्रजाजनाचे नेते आहात; तेव्हा या प्रश्नाची जरूर तेथें व योग्य वेळीं बहुजनसमाजात जागृति करून इष्ट ती सुधारणा सुकर रीतीनें व सत्वर घडवून आणण्याचे बाबतींत आपण झटल्यास, समाजास व आम्हासहि आपलें मोठे साहाय्य होणार आहे. आपलें तें सामाजिक कर्तव्यच आहे. लोकमत या गोष्टीस अनुकूल करून घेऊन, सर्वांचे कल्याणाचा व प्रगतीचा मार्ग मोकळा करणें व त्यावरून सर्वांस न ठेचाळता जातां येणें सुशक्य करणें याकडे आपले मन लावून अहर्निश, मनःपूर्वक व सर्व तऱ्हेनें खटपट कराल अशी आम्ही उमेद बाळगल्यास तें अस्थानीं होईल असें आम्हांस वाटत नाहीं. मार्ग अडचणीचा आहे व कार्य बिकट आहे हें आम्ही जाणून आहोंत; तथापि तो चाळून गेलेंच पाहिजे व कार्य केलेंच पाहिजे हेंहि तितकेंच खरें आहे. तेव्हां लघुतम-विरोधाच्या मार्गानें जाऊन अखेरचा पल्ला कसा गांठावयाचा तें आम्ही आपल्याच सारासार विचारावर व योजनेवर अवलंबून ठेवितों. त्यासंबंधींची

एखादी योग्य विधायक योजना तयार करून ती आमच्यासमोर मांडल्यास आम्हास फार आनंद होईल व तिचा आम्ही काळजीपूर्वक अवश्य विचार करूं.

शेवटीं, या महत्त्वाच्या प्रश्नाच्या बाबतींत आपल्या व आमच्या सर्व स्पृश्यास्पृश्य प्रजाजनाच्या विचारास व आचारास योग्य ती दिशा प्रभू श्रीरामचंद्र लावण्याची कृपा करो व आपल्या सनातन धर्माची उन्नति व अभिवृद्धि होण्यास मदत करो, अशी त्याची अनन्यभावे प्रार्थना करून आम्ही या विषयाची तूर्त रजा घेतों; व यापुढें नेहमींप्रमाणें कौन्सिलचें काम आता चालणारे आहे असे सुचवून आम्ही आपलें भाषण पुरें करतों."

या भाषणात श्रीमंत राजेसाहेबानीं जाहीर केलेल्या धोरणास अनुसरून दरबारतर्फे संस्थानात पुढें लवकरच जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला.

श्रीमंत राजेसाहेबाच्या अस्पृश्यतेबाबतच्या धोरणाबद्दल ज्ञानप्रकाशाच्या शुक्रवार ता. २१ ऑक्टोबर १९३२च्या अंकात अग्रलेख प्रसिद्ध झाला. त्यांतील महत्त्वाचा उतारा खालीं दिला आहे.

## भोर दरबार व अस्पृश्यतानिवारण

"कोल्हापूर दरबारने अस्पृश्यतानिवारणासंबंधानें काढलेल्या जाहीरनाम्याचें स्वागत करताना, आम्ही आपल्या लेखात अशी दृढ आशा व्यक्त केली होती कीं, अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत महाराष्ट्रातील इतर संस्थानेंहि कोल्हापूर दरबारचें अनुकरण करावयाला लौकरच धैर्यानें पुढें येतील. आम्हीं व्यक्त केलेली ही आशा सफल होण्याचीं सुचिन्हें दिसत असून भोर दरबारनें या बाबतींत चागली आघाडी मारली आहे, ही खरोखर अत्यंत समाधानाची गोष्ट होय. भोर संस्थानांतील सुधारलेल्या कायदेमंडळाची दुसरी बैठक भोर येथें नुकतीच भरली होती. त्या सुप्रसंगीं प्रास्ताविक भाषण करताना, भोर संस्थानचे सुविद्य, प्रगमनशील आणि लोकहिततत्पर अधिपती श्री. बाबासाहेब पंतसचिव यांनीं असें जाहीर केलें कीं, सुरुवातीची पायरी म्हणून यापुढें आमच्या राज्यांत सरकारी शाळा, कोर्टें, कचेऱ्या, ( देवळांशीं संबंध नसलेल्या ) चावड्या व धर्मशाळा, या ठिकाणीं स्पृश्यास्पृश्य-विचार पाळला जाणार नाहीं. यासंबंधींचा जाहीरनामा आम्ही लौकरच काढणार आहों.

श्री. बाबासाहेब पंतसचिव यांनीं दिलेल्या या जाहीर आश्वासनाबद्दल आम्ही त्यांचें मन:पूर्वक अभिनंदन करतों; आणि 'सुरुवातीची पायरी' म्हणून त्यांनीं आखलेला हा कार्यक्रम अक्षरश: आणि अर्थश: त्यांच्या राज्यांतील सर्व लहानथोर अधिकारीवर्गाकडून आणि नागरिकांकडून पाळला जाईल, अशी उमेद बाळगतों. श्रीमंताना या बाबतींत कित्येक दुटप्पी मंडळीप्रमाणें अगदीं आणीबाणीची परिस्थिति उत्पन्न होईपर्यंत खचित स्वस्थ बसतां आलें असतें. पण त्यानीं तसा भ्याडपणाचा मार्ग न स्वीकारता स्वत:चें कर्तव्य व जबाबदारी ओळखून शक्य तेवढ्या त्वरेनें या महत्त्वाच्या प्रश्नाला हात घातला, व असंदिग्ध रीतीनें अस्पृश्यतानिवारणाच्या बाजूला आपले वजन टाकले, ह्याबद्दल अस्पृश्य-वर्ग त्यांचा कृतज्ञ राहील यात शंका नाहीं."

सुधागड तालुक्यांतील हरिजन-सेवासंघाचे कार्यकर्त्यांना उत्तेजन मिळून त्यांनीं जाहीरनाम्याप्रमाणें कार्य करण्यास सुरुवात केली. पाली येथील उत्साही कार्यकर्ते श्रीयुत बापूसाहेब लिमये यांनीं कांहीं सहकाऱ्याच्या मदतीनें, सनातनी-वर्गाच्या विरोधाला भीक न घालता, हरिजन सेवासंघाचें कार्य उत्तम रीतीनें चालविले आहे. श्रीमंत राजेसाहेबानीं त्याच्या या कार्यास ३०० रुपयांची मदत देऊन आपली सक्रिय सहानुभूति दाखविली आहे. सुशिक्षितवर्गानें पुढाकार घेऊन लोकांचीं मनें वळवून अज्ञ व रूढिप्रिय जनतेंत हरिजनाविषयीं आस्था व कळकळ उत्पन्न करून हळूहळू अस्पृश्यता घालविण्याचा प्रयत्न करावा अशी श्रीमंत राजेसाहेबांची इच्छा असल्यामुळें ज्या ज्या ठिकाणीं असे संघ निघतील त्यांना मदत देण्यास श्रीमंत राजेसाहेब नेहमीं तयार असतात.

श्रीमंत राजेसाहेब अस्पृश्यतेबाबतचें आपलें धोरण वर दिलेल्या भाषणांत जाहीर करून थाबले नाहींत, तर तें त्यांनीं प्रत्यक्ष कृतींतहि आणलें. १९३५ च्या जूनमध्यें त्यांना ' राजा ' ही पदवी मिळाल्याबद्दल सर्व प्रजाजनांनीं मानपत्रें अर्पण करून त्याचें अभिनंदन केलें. त्या मानपत्रांच्या समारंभांत पाली हरिजन सेवासंघाचें मानपत्र अस्पृश्यांकडून दरबारांत स्वीकारून त्यांना समानतेनें वागविलें. ह्या अस्पृश्योद्धारक सहानुभूतीच्या सक्रिय धोरणाबद्दल महाराष्ट्र प्रांतिक हरिजन-सेवकसंघाचे त्या वेळचे अध्यक्ष कै. गो. कृ. देवधर यांनीं लागलेंच

पत्र पाठवून श्रीमंतांचें हार्दिक अभिनंदन केलें. तें पत्र राजा पदवी मिळाल्या-बद्दलच्या हकीकतींत पुढें देण्यांत आले आहे.

## आपद्ग्रस्तांस मदत

### जांभुळपाडा जलप्रलय

श्रीमंत राजेसाहेब अत्यंत उदार वृत्तीचे आहेत. दयाशीलता हें त्याच्या स्वभावाचें वैशिष्टय आहे. दु:खी, कष्टी, अभागी जनता त्याच्या दृष्टीस पडली अगर एखादी अत्यंत दु:खकारक वार्ता त्याच्या कानीं आली, तर त्यांचें कोमल अंत:करण दु:खानें व्याकुळ होतें व संकटग्रस्ताच्या संकटनिवारणार्थ आपणास कोणता उपाय योजता येईल याकडे त्याचे चित्त ताबडतोब वेधले जाऊन ते सढळ हातानें आर्थिक मदत करतात. त्या वेळीं ते लहानमोठा, दीनदुबळा, हा भेद न मानता संकटातून मुक्तता करण्याकरिता जातीनें प्रयत्न करितात.

१९२३ च्या जुलै १९ तारखेस भोर संस्थानपैकीं सुधागड तालुक्यातील जाभुळपाडा व आसपासच्या काहीं गावात अतिवृष्टि होऊन लोकाचीं घरे-दारें बुडालीं, गुरें वाहून गेलीं, पिके जलमय झालीं, सर्व लोक निराश्रित झाले. ही बातमी श्रीमंत राजेसाहेबाच्या कानीं आल्यावर त्यांना अत्यंत दु:ख झाले. त्यांनीं ताबडतोब आपल्या अधिकाऱ्यांना जरूर ती सर्व प्रकारची मदत देण्याबद्दल हुकूम सोडले. इतकेंच नव्हे, तर जलमय झालेल्या ठिकाणीं स्वत: सर्व परिस्थिति नजरेखालीं घालण्यास ते तेथें जाण्यास निघाले. त्या वेळीं भर पावसाळ्याचे दिवस होते. जाभुळपाडा येथें जाण्यास सोईची सडक नव्हती. त्यामुळें त्या वेळीं त्याचा नाइलाज झाला. तथापि त्यामुळें निराश होऊन ते स्वस्थ बसले नाहींत. काहीं अधिकाऱ्यांना तेथें पाठवून त्यांनीं गोरगरिबाना खाण्यास अन्न व पाघरण्यास कपडा सर्वांना मिळेल अशी तजवीज केली. निराश्रित झालेल्या लोकांना घरेदारें बाधण्यास सरकारी फॉरेस्टातील लांकडें देण्यात आलीं. त्याच-प्रमाणें पिकांची पाहणी करून सारामाफी करण्यात आली. पुढें कांहीं दिवसानीं पाऊस थांबल्यावर म्हणजे ता. २४ सप्टेंबर १९३३ इ. रोजीं स्वत: तेथें जाऊन निराश्रित झालेल्या आपल्या प्रजाजनांची स्वत: विचारपूस करून रु. ७१० सारासूट आणि रु. ४१० देणगीदाखल देऊन श्रीमंत राजेसाहेबानीं आपली सहानुभूति व्यक्त केली. अशा प्रकारचा उदारधी राजा आपल्याला लाभला याबद्दल त्या दीन जीवाना किती धन्यता वाटली असेल !

---

## प्रकरण १० वें

# ब्रिटिश सरकारशीं भोर दरबारचें सहकार्य

### महाराष्ट्रांतील धरणांचे कामीं सहकार्य

महाराष्ट्रांत वरचेवर पडणाऱ्या दुष्काळापासून शेतकऱ्यांचा अंशतः तरी बचाव करण्याच्या हेतूनें दुष्काळ-कमिशनच्या सूचनांस अनुसरून महाराष्ट्रात पाटबंधाऱ्याचीं कामें सुरू करण्याकरिता मुंबई इलाख्यांत इ. स. १८६२ सालीं इरिगेशन ( पाटबंधाऱ्याच्या ) खात्याची स्थापना करण्यांत आली. सदरचे खात्यामार्फत कर्नल फाइफ व मि. व्हाइटिंग या दोन एंजिनियरांनीं महाराष्ट्राची पाहणी करून पाणी अडविण्याकरिता दगडी बांधकामाची धरणें बांधण्यास योग्य अशीं तीन ठिकाणें पसंत केलीं. तीं तीन ठिकाणें म्हणजे पुणें जिल्ह्यांतील खडकवासले व वीर आणि सातारा जिल्ह्यांतील भोर-नजीकचें भाटघर हीं होत. हीं तीनहि ठिकाणें जरी ब्रिटिश हद्दींत आहेत तरी या ठिकाणीं धरणें बाधून आडवावयाच्या मुठा, वेळवंडी व निरा या नद्यांचे उगम भोर संस्थानच्या हद्दींत असून अडविलेल्या पाण्याखालीं भोर संस्थानचाच बराचसा मुलूख बुडणारा असल्यामुळें सदर कामास भोर संस्थानची मान्यता, सहानुभूति व सहकारिता यांची जरूरी होती.

प्रथम मुठा नदीस खडकवासलें येथें धरण बांधण्याची मंजुरी मिळाली. तेव्हां संस्थानची मान्यता व मदत मिळण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेब यांचे परम-पूज्य आजोबा कै. श्रीमंत नानासाहेब याना इंग्रज सरकारकडून लिहून आले. तेव्हां भोर दरबारकडून सन १८२० सालच्या तहांतील कलम ६ व ९ यातील कराराप्रमाणें संस्थानचें कोणत्याहि प्रकारें नुकसान न होईल अशा शर्तीवर धरणाचे कामास मान्यता असल्याचें लिहून गेलें. नंतर सदर धरणाचे कामास सुरुवात होऊन तें काम सन १८७१ सालीं पुरें झाले. या धरणाचे कामीं भोर संस्थानापैकीं ७ गावातील मिळून अदमासें रु. ७२१ आकाराची २८० एकर जमीन पाण्यांत बुडाली, व तिचे मोबदला तितक्या आकाराच्या सुमारें ४२० एकर क्षेत्राच्या ब्रिटिश हद्दींतील जमिनी संस्थानास मिळाल्या. त्या वेळीं पाण्यात बुडणाऱ्या जमिनीबद्दल जमिनी देण्याचें तत्त्व इंग्रज सरकारनें मान्य

करून सन १८२० सालच्या तहांतील कलम ६ व ९ यांत केलेला करार पाळला. या धरणाच्या कामीं भोर दरबारनेंहि इंग्रज सरकारास लागेल ती मदत देऊन इंग्रज सरकारशीं सहकार्य केले. या धरणाची कल्पना व योजना कर्नल फ़ाइफ या एंजिनियराची असल्यामुळे या खडकवासला धरणास 'लेक फाइफ' (Lake Fife) असे नाव देण्यात आले.

खडकवासल्याचें धरण पुरे होण्याच्या सुमारास म्हणजे इ. स. १८७० सालीं मुंबई सरकारने भाटघर येथें वेळवंडी नदीस व वीर येथें निरा नदीस अशीं आणखी दोन धरणें बाधण्याचे ठरविले व त्याप्रमाणें संमतीकरिता भोर दरबारकडे लिहून आले. संस्थानचे व रयतेचें अतिशय नुकसान होणार म्हणून हीं दोन्ही धरणें होऊं देण्यास संस्थानची नाखुषी होती. परंतु शेजारच्या ब्रिटिश हद्दीतील शेतकऱ्याचा दुष्काळापासून बचाव करण्याकरिता धरणें बाधावयाचींच असतील तर त्यामुळे संस्थानची होणारी नुकसानी, जितका संस्थानचा प्रदेश पाण्यात जाईल त्याबद्दल रयतेस योग्य मोबदला मिळून शिवाय संस्थानचे नुकसानभरपाईसाठीं तितक्याच मगदुराचीं संस्थानालगतचीं ब्रिटिश हद्दींतील गांवे त्यांवरील राजसत्तेसुद्धा (ज्युरिस्डिक्शन) मोबदल्यांत मिळवींत असा सरकारी ठराव झाल्याशिवाय धरणाच्या कामास सुरुवात करण्याचे हुकूम देण्यात येऊं नयेत, अशी यादी कै. श्री. नानासाहेब यानीं सन १८७० सालीं इंग्रज सरकारकडे पाठविली.

पुढें सन १८७१ सालीं श्रीमंत नानासाहेब कैलासवासी झाले व श्रीमंत राजेसाहेबांचे वडील गादीवर आले त्या वेळीं त्याचें वय १७ वर्षांचें होतें. म्हणून त्याच्या अज्ञानावस्थेंत संस्थानचा कारभार रीजन्सीमार्फत सुरू झाला. रीजन्सींत ब्रिटिश सरकारनें नेमलेले कारभारी होते. रीजन्सीचा कारभार सुरू असताना भाटघर धरणाखालीं बुडणाऱ्या जमिनीची ब्रिटिश सरकारने संस्थानच्या अधिकाऱ्याच्या मदतीनें पाहणी करून नुकसानभरपाईबद्दल संस्थानास दरसाल सुमारे १०७४१ रुपये नक्तीनें द्यावे लागतील असा अंदाज करण्यांत आला, व या रकमेस मान्यता आहे कीं नाहीं याबद्दल भोर दरबार-कडे लिहून आलें. संस्थानच्या कारभाऱ्यानीं नुकसानभरपाईकरिता ठरविण्यात आलेली वरील रक्कम मान्य असल्याचें ब्रिटिश सरकारास लिहून कळविले व

त्याबरोबरच पूर्वी कै. श्री. नानासाहेबानीं पाठविलेल्या यादीचा उतारा देऊन नक्त रकमेऐवजीं नुकसानीचे मोबदल्यांत वरील उत्पन्नाचीं ब्रिटिश हद्दींतील गावें मिळावींत अशीहि मागणी केली होती.

हा पत्रव्यवहार झाल्यानंतर ९ वर्षें हा प्रश्न तसाच पडून होता. कै. श्रीमंत रावसाहेब वयांत येऊन त्यांचे हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें आल्यानंतर सन १८८१ सालीं "भाटघर धरणांत जाणाऱ्या जमिनींची पुन्हां पाहणी करून नुकसानभरपाईची रक्कम ठरविण्याकरितां ऑफिसर पाठविणार आहोंत. त्यांना लागेल ती मदत द्यावी." असें ब्रिटिश सरकारांतून भोर दरबारास लिहून आलें. पूर्वी पाहणी होऊन रकमेचा आंकडा ठरला असतां पुन्हां पाहणी करण्यांत येत आहे हें पाहून भोर दरबारास आश्चर्य वाटल्यावाचून राहिलें नाहीं. नवीन पाहणी करण्यात रकमेचा आकडा कमी करण्याचा सरकारचा हेतु नसेलना अशीहि शंका आल्यावाचून राहिली नाहीं. तथापि कै. श्रीमंत रावसाहेबानीं मोजणीकरितां आलेल्या अधिकाऱ्याना सर्व प्रकारें मदत देऊन मोजणीचे कामीं कोणत्याहि प्रकारें व्यत्यय येऊं दिला नाहीं.

भाटघर व वीर येथील दोन्ही धरणांकरितां घ्याव्या लागणाऱ्या जमिनींची मोजणी होऊन आकारणी करण्यांत आली. भाटघर धरणासाठीं ३१ गांवांतील मिळून ५५३१ रुपये आकाराच्या अदमासें ४९४८ एकर क्षेत्राच्या जमिनी व वीर येथील धरणासाठीं ८ गांवांतील ७६५ रु. आकाराच्या १२१० एकर क्षेत्रफळाच्या जमिनी घ्याव्या लागतील असा अंदाज ठरला. पुन्हां पाहणी करण्याचें जेव्हा ब्रिटिश सरकारनें ठरविलें त्या वेळीं वाटलेली भीति खरी ठरली. पूर्वी ठरविलेल्या रकमेंत साडेचार हजारांचा काट मारण्यांत आला, व नुकसानभरपाईकरितां नक्तीनें रक्कम घ्यावी असें सुचविण्यांत आलें.

कै. श्रीमंत नानासाहेब यांनीं जमिनीच्या मोबदला जमीन मिळावी अशी यादी दिली होती. त्यानंतर कै. श्रीमंत रावसाहेब याच्या अज्ञानावस्थेंत ब्रिटिश सरकारनें नेमलेल्या कारभाऱ्यांनींहि तीच मागणी केली होती. तथापि, नुकसानीचा मोबदला ऐन रक्कमेंतच घ्यावा असें सरकारचें म्हणणें पडलें. यावर प्रदेश बुडून जी नुकसानी होते तिचा मोबदला रुपये, आणे, पैनीं आकारतां येत नाहीं; संस्थानचें महत्त्व क्षेत्र, लोकसंख्या, व वसुली इत्यादि बाबींवर

अवलंबून असतें; क्षेत्र कमी झाल्यानें संस्थानला कमीपणा येतो; क्षेत्राच्या नुकसानीची भरपाई मोबदला गांवें मिळाल्याशिवाय कशानेंहि होणार नाहीं; जमीनमहसुलाखेरीज स्टँप, कोर्टफी, कोंडवाडा, रिव्हिजन सर्व्हेनें होणारी वाढ वगैरे अनेक प्रकारें मिळणारें उत्पन्न क्षेत्र व त्यावरील राजसत्ता नाहींशी झाल्यानें बुडणारें आहे, इत्यादि सयुक्तिक कारणें दाखवून कै. श्रीमंत रावसाहेबांनीं मुंबई सरकारशीं बराच युक्तिवाद केला. परंतु तो सरकारास पटला नाहीं. शेवटीं सन १८८३ सालीं नुकसानभरपाईबद्दल संस्थानला मोबदल्यांत जमीन देता येत नाहीं, दरसाल ऐन रकमेंतच मोबदला घेतला पाहिजे, असें जेव्हा सक्तीचें लिहून आलें तेव्हा नाइलाजास्तव कै. श्रीमंत रावसाहेबांना ब्रिटिश सरकारच्या म्हणण्यास नाखुषीनें संमति देऊन ब्रिटिश सरकारशीं स्वार्थत्यागपूर्वक सहकार्य करावें लागले. हीं दोन्ही कामें १८९४ सालीं पुरीं झालीं. या दोन्ही धरणांपायीं संस्थानास १० चौरस मैल क्षेत्रफळास मुकावें लागलें. भाटघर धरणाची योजना मि. व्हाइटिंग यांची असल्यामुळें या जल-संचयास 'लेक व्हाइटिंग' असें नांव देण्यांत आलें.

खडकवासला, भाटघर व वीर येथील तीन धरणांमुळें संस्थानचें जें क्षेत्र कमी झालें तें लक्षांत घेऊन ब्रिटिश सरकारांतून धरणाच्या कामाकरितां पुन्हा संस्थानांतील जमिनीची मागणी करण्यात येणार नाहीं असें वाटत होतें. परंतु हिंदुस्थानांत सन १९०० सालीं फार मोठा दुष्काळ पडल्यानंतर त्या वेळचे कर्तबगार व मुत्सद्दी व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं दुष्काळनिवारणाचा प्रश्न पुन्हा हातीं घेऊन पाटबंधाऱ्याचें म्हणून एक कमिशन (Irrigation Commission) नेमिलें. त्या कमिशननें सुमारें ३ वर्षें सर्व देशभर फिरून आपला रिपोर्ट सादर केला. त्यांत ४४ कोटि रुपये खर्चून ठिकठिकाणीं आणखी धरणें वाढवून काळव्यांवरील शेतीस उत्तेजन द्यावें, अशा शिफारसी होत्या. या शिफारशींत भाटघर येथील धरण वाढविण्यासंबंधीं एक सूचना होती. ही सूचना म्हणजे संस्थानच्या शरीराचा आणखी एक लचका जाण्याचा प्रसंग! या सूचनेस अनुसरून सर्व्हे करणें, योजना आंखणें, वगैरे हालचाली सुरू झाल्या. या योजनेस पूर्वीप्रमाणेंच भोर दरबारची परवानगी व सहकारिता मागण्यांत आली व आणखी अजमासें ४० गांवांपैकीं सुमारें ५२०० एकर म्हणजे ८ चौरस मैलांचे

क्षेत्रफळाची या कामासाठीं मागणी करण्यांत आली. मागील धरणाचे वेळीं कटु अनुभव आल्यामुळें कै. श्रीमंत रावसाहेब यानीं सर्व अडचणी ब्रिटिश सरकारपुढें चिकाटीनें मांडिल्या व बड्या अधिकाऱ्याना प्रत्यक्ष जागेवर नेऊन वस्तुस्थिति दाखविण्यांत आली. अखेर या सर्व खटपटीचा सुपरिणाम होऊन मुंबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड सिडनहॅम यांनीं सन १९०९ सालीं संस्थानचा जेवढा मुलूख भाटघरचे वाढणाऱ्या धरणांत बुडेल त्याच्या बदला तितक्याच मगदुराचा ब्रिटिश मुलूख राजसत्तेसह संस्थानला देण्याचें ठरविलें, व त्याप्रमाणें पोलिटिकल एजंट-मार्फत भोर दरबारास लेखी कळविण्यांत आलें. मोबदल्यांत ब्रिटिश मुलखातील गावें देण्यात येतील असे लेखी आश्वासन मिळाल्यावर भोर दरबारनें भाटघर धरण वाढविण्यास संमति दिली.

प्रथम भाटघरचें पहिलें धरणच उंच वाढविण्याची योजना होती. परंतु प्रत्यक्ष काम सुरू करतेवेळीं दिसून आलेल्या अडचणींचा विचार होऊन पहिले धरण पोटात ठेवून त्याखालीं काहीं अंतरावर नवीनच सुमारे १५० फूट उंचीचे व एक मैल लांबीचें धरण बांधण्याचें निश्चित ठरले व या कामावर अनुभविक व तडजोड करण्यात कुशल अशा मि. सी. बी. पूली, एक्झिक्यूटिव्ह एंजिनियर, यांची नेमणूक करण्यांत येऊन सन १९१२ सालीं कामास सुरुवात झाली.

काम सुरू झाल्यानंतर ज्या अनेक अडचणी उत्पन्न झाल्या त्या भोर दरबारच्या सहकार्यामुळें दूर होऊन धरणाचें काम सुरळीतपणें चालू झालें. पूर्वी इंग्रज सरकारच्या सूचनेवरून कापूरवहाळ ते भाटघर व तेथून भोरपर्यंत संस्थानचे हद्दींत केवळ भाटघर धरणाच्या सोयीकरिता म्हणून सुमारें ९ मैलाचा जवळचा रस्ता ५० हजार रुपये खर्च करून बाधला होता. पहिल्या धरणाचे वेळीं धरण तयार झाल्यावर धरणावरून गाड्याघोड्यांचे रहदारीस वाट मिळेल असें सांगण्यांत आल्यावरून भोर दरबारनें वरील खर्च केला. परंतु धरण तयार झाल्यावर धरणावरून गाड्याचे रहदारीस परवानगी देण्याचें नाकारण्यांत आलें. यामुळें पर्जन्यकाळ शिवायकरून फक्त ८ महिने व पुणें ते भोर जवळचा रस्ता म्हणून या रस्त्याचा उपयोग करण्यांत येई.

नवीन धरणाचें काम सुरू झाल्यावर धरणास लागणारी चुनखडी वगैरे माल, पुण्याहून आणावयाचा. माल आणावयास कापूरवहाळ ते भाटघरचा रस्ताच

जवळचा होता. या रस्त्यावर गुंजवणी नदीस पूल नसल्यामुळें पावसाळ्यात या रस्त्याचा उपयोग नव्हता. ही अडचण दूर करण्याकरिता इंग्रज सरकारनें ७० हजार रुपये खर्च करून पूल बांधिला व धरणाचें काम पुरें झाल्यावर या पुलाचा उपयोग संस्थानास कायमचा होणार असल्यामुळें संस्थानकडे मदत मागण्यात आली. भोर दरबारनेंहि तत्काळ २५ हजार रुपयांची मदत दिली. या नवीन प्रचंड कामानिमित्त सतत सुरू राहणाऱ्या मालाच्या वाहतुकीमुळे या रस्त्याची फार खराबी होऊं नये म्हणून धरणाचे कामास लागणाऱ्या मालास संस्थानचा टोल माफ करून रस्ता चागल्या स्थितींत ठेवण्याचे शर्तीवर तो ब्रिटिश इरिगेशन खात्याचे स्वाधीन करण्यांत आला व रस्त्याची वार्षिक दुरुस्ती भाटघरचे अधिकाऱ्यांकडेच सोंपविण्यांत आली. पोलिस बंदोबस्ताची व बाजारहाटाची व्यवस्था ऑक्ट्रॉय न घेतां भोर दरबारनें ठेविली. कामाची खोटी होऊं नये म्हणून कायद्याचे औपचारिक नियम बाजूस ठेवून संस्थानांतील जमिनी त्वरित भाटघरचे अधिकाऱ्यांचे स्वाधीन करण्याची व्यवस्था करण्यांत आली. थोडक्यांत सागावयाचें म्हणजे, प्रत्यहीं उपस्थित झालेल्या अडचणींची तजवीज भोर दरबारच्या सहानुभूतीनें लागत गेली. दगड, चुनखडी वगैरे काढण्याकरितां जमिनी मिळवून देण्याचे बाबतींत विशेष सवलती दरबारकडून मिळाल्या असल्याविषयीं भाटघर धरणाचे अधिकाऱ्याकडून अनेक वेळा संस्थानबद्दल स्तुतिपर उद्गार काढण्यात आले.

कै. हिज हायनेस श्रीमंत रावसाहेब याचे कारकीर्दीत सन १९१२ ते १९२२ पर्यंत १० वर्षें दरबारच्या सहकार्यानें धरणाचें काम सुरळीत चालले होतें. या १० वर्षांतच वास्तविक पाहतां रयतेला द्यावयाची नुकसानभरपाई ठरवावयास पाहिजे होती. लोकांच्या जमिनीतून दगड काढले त्याचाहि विचार करण्यांत आला नाहीं. हें काम लांबणीवर पडल्यामुळें पुढें तें तंट्यास कसें कारणीभूत झालें त्याची हकीकत मागें आलीच आहे. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यानंतर नुकसानभरपाईच्या वगैरे कामास सुरुवात झाली.

धरणाचें काम बऱ्याच उंचीवर आलें व लोकाच्या जमिनी व घरे वाढत्या जलसंचयांत बुडून जाण्याची वेळ आली, तेव्हां जमिनी व घरे यांची नुकसानी ठरवून ती लोकांस देण्याकरिता रावसाहेब जी. आर. आवटी या इंग्रजी मुलकी

अधिकाऱ्यांची नेमणूक लँड ॲक्विझिशन ऑफिसर म्हणून सन १९२३ सालीं करण्यांत आली आणि पूर्वी लँड ॲक्विझिशनचे कामीं मदतनीस म्हणून संस्थानतर्फे नेमलेले रावसाहेब ए. आर. जोशी, बी. ए., एलएल. बी., व इरिगेशनखात्याचे अंमलदार यांचे दरम्यान वाटाघाटी होऊन नुकसानी देण्याच्या बाबतींत साधारणपणें ठरलेल्या तत्त्वानुसार रावसाहेब आवटी यांचे कामास सुरुवात झाली; व रयतेला नुकसानभरपाईबद्दल जास्तींत जास्त जितकी रक्कम देता येईल तितकी मिळवून देण्याचे कामीं श्रीमंत राजेसाहेबानीं प्रजावात्सल्यानें शक्य तितके प्रयत्न केले. म्हणूनच नुकसानीबद्दल प्रजेच्या पदरात योग्य मोबदला पडला. ज्या लोकांच्या जमिनी बुडाल्या त्यांचेपैकीं कांहीं लोकानीं रोख रक्कम न घेतां दुसरीकडे जमिनी मिळाल्यास त्या घेण्याची तयारी दाखविल्यामुळें श्रीमंत राजेसाहेबानीं त्याची बाजू ब्रिटिश सरकारपुढें नेटानें मांडली; तेव्हा त्या लोकांना त्यांच्या गेलेल्या जमिनींबद्दल इंग्रज सरकारनें सोलापूर जिल्ह्यातील जमिनी दिल्या. याप्रमाणें भोर दरबारनें प्रजेच्या हिताकडे सारखें लक्ष पुरविल्यामुळें धरणांत बुडालेल्या जमिनींबद्दल रयतेला योग्य मोबदला मिळून रयतेच्या बाजूचा समाधानकारक निकाल लागला.

यानंतर संस्थानला द्यावयाच्या मोबदल्याचा प्रश्न पुढें येऊन त्याचे वाटाघाटीस सुरुवात झाली. मुलखास मुलूख देण्याबद्दल पूर्वी इंग्रज सरकार वचनबद्ध झालें असल्यामुळें या प्रश्नाचा निकाल लावणें फारसें कठीण नव्हतें. मोबदला देण्याकरितां पूर्वी जीं गावे इंग्रज सरकारकडून सुचविण्यात आलीं होतीं त्यापैकींच संस्थानच्या वसुलाचें जितके नुकसान होत होतें तितक्याच वसुलाचीं गांवें निवडून तीं राजसत्तेसह संस्थानास देण्याचें काम मुळींच भानगडीचें व दिरंगाईवर टाकण्यासारखें नव्हतें. परंतु, तें कां लांबणीवर टाकण्यांत येत होतें याचें प्रथम काहींच कारण कळेना. सन १९०९ सालीं मुंबई सरकारनें जेव्हां मुलखास मुलूख देण्याचें भोर संस्थानास लेखी आश्वासन दिलें त्या वेळीं भाटघर धरण सुरू करण्याची घाई असल्यामुळें आश्वासन पुरें करण्यास कायद्याची वगैरे अडचण उत्पन्न होईल कीं काय याचा विचार करण्यास त्या वेळीं मुंबई सरकारास सवड नसावी. म्हणून त्यांनीं कायदेपंडितांचा सल्ला घेतला नसावा असें दिसतें. आश्वासनाप्रमाणें मोबदला देण्याची जेव्हां वेळ आली

तेव्हां त्याना प्रिव्ही कौन्सिलच्या एका ठरावाची नेमकी आठवण होऊन त्या ठरावाप्रमाणें असा मुलुखाचा मोबदला कायद्याप्रमाणें करतां येईल कीं नाहीं अशी अडचण उत्पन्न झाली. यामुळें मुंबई सरकारनें या प्रश्नाचा विचार सावकाशीनें चालविला होता. शेवटीं ही अडचण संस्थानपुढें मांडून राजसत्तेसह मुलुखाचा मोबदला देणें कसें अशक्य होत आहे हें संस्थानास कळविले. इंग्रज सरकारचें राज्य हिंदुस्थानात सुरू झाल्यापासून राजसत्तेसह मुलखाचे मोबदले झाल्याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. भोर संस्थानांतच राज्यकारभाराच्या सोयीसाठीं सुधागड तालुक्यांत सन १८३० सालीं किती तरी गावाचे मोबदले करण्यात आले. मुंबई सरकारनें दिलेलें वचन पाळण्यास कायद्याची अडचण उभी राहिली याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाहीं. ‘ वारागनेव नृपनीतिरनेकरूपा ’ असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

मुंबई सरकारनें जेव्हा वरील कायद्याची अडचण भोर दरबारास कळविली तेव्हा श्रीमंत राजेसाहेबांस किती वाईट वाटलें असेल याची कल्पना करणें बरे. धरणाचें काम सुरळीत चालावें, कोणत्याहि प्रकारचा व्यत्यय येऊन कामाची यत्किंचित्‌हि खोटी होऊं नये म्हणून भोर दरबार किती दक्षता बाळगोत असे हे मागे सागण्यांत आलेच आहे. मुंबई सरकारनेंहि अनेक प्रसंगीं भोर दरबारच्या सहकार्याची मुक्तकठानें स्तुति गाइली व त्यांना मोबदल्यात भोर संस्थानास गांवें मिळावींत असे मनापासून वाटत नव्हतें असे नाहीं. परंतु राजसत्ता ( ज्यूरिस्डिक्शन ) देण्यास कायद्याची आडकाठी आली, त्यास ते काय करणार ! अखेर बऱ्याच वाटाघाटीनंतर श्रीमंत राजेसाहेबांनीं मुंबई सरकारच्या अडचणींचें स्वरूप लक्षात घेऊन पूर्वी ठरल्याप्रमाणें मुलुखाच्या ज्यूरिस्डिक्शनचा पुरेपूर मोबदला मागण्याचा आग्रह धरण्याऐवजीं आपला जो मुलूख बुडाला तेवढ्या मगदुराचीं इंग्रजी हद्दींतील गांवे नुसतीं इनाम म्हणून स्वीकारण्याचें कबूल केले व इंग्रज सरकारनेंहि तें मान्य केले. अशा प्रकारे सन १९२६ चे सुमारास हा तंटा मिटविण्यात आला.

मोबदल्याचा प्रश्न निकालांत निघाल्यानंतर बुडालेल्या जमिनींचा मगदूर काय ठरवावा, हा प्रश्न उत्पन्न झाला. दिसण्यात हा प्रश्न बिकट दिसत नाहीं. बुडालेल्या जमिनीचा जो सारा संस्थानास मिळत होता तो त्या

जमिनीचा मगदूर असें वरवर पाहणारास वाटेल. इंग्रज सरकारनेंहि याच धोरणानें आकार ठरविला होता. परंतु इनामी गांवांवर ज्यूरिस्डिक्शन नसल्यानें संस्थानचें म्हणणें असें होतें कीं, संस्थानचे हद्दींत रिव्हिजन सर्व्हे करण्याचा काळ येऊन गेला असल्यामुळे प्रचलित वसुलीवर मगदूर न ठरविता रिव्हिजनचे दरानें मगदूर ठरवावा व पुष्कळ नापीक जमीन हल्लीं लागवडीस आली आहे तेव्हा तिचीहि पाहणी करून त्या मानानें तिचा मगदूर ठरवावा. त्याचप्रमाणें ज्या नुकसानीची किंमत ठरविता येत नाहीं अशा म्हणजे कोर्टफी, स्टाप वगैरे बाबतींचे नुकसानीबद्दल व सक्तीनें मुलूख घेतला गेला म्हणून कायद्यानें खासगी व्यक्तीस जशी नुकसानीचे ऐन रकमेवर शेकडा १५ प्रमाणें जादा भरपाई मिळते तशी तरी संस्थानास देण्यात यावी. संस्थानची ही मागणी अगदीं रास्त होती. या बाबतींतहि भोर दरबारास मुंबई सरकारशीं बरेंच झगडावें लागलें. अखेर बरीच भवति न भवति झाल्यावर, सुमारें ३२०० रुपये आकाराची संस्थानची जमीन पाण्यात बुडाली त्याबद्दल सालिना सुमारें ५२०० रुपये उत्पन्नाचीं गांवें संस्थानला देण्याचें ठरलें, व त्याप्रमाणें सभोंवार संस्थानची हद्द असलेलीं इंग्रज सरकारचीं वर ठरलेल्या उत्पन्नाचीं दोन गांवे विंग व विंझर हीं इनाम हक्कानें संस्थानास देण्याचें निश्चित झालें.

गावें मुक्रर झाल्यावर या गांवांचे इनामाच्या व मोबदल्याच्या शर्ती काय असाव्या याबद्दल बरेच प्रश्न उत्पन्न झाले. शेवटीं या प्रश्नाचा बराच ऊहापोह झाल्यावर शर्ती ठरून या प्रश्नाचा निर्णय उभयपक्षीं समाधानकारक झाला. याप्रमाणें सर्व बिकट प्रश्नांचा निकाल लागल्यावर सन १९३३ सालीं भोर दरबार व हिंदुस्थान सरकार यांचे दरम्यान भाटघर धरणांत बुडालेल्या संस्थानच्या प्रदेशाबद्दल ८ कलमी करारनामा होऊन विंग व विंझर या दोन गांवच्या इनामाची सनद संस्थानास देण्यांत आली.

भाटघर येथें जें नवीन धरण बांधण्यांत आलें त्यास ' लॉइड डॅम ' असें नांव देण्यात आलें. या धरणाचा उद्घाटनसमारंभ धरणाचे उत्तर अंगास मुद्दाम तयार केलेल्या कायमच्या दगडी विस्तीर्ण कमानीमध्यें मुंबईचे माजी गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांचे हस्तें सन १९२८ च्या ऑक्टोबरमध्यें २७ तारखेस मोठ्या थाटानें झाला. या समारंभास श्रीमंत राजेसाहेब निमंत्रणावरून

हजर होते. पूर्वींचे एक्झिक्यूटिव्ह एंजिनियर व या वेळीं सुपरिंटेंडिंग एंजिनियर झालेले मि. पूली, चीफ एंजिनियर मि. हॅरिसन व गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांचीं त्या वेळी जी भाषणें झालीं, त्यात भोर दरबारनें या कामास केलेल्या मदतीचे कृतज्ञतापूर्वक उल्लेख करण्यांत आले. याच कमानींत भोर दरबारनें सदरच्या कामास जी बहुमोल मदत केली तिचाहि संक्षेपानें उल्लेख असलेली एक स्वतंत्र टॅबलेट–स्मारकफलक–कृतज्ञता दर्शविण्याकरिता ब्रिटिश सरकारनें लाविली आहे. मि. हॅरिसन व मि. पूली याच्या भाषणांतील उतारे व धरणावरील फलकावर लिहिलेला मजकूर खालीं लिहिल्याप्रमाणें:—

Mr. Harrison said :—

" Your Excellency, I would now refer with emphasis and with most grateful thanks to the valuable assistance which the Chief Saheb of Bhor and all his State officials have rendered throughout the whole period of construction and it is with the greatest satisfaction and pleasure that I see my friend the Pant Sachiv present amongst us today. As Your Excellency is aware, it has been necessary to construct this Dam in the Bhor State and consequently to submerge a portion of the Chief's territory by the lake so formed. However, with that high sense of service and marked sympathy for the good of his less favourably placed fellow-countrymen for which, like his late revered father, he is so justly noted, he has co-operated most loyally with us and has smoothed many a difficulty from our path in the several years during which this work has been in progress. I gladly, therefore, take this opportunity of bringing such loyal and valuable assistance to Your Excellency's notice, though indeed Your Excellency is already well aware of it, and of tendering to him from myself and on behalf of all the establishment who have been on this work, our grateful appreciation and thanks."

Mr. Pooley said .—

" I believe it is almost unknown for such a large work to be completed without some serious delay or complication arising, but I am happy to say that nothing of the kind has

occurred in the case of this project. A serious hitch that threatened during the progress of the work was when the outside agitators stirred up the local people to resort to passive resistance, by which means they have successfully stopped a large work in an adjoining valley. Thanks largely, however, to the very loyal co-operation and assistance rendered by the Bhor State, this difficulty was overcome and progress was not interrupted. As Mr. Harrison has stated, Sir, these works are situated in the Bhor State territory, and throughout the progress of the work the Chief and his officials have co-operated most cordially with the Irrigation Department and have rendered us most valuable and loyal assistance. When the works first started, it was necessary to obtain possession of lands at very short notice both for works purposes and for stone and lime quarries. There was no bridge road giving access to the Dam, so the late Chief of Bhor handed over the State road from Kapurval and also contributed towards the cost of a bridge over the Gunjavani river, Satisfactory arrangements were also made regarding maintenance of the road, exemption of Government materials from toll, etc. Facilities were further granted for keeping Government cash at the State treasury in Bhor, also for policing the works and establishing a market and bazaar, to the great convenience of the people on the works. In bringing therefore particularly to Your Excellency's notice the most friendly and loyal spirit in which assistance has been rendered by the Chief of Bhor, I do no more than the high obligation demands."

**Tablet** fixed in the Commemoration Building at the North end of the Lloyd Dam regarding co-operation of Bhor in the construction of the Dam :—

" This tablet is erected to record the appreciation of the Government of Bombay of the loyal co-operation and valuable assistance rendered by the Rulers of the Bhor State in connection with the construction of and acquisition of land required for the Lloyd Dam which is situated in the State territory.

चित्रांक १०४



भाटघर येथील लॉइड धरणाचे उद्घाटनसमारंभास सायमन कमिशनचे सभासद आले होते, त्यांना श्रीमंतांनीं भाटघर येथें चहापार्टी दिली.

बसलेले:—१ सर लेस्ली विल्सन; २ लेडी विल्सन.

उभे:—१ मि. पूली; २ मि. हॅरिसन; ३ सर हिदायतुल्ला; ४ सर जॉन सायमन; ५ श्रीमंत राजेसाहेब (मागचे बाजूस) [सं. पा. ६१३

The State surrendeıed in all about 18 square miles of territory assessed at R. 9,446/- as well as 38 village sites. The Kapurval-Bhatghar road originally constructed by the State at a cost of Rs. 50,000 was allowed to be used for the benefit of the works and a contribution of Rs. 25,000/- towards the cost of the bridge over the Gunjavani River was given by the State. The construction of the Lloyd Dam was commenced in 1913, the 38th year of the rule of His Highness Meherban Shankarrao Chimnajı Pant Sachıv of Bhor and was completed in 1928, the 7th year of the rule of his successor Meherban Raghunathrao Shankarrao alias Babasaheb Pant Sachiv, Chief of Bhor."

वरील उद्घाटनसमारंभाच्या वेळीं जे सन्माननीय गृहस्थ हजर होते, त्यांत इंडियन स्टॅटयुटरी कमिशनचे अध्यक्ष सर जॉन सायमन व त्याचे सहकारी गव्हर्नरसाहेबाच्या बरोबर आले होते. या सर्व पाहुण्यांचें आदरातिथ्य संस्थानच्या वतीनें लॉइड धरणावर करण्यात आले. हा उद्घाटनसमारंभ झाल्यावर धरणावरून गाड्या, मोटारी वगैरे वाहनास जाण्यास परवानगी मिळाली. ही परवानगी मिळाल्यानंतर श्रीमंत राजेसाहेबानीं निरा नदीच्या पुलाचें काम हातीं घेऊन तें पुरें केलें. त्यामुळें पुण्याहून महाडास जाण्यास जवळचा मार्ग मोकळा झाला.

श्रीमंत राजेसाहेबांच्या कारकीर्दींत भाटघरच्या नवीन धरणाचाच संबंध आला असता पूर्वींपासूनची सविस्तर हकिकत देण्यात हेतु इतकाच कीं, गेल्या ७० वर्षांत खडकवासला, वीर व भाटघर येथील धरणांमुळें संस्थानास किती नुकसान सोसावे लागलें याची वाचकाना यथार्थ कल्पना यावी. लॉइड धरणाचें काम कै. श्रीमंत रावसाहेब याचे कारकीर्दींत सुरू झालें. तथापि मोबदल्याचे वगैरे अनेक भानगडीचे प्रश्न श्रीमंत राजेसाहेबाना सोडवावे लागले व त्या कामीं त्याना संस्थानच्या व प्रजेच्या हिताकरिता निर्भय व निर्भीडपणें प्रयत्न करावे लागले. म्हणूनच संस्थानचा व प्रजेचा जास्तींत जास्त फायदा झाला. श्रीमंत राजेसाहेब संस्थानच्या हिताकरितां जरी इंग्रज सरकारशीं झगडत होते, तरी साम्राज्य सरकारशी एकनिष्ठ राहून त्या सरकारबरोबर सहकार्य

करण्याचें श्रीशंकराजी नारायण यांचेपासून सचिव घराण्यांत चालत आलेलें जें कुलव्रत त्या व्रताचा श्रीमंत राजेसाहेबांनीं कधींहि भंग होऊं दिला नाहीं.

वरील तीन्ही धरणांमुळें संस्थानचे हद्दींत जो जलसंचय झाला आहे, त्या जलसंचयाचा संस्थानी प्रजेला यत्किंचित्‌हि उपयोग नाहीं. कारण तलावाच्या दोन्ही बाजूंकडील जमिनी तलावापेक्षा उंचीवर असल्यामुळें या जमिनींना पाणी मिळणें शक्य नाहीं. संस्थानांतील जलसंचयाचा उपयोग सर्वस्वी ब्रिटिश प्रजेला आहे.

पुढें श्रीमंत राजेसाहेब इंग्लंडला गेले त्या वेळीं मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन हेहि त्यांची मुदत भरल्यामुळें लंडन येथें होते. श्रीमंताच्या लंडन येथील मुक्कामात सर लेस्ली विल्सन यानीं तेथील East India Associationच्या सभासदाशीं ता. २३ जुलै १९३० रोजीं श्रीमंत राजेसाहेबाचा परिचय करून देतांना आपल्या भाषणांत पुढील उद्गार काढले:—

"The lengthening of the Bhatghar or Lloyd Dam, now the longest in the world, for irrigation purposes, would not have been possible it the Chief Saheb of Bhor had not agreed to the innundation of a portion of his territory and gone to much expense in the consequent construction of the bridges and roads."

## देशांत सुव्यवस्था व शांतता राखण्याचे कामीं भोर दरबारचें ब्रिटिश सरकारशीं सहकार्य

देशातील प्रजेचें जीवित व मालमत्ता सुरक्षित राहून प्रजेची भरभराट व सुखवृद्धि होण्याकरितां देशात सुव्यवस्था व शांतता राखणें हें कोणत्याहि सरकारचे प्रमुख व आद्य कर्तव्य आहे. हें कर्तव्य बजावण्याच्या कामीं ब्रिटिश सरकारास भोर दरबारनें सन १९२१ व सन १९३१ सालीं जरूर ती मदत दिली आहे.

### प्रतापगड दरोडा

सन १९२९ सालच्या डिसेंबर महिन्यांत सातारा जिल्ह्यांतील प्रतापगडावरील श्रीभवानी देवालयातील भवानी देवीच्या अंगावरील सुमारे २ लाख रुपये किंमतीच्या दागिन्यांची चोरी झाली. चोरी करणारे लोक कोण असावेत

याचा प्रथम पत्ता लागेना. तथापि ते पठाण असून आसपासच्या प्रदेशांतच भटकत राहिले असावेत असा संशय येऊन त्याच्या तपासाचे काम सुरू झाले. सातारा जिल्ह्यांतील पोलिसखात्यानें भोरच्या पोलिसखात्यास भोरच्या हद्दींत तपास करण्यास कळविले. कांहीं पठाण भोरचे हद्दींत फिरत होते. भोरचे पोलिस पाळतीवर होतेच. त्यांना सदर पठाणांचा संशय येऊन निरनिराळ्या ठिकाणीं त्यानीं १४ पठाण पकडले व सातारा पोलिसला वर्दी दिली. सातारा पोलिस भोरास आल्यावर त्यांना भोर पोलिसनें हरएक प्रकारे मदत केली. त्यामुळें चोरीचा मुद्देमाल बराच मिळाला. या चौकशीनिमित्त सातारचे डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस, मि. ओगॉरमन ( Mr. O'Gorman ) भोरास आले, तेव्हा त्यांनीं श्रीमंत राजेसाहेबांची भेट घेऊन भोर पोलिसाच्या तत्परतेची व प्रशंसनीय कामगिरीची श्रीमंत राजेसाहेबाजवळ समक्ष तारीफ केली. चोरीचा बराच माल सांपडून चोराना शिक्षा झाल्या.

या चोरीच्या तपासाचे कामीं संस्थाननें जी मदत केली तीबद्दल मुंबई सरकारानें भोर दरबारच्या सहकार्याबद्दल प्रशंसापर उद्गार काढले. मुंबई इलाख्याचे डे. इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस यांनीं, ज्या भोर पोलिसांची मदत झाली त्याना देण्याकरितां १५५ रु. रोख, ३ शिफारसपत्रें, १० चांगल्या कामाचीं तिकिटें व ७ सर्टिफिकिटें पोलिटिकल एजंटमार्फत भोर दरबारकडे पाठविलीं तीं ज्याचीं त्यास देण्यात आली. भोर दरबारनेंहि ज्या पोलिसानीं चांगलीं कामें केलीं त्यांना उत्तेजनार्थ संस्थानतर्फे बक्षिसें दिलीं.

या दरवड्यातील लोकावर खटले भरण्यात येऊन शिक्षा झाल्या त्या वेळीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांच्या पो. ए. मार्फत आलेल्या ता. १ जानेवारी १९३० च्या पत्रांत व सातारचे डिस्ट्रिक्ट आणि सेशन्स जज् यांनीं दरवडेखोराना पकडून देण्याचे कामीं भोर दरबारचे सहकार्याबद्दल निकालपत्राचा प्यारा ४६ मध्यें गौरवपर उल्लेख केला आहे तें पत्र व प्यारा हीं या ठिकाणीं उद्धृत केलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:—

Poona, 7th January 1930.

My friend,

I enclose a copy of the District Magistrate Satara's Demi-Official letter dated 1st January 1930 in the matter of the assistance rendered by your State in the arrest of some of the dacoits who looted the Bhavani Temple at Pratapgad near Mahableshwar.

I am exceedingly pleased to learn of the assistance rendered and also add my appreciation. I congratulate you on the efficiency displayed by your Police Force and thank you for your co-operation.

Your sincere friend,
H. R. Gould.
Political Agent, Poona.

Satara, 1st January 1930.

My dear Gould,

I have been told by O'Gorman, the D.S.P. here, that the Chief of Bhor and his Chief Police Officer were very helpful in assisting in the arrest of some of the dacoits who looted the Bhavani Temple at Pratapgad. Will you kindly convey to him the thanks of the D. S. P. and myself for the co-operation and assistance rendered ?

Yours sincerely,
J. Monteath.

To

H. R. Gould, Esqr., I. C. S.
Collector and Political Agent, Poona.

46. I cannot conclude this long judgment without saying a word about the officers connected with this case. My acknowledgments are due to the Dewan of Bhor who sent a wire to Mr. Bashirkhan informing him that the Pathans were in jungles of Pimpalwadi. The promptitude shown by Mr. Bashirkhan, the Sub-Inspector of Mahableshwar, is really

commendable. It is due to him and the officers in Bhor State that the 12 accused were arrested in one day.

No. M. A. G.| I. P. G.| 280.

26th February 1931.

Copy of extract of Para 46 of the judgment of the Additional Sessions Judge, Satara, in Pratapgad Dacoity case forwarded with compliments to the Chief of Bhor through the Political Agent, Bhor State, for information.

Dist. Magistrate, Satara.

## आपद्ग्रस्तांस मदत

### अखिल भारतीय महारोगनिवारण फंड

श्रीमंत राजेसाहेब स्वतःच्या प्रजेच्या कल्याणाविषयी व दुःखनिवारणार्थ कळकळ बाळगतात, एवढेंच नव्हे तर संस्थानाबाहेरील प्रजेविषयींहि तितक्याच दक्षतेने ते दुःखनिवारणार्थ मदत करतात.

हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग यानी १९२५ सालीं अखिल भारतीय महारोग-निवारण फंड उभारला. त्या फंडास मदत देण्याबद्दल व्हाइसरॉयाचे पत्रक पोलिटिकल एजंट मि. पी. बी. हेग याचेकडून श्रीमंत राजेसाहेब यांचेकडे आले. त्या पत्रकाप्रमाणें सदर फंडास भोर संस्थानातून मदत पाठविण्यास वर्गणी गोळा करण्याच्या उद्देशाने भोर येथें श्रीराम मंडपात श्रीमंत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं सभा ता. १५ जुलै १९३५ रोजीं भरविली होती. या सभेस भोरचा अधिकारीवर्ग व सर्व नागरिक हजर होते. प्रथमतः श्रीमंत राजेसाहेबाचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर भोरचे चीफ मेडिकल ऑफिसर डॉ. ताम्हणकर यानीं फंड उभारण्याचा उद्देश जमलेल्या सर्व लोकांस समजावून सांगितला. त्याचा लोकांवर बराच परिणाम झाला. फंडाचा उद्देश समजावून सागण्याकरितां अशाच प्रकारच्या सभा तालुक्याचे मामलेदार याचे अध्यक्षतेखालीं तालुक्याचे मुख्य ठिकाणी भरविण्यांत आल्या. सर्व संस्थानातून मिळून एकंदर वर्गणी रु. ७०० जमली. त्यापैकीं स्टेटकडून रु. ५०० देण्यात आले होते. ती फंडाचे ऑनररी ट्रेझरर याचेकडे पोलिटिकल एजंटमार्फत पाठविण्यांत आली.

## क्वेटा व बिहार भूकंप फंडांस देणगी

जानेवारी १९३४ मध्यें बिहारमध्यें व १९३५ च्या मे महिन्यात क्वेटा येथें भूकंपाचे भयंकर धक्के बसून अत्यंत प्राणहानि झाली. हजारों लोक घरादारांवांचून व अन्नपाण्यावांचून निराश्रित झाले. या सर्व दुःखपीडितांच्या मदतीकरितां त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनीं फंड उभारले, त्या वेळीं क्वेटा फंडास रु. २००० व बिहार फंडास रु. १५०० देऊन श्रीमंत राजेसाहेबानीं आपलें दातृत्व व दुःखपीडितांविषयीं कळकळ व्यक्त केली. दोन्ही वेळीं श्रीमंताना व्हाइसरॉय याचेकडून आभारप्रदर्शक पत्रे आलीं

आजपर्यंत ज्या ज्या वेळीं ब्रिटिश सरकारशीं सहकार्य करण्याचा प्रसंग आला त्या त्या वेळीं आत्मीयतेनें भोर दरबारनें सहकार्य केलें आहे.

# प्रकरण ११ वें

## ग्रामोद्धार

मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यानीं सन १९३३ सालीं ग्रामोद्धाराचा प्रश्न ( Rural Uplift Problem ) हातीं घेऊन या कार्यास चालना दिली. तेव्हांपासून ग्रामोद्धाराचे अनेक प्रयत्न चालू झाले. ग्रामोद्धाराविषयीं अनेकाच्या अनेक कल्पना आहेत. जो तो आपल्या कल्पनेप्रमाणें कार्य करीत आहे. रेडिओचे कार्यक्रम, सदीप व्याख्यानें, प्रदर्शनें वगैरे कार्यक्रम सुरू केल्यानें ग्रामोद्धार होईल अशी काहींची कल्पना असल्यामुळें तसले प्रयोग चालू आहेत. ग्रामोद्धार म्हणजे खेडेगावातील लोकाची स्थिति सुधारणें. वरील प्रयोगानीं शेतकऱ्याना कितपत फायदा होत असेल याची शंकाच आहे.

वरीलसारख्या खर्चाच्या योजनेनें खेडेगावातील लोकाना कांहीं फायदा होऊन त्याची आर्थिक स्थिति सुधारेल अशी श्रीमंत राजेसाहेबाची कल्पना नाहीं. शहरातील अनेक प्रकारचीं व्यसनें खेड्यात शिरत असल्यामुळे खेड्यातील लोकांची राहणी खर्चाची होत असून त्याचें जीवन सुखाचें न होता दिवसानुदिवस ते लोक खड्डयात पडत आहेत. खेड्यातील लोकाची खरी सुधारणा करावयाची म्हणजे त्यांना शहरातील अनेक प्रकारच्या मोहापासून परावृत्त करणें, साध्या राहणीची आवड उत्पन्न करणें, कर्जांत न बुडतील असे प्रयत्न करणें, जमिनीच्या वाटण्या होऊन लहान लहान तुकडे पाडण्याची पद्धत कायद्यानें बंद करण्याची तजवीज करणे, गावात स्वच्छता राखून पिण्याकरिता स्वच्छ पाण्याची तजवीज करून आरोग्यरक्षणाची सोय करणे, स्वतःच्या गैरसोयी असतील त्या दूर करणे, सडका नसल्यास त्या तयार करणें, वगैरे कामें करावीं. अंगमेहनतीने व सर्वांनी सहकार्यानें हीं कामें केल्यास थोडया खर्चानें होण्यासारखीं आहेत. अशीं कामे करण्याच्या कामीं सुशिक्षितानीं त्याचें नेतृत्व पत्करून कार्य सौकर्यानें कसे करावे हे शिकविल्यास विशेष सुलभतेनें ग्रामसुधारणेचें काम होईल; व मग या कामात सरकारनें यथाशक्ति द्रव्यद्वारा मदत देऊन उत्तेजन दिल्यास ग्रामोद्धार कठीण नाहीं असे श्रीमंताना वाटतें.

भोर संस्थानांतील प्रदेश डोंगराळ असून खेडयांतील लोकाचें उपजीविकेचें मुख्य साधन शेती आहे. शेतीशिवाय इतर उद्योगधंदे, कारखाने चालविण्यास ज्या नैसर्गिक परिस्थितीची अनुकूलता लागते ती नाहीं. तथापि, शेतीच्या कामाकडे मोडणाऱ्या वर्षांतील ५।६ महिन्याखेरीज बाकी शिल्लक राहणाऱ्या वेळात खेड्यातील शेतकरी वर्गानें किरकोळ घरगुती धंदे स्वत:च्या अंगमेहनतीनें करण्याचें मनावर घेतल्यास तें शक्य आहे. मात्र त्यात सुशिक्षितानीं त्याना शिक्षण देण्याचें कार्य केले पाहिजे.

श्रीमंत राजेसाहेब विचित्रगड तालुक्याचा राज्यकारभार पाहत असतांना त्यानीं त्या तालुक्यातील सर्व खेड्यांचें सूक्ष्म निरीक्षण केलें होतें. खेड्यातील लोकाची स्थिति सुधारली पाहिजे अशी त्याच वेळीं त्याची ठाम समजूत झाली होती.

शेतकऱ्यावरील करांचा बोजा थोडा हलका करून त्यांची स्थिति सुधारण्याकडे श्रीमंत राजेसाहेबाचें प्रथमपासून लक्ष असल्यामुळे सन १९२२ सालीं गादीवर येतांच राज्यारोहणाचे दरबारचे वेळीं संस्थानांत चालू असलेले चूलपट्टी, लग्नटक्का, पाटदाम, इत्यादि कर काढून टाकिल्याचे त्यांनीं जाहीर केल्याबद्दल मागें सागण्यांत आलेंच आहे. हे कर काढून टाकल्यामुळे संस्थानच्या वार्षिक उत्पन्नांत जरी सुमारें १२ हजार रुपयांची तूट आली तरी, केवळ खेड्यातील लोकांच्या हिताची त्यांना कळकळ असल्यामुळें त्यांनीं हें वार्षिक १२ हजार रुपयांचें नुकसान मोठ्या आनंदानें सोसलें.

संस्थानांत लँड रेव्हेन्यू सेटलमेंट सुमारे ५० वर्षांपूर्वी झाली, त्या वेळीं संस्थानालगतच्या ब्रिटिश हद्दींत साऱ्याचे जे दर होते त्याच दरानें संस्थानांत आकारणी करण्यांत येते. तीस वर्षांनीं पुन्हां सर्व्हे करून नवीन आकारणी करण्याचा नियम आहे. त्याप्रमाणें ब्रिटिश हद्दींत व इतर कांहीं संस्थानातून फेर आकारणी करून सारावाढ करण्यात आली. तथापि, श्रीमंत राजेसाहेबानीं आतांपावेतों सारावाढ केलेली नाहीं. फेर आकारणी केली असती तर संस्थानची जमाबंदी दिढीनें तरी खास झाली असती.

कायदेमंडळाच्या स्थापनेचे वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या खाजगी उत्पन्नातून २०,००० रुपये कायदेमंडळाचे स्वाधीन करून त्या रकमेचें व्याज

चित्रांक १०५



भोर येथील राजवाडा; श्रीमंत राजेसाहेबांनीं फ्लॉरेन्सहून आणलेले पुतळे दरवाज्याचे दोहों बाजूंस बसविल्यानंतरचा फोटो.

[ सं. पा. ६३२

कायदेमंडळानें आपल्या इच्छेप्रमाणें शेतकी व जंगलची सुधारणा करण्याच्या कामीं, त्याचप्रमाणें घरगुती धंद्यांस उत्तेजन देण्याच्या कामीं खर्च करण्याची कायदेमंडळास परवानगी देण्यात आली. त्याचप्रमाणें तालुका लोकलबोर्डांच्या स्थापनेच्या वेळीं डिस्ट्रिक्ट लोकलबोर्डाच्या स्वाधीन खाजगी उत्पन्नातूनच २१,३२५ रुपये केले. या रकमेचें व्याज खेड्यातील लोकाचें आरोग्य, स्वच्छ पाण्याची सोय इत्यादि कामांकडे खर्च करण्यास देण्याची तालुका लोकल-बोर्डांना परवानगी दिली. गादीवर येतांच सर्व संस्थानात प्राथमिक शिक्षण मोफत केले. दुष्काळ वगैरेसारख्या आपत्प्रसंगीं रयतेस सारातहकुबी अगर सारामाफी देण्याचें धोरण श्रीमंत राजेसाहेबानीं ठेविले आहे. त्याप्रमाणें त्यानीं सन १९२९–३० सालीं शिरवळ भागात पिकें चागलीं न आल्यामुळें आठ हजार रुपयांची सारा-तहकुबी दिली. त्यानंतर १९३१–३२ सालीं सर्व संस्थानात ४०,००० रुपयाची सारामाफी दिली.

संस्थानात सन १८८४ सालचा ॲग्रिकल्चरिस्ट लोन्स ॲक्ट नं. १२ हा ॲक्ट विशेष नियम करून लागू करण्यात आला. सन १९३३ सालीं सुधागड तालुक्यात पाली येथें लहान प्रमाणावर शेतकी प्रदर्शन भरविण्यात येऊन त्याच सालीं भोर येथेंहि मोठ्या प्रमाणावर शेतकी प्रदर्शन भरविण्यात आले. या सर्व गोष्टी खेड्याची आर्थिक, शैक्षणिक, आरोग्यविषयक व शेतकी-विषयक स्थिति सुधारण्याच्या हेतूनेंच श्रीमंत राजेसाहेबांनीं केल्या व त्या ब्रिटिश हद्दींत व इतर ठिकाणीं ग्रामोद्धाराची चळवळ सुरू होण्यापूर्वीच केल्या. त्यामुळे सर फ्रेडरिक साइक्स यांनीं जेव्हा ग्रामोद्धाराचा ( Village Uplift ) प्रश्न हाती घेतला, तेव्हां त्यांना हें कार्य काहीं नवीन वाटले नाहीं; कारण ग्रामसुधारणेचे कार्य संस्थानात हळूहळू सुरूच होतें. सर फ्रेडरिक साइक्स यानीं ग्राम-सुधारणेचें अभिनंदनीय कार्य हातीं घेतलेले पाहून श्रीमंत राजेसाहेबांस फार आनंद वाटला.

श्रीमंत राजेसाहेब हे १३ जुलै १९३२ रोजीं पुणें येथील कौन्सिल हॉलमध्ये नेक नामदार गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यानीं भरविलेल्या सरदाराच्या दरबारास हजर राहिले होते. या दरबारात नेक नामदारसाहेबानीं केलेल्या भाषणात Deccan Agricultural Association या संस्थेने भर-

विलेल्या Rural Uplift Conferenceच्या दुसऱ्या अधिवेशनात शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकरितां वरण्यांत आलेल्या सूचनाचा उल्लेख करतांना त्या कामीं दक्षिणेंतील संस्थानांच्या अधिपतींचे सहकार्याबद्दल खालील उद्गार काढले:—

"It is gratifying to note that this problem was presently considered by the Deccan Agricultural Association and its second Rural Uplift Conference, when various suggestions for tackling it were made. One very gratifying feature of this Conference was the concrete evidence of the live interest which the Ruling Princes and Chiefs of the Deccan are taking in such matters. The Conference was presided over by His Highness the Raja of Sangli, while among the prominent members was the ruler of Bhor. It is encouraging to know that rural uplift is attracting increasing public attention throughout India and that the Ruling Chiefs and Sardars of the Deccan should be taking a prominent part in this movement which is so full of significance to the future of the country."

यानंतर सर फ्रेडरिक साइक्स यानीं पुणें येथें गणेशखिंड गव्हर्मेंट हाउसमध्यें ता. ४ ऑक्टोबर १९३३ रोजीं ग्रामसुधारणेच्या बाबतींत विचार-विनिमय करण्याकरिता दक्षिणेंतील व गुजराथेंतील संस्थानिकाची सभा भरविली, त्या सभेस श्रीमंत राजेसाहेब गेले होते. सर फ्रेडरिक साइक्स यांनीं हातीं घेतलेल्या कार्यांत, त्याचप्रमाणें मुंबईसरकार राष्ट्रहिताचीं जीं जीं कामें हातीं घेईल त्या सर्व कामात अंत:करणपूर्वक सहकार्य करण्याचें श्रीमंत राजेसाहेबांनीं गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यांना आश्वासन दिलें. ग्रामसुधारणेच्या बाबतींत कोणकोणत्या दिशांनीं प्रयत्न केला असतां कार्य यशस्वी होईल याबद्दल सभेस जमलेल्या संस्थानिकांचीं मतें सर फ्रेडरिक साइक्स यांनीं लेखी मागितलीं. हीं मतें मागविण्यात गव्हर्नरसाहेबाचा हेतु असा होता कीं, सर्वांच्या मतांचा विचार होऊन ग्रामसुधारणेची योजना तयार करावी. श्रीमंत राजेसाहेबांनीं या बाबतींत शक्याशक्यतेचा सर्व बाजूंनीं विचार करून आपल्या कल्पना व सूचना मुंबई सरकारास लेखी कळविल्या.

श्रीमंत राजेसाहेब व मुंबई सरकार यांच्या दरम्यानच्या वरील वाटाघाटी खाजगी स्वरूपाच्या होत्या. ग्रामसुधारणेसंबंधीं आपले विचार काय आहेत हें आपल्या संस्थानातील प्रजेस कळावें म्हणून ता. १४ मार्च सन १९३४ रोजीं कायदेमंडळाची बैठक झाली त्या वेळीं त्यांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत आपले विचार मांडले. तें भाषण परिशिष्ट ५ मध्यें दिलें आहे.

कायदेमंडळात श्रीमंत राजेसाहेबानीं आपले विचार माडल्यानंतर ग्रामोद्धाराच्या कार्यास मूर्त स्वरूप देण्याकरिता त्यानीं ५ अधिकाऱ्याची एक मध्यवर्ति कमिटी नेमिली व पाचहि तालुक्यांच्या मामलेदारांच्या सल्ल्यानें स्थानिक परिस्थितीप्रमाणें ग्रामसुधारणेकरिता संस्थानच्या उत्पन्नाच्या मानानें कोणत्या गोष्टी करता येणें शक्य आहे याबद्दलची एक योजना तयार करण्याचें काम या कमिटीकडे ठेविलें.

सन १९३७ च्या मार्च महिन्यात भरलेल्या कायदेमंडळाच्या बैठकींत ग्रामपंचायत ॲक्ट पास करण्यांत आला आहे. ग्रामोद्धाराचें कार्य अधिक नेटानें व उत्साहानें चालू ठेवण्याकरितां याच सालीं सरकारी व बिनसरकारी सभासदांची एक मिश्र कमिटीहि नेमण्यांत आली आहे व ह्या कार्याकडे दरसाल रु. ४०० खर्च करण्याचें कायदेमंडळानें ठरविलें आहे.

उत्तम जातीच्या बैलाची निपज होण्याकरिता श्रीमंत राजेसाहेबानीं शिरवळ तालुक्यास सन १९३६ सालीं एक वळू खरेदी करून दिला.

## सांगवी येथील पाटाचा उद्घाटनसमारंभ

भाटघरनजीक सागवी नांवाचें एक लहान खेडें भोर संस्थानपैकीं आहे. तेथील रहिवाश्यांनीं भाटघर धरणांतील साडपाण्याचा उपयोग शेताकडे करण्याकरितां ब्रिटिश सरकारकडे मागणी केली. भाटघर धरण बांधल्यामुळें त्यांची झालेली नुकसानी व सोसावा लागलेला त्रास लक्षांत घेऊन सवलतीनें तें पाणी शेतीकरितां सरकारनें दिलें. तेव्हां तेथील रहिवाश्यांनीं धरणापासून पाट बांधून गावापर्यंत तें पाणी नेलें. या पाटाचा उद्घाटनसमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांनीं तेथील रहिवाश्यांच्या विनंतीवरून ता. १६ डिसेंबर १९२९ रोजीं सांगवी गांवास भेट देऊन केला. संस्थानांतील शेती-

सुधारणेस मदत व्हावी म्हणून या गांवच्या शेतकऱ्यांना रु. ५००० अगदीं हलक्या व्याजानें कर्जाऊ म्हणून दिले आहेत.

## उत्रवली येथील रामनाथ पुलाची कोनशिलास्थापना

ग्रामसुधारणेची चळवळ सर्वत्र सुरू झाली, तेव्हां भोरनजीकच्या उत्रवली गावातील लोकानीं स्वयंस्फूर्तीनें व स्वावलंबनानें आपल्या गावची सुधारणा करण्याचें ठरविले. मुख्य रस्त्यापासून म्हणजे महाड-पंढरपूर रस्त्यापासून उत्रवली गांव सुमारें ६ फर्लांग आहे. गांवाशेजारींच एक मोठा ओढा आहे. पावसाळ्यात या ओढ्यास कधीं कधीं उतारहि बंद होत असे. यामुळे पावसाळ्यात गांवापर्यंत गाड्या जाण्यास व लोकांनाहि ओढा उतरून जाण्यास फार त्रास पडे. ही अडचण दूर करण्याकरिता त्याच गावचे रहिवासी व भाटघर धरणावरील प्रसिद्ध कॉन्ट्रॅक्टर राघोबा तुकाराम शेटे याचे नेतृत्वाखालीं वर्गणी जमा करून ६ फर्लांग सडक तयार करण्याचे व ओढ्यावर लहानसा पूल बाधण्याचें गावकऱ्यानी ठरविले. त्याप्रमाणें सडक तयार झाल्यावर पुलाची कोणशिला बसविण्याबद्दल त्यांनीं श्रीमंत राजेसाहेबास विनंति केली. उत्रवली गाव संस्थानातील असून तो श्रीमंत राजेसाहेबांचा इनामी गांव आहे. लोकानीं सुरू केलेल्या कामास आपली सक्रिय सहानुभूति दाखवून ग्रामसुधारणेच्या कार्यास उत्तेजन देण्याकरिता श्रीमंत राजेसाहेबानीं गावकऱ्याची विनंति मान्य केली. तेव्हा गावकऱ्याना अत्यंत आनंद झाला. त्यानीं मोठया उत्साहाने ता. १९ जानेवारी सन १९३४ इ. रोजीं श्रीमंताच्या हस्तें पुलाची कोणशिला बसविण्याचा समारंभ साजरा केला. त्या वेळीं गावकऱ्याचेतर्फे कायदेमंडळाचे सभासद श्रीयुत पानसे, बी. ए., एलएल. बी., यांनी स्वागतपर प्रास्ताविक भाषण केलें. त्यात ते गावकऱ्यांना उद्देशून म्हणाले, "सरकार लहान असो कीं मोठे असो, कोणत्याहि सरकारला रयतेच्या सर्व गरजा भागवितां येणें शक्य नाहीं. लोकांनींच स्वावलंबनपूर्वक प्रयत्न करून सहकार्यानें आपल्या बारीक-सारीक अडचणी व गैरसोयी दूर करण्यास शिकलें पाहिजे. उत्रवली गावकऱ्यानी केलेला उपक्रम अभिनंदनीय असून इतर गावकऱ्याना तो मार्गदर्शक होणारा आहे."

चित्रांक १०६



सातारा येथील यादोगोपाळ पेठेंतील पंतसचिवांचा वाडा (सन १८२६ सालीं बांधला).

[सं. पा. ६३३

श्री. पानसे यांच्या भाषणानंतर श्रीमंत राजेसाहेबानीं भाषण केले; त्यात उत्रवलीचे रा. राघोबा शेटे यानीं पुढाकार घेऊन इतर गावकऱ्याच्या सहकार्याने पुल बांधण्याचें ठरविले त्याबद्दल त्याचा गौरवपूर्वक उल्लेख केला व सदर कार्यास रु. १५० देणगी दिल्याचे जाहीर करून पुलाची कोणशिला बसविली.

श्रीमंत राजेसाहेबाचे आभार मानण्याचे काम गावकऱ्यानी कायदे-मंडळाचे उपाध्यक्ष श्रीयुत आगाशे, बी. ए., एलएल. बी., याकडे दिले होतें. ते म्हणाले,

" गावकऱ्यानीं आरंभिलेल्या कार्यास आज येथें येऊन श्रीमंत राजे-साहेबांनीं सहानुभूति दाखविली व ग्रामसुधारणेबद्दल आपली कळकळ प्रगट केली, यामुळे गावकऱ्यांनीं आरंभिलेल्या कार्यास सरकारमान्यता मिळाली. श्रीमंत राजेसाहेबांनीं नुसती शाब्दिक सहानुभूति न दाखविता गावकऱ्यानी आरंभिलेल्या कार्यास १५० रुपयाची प्रथम मदत दिली."

## रामनाथ पुलाचा उद्घाटनसमारंभ

श्रीमंत राजेसाहेबाचें प्रोत्साहन मिळाल्यावर गांवकऱ्यानीं एक वर्षांत पुलाचें काम पुरे केले. पूल तयार झाल्यावर पुलास श्रीमंत राजेसाहेब याचे अल्पवयी दिवंगत झालेले पुत्र राजकुमार रामनाथसाहेब याचे नाव देण्याची गावकऱ्यानीं श्रीमंत राजेसाहेबांस विनंति केली. श्रीमंतानीं गावकऱ्यांची उत्कट इच्छा पाहून त्याची विनंति मान्य केली. तेव्हा पुलास राजकुमार रामनाथ याचे नाव देण्याचा व पुलाचें उद्घाटन करण्याचा समारंभ श्रीमंत राजेसाहेबाचे हस्तेंच करण्याचें ठरवून त्याप्रमाणें श्री. राजेसाहेबास त्यानीं विनंति केली. विनंति मान्य झाल्यावर हा समारंभ ता. २२ ऑक्टोबर सन १९३४ इ. रोजीं करण्यात आला. या समारंभाकरिता पुण्याहून बरीच प्रतिष्ठित व ग्रामसुधारणेची आस्था बाळगणारी पाहुणे मंडळी आली होती. प्रथम श्रीयुत पानसे यानी सडक व पूल याकरिता वर्गणी कशी जमा करण्यात आली, लोकानीं स्वार्थ-त्यागपूर्वक कशी कामे केलीं वगैरे हकिकत सागून वर्गणी व तालुका लोकल-बोर्डानें दिलेली २०० रुपयाची मदत व श्रीमंत राजेसाहेबानी प्रथम दिलेली १५० रुपयाची देणगी मिळून एकंदर रक्कम १७७० रुपये जमा होऊन

खर्च रुपये २०२० झाल्याचें सांगितलें. नंतर श्रीमंत राजेसाहेबानीं पुलाचें उद्घाटन करून पुलास ‘ रामनाथ पूल ’ असें नाव दिल्याचें जाहीर केलें. श्रीमंत राजेसाहेबांनीं पूल बांधण्याचे कामीं जी २५० रुपयांची तूट आली होती ती भरून काढण्याकरितां आणखी २५० रुपयाची देणगी जाहीर केली आणि गांवकऱ्यांचे आभार मानून तान्हुबाई कासार यांनीं दिलेल्या रु. ४०० च्या देणगीचा गौरवपूर्वक उल्लेख करून ग्रामसुधारणेस मार्गदर्शक होईल असें भाषण केलें.

## साक्षरता-प्रसार केंद्राचें उद्घाटन

उत्रवली गांवच्या लोकांनीं केलेल्या कामाचा परिणाम होऊन त्यांचें अनुकरण करण्यास इतर गांवांतून सुरुवात झाली. याच तालुक्यांतील भादें गावच्या लोकांनींहि पुण्यांतील ग्रामसंघटनामंडळाचे नेतृत्वाखालीं सहकार्यानें आपल्या गांवांतील लोकांच्या उपयोगाचीं बरींच कामें हातीं घेऊन तीं पार पाडलीं. या गांवांतील लोकांचें कार्य यशस्वी रीतीनें चाललेलें पाहून वरील मंडळाचे प्रमुख चालक प्रो. एस. आर. भागवत व श्रीयुत डी. व्ही. गोखले यांचे मनांत साक्षरतेचा प्रसार करण्याकरितां भादें गांवीं साक्षरताप्रसारक मंडळाचें एक केंद्र उघडण्याची कल्पना आली; व त्याप्रमाणें करण्याचें ठरवून त्यानीं या केन्द्राचे उद्घाटनसमारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची श्रीमंत राजेसाहेबांना विनंति केली. शेतकरी वर्गांत शिक्षणाचा प्रसार करण्याची कोणींहि एखादी व्यवहार्य योजना श्रीमंत राजेसाहेबांचे पुढें मांडल्यास त्या योजनेचा पुरस्कार करून लोकांना उत्तेजन देण्यास श्रीमंत राजेसाहेब कधींहि मागें घेत नाहींत. त्यांनीं तत्काल वरील मंडळीची विनंति मान्य केली. मंडळाचे आग्रहावरून केडगांवचे श्रीनारायणमहाराज यानींहि या विद्याप्रसारकार्याचे वेळीं हजर राहण्याचें मान्य केलें होतें. हा उद्घाटनसमारंभ ता. २१ एप्रिल १९३५ इ. रोजीं झाला. प्रथम प्रो. भागवत यांनीं केडगांवचे श्रीनारायण महाराज व श्रीमंत राजेसाहेब यांचे आभार मानून साक्षरतेचें महत्त्व किती आहे व जनतेंतील निरक्षरता घालविण्याकरिता मंडळानें कोणती योजना आखली आहे हें विस्तारपूर्वक सांगितले. नंतर त्यांनीं श्रीमंत राजेसाहेबास केंद्र उघडण्याची विनंति केली.

श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून केंद्र उघडल्याचें जाहीर केलें. तें भाषण परिशिष्ट ६ मध्यें समग्र दिलें आहे.

श्रीनारायणमहाराज यांनीं मंडळाच्या कार्यास शुभाशीर्वाद दिला. नंतर तेथें जमलेल्या लोकांपैकीं मोठया अशिक्षित लोकांना थोडक्या वेळांत मूळाक्षराची ओळख करून देऊन त्यांना वाचण्यास व लिहिण्यास कसें शिकविता येईल हें सप्रयोग दाखविण्यात आले. हा कार्यक्रम झाल्यावर श्रीमंत राजेसाहेबानी या कार्याच्या प्रसारार्थ २५० रुपयाची देणगी दिल्याचे जाहीर केले. सर्व कार्यक्रम आटोपल्यावर श्रीमंत राजेसाहेब भोरास परत आले.

श्रीनारायणमहाराज यांचे आशीर्वादानें, श्रीमंत राजेसाहेबांच्या प्रोत्साहनानें साक्षरताप्रसाराचें कार्य आसपासच्या खेड्यांतून समाधानकारक रीतीनें चालू आहे.

## नगरशेट रामदास यांनीं बांधलेल्या पुष्करणीचा उद्घाटनसमारंभ

भोर येथील प्रसिद्ध दानशूर व्यापारी नगरशेट रामदास किसनदास यांनीं ' लक्ष्मीबाई पुला ' शेजारीं एक पुष्करणी बांधून गोरगरिबांकरिता, वाटसरूंकरिता व जनावरांकरितां पिण्याच्या पाण्याची सोय केली आहे. या पुष्करणीचा उद्घाटनसमारंभ ता. १४ माहे एप्रिल १९३५ रोजीं श्रीमंत राजेसाहेब याचे हस्तें मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. या समारंभाकरिता गावांतील सर्व प्रमुख नागरिक हजर होते. स्वागतपर पद्यगायन झाल्यावर नगरशेट यांनीं स्वागतपर भाषण केलें. त्यात प्रथम त्यानीं श्रीमंत राजेसाहेब यांचे स्वागत करून ही पुष्करणी बाधण्याची मूळ कल्पना आपणास कशी आली तें थोडक्यांत सांगितलें. आणि ती पुष्करणी खुली करण्याबद्दल श्रीमंतांना विनंति केली. श्रीमंत राजेसाहेबांनीं समयोचित भाषण करून नगरशेट यांच्या या परोपकाराच्या कार्याचा गौरवपूर्वक उल्लेख केला. तसेंच या पुष्करणीपासून थोड्याच अंतरावर फक्त अस्पृश्यांकरितां नळ नेऊन पाण्याची सोय केल्याबद्दल त्याच्या दातृत्वाची प्रशंसा केली. आणि पुष्करणीच्या नळाची तोटी फिरवून पाणी सोडून ती लोकांच्या उपयोगाकरितां खुली केल्याचें जाहीर केलें. त्यानंतर श्रीमंत राजेसाहेबांच्या हस्तें कॉन्ट्रॅक्टर रा. राघू तुकाराम शेटे

व मिस्त्री यास उत्तम बांधकाम केल्याबद्दल पोषाख देण्यांत आले. भोर कायदे-मंडळाचे सभासद श्री. रा. ग. म. पानसे यांनीं नगरशेट याच्यातर्फे श्रीमंतांचे आभार मानल्यावर पानसुपारी होऊन समारंभ आटोपला.

## श्रीमंतांची विंगास भेट

भाटघर धरणांत गेलेल्या जमिनींच्या मोबदल्यात विंग आणि विझर हीं गांवें ब्रिटिश सरकारकडून संस्थान-दरबारला इनाम देण्यांत आलीं. इनामदार या नात्यानें श्रीमंत राजेसाहेब यांनीं विंगास भेट द्यावी अशी विंगचे रहिवाश्यानीं विनंति केली. त्यांच्या विनंतीस मान देऊन श्रीमंत राजेसाहेब यानीं २२ जून १९३६ रोजी विंगास भेट दिली. भेटीच्या वेळीं शाळेतील मुलामुलींना मिठाई वांटली व श्रीमंत राजेसाहेब यानीं रु. २५० ची देणगी दिल्याचें जाहीर केले. ही रक्कम विंगच्या लोकांना ग्रामसुधारणेच्या कार्याकडे खर्च करण्यास त्यानी परवानगी दिली आहे.

## बावडें येथील विविध कार्यक्रम

भोर संस्थानांत बावडें नांवाचें एक लहान खेडें आहे. तेथील इनामदार व भोरचे रहिवाशी रा. नरेंद्र काशिनाथ बावडेकर व बावडें येथील प्रमुख रहिवाश्यांनीं केलेल्या विनंतीवरून श्रीमंत राजेसाहेब यानीं ता. ११-६-१९३८ इ. रोजीं बावडें गावास भेट दिली. बावडें भोरपासून सुमारें १५—१६ मैल लाब आहे. श्रीमंत राजेसाहेब भोराहून २-३० वाजतां निघून ३-४५ वाजता बावडें येथें गेले. बरोबर श्रीमंत राजे शामराज हैद्राबाद हे होते. तेथील सर्व रहिवाश्यांनीं श्रीमंतांस सामोरें येऊन त्याचें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें. बावडें गांव पुणें-सातारा सडकेवर असून मुख्य रस्त्यापासून २ मैल लांब आहे. या मुख्य रस्त्यापासून गांवापर्यंत चांगली सडक नसल्यानें लोकांना जाण्या-येण्यास फार त्रास होई. ही सार्वजनिक अडचण दूर करण्याचें ठरवून रा. नरेंद्र काशिनाथ बावडेकर यांनीं सर्व गावकऱ्याच्या शारीरिक साहाय्याने व आर्थिक मदतीनें वरील सडक नुकतीच ग्रामोद्धाराच्या तत्त्वास अनुसरून तयार केली होती. त्या सडकेचा उद्‌घाटनसमारंभ रा. बावडेकर याच्या विनंतीवरून श्रीमंत राजेसाहेब यांनीं केला. हा समारंभ उरकल्यावर सर्व नागरिकानीं ढोल, लेजीम वगैरे वाद्यानीं युक्त अशा मिरवणुकीने

चित्रांक १०७



महाबळेश्वर येथील ब्रायर्स बंगला ( पंतसचिव लॉज बंगला नं. १ ). सन १८७० साली खरेदी करण्यांत आला. [ सं. पा. ६३४

श्रीमंताना बावडें येथील श्रीनागेश्वराच्या देवालयापर्यंत नेलें. तेथें श्रीमंतांस व बरोबरीच्या मंडळीस देण्यांत आलेल्या अल्पोपाहाराचा स्वीकार करून श्रीनागेश्वर-हॉलचा जीर्णोद्धारसमारंभ श्रीमंतांच्या हस्तें करण्यात आला. त्या वेळी ग्रामोद्धारकार्यांत विशेष भाग घेणारे श्री. बावडेकर याचे सहकारी व मित्र रा. गिजरे यानी बावडें ग्रामसुधारणामंडळाचा द्विवार्षिक अहवाल वाचून तो श्रीमंतास सादर केला. नवीन बाधलेल्या श्रीनागेश्वर-हॉलचें उद्घाटन करून श्रीमंत राजेसाहेब यानीं मराठी शाळेस भेट दिली. तेथें मुलामुलीना बक्षिसे व मिठाई वाटण्यात आली. जातां जाता बावडें ग्रामस्थानीं चालविलेल्या मोफत वाचनालयास श्रीमंतानीं भेट दिली. त्यानंतर बावडे गावातील चादणीचौकात श्रीमंतास मानपत्र अर्पण करण्यात आले. या समारंभाकरितां बावडे येथील व आसपासच्या गावातील सुमारे ५००--७०० मंडळी जमली होती. प्रथमतः रा. गिजरे यानीं समारंभास आलेले शुभ संदेश वाचून दाखविले आणि सातारचे श्रीमंत सरदार बाबासाहेब पंडितराव यानी श्रीमंत राजेसाहेबाच्या कारकीर्दी-संबंधीं गौरवपर भाषण केलें. नंतर बावडें गावातर्फेचें मानपत्र रा. रामचंद्र लक्ष्मण कुलकर्णी बावडेकर, हेडमास्तर शिरवळ शाळा, यानीं वाचून तें श्रीमंतास अर्पण केले. श्रीमंत राजेसाहेब यानीं भाषण करून सडकेचा व नागेश्वर-हॉलचा उद्घाटनसमारंभ करण्याची संधि दिल्याबद्दल आणि मानपत्र अर्पण केल्याबद्दल बावडें ग्रामस्थाचे आभार मानून तेथील ग्रामोद्धारकार्यास रु. ४०० ची देणगी दिली. या समारंभाचे वेळी बावडें येथील ग्रामस्थ रा. तुकाराम बापू पवार यानी वरील कार्याकरिता रु. १०१ देणगी दिली. नंतर हारतुरे, पानसुपारी व आभारप्रदर्शन झाल्यावर बावडें गावकऱ्यांनी व्यक्तिशः सुमारें ४०--५० पुष्पहार समर्पण केल्यावर समारंभ आटोपला व श्रीमंत राजेसाहेब भोरास सायंकाळीं ७ चे सुमारास परत आले.

## पुन्हां बावडें येथील विविध समारंभ

ता. ३१-५-१९३९ रोजीं श्रीमंतांची स्वारी दुपारीं २॥ वाजता भोराहून निघून बावडें येथें गेली. बावडें गांवचे वेशीपाशीं श्रीमंताचें, पाटील व गांव-करीवर्गाकडून स्वागत करण्यात आले व आगमनाप्रीत्यर्थ ९ बाराची सलामी देण्यांत आली. बावडें गावात जाण्यासाठीं गुदस्त सालीं ग्रामोद्धार-मंडळीनें जी

सडक केली त्या सडकेस ‘ तुकाराम रामजी पवार रस्ता ’ असें नांव श्रीमंतांचे हस्तें देण्याचा समारंभ झाला. सडकेवर एक मंडप घातला होता. तेथें श्रीमंतांची स्वारी स्थानापन्न झाल्यावर रा. कृष्णाजीपंत सबनीस यांनीं थोडेंसें भाषण करून श्रीमंतांस सडकेवर लावलेली मारबलची टॅबलेट खुली करण्यास विनंति केली. श्रीमंतानीं ती खुली करून रस्त्याचें नामकरण केल्याचें जाहीर केलें. ग्रामभूषण तुकाराम रामजी पवार यानीं श्रीमंतास हार घातला व पानसुपारी केली. टॅबलेटशेजारीं एका आंब्याच्या झाडाचें श्रीमंतांचे हस्तें वृक्षारोपण करण्यांत आलें. राष्ट्रीय स्वयंसेवक-संघाकडून श्रीमंतांस गार्ड ऑफ ऑनरची सलामी देण्यात आली. सदर संघाकरिता तयार केलेल्या जागेस ‘शंकराजी नारायण क्रीडांगण’ असें नाव देण्यांत आलें. त्याहि ठिकाणीं आब्याचे झाडाचें वृक्षारोपण करण्यात आले. तेथून श्रीमंत राजेसाहेबाना मिरवत मिरवत गांवात नेण्यांत आलें. ग्रामभूषण तुकाराम रामजी याचे घरीं श्रीमंतास अल्पोपाहार देण्यांत आला. श्रीमंताचे आगमनाप्रीत्यर्थ गुराचें प्रदर्शन भरविलें होतें तें श्रीमंतानीं पाहिले व नवीन तालमीचें उद्‌घाटन केलें. नंतर श्रीमंतानीं शाळेस भेट दिली व मुलास मिठाई वांटली. रा. नरेंद्र काशिनाथ बावडेकर यांनीं आपल्या वडिलाचें स्मारक म्हणून नवीन बाधलेल्या “ श्री. काशिनाथ निर्झरिणी ” नावाचे टाक्याचा उद्‌घाटनसमारंभ श्रीमंताचे हस्तें करण्यात आला. त्याचेनजीक एक वृक्षारोपण श्रीमंताचे हस्तें केलें. राजा रघुनाथराव चौकात मानपत्राचा समारंभ झाला. त्या वेळीं प्रथम ग्रामसुधारणामंडळाच्या कार्यकर्त्यांची श्रीमंतांस ओळख करून दिल्यानंतर श्री. वेदमूर्ति काकाभटजी मोरवेकर यानीं श्रीमंतास शुभ आशीर्वाद देऊन श्रीफल अर्पण केले. मुलांमुलींचीं स्वागतपर पद्ये झालीं, व गिजरे यांनीं तीन वर्षांचा ग्रामसुधारणामंडळाचा अहवाल सांगितला. नंतर पंडितराव कुलकर्णी यानीं मानपत्र वाचून दाखविले व श्रीमंतास अर्पण केलें. श्रीमंतानीं समयोचित भाषण करून रु. २०० देणगी मंडळाचे कार्यकर्ते रा. नरेंद्र बावडेकर यांच्या पसंतीप्रमाणें योग्य कार्याकडे खर्च करण्यास देण्याचें जाहीर केलें. नंतर हारतुरे, पानसुपारी झाली; व इतर गांवकरी यांनीं श्रीमंतांस हार घातले. नंतर रा. म. हे. देव यांनी थोडेंसें भाषण केले व पानसुपारी होऊन समारंभ आटोपला. नंतर स्वारी भोरास आली.

चित्रांक १०८



महाबळेश्वर येथील ' पंतसचिव लॉज ', बंगला नं. २. श्रीमंत राजेसाहेब यांनीं सन १९२७ मध्यें नवीन बांधला. [ सं. पा. ६३४

ग्रामसुधारणेसंबंधीं श्रीमंत राजेसाहेबांचीं काय मतें आहेत तीं त्यानीं वेळोवेळीं केलेल्या भाषणातून प्रगट झालीं आहेत. ग्रामसुधारणेच्या खऱ्या मार्गाची दिशा त्यानीं दाखवून दिली. त्या मार्गानें संस्थानात ग्रामसुधारणेचें कार्य चालू आहे. सहकार्यानें व स्वावलंबनानें कार्य करण्याची जनतेंत गोडी उत्पन्न होत आहे. बऱ्याच गावातून रस्ते तयार करण्याचे व पिण्याकरिता स्वच्छ पाण्याची सोय करण्याचें काम चालू आहे. ज्या ज्या ठिकाणीं गांवकरी, स्वावलंबनानें, एकजुटीनें व आर्थिक झीज सोसून अशीं कामें करीत आहेत त्या त्या ठिकाणच्या लोकास तालुका बोर्डांकडून मदत मिळत असून श्रीमंत राजेसाहेबांकडूनहि सक्रिय सहानुभूति दाखविण्यात येते.

ता. १७ ऑगस्ट १९३४ रोजीं दक्षिणेंतील संस्थानचे ए. जी. जी. लेफ्टनंट-कर्नल एच्. विल्बरफोर्स-बेल यानीं भोरास भेट दिली. त्या वेळीं दरबारांत त्यानीं आपल्या भाषणात ग्रामसुधारणेबाबत श्रीमंत राजेसाहेबांच्या धोरणाविषयीं पुढील उद्गार काढले. ते म्हणाले:—

"You have been particularly interested in forwarding measures for the uplift of the rural areas of your State, and I congratulate you upon your efforts in this direction and also upon the public spirit which prompted you to make a donation of Rs. 1500/- to the Behar Earthquake Relief Fund. Your readiness to assist a terribly afflicted province to the best of your ability indicated your desire to do what you can to alleviate distress."

# प्रकरण १२ वें

# सरकारी व खासगी इमारती

श्रीमंत राजेसाहेबांनीं सरकारी व खासगी इमारती दुरुस्त राखण्याचे व नवीन बाधण्याचे कामीं विशेष खर्च केला त्याची माहिती.

## भोर राजवाडा ( खासगी )

भोर येथील राजवाडा श्रीमंत चिमणाजी रघुनाथ ऊर्फ नानासाहेब यांनीं सुमारे दोन लक्ष रुपये खर्चून सन १८६९ मध्यें बाधला.

श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर दुरुस्तीच्या अभावीं वाडयातील गच्च्या वगैरे भाग मोडकळीस येऊन ठिकठिकाणीं गळती झाली असल्याचे दिसून आले. त्या गच्च्या सर्व काढून टाकल्या. वाडयाचे मागील चौकात कारंजें होतें. तें आतून पोकळ झाल्यामुळें इमारतीखाली पाणी मुरून त्या भागांत गारठा बराच वाटूं लागला. त्यामुळे तें कारंजे काढून टाकावे लागले. याशिवाय बऱ्याच दुरुस्त्या करून हल्ली वाडयावर बहुतेक ठिकाणीं पत्र्याचें आच्छादन केले आहे. या सर्व दुरुस्तीस श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यापासून सुमारे ३०,००० रुपये खर्च झाला आहे. वाडयाची दुरुस्ती वगैरे खर्च श्रीमंतांचे खाजगींतूनच होतो. याशिवाय सर्व वाडयांत इलेक्ट्रिक फिटिंग करून विजेच्या दिव्याची सोय सुमारे ७५०० रुपये खर्च करून केली आहे. हल्लीं दरसाल वाडा दुरुस्तीची तरतूद करून ठेविली आहे. वाडयातील पूर्वीचे नादुरुस्त सामान ( फर्निचर ) काढून टाकून सुमारे १२००० रु. खर्च करून नवीन सामान खरेदी केले. वाड्यांत दुसऱ्या मजल्यावर जाण्यासाठीं विजेच्या साहाय्याने चालणारा लिफ्ट लवकरच बसविण्यात येणार असून त्या कामीं रु. ४६७५ खर्च करण्यांत येणार आहेत.

## रामबाग बंगला ( सरकारी )

भोरनजीक पूर्वेस ‘ रामबाग ’ नावाचा बाग असून बागेत श्रीमंत रावसाहेब यानीं एक बंगला बाधून पाहुण्याची राहण्याची सोय केली आहे. भोरचे पो. ए. हे भोरास आले असता तेथें त्याची राहण्याची सोय करण्यात

येत असे. हा बंगला फार लहान असल्यामुळें जास्त पाहुणे आल्यास फार गैरसोय होई. या बंगल्याचीहि बरीच दुरुस्ती करण्यात आली आहे. मामान ( फर्निचर ) बेताचेंच असल्यामुळे फार अडचण भासत असे. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर बऱ्याच किमतीचें फर्निचर घेऊन ती उणीव दूर केली; तथापि इमारतीची उणीव होतीच १०.३७ साली बागेचे बाहेरचे बाजूस नवीन बंगला बांधून ही उणीव नुकतीच दूर करण्यात आली आहे. त्याकरिता सुमारे ७००० रु. खर्च आला. बंगल्यात विजेच्या दिव्याची सोय करण्यात आली आहे.

## भोर येथील गेस्ट हाउसेस ( सरकारी )

वरील बंगल्याखेरीज भोर गावात, श्रीशंकराजी नारायण उत्सव, श्रीरामनवमी उत्सव, इत्यादि उत्सवास येणाऱ्या सरकारी पाहुण्याचे सोयीकरिता, तसेच कायदेमंडळाचे बैठकीकरिता कायदेमंडळाचे सभासद भोरास येतात त्याच्या व इतर कोणीहि पाहुणा म्हणून आल्यास त्याच्या अशा सर्वांच्या सोईकरिता म्हणून दोन गेस्ट हाउसेस तयार केली आहेत. त्यापैकी नंबर १ चे गेस्ट हाउस वाड्याचे शेजारींच आहे. तें बरेच मोडकळीस आले होतें तें दुरुस्त करून तेथें राहण्याची सोय करण्यात आली आहे. नंबर २ चे गेस्ट हाउस बजरंग आळींत असून तेंहि वाड्यापासून जवळच आहे. त्यातहि जरूर ते सामान ठेवून राहण्याच्या सोईचें ठेविले आहे. त्यामुळे आता कोणीहि पाहुणा भोरास आल्यास त्याची गैरसोय होत नाही.

## सातारा वाडा ( खासगी )

सातारा येथें यादो गोपाळ पेठेत सन १८२६ सालीं श्रीमंत रघुनाथ चिमणाजी याचे कारकीर्दींत हा वाडा बांधण्यात आलेला आहे. त्याचे दुरुस्तीकडे श्रीमंत बाबासाहेब यानीं गादीवर आल्यानंतर रु. ६००० खर्च केला आहे. हा सर्व खर्च व वाड्याचा बारमाही खर्च श्रीमंत राजेसाहेब याचे खाजगींतूनच होत असतो. या वाड्यात नुकतीच विजेच्या दिव्याची सोय केली आहे.

## पुणें वाडा ( खासगी )

पुणें येथें शुक्रवार पेठेंत वाडा आहे. तो श्रीमंत सदाशिव चिमणाजी यानीं सन १८७५ इ. मध्यें बाधला. या वाड्याचे दुरुस्तीकडे श्रीमंत राजेसाहेब यानीं रु. ३०,००० खर्च केले आहेत. हाहि खर्च खासगीकडून होतो.

## पुणें बंगला ( सरकारी )

वरील शुक्रवार पेठेतील वाडा श्रीमंताच्या वाढत्या परिवारास पुरेसा नसल्यामुळे, श्रीमंत राजकुमाराना शिक्षणाकरितां पुण्यास राहावे लागत असल्यामुळें व कामकाजानिमित श्रीमंत राजेसाहेबांना मधून मधून पुणें येथें मुक्काम करावा लागत असल्यामुळें त्यांनीं मंगळदास रोडवर नवीन पद्धतीनें बाधलेला एक बंगला सुमारे दीड लाख रुपयांस फर्निचरसुद्धां १९२३ सालीं खरेदी केला. या बंगल्याच्या मागील बाजूस नोकर लोकाना राहण्यासाठीं रु. ४०,००० खर्च करून नवीन इमारत बांधली. या बंगल्यास 'लक्ष्मीविलास' असें नांव देण्यांत आलें आहे. या बंगल्यांत दुसऱ्या मजल्यावर जाण्यासाठीं लवकरच विजेच्या साहाय्यानें चालणारा लिफ्ट रु. ४७७५ खर्च करून लावण्यात येणार आहे. याखेरीज नोकरलोक राहण्यास जागा पुरत नाहीं, यास्तव आणखी जागा रु. ८८०० खर्चून बांधण्याचें ठरलें आहे. मध्यंतरीं बंगल्याच्या मागील भागास आग लागून कांहीं भाग जळाला. तो रु. १३७५ खर्च करून नवीन बाधण्यात आला. पुणें बंगल्याच्या खर्चासाठीं स्टेटकडून दरसाल रु. ५००० घेण्यांत येतात. याखेरीज जो जास्त खर्च लागतो तो खाजगींतून करण्यांत येतो.

## महाबळेश्वर बंगला ( सरकारी )

सन १८७० सालीं श्रीमंत चिमणाजी रघुनाथ यानीं 'ब्रायर्स' नांवाचा बंगला खरेदी केला. हा बंगला लहान असल्यामुळे व ठराविक जागेंत ठराविक माणसेंच राहिलीं पाहिजेत, असा महाबळेश्वर येथील नियम असल्यामुळें त्यात फार थोड्या लोकांचा समावेश होई. स्वारींतील सर्व लोकांना राहण्याकरिता दुसरीकडे भाड्यानें जागा घ्यावी लागे. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर रु. ३२,००० खर्च करून नवीन बंगला व स्वारींतील सर्व लोकाना

चित्रांक १०९



पुणें येथील मंगळदास रोडवरील ' लक्ष्मीविलास ' बंगला. श्रीमंत राजेसाहेबांनीं सन १९२३ मध्यें खरेदी केला. [ सं. पा. ६३४

( सुमारें ५० लोकांना ) एके ठिकाणींच राहतां येईल अशी पुरेशी इमारत बांधली. त्यामुळें हल्लीं सुमारे ५० नोकरलोकाना या बंगल्यात राहण्याची परवानगी मिळाली आहे. या बंगल्याकरिता नवीन सामान ( फर्निचर ) खरेदी करण्यात आले आहे, व बंगल्यास विजेच्या दिव्याची सोय करण्यात आली आहे. पूर्वीचें ' ब्रायर्स ' हें नाव बदलून हल्लीं त्यास ' पंतसचिव लॉज ' असें नाव देण्यात आलें आहे.

## श्रीशंकराजी नारायण यांची समाधि ( खासगी )

संस्थानातील अंबवडें या सृष्टिसौंदर्यानें युक्त अशा खेडेगावीं संस्थानचे संस्थापक ब्रम्हीभूत श्रीशंकराजी नारायण हे समाधिस्थ झाले, ही हकीगत सर्वलोकविश्रुत आहे. या ठिकाणीं शूर व पराक्रमी अशा या राजकारणी थोर पुरुषाची समाधि साधी काळया दगडाची बांधलेली होती. ती संन्यासाश्रमातील निरिच्छ विरागी पुरुषाच्या वृत्तीला साधेपणानें साजेशी असली तरी संस्थानचे संस्थापक या नात्यानें वैभवशाली पुरुषाला अनुरूप अशी नसून जीर्णावस्थेस प्राप्त झालेली होती. ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेबाच्या लक्षात येऊन त्या थोर पुरुषाचे कीर्तीला शोभून दिसेल अशा वैभवानें युक्त अशी उठावदार समाधि संगमरवरी दगडाची १९३५ मध्यें बाधून त्यानीं जीर्णोद्धार केला. समाधीचे ठिकाणी तीन वृंदावनें असून मधील मोठे वृंदावन श्रीशंकराजी नारायण याच्या समाधीवर बाधलेलं आहे. समाधीकरिता वापरलेला दगड उत्तर हिंदुस्थानांतून मकराणा या प्रसिद्ध ठिकाणाहून आणलेला आहे. समाधीचे पुढील बाजूस भव्य विस्तृत सभामंडप बाधला आहे. मंडपाच्या भोंवताली पूर्वीची इमारत दुरुस्त करून सभामंडपास शोभेशी नवीन इमारत बाधण्यात आली आहे. समाधीच्या भोंवतालचा भाग उंचसखल असून त्यावर झुडपें वाढलीं होती. तीं काढून टाकून बगीचा करण्यालायक जमीन सपाट करण्यात आली आहे. समाधीजवळील ओढ्याचें पाणी पंपाने इमारतीत नेण्यात आले आहे. ही इमारत व सभामंडप या सर्वांस मिळून ३१०,०० रुपये खर्च लागला आहे. ह्यासंबंधींचा सर्व खर्च खाजगींतून होतो.

## श्रीक्षेत्र काशी येथील देवालय ( खासगी )

श्रीमंत राजेसाहेब यांचे वडील कै. श्रीमंत रावसाहेब यांनीं शितळा-घाटावर शिवपंचायतनाचे देऊळ रु. ५०००० खर्च करून सन १८९७ साली बाधले, आणि कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचें नाव शिऊबाई व स्वतःचें नाव शंकरराव असल्यानें त्या दोहोंचें द्योतक म्हणून मंदिरास 'शिवा-शंकर' असें नाव दिले. देऊळ दगडी असून दक्षिणी पद्धतीनें बाधण्यांत आले आहे. याच देवळाचे आवारात त्यानी आपली कन्या तान्हुबाई यांचे निधनानंतर त्यांच्या स्मरणार्थ एक लहानसें देऊळ बांधलें आहे. येथें अन्नछत्र ठेवण्यात आलेलें आहे. महागाईमुळे श्रीमंत रावसाहेब याच्या वेळींच येथील कांहीं खर्च कमी करण्यात आले होते. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यावर त्यानी देवस्थानचे उत्पन्न वाढविलें. नादुरुस्त झालेला सभामंडप दुरुस्त केला. अन्नछत्राची जागा दुरुस्त करून दुमजला सहा खण वाढविले. देवळात व बाहेरील इमारतींत पुरेसे इलेक्ट्रिक फिटिंग केले. काशीकडे उष्मा फार असल्यामुळे इलेक्ट्रिक पंख्याचा उपयोग नेहमी होण्यासारखा आहे. ह्या सर्व दुरुस्तीस एकूण सुमारें ७४०० रु. खर्च लागला.

ह्याच मंदिराच्या मोकळ्या जागेंत श्रीमंत बाबासाहेब यांनी रु. ८००० खर्च करून दोन नवीन शिवमंदिरें बाधलीं आहेत. व त्यांपैकीं एकास कै. श्रीमंत सौ. लक्ष्मीबाई राणीसाहेब याच्या स्मरणार्थ 'श्रीलक्ष्मीश्वर' असे नाव दिले आहे. ह्या देवस्थानाकडे बारमाही खर्च सुमारें ४००० रु. आहे. या संबंधाचा सर्व खर्च खाजगींतून होतो.

चित्रांक ११०



ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांची नवीन बांधलेली समाधि ( सन १९३३ ), अंबवडें.

[ सं. पा. ६३५

## प्रकरण १३ वें

# पंचम जॉर्ज यांचा रौप्यमहोत्सव ( सिल्व्हर ज्युबिली )

हिंदुस्थानचे माजी बादशहा पंचम जॉर्ज व महाराणी मेरी यांचा रौप्यमहोत्सव सर्व ब्रिटिश साम्राज्यांत ता. ६ मे सन १९३५ इ. रोजीं मोठ्या थाटानें साजरा करण्यात यावा असे जाहीर झाले. तेव्हा भोर येथेंहि हा समारंभ कशा प्रकारें करावा याचा विचार करण्याकरिता भोर नागरिकाची सभा श्रीराममंडपात श्रीमंत राजेसाहेबाचे अध्यक्षतेखालीं भरली. प्रथमत· श्रीमंत राजेसाहेबानी ब्रिटिश सरकारचा हिंदुस्थानशीं संबंध आल्यापासून हिदुस्थानचा अनेक प्रकारे कसा फायदा झाला हें विशद करून सागितले व ब्रिटिश सिंहासनाशीं संस्थानची पूर्वापार असलेली अविचलित राजनिष्ठा लक्षात घेऊन हा समारंभ योग्य रीतीने साजरा करण्याची आवश्यकता किती आहे ही गोष्ट त्यानीं नागरिकाच्या नजरेस आणून दिली. कायदेमंडळाचे सभासद श्रीयुत पानसे व श्रीयुत पाटणकर या वकिलद्वयानी भाषणे करून श्रीमंताच्या कल्पनेला दुजोरा दिला. नंतर फंड जमा करण्याकरिता एक मध्यवर्ति कमिटी नेमण्याचा ठराव पास झाला. या कमिटीस प्रत्येक तालुक्यात फंड जमा करण्याकरिता तालुका-कमिट्या नेमण्याचा अधिकार देण्यात आला. हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन याच्या पत्नी लेडी विलिंग्डन यानीं सिल्व्हर ज्युबिली फंड उभारला होता. त्या फंडास मदत करण्याकरिता हिंदुस्थानात ठिकठिकाणीं फंड जमा करण्यात येत होते.

ता. १८ एप्रिल १९३५ रोजीं भोर म्युनिसिपालिटीनें भोरास वर्गणी जमविण्याकरिता श्रीराम-मंडपातच सभा भरविली. या सभेचे अध्यक्षस्थान श्रीमंत बाबासाहेबानीं स्वीकारले होतें. या वेळींहि श्रीमंत बाबासाहेबानी उद्बोधक भाषण करून व्हाइसरॉयाचे फंडास मदत करणें किती अगत्याचें आहे हे निदर्शनास आणून दिले. श्रीमंत राजेसाहेबाचे भाषणाचा परिणाम होऊन जागचे जागीं नगरशेट रामदास व नगरभूषण थोपटे यानीं अनुक्रमें रु. १०० व रु. १२५ देण्याचे जाहीर केले. या सभेचें अध्यक्षस्थान श्रीमंत राजे-

साहेबानीं स्वीकारल्यामुळें सभेचें कार्य यशस्वी झाले व फंड जमा करण्यास जोराची चालना मिळाली.

या संधीचा फायदा घेऊन श्रीमंत बाबासाहेबांनीं भोर दवाखान्याचें King George V Silver Jubilee Hospital ( किंग जॉर्ज दी फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल ) मध्यें रूपांतर करण्याची व भोर दरबारकडून फंडास मदत म्हणून पाठविण्यात येणाऱ्या रकमेपैकीं जी रक्कम परत येईल तीमध्यें आणखी भर घालून तिचा विनियोग हॉस्पिटलचे खर्चाकडे करण्याची ने. ना. व्हाइसरॉयसाहेबांकडून परवानगी मिळविली.

व्हाइसरॉयसाहेबानीं जो फंड उभारला होता त्याचा विनियोग प्रजेच्या आपत्तिनिवारणार्थ कोणत्या तरी कार्याकडे करावा अशी बादशहांनीं आपली इच्छा प्रदर्शित केली होती.

## रौप्य-महोत्सव समारंभ

ता. ६ मे सन १९३५ इ. रोजीं बादशहा पंचम जॉर्ज यांचा रौप्य-महोत्सवसमारंभ मोठ्या थाटानें भोर येथें साजरा करण्यांत आला. या दिवशीं सकाळीं परेड ग्राउंडवर सेरिमोनियल परेड झाल्यावर ३१ तोफांची सलामी झाली व ती श्रीमंतानीं घेतली. बादशहा व महाराणी यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त व्हावें म्हणून सर्व देवालयांतून प्रार्थना करण्यांत आल्या. दुपारीं १ वाजता श्रीराम-मंडपात दरबार भरला होता. या दरबारास नागरिकांची अतोनात गर्दी झाली होती. मूर्तिमंत उत्साहच वावरत असल्याचे व बादशहाविषयीं नागरिकाचे मनातील राजनिष्ठेस भरती आल्याचें दिसत होतें. प्रथम ए. जी. जी. साहेबाचेकडून आलेला पुढील खलिता दिवाणानीं वाचून दाखविला:

KHARITA

To

Meherban Shrimant Raghunathrao Shankarrao,
Pant Sachiv, Chief of Bhor.

My friend,

It has afforded me sincere pleasure to be informed of the preparations which you have made to commemorate, in a manner worthy of the occasion, the twenty-fifth year of the reign of His Most Gracious Majesty the King-Emperor of

India. We are all united by our deep devotion to Their Majesties, and it will give me much gratification to communicate to His Excellency the Viceroy for the knowledge of His Majesty this evidence of your loyalty and devotion.

During the dark days of the Great War, when the Ruling Princes and Chiefs freely put forth their resources in the defence of the Empire, and after the coming of peace, when the Empire had to endure the trials of the economic upheaval which tended to disturb the whole structure of the civilised world, ,His Majesty set us all a magnificent example of duty and service and gained the whole-hearted devotion and loyalty of his subjects throughout the Empire. Under the protecting shelter of His Majesty's rule the Empire has now for long enjoyed the blessings of peace and the Ruling Princes and Chiefs have been free to devote themselves to the prosperity of their subjects and the moral and material advancement of their States. Here in India momentous changes have taken place and the Ruling Princes and Chiefs have taken a conspicuous part in assisting to inaugurate the far-reaching reforms which, we all trust, will bring contentment and happiness to the peoples of this great country,

By so readily taking the opportunity afforded by this auspicious occasion, you have shown your just appreciation of the great benefits which you have experienced under the benign and beneficent rule of His Majesty the King.

You may rest assured that it is our Gracious Sovereign's desire to extend to you on all occasions his sympathy and hearty assistance, to support your authority and to enhance your personal consideration.

It will ever be my aim to give you my cordial support in all that contributes to your personal welfare and prosperity of your subjects and the progress of your State.

Kolhapur,                                        Yours sincerely,
1st May 1935.                                    J. C. Tate.

खलिता-वाचनानंतर ए. जी. जी. यांचेकडून दरबारकडे ४ पदकें (Silver Jubilee Medals) आल्याचे दिवाणानीं सांगितले; एक श्रीमंत राजेसाहेबांकरिता, दुसरें श्रीमंत युवराजसाहेबांकरितां, तिसरें श्रीमंताचे पर्सनल असिस्टंट श्रीयुत न. गो. अंबेकर यांचेकरितां व ४ थें दरबार वकील श्रीयुत र. के. देशपांडे यांचे करितां. श्रीमंत राजेसाहेबानीं ज्याचीं त्याना पदकें दिलीं. श्रीमंत राजेसाहेबांनीं विस्तृत हृदयस्पर्शी भाषण करून रौप्यमहोत्सवाचे निरंतर स्मरण राहावे म्हणून भोर दवाखान्याचें हॉस्पिटलमध्यें रूपातर करून त्यास 'पंचम जॉर्ज सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल' असें नांव देण्याचा आपला हेतु असल्याचें जाहीर केलें व त्याकरितां स्टेट फंडातून १०,००० व खाजगी उत्पन्नांतून १०,००० रुपये देण्याचे जाहीर केले. संस्थानात फंडाची रक्कम ६००० रुपये जमली होती. त्या फंडास स्वतःचे खाजगी १००० रुपये देण्याचेंहि त्यानीं जाहीर केले. संस्थानात तालुक्याचे ठिकाणींहि हा समारंभ साजरा करण्यात आला.

फंडाची एकंदर रक्कम रु. ७,००० झाली, त्यात दरबारचे आणखी १००० रुपये घालून ८००० रुपयांची रक्कम व्हाइसरॉयाचे फंडाकडे पाठविण्यात आली. या रकमेपैकीं सुमारे ५६०० रुपये परत आले.

श्रीमंत राजेसाहेबाचे भाषणानंतर दरबारतर्फे बादशहा पंचम जॉर्ज याजकडे पाठविण्याचा संदेश सेकंड कौन्सिलर मि. व्ही. जी. रानडे, एम्. ए., एलएल. बी., यानीं वाचून दाखविला. तो संदेश एका थैलींत घालून बादशहाचेकडे पाठविण्यात आला. तो संदेश पुढें दिला आहे.

**Message of Loyal congratulations and Good wishes.**

His Most Gracious Majesty George V, by the Grace
of God, King of Great Britain and Ireland and
of the Dependencies thereof and Emperor
of India and Her Most Excellent
Majesty Queen Mary.

May it please Your Most Benevolent Imperial Majesties,

I deem it a fortunate privilege and honour to have this joyous opportunity of most humbly and respectfully soliciting permission to lay at the foot of Your Majesties' august Throne

## चित्रांक १११




राज्यारोहणसमयीं वेस्टमिन्स्टर ॲबेमधील बादशहा सहावे जॉर्ज यांना मुकुट घालण्याचा समारंभ.

[ सं. पा. ६४५

## चित्रांक ११२




बकिंगहॅम राजवाड्याच्या बाल्कनीमध्यें बादशहांचे कुटुंबांतील मंडळींचा कॉरोनेशननंतर घेतलेला फोटो.

मागील बाजूस–१ हर मॅजेस्टी दि क्वीन; २ क्वीन मेरी; ३ हिज मॅजेस्टी जॉर्ज दि सिक्स्थ.

पुढील बाजूस–१ प्रिन्सेस एलिझाबेथ; २ प्रिन्सेस मार्गारेट. [ सं. पा. ६४५

my sinceremost and reverential congratulations upon the coming of the happy event, I mean, the completion of the Twenty-fifth year of Your Majesties' benign and eventful regime and it affords me the greatest delight and heart-felt satisfaction to be able to enjoy this pleasurable occasion by expressions of my unswerving and deep-seated loyalty and unqualified and whole-hearted attachment to the British Crown and Your Majesties' sacred Persons. I need not reiterate, it is a matter of gratification and pride to me and my State to be a member and to occupy a place, however small it may happen to be, in the commonwealth of nations and the comity of peoples that go to form the Mighty British Empire. That the Empire is angelically watched and guarded by the Goddesses of Peace, Prosperity and Contentment is unmistakably evinced by two, among the many, significant and noteworthy facts, Your Majesty's recovery from the peril of a very serious illness and the successful emergence of the Empire from the ordeal of the Great War. Under the ægis of the British flag and Your Majesties' paternal care, we, the Princes and the people of India are enjoying, I have the pleasure to candidly acknowledge with genuine and deepmost feelings of gratitude, complete peace and assured security from all troubles, external and internal. It is Your Majesty's beneficent sceptre that has welded the peoples of India into one nation. Your Majesties reign, already a record of remarkable progress, promises to be a turning point for good in the history of India. That Your Majesties gave your Royal initiation to the idea of devoting the Silver Jubilee Fund to the relief of the sick and suffering is a striking proof of Your Majesties' true sympathy and earnest concern for the welfare and happiness of the people, especially the poor and distressed among them. This act of humanity is sure to plant Your Majesties' names in the hearts of all. To further the noble object of Your Majesty I may be allowed to mention herein my intention of commemorating this auspicious and memorable event of the Silver Jubilee of Your Majesties' reign by converting the existing State Charita-

ble Dispensary into a HOSPITAL to be named as KING GEORGE V SILVER JUBILEE HOSPITAL and of setting apart an additional sum of Rs. 20,000 ( twenty thousand ) as a permanent Fund, the interest of which is to be utilised in meeting the expenses of the Hospital, the present expenditure over the Charitable Dispensary continuing as before. The new institution, though modest at present, promises to grow, in times to come, by affording greater and easier medical relief. I can not let go this opportunity without expressing my deepmost obligations to H. E. the Viceroy and to Your Majesty as well for granting me the needful permission so earnestly sought for, to name the Hospital as above and thus associate Your Majesty's inspiring name with an institution in my State.

It also gave me great and sincere pleasure to receive with heart-felt gratitude the Kharita, from the Agent to the Governor-General of India for the Deccan States and Resident at Kolhapur, conveying to me Your Majesty's desire, on all occasions, to extend me your warm sympathy and hearty assistance to support my authority and to enhance my personal consideration.

Before concluding, I would like to refer herein to one small and personal matter, which I value most. I ever cherish the memory of the courtesy and kindness which it pleased Your Majesties to show towards me in general during my two months' stay in London in the year 1930 A. D. as well as in granting me an interview and asking me to lunch with Your Majesties. And, as in duty bound by feelings of attachment and allegiance, I beg leave to conclude, with all respects and regards, by offering my fervent prayers to the Omnipotent Lord for blessing Your Majesties with a long life of health and happiness and an all-round prosperity and progress of the Empire.

I have the honour to be
Your Majesties'most dutiful & loyal Servant
**R. S. Pant Sachiv**
Ruler of Bhor.

चित्रांक ११३



बेस्टमिन्स्टर ॲबेमधील बादशहांच्या सिंहासनापलीकडील पीअर्स बसण्याची जागा. पहिल्या मजल्यावर × खूण केलेल्या ठिकाणीं श्रीमंत राजेसाहेब, भोर, राज्यारोहणाच्या वेळीं बसले होते.

[ सं. पा. ६४६

रौप्य ज्युबिली समारंभाचे वेळीं अभिनंदनपर संदेश व वरील सन्मान-पत्रिका दरबारतर्फे बादशहांकडे पाठविण्यात आली त्यास बकिंगहॅम पॅलेसमधून खालील उत्तर आले :—

Buckingham Palace,
May 1935

" King Emperor is graciously pleased to express his thanks for the greetings addressed to His Imperial Majesty on the occasion of his Silver Jubilee, and much appreciates the sentiments of loyalty and goodwill which prompted this message. "

त्याचप्रमाणें भोर स्टेट कायदेमंडळानें पास केलेला बादशहाचे अभिनंदनाचा ठराव श्रीमंत राजेसाहेब यानीं ए. जी. जी. मार्फत बादशहांकडे पाठविला होता.

श्रीमंत राजेसाहेबांनीं आपला हेतु जाहीर केल्याप्रमाणें तो लवकरच अमलांत आणण्याचें त्यांनीं ठरविले. त्याकरिता दवाखान्याच्या इमारतींत पुष्कळ फेरफार करून हॉस्पिटलला योग्य अशी ती इमारत तयार करण्यात आली. श्रीमंत राजेसाहेबानीं दिलेले वीस हजार रुपये व फंडापैकीं परत आलेली रक्कम याच्या प्रॉमिसरी नोटा घेऊन त्याच्या व्याजाचा विनियोग पूर्वीं दवाखान्याकडे होत होता त्यात ह्या रकमेची भर घालून खर्च करण्याचें ठरविण्यात आलें. हॉस्पिटलला लागणारें नवीन सामान व उपकरणें खरेदी करण्यात आलीं. सर्व तयारी झाल्यावर ए. जी. जी. लेफ्टनंट-कर्नल जे. डी. गॉर्डन यानी ता. २२ एप्रिल सन १९३६ इ. रोजीं भोरास भेट दिली. त्याचा मुक्काम भोर येथें ता. २२ ते ता. २४ अखेरपर्यंत होता. त्या मुक्कामात ता. २४ एप्रिल रोजीं त्यांचे हस्तें हॉस्पिटलचा उद्घाटनसमारंभ करण्यांत आला. ( डिस्पेन्सरीचें हॉस्पिटलमध्यें रूपांतर करण्यात आले ती हकीकत प्रकरण ८ मध्यें दिली आहे. )

## बादशहा षष्ठम जॉर्ज यांचें राज्यारोहण

बादशहा पाचवे जॉर्ज १९३६ च्या जानेवारी महिन्याचे २१ तारखेस निधन पावले. त्याच्या पश्चात् त्याचे ज्येष्ठ चिरंजीव आठवे एडवर्ड हे हिंदुस्थानचे

बादशहा झाल्याचें ता. २२ रोजीं जाहीर करण्यात आले. पुढें त्यांचा जाहीर राज्यारोहणसमारंभ होण्यापूर्वींच काहीं खाजगी परंतु अत्यंत महत्त्वाच्या अशा अपरिहार्य कारणामुळें त्यांना इंग्लंडच्या गादीचा त्याग ता. १० डिसेंबर १९३६ रोजीं करावा लागला. आठवे एडवर्ड यांनीं राज्यत्याग केल्यामुळें त्याचे धाकटे बंधु सहावे जॉर्ज म्हणून इंग्लंडच्या गादीवर आल्याचा जाहीरनामा ता. ११ डिसेंबर १९३६ ला प्रसिद्ध करण्यात आला. त्या दिवशीं हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं मोठा उत्सव करण्यात आला त्याप्रमाणें भोर येथेंहि दरबार भरवून हा जाहीरनामा वाचून दाखविण्यांत आला; दरबारला सर्व अधिकारी, प्रमुख नागरिक वगैरे हजर होते. त्या प्रसंगीं बादशहा गादीवर आल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणारा व संस्थानची राजनिष्ठा प्रदर्शित करणारा संदेश ए. जी. जी. मार्फत पाठविण्यात आला. कोल्हापूर येथें रेसिडेन्सींत दरबार भरवून जाहीरनामा वाचण्याचा समारंभ ता. १४-१२-१९३६ रोजीं झाला. त्या समारंभाकरिता भोर दरबारतर्फें रा. वि. गो. रानडे, एम्. ए., एलएल. बी., सेकंड कौन्सिलर, व रा. र. के. देशपांडे, दरबार वकील, हे हजर राहिले होते. आठवे एडवर्ड यांचा राज्यारोहणसमारंभ १२ मे १९३७ इ. रोजीं लंडन येथें करण्याचें जाहीर करण्यात आलें होतें. मध्यंतरीं हें नवीन वादळ उपस्थित होऊन आठवे एडवर्ड याचे जागीं सहावे जॉर्ज बादशहा म्हणून आले. या घडामोडीमुळें राज्यारोहणसमारंभ पुढें ढकलला जाईल असें सर्वांना वाटत होतें. परंतु तशा प्रकारचा कांहींहि फरक न होतां सहावे जॉर्ज यांचा राज्यारोहणसमारंभ लंडन येथे मोठ्या थाटानें त्याच तारखेस म्हणजे ता. १२ मे १९३७ रोजीं साजरा करण्यांत आला. हा दिवस हिंदुस्थानांतहि मोठा सुदिन मानण्यांत येऊन त्या दिवशीं हिंदुस्थानांतल्या सर्व प्रमुख ठिकाणीं मोठा उत्सव साजरा करण्यांत आला. या वेळीं श्रीमंत राजेसाहेब बादशहांच्या राज्यारोहणसमारंभाकरिता लंडन येथें गेले होते. तरी त्या दिवशीं भोर येथेहि इतर ठिकाणाप्रमाणें समारंभ करण्यात आला. शहरातील सर्व रस्ते ध्वजापताकानीं सुशोभित केले होते. सकाळीं प्रथम ३१ तोफांची सलामी देण्यांत आली. परेड ग्राउंडवर सेरिमोनिअल परेड झाली. श्रीमंत राजेसाहेब हे लंडन येथील समारंभास हजर

चित्रांक ११४




वेस्टमिन्स्टर ॲबेमधील क्वायर, लंडन.

[ सं. पा. ६४६

राहण्यास गेले असल्यामुळें परेडला मे. रा. ब. दिवाण व सर्व अधिकारी व गांवातील सर्व नागरिक हजर होते. रा. ब. दिवाणसाहेब यानीं सलामी घेतली. सरकारी व शहरांतील सर्व देवळातून देवताना भिक्षुकवर्गाकडून अभिषेक, पूजाअर्चा करविण्यात आली. मुसलमानानीं मशिदीतून प्रार्थना केल्या. दुपारीं गोरगरिबाना अन्नदान करण्यात आलें. दुपारीं ३ वाजता राजवाड्यांतील श्रीराम-मंडपांत दरबार भरविण्यात आला. या दरबारास सर्व सरकारी अधिकारी, नोकरवर्ग व प्रमुख नागरिक शेटसावकार हजर होते. सर्वांच्या चर्येवर मूर्तिमंत आनंद पसरलेला होता. प्रथमतः मे. रा. ब. दिवाणसाहेब यानीं भाषण करून बादशहाच्या सुस्वभावाचे व त्याच्या अंगी असलेल्या गुणांचें वर्णन केले. नंतर धर्माचार्यांनीं आशीर्वचनपर श्लोक म्हणून दाखविले. त्यानंतर भोरचे प्रसिद्ध वकील श्री. ग. म. पानसे यानीं बादशहाचें चरित्र थोडक्यांत सागून त्याच्या अंगीं किती लोकोत्तर व त्याच्या राजवैभवास साजेसे अनेक गुण आहेत हें सागितले, व राज्यारोहणसमारंभ थाटानें साजरा करण्याकरिता नेमिलेल्या कमिटीशी सहकार्य करून समारंभात भाग घेऊन कार्यक्रम यशस्वीपणें पार पाडण्यास मदत केल्याबद्दल सर्व नागरिकाचे आभार मानले. नंतर राष्ट्रगीत वाजविण्यात येऊन श्रीरामचंद्राची बादशहाना दीर्घायुष्य देण्याबद्दल प्रार्थना केल्यावर दरबार समाप्त झाला. नंतर शाळेतील मुलामुलींना मिठाई वाटण्यांत आली. सायंकाळी राजवाड्यावर व शहरात सर्वत्र विजेची रोषणाई करण्यात आली. रात्रीं ८ वाजतां नदीकिनारीं दारूकाम सोडण्यात आले. यानतर या दिवसाचा शेवटचा कार्यक्रम म्हणजे श्रीदत्तमंदिरांतील हरिकीर्तन हा होय. कीर्तनाचा विषयहि समयास उचित म्हणजे बादशहांचे चरित्रविषयक व त्याच्या छत्राखालीं हिंदुस्थानची भरभराट व्हावी असाच होता. याच वेळीं दुसऱ्या कित्येक देवळातून भजनाचेहि कार्यक्रम झाले. याच प्रकारचे समारंभ संस्थानातील तालुक्याच्या ठिकाणीं साजरे करण्यांत आले.

## लंडन येथील समारंभास श्रीमंत राजेसाहेबांची उपस्थिति

लंडन येथें बादशहांचा राज्यारोहणसमारंभ वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें होणार होता. त्या समारंभास हजर राहण्याकरिता श्रीमंत राजेसाहेब ता. १७

एप्रिल १९३७ रोजीं निघून विलायतेस लंडन येथें ता. १ मे रोजीं गेले. बरोबर श्री. युवराज भाऊसाहेब, श्री. राजकुमार बापूसाहेब, रावसाहेब व श्री. राजकुमारी पद्मावतीराजे व नात विमलाराजे या होत्या. श्रीमंत राजेसाहेब हे लंडन येथें १ महिनाभर राहिले होते. त्या अवधींत बादशहांच्या राज्यारोहण-संबंधीं झालेल्या कार्यक्रमास म्हणजे ता. १२ मे रोजीं बादशहा व महाराणी यांचा राज्याभिषेक वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें झाला, त्यास अर्ल मार्शल याचेकडून निमंत्रण आल्यावरून श्रीमंत राजेसाहेब यांना उपस्थित राहण्याचा मान मिळाला. दुसऱ्या दिवशीं त्याना कॉरोनेशन मेडल मिळालें. याखेरीज राज्यारोहणसंबंधीं कोर्ट बॉल व स्पिटहेड येथील नेव्हल रिव्ह्यू या दोन समारंभास आमंत्रण आल्यावरून श्रीमंत राजेसाहेब हजर होते. नेव्हल रिव्ह्यू ता. २० रोजीं झाला. त्या वेळीं निरनिराळ्या राष्ट्रांचीं आरमारी जहाजें समुद्रात उभीं असलेलीं कॅमेरोनिया बोटीवरून पाहण्याची संधि त्यांना मिळाली. कोर्ट बॉल ता. २६ मे रोजीं बकिंगहॅम राजवाड्यात झाला, त्या वेळीं बादशहा व महाराणी हे या समारंभास हजर होते. याखेरीज बहुतेक दररोज मोठमोठ्या संस्थांतर्फे व प्रमुख व्यक्तींनीं दिलेल्या अनेक चहापार्ट्या, रिसेप्शन्स्, डिनर्स, उद्यानोपाहार वगैरेना श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले व अनेक सरकारी मोठमोठ्या अधिकाऱ्याच्या व ओळखीच्या युरोपीय गृहस्थाच्या त्यांनीं भेटी घेतल्या. ( या राज्यारोहणाकरिता केलेल्या प्रवासाची सविस्तर हकीकत ‘ श्रीमंत राजेसाहेब याचे प्रवास ’ या शीर्षकाखाली पुढें देण्यांत येणार आहे. )

---

चित्रांक ११५



श्रीमंत राजेसाहेब दरबारी पोषाखांत ( सन १९३७ ).
( विलायतेंतील राज्यारोहणाच्या वेळच्या कोर्टबॉलच्या समारंभास याच पोषाखांत श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले होते. )

[ सं. पा. ६४६

## प्रकरण १४ वें

# नरेंद्र-मंडळांतील कामगिरी

सन १९१६ सालीं हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड चेम्सफोर्ड यांनीं प्रथम अखिल भारतातील संस्थानिकाच्या हितसंबंधाची चर्चा करण्याकरिता दरसाल दिल्ली येथें संस्थानिकांची परिषद (Conference of the Ruling Princes and Chiefs) भरविण्याचा उपक्रम सुरू केला. त्या वेळीं भोरचे माजी अधिपति कै. हिज हायनेस श्रीमंत शंकरराव याना या परिषदेस निमंत्रण आलें. सन १९२१ सालापर्यंत या परिषदा दरसाल भरत असत. या परिषदेंत अनेक प्रश्नावर चर्चा होत असे. श्रीमंत बाबासाहेब कै. रावसाहेब याचेबरोबर या परिषदेच्या १९१७ च्या नोव्हेंबरमधील अधिवेशनास गेले होते. तेव्हा प्रिन्सेस कॉन्फरन्सपासून एकंदर संस्थानिकांना त्यांच्या अडचणी सरकारपुढें मांडल्यामुळे कसा फायदा होतो हें त्याच्या ध्यानात आले व तेव्हांपासून ह्या परिषदाकडे त्याचे विशेष लक्ष जाऊं लागले. या परिषदेचे रूपातर कायमच्या संस्थेंत करून सदर संस्थेस कोणतें नाव द्यावे याबद्दलहि पुष्कळ वाटाघाट झाली व सर्वानुमतें नवीन स्थापन होणाऱ्या संस्थेस ‘ नरेंद्र-मंडळ ’ (Chamber of Princes) असे नाव देण्याचे ठरले. मंडळाची घटना व नियम त्या वेळी तयार करण्यांत आले त्यास अनुसरून वंशपरंपरेच्या ११ किंवा त्यापेक्षा जास्त तोफाच्या सलामीचा मान ता. १ जानेवारी १९२० सालीं असलेल्यास किंवा अंतर्गत राजसत्तेचे पूर्ण अगर बव्हंशीं पूर्ण अधिकार भोगणाऱ्या संस्थानिकास नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद म्हणून घेण्यांत यावे असे ठरले होतें. या नियमाप्रमाणे १०८ संस्थानाच्या अधिपतींना नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद म्हणून निवडण्यात आले. दुसऱ्या नियमाप्रमाणें जरी अंतर्गत राजसत्तेचे पूर्ण अगर बव्हंशीं पूर्ण अधिकार भोगणाऱ्या काही संस्थानिकास नरेंद्र-मंडळांत सामील केलें होतें, तरी त्यांना निदान ९ तोफाच्या सलामीचा वंशपरंपरेचा मान आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यांत आली होती. कै. श्रीमंत रावसाहेब यांना ११ तोफांचे सलामीचा मान होता. परंतु तो वैयक्तिक (Personal) असल्यामुळे कायमचे सभासदांत भोर संस्थानच्या अधिपतींचा

अंतर्भाव झाला नाहीं. ज्याना तोफाचे सलामीचा वंशपरंपरेचा मान नाही परंतु अंतर्गत राज्यकारभाराचा पूर्ण अधिकार आहे अशा आणखी एकंदर १२८ संस्थानाचे प्रातवार निरनिराळे १२ गट करून प्रत्येक गटातर्फे एक याप्रमाणें १२ गटाचे १२ प्रतिनिधी निवडणुकीचे पद्धतीनें नरेन्द्र-मंडळात प्रातिनिधिक सभासद (Representative Members) म्हणून दर तीन वर्षांनीं निवडणूक करून घेण्याचे ठरले. याप्रमाणे नरेन्द्र-मंडळाची घटना तयार झाली.

सन १९२१ सालीं मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा अमलांत आल्या. त्याच वेळीं संस्थानिकाच्या हितसंबंधाची चर्चा करून हिंदुस्थान सरकारला संस्थानिकाच्या प्रश्नाचे बाबतींत सल्ला देण्याकरिता म्हणून वरील 'नरेंद्र-मंडळाची' (Chamber of Princes) स्थापना झाली व तिचा उद्घाटनसमारंभ बादशहा पंचम जॉर्ज याचे जाहीरनाम्यास अनुसरून बादशहाचे चुलते हिज रॉयल हायनेस डयूक ऑफ कॅनॉट याचे हस्तें दिल्ली येथें मोठ्या थाटाने करण्यात आला. विशेष निमंत्रणावरून कै. श्रीमंत रावसाहेब या समारंभास हजर राहिले होते. या वेळीं तोफाचे सलामीचा वंशपरंपरेचा मान मिळण्याची पूर्वी संधि आली असता ती आपण घालविली व त्यामुळें कायमच्या सभासदाचे जागेस आपलें संस्थान मुकलें याबद्दल त्याना फार वाईट वाटले, व आपले हातून मोठी चूक झाली असें त्याचे कारभारी कै. रा. ब. सातभाई याचेजवळ त्यानीं बोलूनहि दाखविले.

नरेंद्र-मंडळात हंगामी सभासद निवडून देणाऱ्या बारा गटांत मध्य महाराष्ट्रातील ६ संस्थानाचा एक स्वतंत्र गट (Central Group of States in the Deccan) करण्यात आला, व नरेन्द्र-मंडळाचे संस्थापनेपासून भोर संस्थान हें मध्य महाराष्ट्रातील अक्कलकोट, औंध, जत, फलटण आणि सुरगणा या संस्थानांचे बरोबर सदर गटात दाखल झाले. या गटाचे वतीनें एक प्रतिनिधि दर तीन वर्षांनीं नरेन्द्र-मंडळात निवडून दिला जातो. सदर गटातर्फे पहिली निवडणूक सन १९२१ च्या नोव्हेंबरात झाली. त्या वेळीं अक्कलकोटचे माजी राजेसाहेब श्रीमंत फत्तेसिंगराव पहिल्या तीन वर्षांकरितां प्रतिनिधि म्हणून निवडून आले. त्याची मुदत सन १९२४ नोव्हेंबरपर्यंत होती. परंतु सन १९२३ चे मार्च महिन्यांत प्रकृतींत काहीं बिघाड झाल्यामुळें त्याजवर

ऑपरेशन करून घेण्याची पाळी आली व त्याकरिता ते पुण्यास समून हॉस्पिटलमध्यें आले. तेथें पोटांत घ्यावयाच्या औषधाचें नाव लिहिण्यांत अ. डॉक्टराचे हातून चूक झाल्यामुळें भलतेंच विषारी औषध दुर्दैवानें पोटात जाऊन त्याना ऐन तारुण्यात आकस्मिकपणें मृत्युमुखीं पडावें लागलें. त्याच्या या अकालीं शोचनीय निधनामुळे नरेन्द्र-मंडळातील त्याची जागा रिकामी पडली. यामुळे या जागेकरिता नवीन निवडणूक करण्याचा प्रसंग आला.

भोर संस्थानचे अधिपति श्रीमंत राजेसाहेब हे नुकतेच गादीवर आले होते. नरेन्द्र-मंडळात संस्थानिकाचे वतीनें थोडेबहुत उपयुक्त कार्य करून आपल्या संस्थानिक बांधवाची यथाशक्ति व यथामति सेवा करता आली तर पाहावी या हेतूनें वरील रिकाम्या झालेल्या जागेवर आपल्या गटातर्फे प्रतिनिधि म्हणून आपली निवडणूक व्हावी अशी इच्छा त्यानी प्रगट केली सुदैवानें त्याच्या गटापैकीं औंध, फलटण, सुरगणा व जत या संस्थानाचे अधिपतींनीं मोठ्या आनंदानें त्याना प्रोत्साहन व पाठिंबा दिल्यामुळें लागलीच ते पहिल्या तीन वर्षांपैकीं राहिलेल्या मुदतीपुरते बिनविरोध एकमतानें आपल्या गटातर्फें प्रतिनिधि म्हणून सन १९२३ च्या जूनमध्यें निवडून आले. परंतु सदर राहिलेल्या मुदतींत नरेन्द्र-मंडळाची बैठकच झाली नाहीं, यामुळें कार्य करण्याची संधि मिळाली नाहीं; म्हणून त्यांना थोडें निराश व्हावे लागलें. पहिली त्रैवार्षिक मुदत सन १९२४ सालचे नोव्हेंबरात संपणारी असल्यामुळें पुढील तीन वर्षांकरिता पुन्हा निवडणुकीची वेळ आली. या वेळींहि म्हणजे १९२४ च्या नोव्हेंबरात त्याच्या गटांतील संस्थानिक बंधूंनीं श्रीमंत राजेसाहेबास एकमतानें आपल्यातर्फे प्रतिनिधि म्हणून निवडून दिलें. या तीन वर्षांतील त्याची नरेन्द्र-मंडळातील कामगिरी त्याच्या संस्थानिकबंधूंस पसंत पडून ही तीन वर्षांची मुदत संपल्यावर त्यांनीं सन १९२७ चे जूनमध्यें श्रीमंत राजेसाहेबास आणखी एकवार एकमतानें निवडून दिलें. नंतर सन १९३० चे जून-जुलैमध्ये पुन्हा त्रैवार्षिक निवडणुकीची वेळ आली. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब विलायतचे सफरीस गेले होते. यामुळें फलटण संस्थानचे अधिपति राजे श्रीमंत नानासाहेब निंबाळकर याची निवड झाली.

श्रीमंत राजेसाहेब जून १९२३ पासून जून १९३० पर्यंत सात वर्षे नरेन्द्र-मंडळांत मध्य महाराष्ट्रांतील आपल्या गटातर्फे प्रतिनिधि या नात्यानें काम करीत होते. या सात वर्षांत नरेन्द्र-मंडळाच्या एकंदर ६ बैठकी झाल्या. या सर्व बैठकींत ज्या विषयांवर चर्चा व्हावयाची त्याची यादी–Agenda ( चर्चाविषयपत्रक ) प्रत्येक सभासदाकडे आगाऊ पाठविण्यात येत असे व कोणास कांहीं ठराव वगैरे पाठवावयाचे असल्यास तेहि मागविण्यात येत. नरेन्द्र-मंडळाचे बैठकीस जाण्यापूर्वी बैठकींत येणाऱ्या विषयासंबंधीं श्रीमंत राजेसाहेब आपल्या गटातील संस्थानिकाशीं वाटाघाट करून त्या अनुरोधानें सदर विषयावरील नरेन्द्र-मंडळांतील आपलें धोरण ठरवीत. याशिवाय नरेन्द्र-मंडळाचे बैठकीचे पूर्वीं संस्थानिकाची खाजगी स्वरूपाची (Informal) बैठक भरत असे. त्या वेळींहि दिल्लीस हजर राहून चर्चा चालू असता आपल्या गटातील संस्थानिकबंधूंची हरएक प्रकारे प्रगति कशी साधतां येईल याचेहि सूक्ष्म निरीक्षण करीत.

श्रीमंत राजेसाहेब नरेन्द्र-मंडळाचे सभासद असताना ज्या ६ बैठकी झाल्या त्या ६ बैठकींत त्यांनीं एकंदर १८ भाषणें केलीं. परंतु त्यातले त्यात जकातमाफीचा ठराव, पाटबंधाऱ्याचे कामाकरिता संस्थानातून ब्रिटिश सरकारास जमिनी घ्यावयाच्या झाल्यास त्याबद्दल नुकसानभरपाईच्या पद्धतीबद्दलचें हिंदुस्थान सरकारनें नरेन्द्र-मंडळाचे मंजुरीकरितां माडलेलें टिपण, नरेन्द्र-मंडळाचे वादविवाद जाहीर रीतीनें प्रसिद्ध होऊं देण्याबद्दलची सूचना, संस्थानाचे आर्थिक हक्काची चौकशी करण्यासाठीं कमिटी नेमण्याबद्दलचा ठराव आणि नरेन्द्र-मंडळाची घटना दुरुस्त करण्याबद्दलची आवश्यकता इत्यादि विषयावर श्रीमंत राजेसाहेबांचीं जीं भाषणें झालीं तीं लहान संस्थानांच्या अत्यंत जिव्हाळ्याचीं असून आपल्या संस्थानिकबंधूंच्या हितसंबंधाविषयीं श्रीमंत राजेसाहेबांस किती आस्था व कळकळ वाटते याचीं निदर्शक आहेत.

सन १९२४ चे नोव्हेंबरांतील नरेन्द्र-मंडळाच्या अधिवेशनात " १९ व २१ तोफांची सलामी असणाऱ्या १० संस्थानिकास स्वतःसाठीं विकत घेतलेल्या मालाचे बाबतींत ज्याप्रमाणें जकातीची माफी आहे, त्याचप्रमाणें ती नरेन्द्र-मंडळाच्या सर्व कायमच्या सभासदांना असावी. " असा ठराव चर्चेस

चित्रांक ११६



**लॉर्ड आयर्विन, हल्लींचे व्हायकाउन्ट ऑफ हॅलिफॅक्स,** हिंदुस्थानचे व्हाइसरॉय असतांना सन १९२८ सालीं नरेंद्र मंडळाचे बैठकीच्या शेवटीं सभासदांचा घेतलेला फोटो.
रांग १ ली, उजवीकडून दुसरे श्रीमंत राजेसाहेब. [सं. पा. ६५३

आला. श्रीमंत राजेसाहेब नरेन्द्र-मंडळाचे प्रातिनिधिक सभासद झाल्यावर नरेन्द्र-मंडळाची ही पहिलीच बैठक होती व या बैठकींत त्यानीं या ठरावास पुष्टि देतांना प्रथमच भाषण केलें. ठरावास पुष्टी देण्याकरिता श्रीमंत राजेसाहेबानीं फारच मार्मिक भाषण केलें. त्यात त्यानीं नरेन्द्र-मंडळाच्या घटनेतील विषमतेकडे साऱ्या संस्थानिकाचे लक्ष वेधण्याची संधि वाया जाऊं दिली नाहीं. नरेन्द्र-मंडळात कायमच्या सभासदाचें फारच मोठे मताधिक्य असल्यामुळें प्रातिनिधिक सभासदानीं कोणत्याहि ठरावास विरोध करून तो पास न होऊं देणे किंवा उपसूचना आणून ती पास करून घेणे साहजिकच अशक्य आहे असे पाहून आपला मुद्दा मोठ्या खुबीनें पुढें माडून श्रीमंत राजेसाहेबानीं भाषण केलें. त्यांच्या भाषणातील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे. त्यावरून त्यानीं आपली बाजू युक्तीनें कशी माडली हें लक्षात येणार आहे. हा ठराव पास झाल्यास १० संस्थानिकाप्रमाणे आणखी २८ कायमचे सभासद असणाऱ्या संस्थानिकास फायदा मिळणार होता. याबद्दल ते म्हणाले,

" It would indeed be a source of great gratification not only to the Ruling Princes and Chiefs who will be entitled to this new privilege, but I can assure you that even lesser Princes will gladly share with equal joy the good fortune of their more lucky brothers in the Chamber. "

अशा प्रकारे भाग्यवान् संस्थानिकाना मिळणाऱ्या फायद्याबद्दल आनंद प्रदर्शित करून पुढें ते म्हणाले:—

" I do not pretend to conceal the fact that on reading the resolution at first in the provisional Agenda, I felt rather uneasy to note that an invidious distinction was thus again sought to be drawn quite unnecessarily among the members of one and the same Chamber. I also then thought that this privilege could have been equally and easily made available for all the constituents of the Chamber including the Ruling Princes and Chiefs who cannot be members of the Chamber in their own right but are entitled to send Representatives on their behalf. "

सर्व संस्थानिकांच्या हितसंबंधाची चर्चा करण्याचा नरेन्द्र-मंडळ स्थापन करण्यातील जो प्रधान हेतु त्यास अनुसरून, वास्तविक नरेन्द्र-मंडळापुढें चर्चे-करिता व संमतीकरिता यावयाचे ठराव सर्वांच्या हिताचे असले पाहिजेत, असें आपलें मत व्यक्त करून ते म्हणाले, "असें असलें तरी ज्याअर्थी आणखी ९८ संस्थानिकबांधवांचें हित होत आहे त्याअर्थी या ठरावास विरोध न दर्शविता पाठिंबा देण्याचा आम्हीं निश्चय केला. आणखी ९८ संस्थानिकाना फायदा मिळणार आहे. हा लाभ कांहीं कमी नाहीं." असे सागून ते पुढें म्हणाले,

"I would have been further satisfied if the scope of the privilege could have been still more widened to 128 more members of our order who send their representatives to this House. However I am prepared for the present to rely upon the mysterious working of time, coupled with the generous good sense of our big brothers, which, I am quite confident, with the sympathetic and liberal attitude of Your Excellency's Government, will ultimately prevail upon them, especially in consideration of the friendly and self-sacrificing spirit of the lesser Princes, and they would themselves come forward in due course to propose and support the still further extension of the privilege contained in the resolution under discussion."

श्रीमंत राजेसाहेबांचें नरेन्द्र-मंडळात हें पहिलेंच भाषण होतें. संधि मिळाली असतां आपला मुद्दा मोठ्या युक्तीनें नरेन्द्र-मंडळापुढें व हिंदुस्थान सरकारपुढें मांडण्याची श्रीमंत राजेसाहेबाची खुबी लक्षात येण्याकरितां त्याच्या या भाषणातील मूळ उतारे दिले आहेत. जत संस्थानचे माजी अधिपति याना श्रीमंत राजेसाहेबाचे हे भाषण वाचून आनंद वाटला व त्यानीं स्वीकारलेले हे धोरण पूर्णपणें पसंत पडून त्यानीं श्रीमंत राजेसाहेबांस लागलीच तसें लिहून कळविले. ता. १२ डिसेंबर १९२५ रोजीं पाठविलेल्या पत्रात ते म्हणतात:–

"Recently I have received the proceedings of the meeting of the Chamber of Princes ( Narendra Mandal ) held at Delhi from 17th November 1924 and onwards and therein I was glad to read your speech supporting Agendum No. 10 about extension of Customs facilities to all Princes who are by right members of the Narendra Mandal. After pointing out the

चित्रांक ११७



व्हाइसरॉयांचे प्रतिनिधि सर कोर्टने लॅटिमर यांना दक्षिणेंतील संस्थानांचे गटातर्फे मुंबई येथें दिलेल्या पार्टीच्या वेळीं घेतलेला फोटो.
श्रीमंत राजेसाहेब, भोर, उभे राहून टोस्टचें भाषण करीत आहेत.

[ सं. पा. ६७९

drawbacks of the motion, you have shown your liberal-mindedness in supporting the motion as it was bringing good to a few more Princes who had not that right. You have done well. Please accept my hearty congratulations for it."

यावरून त्यांचे गटातील संस्थानिकबंधूंना त्याची नरेन्द्र-मंडळातील काम करण्याची हातोटी मान्य झाल्याचें दिसून येईल.

हिंदुस्थानचे माजी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन याना संस्थानाची प्रगति व्हावी व संस्थानिकाच्या साम्राज्य सरकारशीं येणाऱ्या संबंधाबाबत तक्रारीचा उभयपक्षीं समाधानकारक निकाल लागावा, ह्याविषयीं फार तळमळ वाटत होती. म्हणून त्यानीं तक्रारींचा कायमचा निर्णय होण्यासाठीं सर हारकोर्ट बटलर याचे अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमिली. ही कमिटी नेमल्याबद्दल सन १९२८ चे फेब्रुवारींतील नरेन्द्र-मंडळाच्या अधिवेशनात व्हाइसरॉयाचे आभार मानण्याचा ठराव पास करण्यात आला. लॉर्ड आयर्विन यानी सर्व संस्थानाकरिता सुराज्याचीं अबाधित तत्त्वे प्रतिपादन करून तीं कशी अमलात आणावीं याबद्दलचें एक टिपण सर्व संस्थानिकाच्या माहितीकरिता प्रसिद्ध केलें होतें. त्या टिपणावर याच वेळीं चर्चा होऊन लॉर्ड आयर्विन यानीं सूत्ररूपात सांगितलेल्या तत्त्वाबद्दल पसंतीचा ठराव पास झाला. या ठरावास पुष्टि देण्याकरिता श्रीमंत राजेसाहेबानीं भाषण करून लॉर्ड आयर्विन याचे अंतःकरणात संस्थानांच्या हिताविषयीं वसत असलेल्या तळमळीबद्दल त्याचे आभार मानले.

## लॉर्ड आयर्विन यांचीं सुराज्याचीं तत्त्वें

१. संस्थानिकानीं खाजगी खर्चासाठीं उत्पन्नाचे विशिष्ट प्रमाणात माफक तनखा कायमचा तोडून घेऊन त्या मर्यादेचा अतिक्रम न करणें.

२. संस्थानांत कायदेमंडळाची स्थापना करणें.

३. न्यायदानाकरिता स्वतंत्र हायकोर्ट स्थापणे.

४. नोकरांच्या व लोकांच्या वित्त-जीविताची शाश्वती राखणें.

सुराज्याचीं हीं तत्त्वे मान्य असल्याच्या ठरावास श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून जोराचा पाठिंबा दिला, या गोष्टीस फारसें महत्त्व नाहीं.

परंतु हीं सर्व तत्त्वे त्यानीं आपल्या राज्यकारभारांत अंतर्भूत केलीं असून प्रत्यक्ष आचरणात आधींच आणिलीं होतीं ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे.

याच अधिवेशनांत पाटबंधारे, रेल्वे वगैरेचे कामाकरिता संस्थानांतून जमिनी घ्यावयाच्या झाल्यास त्याबद्दल नुकसानी देण्याच्या पद्धतीसंबंधानें हिंदुस्थान सरकारनें नरेन्द्र-मंडळाचे मंजुरीकरितां पाठविलेले टिपण चर्चेकरितां नरेन्द्र-मंडळापुढें आले. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं जें भाषण केलें त्यांतील विचार मोठे मननीय असल्यामुळे त्या भाषणातीलहि महत्त्वाचे उतारे पुढे दिले आहेत.

भाटघर धरणामुळे भोर संस्थानपैकीं बरीचशी सुपीक जमीन तीन वेळां पाण्यांत बुडून गेली. या वेळच्या नुकसानभरपाईच्या प्रश्नाचा व इतर अडचणींचा श्रीमंत राजेसाहेबास चांगलाच कटु अनुभव आला होता. वरील चर्चेच्या प्रसंगीं यासंबंधींच्या महत्त्वाच्या अडचणी त्यानी नरेन्द्र-मंडळात माडून या बाबतचीं लहान संस्थानांचीं व त्यातील रयतेचीं गाऱ्हाणीं स्पष्टपणें वरिष्ठ सरकारच्या व संस्थानिकबाधवाच्या निदर्शनास आणण्याची संधि वाया जाऊं दिली नाही. खडकवासला, वीर व भाटघर येथील धरणाकरिता संस्थानची एकंदर १८ चौरस मैल क्षेत्राची सुपीक जमीन इंग्रज सरकारनें घेतली व पुढेंहि आणखी मागणी येण्याचा संभव दिसत आहे असें आपल्या भाषणात सागून ते म्हणाले,

"From the nature of their demands, my Darbar at times apprehended that States, which are already small like mine, will be reduced to very small and barren principalities or are likely to be totally wiped out from the map if the process of taking considerable slices out of them goes on in future in this way...... I may also venture to suggest that there must be some limit to the demand of territory on Indian States in proportion to their extent or there should be a provision whereby such States might be able to claim an exchange of territory coupled with a certain share of the profit from the scheme as a special case in order to maintain their dignity in-tact, without causing any substantial diminution in the extent of their area as well as jurisdiction and population."

चित्रांक ११८



पो. ए. मि. एच्. एफ्. बॉल यांच्या भेटीच्या वेळचा फोटो.
खुर्चीवर—२ मि. बॉल; ३ मिसेस बॉल; ४ श्री. राजेसाहेब.

श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या भाषणांत असा आणखी एक मुद्दा उपस्थित केला कीं, पाटबंधाऱ्यांच्या कामांत पाण्यावरील राजसत्तेचा (Royalty over water) एक भानगडीचा प्रश्न उपस्थित होतो, त्या प्रश्नाचा विचार होणें अवश्य असतें. म्हणून नरेन्द्र-मंडळापुढें चर्चेकरितां जो मसुदा आहे त्यात तशा प्रकारची दुरुस्ती झाली पाहिजे. याशिवाय त्यांनीं या मोबदल्याचे प्रश्नावर आपले अनुभवजन्य विचार प्रदर्शित करून भोरसारख्या लहान संस्थानांचीं गाऱ्हाणीं व्हाइसरॉय व नरेन्द्र-मंडळाचे सभासद याचेपुढें मांडून श्रीमंत राजेसाहेबांनीं आपली निर्भय वृत्ति, निर्भीडपणा व मनोधैर्य व्यक्त केलें.

दुसऱ्यांनीं मांडलेल्या ठरावांस पुष्टि देण्याची संधि साधून श्रीमंत राजेसाहेबांनीं नरेन्द्र-मंडळांत काय काम केलें तें सांगितलें. याशिवाय आपण होऊन ठराव अगर उपसूचना माडून त्यानीं विधायक कार्यहि केलं. श्रीमंत राजेसाहेब नरेन्द्र-मंडळाच्या वार्षिक बैठकीस हजर राहूं लागल्यावर दोन अडचणी त्यांच्या लक्षात आल्या.

पहिली अडचण प्रातिनिधिक सभासदांचे निवडणुकीच्या वेळेसंबंधीं होती. पूर्वीं या निवडणुकी ऑक्टोबर किंवा नोव्हेंबरमध्यें होत, व नरेन्द्र-मंडळाच्या बैठकीहि नोव्हेंबरांतच होत असत. यामुळें निवडणुकीच्या वर्षीं निवडून येणाऱ्या सभासदाची मोठी गैरसोय होत असे. निवडणुकीनंतर लगेच भरणाऱ्या बैठकीस हजर राहण्याची तयारी करण्यास व त्या सालच्या नरेन्द्र-मंडळाच्या कामकाजाची माहिती घेण्यास पुरेसा वेळ मिळत नसे. याकरिता श्रीमंत राजेसाहेबांनीं असा ठराव मांडला कीं, निवडणुकीची वेळ नरेन्द्र मंडळाचे बैठकीनंतर लागलीच ठेवावी, म्हणजे निवडून येणारा इसम नवीन असेल तर त्यास कामकाजाची माहिती घेण्यास भरपूर वेळ मिळेल. श्रीमंत राजेसाहेबांची ही सूचना अगदीं सयुक्तिक असल्यामुळे त्याचा ठराव पास होऊन निवडणुकीची वेळ बदलण्यात आली.

दुसरी अडचण अशी होती कीं, नरेन्द्र-मंडळाची बैठक झाल्यावर सबंध वर्षांत पुन्हां त्या संस्थेच्या कामकाजाची काहींच माहिती सामान्य सभासदांस नसे व त्यामुळें सदर संस्थेच्या कामकाजाचे बाबतींत त्यास जितकें अगत्य वाटावयास पाहिजे तितकें वाटत नसे. नरेन्द्र-मंडळाच्या कार्यकारी

मंडळाच्या (Standing Committee) वर्षांतून दोन तीन वेळां नियमानें बैठकी होत. त्या मंडळाच्या बैठकींचे छापील अहवाल फक्त कार्यकारी मंडळच्या सभासदांकडे पाठविले जात. कार्यकारी मंडळाच्या बैठकींचे अहवाल सर्वांना देण्यात येत नाहींत, ही पद्धत श्रीमंत राजेसाहेबास पसंत नव्हती. त्याना असें वाटत होतें कीं, कार्यकारी मंडळाच्या बैठकींच्या अहवालाच्या दोन-अडीचशें प्रती छापून त्या सामान्य सभासदाकडे व प्रातिनिधिक सभासद निवडून येणाऱ्या संस्थानिकाकडे पाठविल्या असता, त्यामुळें नरेन्द्र-मंडळाच्या कामाबद्दल सर्वांस जास्त गोडी उत्पन्न होईल व वेळींच कार्यकारी मंडळापुढें चालणाऱ्या कामाबद्दल उपयुक्त सूचना करतां येतील. या कल्पनेप्रमाणें लागलीच त्यानीं त्या आशयाचा ठराव, नरेन्द्र-मंडळाच्या एक्स-ऑफिशिओ (ex-officio) या हुद्याचे नात्यानें असणारे सेक्रेटरीकडे म्हणजे पोलिटिकल सेक्रेटरीकडे पाठविला. हा ठराव थोड्याशा फरकानें व्हाइसरॉय व नरेन्द्र-मंडळ यास पसंत पडून तो पास झाला. तेव्हापासून कार्यकारी मंडळाच्या कामकाजाचे अहवाल सर्व सभासदांकडे पाठविण्यांत येऊं लागले.

सन १९३० सालच्या नरेंद्रमंडळाच्या बेठकींत चर्चेकरिता पुढील आशयाचा एक ठराव आला. या प्रसंगीं नरेंद्र-मंडळांतील प्रमुख चालकांस विरोध करून श्रीमंत राजेसाहेबानीं या ठरावास एक महत्त्वाची उपसूचना माडण्यास कमी केलं नाही. सदर ठराव अशा आशयाचा होता कीं, कोणाहि संस्थानिकांच्या वैयक्तिक किंवा वंशपरंपरेच्या दर्जासंबंधींचे ( Status ) प्रश्न नेक नामदार व्हाइसरॉय यांचेपुढें विचाराकरितां येतील त्या वेळीं व्हाइसरॉयांनीं निवडक संस्थानिकांचा अगाऊ सल्ला घेऊन मग योग्य वाटेल तसा त्यांचा निर्णय करावा. हा ठराव दिसण्यात संस्थानिकांची इभ्रत वाढविणारा व व्हाइसरॉयांच्या अनियंत्रित अधिकारावर नैतिक नियंत्रण घालणारा होता. परंतु नरेन्द्र-मंडळाची रचना निर्दोष व समतोलपणाची नसल्याकारणानें या ठरावास बिनविरोध पाठिंबा देणें लहान संस्थानिकांच्या दृष्टीनें चुकीचें होईल, असें श्रीमंत राजेसाहेबास वाटले. म्हणून त्यानीं सदर ठरावास विरोध केला व अध्यक्षांच्या परवानगीनें एक विधायक उपसूचना माडली. श्रीमंत राजेसाहेब यांनीं असें सुचविले कीं, संस्थानिकाचा दर्जा कमी करण्याचे प्रश्न उद्भवतील त्या वेळीं ठरावातील सरणीनें

त्याचा विचार होण्यास कांहीं हरकत असू नये; परंतु, तसें करतांनाहि ज्या संस्थानिकांबद्दल असा प्रश्न उत्पन्न होईल त्याची, आपल्या इतर निवडक अधिपतिबंधूंचा सल्ला आपल्यासंबंधींच्या प्रश्नाचे निर्णयाच्या बाबतींत घेतला जावा अशी इच्छा असेल तरच हा मार्ग स्वीकारला जावा. पण ज्या वेळीं संस्थानिकांचा दर्जा वाढविण्याच्या प्रश्नाचा विचार व्हावयाचा असेल त्या वेळी मात्र हा प्रश्न बादशहाचे प्रतिनिधि या नात्यानें एकट्या व्हाइसरॉयसाहेब यांच्याच अधिकारांतील असल्याकारणानें अशा बाबतींत इतर अधिपतींचा सल्ला घेण्याची सूचना पास होणें राज्यघटनेच्या मूळ तत्त्वाविरुद्ध आहे, असें श्रीमंत राजेसाहेब यानी प्रतिपादन केलें. शिवाय बडेबडे संस्थानिक हे छोट्या संस्थानिकाचा दर्जा वाढविण्याच्या प्रश्नाबाबत प्रतिकूलच असण्याचा जास्त संभव असल्यामुळे, श्रीमंत राजेसाहेबांनीं ठरावास विरोध करून आपले विचार नरेन्द्र-मंडळापुढें निर्भीडपणें माडले, व त्यास अनुसरून वरील उपसूचना माडली. दक्षिण महाराष्ट्रातील संस्थानी गटाचे प्रतिनिधि जमखिंडी संस्थानचे राजेसाहेब याना श्रीमंत राजेसाहेबांची विचारसरणी पटून त्यांनींहि त्याच्या उपसूचनेस दुजोरा देण्याचें धैर्य दाखविलें. परंतु, नरेन्द्र-मंडळांतील कायमच्या सभासदांच्या विरुद्ध प्रातिनिधिक सभासदांचें कांहीं चालणारें नसल्याकारणानें अखेर ही उपसूचना पास झाली नाहीं. आपली उपसूचना नापास होणार ही जरी श्रीमंत राजेसाहेबांची खात्री होती तरी आपलें मत काय आहे तें निःसंदिग्धपणें नरेन्द्र-मंडळ व व्हाइसरॉय यांच्यापुढें मांडावयाचें, मग तें कोणास पटो अगर न पटो, हें श्रीमंत राजेसाहेबाचें प्रथमपासून धोरण असल्यामुळें त्यांनी ही उपसूचना मांडली. ही उपसूचना जरी पास झाली नाहीं तरी तिचा अगदींच उपयोग झाला नाहीं असें नाहीं. या वेळीं जो वादविवाद झाला त्यात मूळ ठरावाचें स्पष्टीकरण करतांना बिकानेरचे महाराजांनीं असा खुलासा केला कीं, मूळ ठरावांत स्पष्ट केलेलें नसलें तरी दर्जासंबंधींच्या ज्या प्रश्नाबद्दल गर्भित रीतीनें विशेष कटाक्ष आहे ते प्रश्न म्हणजे, संस्थानिकाचा दर्जा कमी करण्याबद्दलचे असून दर्जा वाढविण्याबद्दलच्या प्रश्नांवर संस्थानिकाचें मत घ्यावें असा ठरावाचा बिलकुल उद्देश नाहीं, व ते प्रश्न सर्वस्वीं व्हाइसरॉय याच्या पूर्ण अधिकारातील आहेत. व्हाइसरॉयसाहेबांनींहि आपल्या समारोपाच्या भाषणात याच खुलाशाचा

अनुवाद केला. श्रीमंत राजेसाहेब यांच्या उपसूचनेनें जें कार्य साधावयाचें तें साधले असें म्हणण्यास हरकत नाही. ही उपसूचना मांडल्यामुळेंच बिकानेरचे महाराज व व्हाइसरॉय याना मूळ ठरावावर भाष्य करून खुलासा करावा लागला.

सन १९३० सालच्या याच अधिवेशनांत, ( १ ) संस्थानिकाच्या आर्थिक मागण्यांची चौकशी करण्यासाठीं तज्ज्ञाची कमिटी नेमण्याचा व (२) नरेन्द्र-मंडळाच्या घटनेची दुरुस्ती करण्याची वेळ आली आहे अशाबद्दल, असे दोन ठराव मंजूर झाले. या दोन्ही ठरावांवर श्रीमंत राजेसाहेबांनीं समयोचित भाषणें केलीं. पहिल्या ठरावावरील भाषणांत त्यांनीं आपलें मत पुढीलप्रमाणें स्पष्ट रीतीनें मांडलें. संस्थानिकांच्या आर्थिक मागण्याची चौकशी करण्याकरिता तज्ज्ञाची कमिटी नेमण्याची किती आवश्यकता आहे ह्याचें विवरण करून, जी कमिटी नेमण्यांत येईल तिनें शिफारस करतांना कोणतें धोरण ठेविले पाहिजे याविषयींचे आपलें मत त्यांनीं नरेन्द्र-मंडळ व व्हाइसरॉय यांचेपुढें आपल्या भाषणांत पुढीलप्रमाणें स्पष्ट शब्दात मांडिलें.

"The important point that I should like the expert Committee to keep before it is that in making recommendations it should avoid any invidious distinctions such as smaller and bigger States, Salute and non-Salute Princes, permanent and non-permanent members etc., for it creates unnecessary uneasiness in the minds of the Rulers of smaller States and finally disadvantage resulting from such invidious distinctions goes to the weaker side and thus it becomes a source of jealousy among the Princely Order. The principle of avoiding invidious distinctions between smaller and bigger States in extending the benefit arising out of the adjustment of fiscal revenues, was admitted and appreciated by some brother Princes like His Highness the Maharaja of Bikaner and His Excellency the Viceroy, when the resolution to exempt the Princes who have a salute of 21 or 19 guns from Customs duties was moved in this Chamber."

लहान संस्थानांतील उत्पन्नाच्या बाबी मर्यादित असून त्या वाढण्याचा संभव नसल्यामुळें, ब्रिटिश सरकारास मिळणाऱ्या जकातीसारख्या उत्पन्नातील प्रमाणशीर हिस्सा त्याना का मिळाला पाहिजे याचें कारण श्रीमंत राजेसाहेब यानीं दिलें तें असें:—

"The present times demand modern machinery of administration to be introduced in the States, big or small alike, but it is not a cheap commodity. It requires an adequate cost to be paid. So additional sources of income must therefore be necessarily found out to meet the required demand."

जकातीसारख्या उत्पन्नांतील हिस्सा संस्थानांना दिल्यास त्यांचा विनियोग संस्थानिक योग्य रीतीनें करतील की नाहीं या बाबतींत ब्रिटिश मुलखांतील पुढाऱ्याचे मनांत वसत असलेली भीति दूर करण्याच्या हेतूनें श्रीमंत राजेसाहेबानीं जाहीर रीतीनें याच भाषणांत लहान संस्थानिकांचे वतीनें पुढील आश्वासन दिले. ते म्हणाले:—

"The income that will accrue to the States by the re-adjustment of the fiscal policy will be utilized in meeting the increased cost of administration and in advancing the moral and material progress of our States."

संस्थानांनी प्राप्तीचा हिस्सा कसा वांटून घ्यावा या बाबतींत तज्ज्ञांचे कमिटीपुढें एक भानगडीचा प्रश्न येणार आहे, तो प्रश्न कोणत्या धोरणानें सोडवावा याबद्दल श्रीमंत राजेसाहेबानीं आपले भाषणांत पुढील सयुक्तिक मार्ग सुचविला.

"The principle of distribution should either be on the basis of population or consumption or both, as the case may be."

या आर्थिक ठरावावरील श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण अत्यंत मुद्देसूद असून संस्थानी प्रजेच्या व आपल्यासारख्या लहान संस्थानिकांच्या हिताविषयी ते किती आस्थेनें व तळमळीनें नरेन्द्र-मंडळांत काम करीत हें दिसून येतें.

दुसरा ठराव नरेन्द्र-मंडळाची घटना सुधारण्याबाबत होता. त्या ठरावास पाठिंबा देण्याकरितां श्रीमंत राजेसाहेबानीं जें भाषण केले त्यात त्यानीं सदर

संस्थेंत वगळलेल्या कित्येक संस्थानिकांचा कायमचे सभासद म्हणून अंतर्भाव होणें कसें अवश्य आहे, व ज्या लहान संस्थानांचे प्रतिनिधी यावयाचे त्यांचीहि संख्या वाढविणें किती न्याय्य आहे हें नरेन्द्र-मंडळास पटवून दिलें.

श्रीमंत राजेसाहेब नरेन्द्र-मंडळाचे सतत ७ वर्षें सभासद होते. त्या अवधींत त्यांनीं प्रत्येक बैठकीस हजर राहून संस्थानिकांचे, विशेषतः लहान संस्थानिकांचे हितास विघातक अशी कोणतीहि गोष्ट घडून न येईल इकडे सारखें लक्ष पुरविले होतें. याशिवाय मिळेल त्या संधीचा फायदा घेऊन हर-तऱ्हेनें युक्तिप्रयुक्तीनें जेवढें काम करतां येईल तेवढें त्यांनीं केले. ज्या कित्येक लहान संस्थानांचा कायमचे सभासद म्हणून नरेन्द्र-मंडळांत अंतर्भाव झाला आहे त्या संस्थानापेक्षा अधिकार, लोकसंख्या, क्षेत्रफळ, जमाबंदी इत्यादि बाबतींत मध्य व दक्षिण महाराष्ट्रांतील प्रमुख संस्थानें कोणत्याहि तऱ्हेनें कमी दर्जाचीं नसताना त्याचा समावेश नरेंद्र-मंडळात करण्यांत आला नाहीं, ही गोष्टहि श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर त्याच्या पूर्णपणें लक्षांत आली. त्याचप्रमाणें नरेन्द्रमंडळाच्या कार्यकारी कमिटींत प्रातिनिधिक सभासदाना कमिटीचे सभासद म्हणून निवडून येतां येत नाहीं, ही गोष्टहि त्यांना कमीपणाची व अपमानास्पद वाटते. यामुळें मध्य व दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकाचा नरेन्द्रमंडळातील कायमचे सभासद म्हणून समावेश व्हावा व गैरसमजुतीमुळें त्यांच्या खऱ्या दर्जाबद्दलचे ( Status ) बाबतींत जो अन्याय झाला आहे तो दूर व्हावा यासाठीं नरेन्द्र-मंडळांतील प्रमुख संस्थानिकांच्या व हिंदुस्थान सरकारच्या पोलिटिकल खात्यातील अधिकाऱ्यांच्या नजरेस ही गोष्ट वेळोवेळीं आणून त्याची न्यायबुद्धि जागृत करण्याची त्यांनीं एकहि संधि वायां जाऊं दिली नाहीं. नुसतें स्वस्थ बसून राहण्याची त्यांची वृत्ति नसून नेहमीं कांहींतरी उपयुक्त कार्य करण्याकडे त्यांच्या मनाची प्रवृत्ति असल्यामुळेंच ते नरेन्द्र-मंडळांत शिरले. केवळ सभासदांच्या मानाची त्यांना अपेक्षा नव्हती. वर सांगितल्याशिवाय दुसऱ्या अनेक ठरावांवर त्यांनीं भाषणें करून आपले म्हणणें साधार नरेन्द्र-मंडळापुढें मांडण्यास कमी केलें नाहीं.

नरेन्द्र-मंडळाच्या घटनेंतील विषमता व लहान परंतु नरेन्द्र-मंडळाचे कायमचे सभासद होण्यास सर्वतोपरी पात्र अशा संस्थानिकांना झालेला

अन्याय यांबद्दलचें आपलें गाऱ्हाणें श्रीमंत राजेसाहेबांनीं नरेन्द्र-मंडळ व व्हाइसरॉय यांच्यापुढेंच मांडलें असें नाहीं, तर सन १९३० सालीं ते विलायतेच्या सफरीस गेले त्या वेळीं लंडन येथील मुक्कामांत त्यांनीं या प्रश्नास बरीच चालना दिली. ता. २३–७–१९३० इ. रोजीं ईस्ट इंडिया ॲसोसिएशन या हिंदुस्थानच्या हितासंबंधीं सतत काळजी वाहणाऱ्या संस्थेच्या विद्यमानें श्रीमंत राजेसाहेबांनीं मेट्रोपोल हॉटेलमध्यें बड्या मंडळींना एक चहापार्टी दिली. या समारंभास सुमारें २५० पाहुणे उपस्थित होते, त्यात मुंबईचे माजी गव्हर्नर सर लेस्ली विल्सन व सर जॉन सायमन, सर हारकोर्ट बटलर हेहि हजर होते. प्रथम सर लेस्ली विल्सन यानीं श्रीमंत राजेसाहेबांची ओळख करून दिली. यानंतर सदर प्रसंगीं श्रीमंत राजेसाहेबानीं जें भाषण केलें, त्यात संस्थानिकाच्या अडचणी काय आहेत व त्याविषयी आणि बटलर कमिटी ( Indian States Committee ) व सायमन कमिशन ( Indian Statutory Commission ) ह्यानीं आपल्या रिपोर्टांत संस्थानाबाबत केलेल्या शिफारशी व त्या रिपोर्टांवरील आपले स्वतःचें मत श्रीमंत राजेसाहेबानी स्पष्ट शब्दात ब्रिटिश जनता व तिचे वजनदार पुढारी यांच्या नजरेस प्रामुख्याने आणून दिले. श्रीमंत राजेसाहेबांचें हें भाषण अत्यंत मननीय व परिणामकारक होतें. ( तें परिशिष्ट ७ मध्यें दिलें आहे. ) या भाषणाबद्दल दुसरेच दिवशीं लंडन टाइम्समध्यें एक प्रशंसापर लेख प्रसिद्ध झाला. तो अत्यंत महत्त्वाचा असल्यानें खालीं दिला आहे. त्यावरून आपलें ध्येय गाठण्याकरितां श्रीमंत राजेसाहेबांचे कसे प्रयत्न चालू असतात हें दिसून येईल.

## ता. २४-७-१९३० च्या लंडन टाइम्समधील उतारा

INDIAN PRINCES AND SIMON REPORT

*Criticism by the Chief of Bhor*

The first considered criticism of the Statutory Commission's Report in conjunction with the Butler Report coming from an Indian Ruler visiting this country was made by the Chief of Bhor, a State in the Bombay Deccan, at his reception yesterday to meet the president and members of the East India Association at the Hotel Metropole. The 250 guests included both Sir John Simon ( accompanied by Lady Simon )

and Sir Harcourt Butler. The Chief Saheb was assisted in receiving the guests by his son the Yuvaraj.

Sir Leslie Wilson announced generous donations from the host to the East India Association and the British Indian Union. The lengthening of the Bhatgar or Lloyd Dam, now the longest in the world for Irrigation purposes, would not have been possible if the Chief Saheb had not agreed to the inundation of a portion of his territory and gone to much expense in the consequent construction of bridges and roads.

The Chief of Bhor said that it was a matter for great satisfaction that both the Indian States' Committee and the Statutory Commission were convinced of the justice of many of the claims and contentions of the States, though there were still some points entitled to fuller consideration than they had received. The federal solution of the Indian constitutional problem was not opposed by the Princes, but they held there should be no coercion or compulsion on the States to join the federation, and it was satisfactory that both reports favoured their unimpaired freedom of decision. The claim of the States to share in the Customs revenue and to be consulted in framing all-India fiscal policy had been recognized; but it seemed to him that certain 'obiter dicta' indulged in by both authorities would tend to restrict the free judgment of the expert body which was to be created to examine the whole question. Similarly objection could be taken to the omission of both bodies to meet the suggestion of the Princes for the establishment of an impartial tribunal to settle justiciable and constitutional questions.

The Chief Saheb raised some other points, notably respecting the States grouped for representation in the Chamber of Princes. He expressed a hope that justice would be done to the States on such of their remaining grievances as might appear reasonable after close examination of them in all their aspects. The Princes were becoming increasingly responsive to the temper of the age, and were adjusting their Administrations to the British Indian model. Frequently, however, the

resources of the States were insufficient to assimilate all modern improvements. This was an additional reason for giving a liberal share of Customs and other federal revenues to the States.

The difficulties of the Indian problem were enormous; but had not Great Britain faced even greater problems, notably in the World War? He appealed to his countrymen of all parties and shades of opinion to attend the Round Table Conference, which was to be held at a propitious time for reaching a settlement.

Sir Louis Dane, in conveying the thanks of the guests to the Chief Saheb for his great hospitality, said that the feelings of the people of Britain towards the States were most cordial and friendly. He was sure that no reasonable claim that the States had to make as to the adjustment of relations would fail to receive favourable consideration by the Parliament and people of this country.

तसेंच लंडन येथील मुक्कामात लहान संस्थानाच्या अडचणी व त्याच्याबाबत झालेला अन्याय, तेथील हिंदुस्थानशीं विशेष संबंध येत असलेल्या स्टेट सेक्रेटरी, त्यांचे अंडरसेक्रेटरी व दुसरे बडेबडे अधिकारी, याच्या कानावर घालण्याची त्यानीं हरएक संधि साधून घेतली. हिंदी संस्थानाच्या वतीनें काहीं महत्त्वाच्या कामानिमित्त प्रो. रशब्रुक विल्यम्स् यांना पतियाळासारख्या प्रमुख संस्थानिकांनीं लंडन येथें पाठविलें होतें. त्यानीं रॉयल ऑटोमोबाइल क्लबमध्यें १६ जुलै १९३० रोजीं पार्लमेंटच्या काहीं सभासदांना चहापार्टी दिली. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं प्रो. रशब्रुक याच्या सूचनेवरून लहान संस्थानांच्याबाबत झालेले अन्याय त्या पार्लमेंटच्या सभासदांना समजावून दिले.

श्रीमंत राजेसाहेब यांनीं लंडन येथें ता. २३ जुलै १९३० रोजीं केलेलं भाषण वर्तमान पत्रांतून वाचण्यात आल्यावर श्रीमंत राजेसाहेबानी लहान संस्थानाच्या अडचणी ब्रिटिश मुत्सद्याचे नजरेस आणण्याची उत्कृष्ट कामगिरी केल्याबद्दल नबाबसाहेब भोपाळ, व रामदुर्ग, औंध, मिरज (ज्युनिअर), सितामाहू व जमखंडी या संस्थानाच्या अधिपतींनीं श्रीमंताना पत्रें पाठवून त्याचा गौरव केला.

श्रीमंत राजेसाहेबांच्या नरेंद्र-मंडळांतील कामगिरीबद्दल त्यांच्या संस्थानिक-बंधूंची इतकी खात्री पटली होती कीं, पुढें १९३३ सालीं जेव्हा फेडरेशन-बाबतच्या कामाकरिता लंडन येथें जाऊन काम करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली तेव्हा सर्वानुमतें श्रीमंत राजेसाहेब भोर यांनाच निवडण्यात आलें. तब्येतीच्या मानानें व दुसऱ्या अडचणींमुळें त्याना त्या वेळीं विलायतेस जातां आलें नाहीं ही गोष्ट निराळी !

श्रीमंत राजेसाहेबांच्या नरेंद्र-मंडळातील कामगिरीबाबत दक्षिणेंतील संस्थानाचे ए. जी. जी. लेप्टनंट-कर्नल एच्. ( हल्लीं सर हॅरॉल्ड ) विल्बरफोर्स-बेल यांनीं १४ ऑगस्ट १९३४ रोजीं भोरास दिलेल्या भेटीच्या वेळीं केलेल्या दरबारातील भाषणांत पुढील उद्गार काढले:—

"Apart, however, from these administrative interests both in your State and out of it, you have been in past years a champion of your group in the Chamber of Princes and also you have been much interested in the question of the future constitution of India.

It is well that experienced Rulers like yourself should give careful attention to these important matters and I feel sure that your interest in them will not wane."

## हिंदुस्थानची संयुक्त राज्यघटना व भोर संस्थान
## ( Federation of India & Bhor State )

ब्रिटिश राजाच्या अंमलाखालीं ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थानें यांचें राजकीय दृष्टया ऐक्य करण्याच्या हेतूनें हिंदुस्थानची संयुक्त राज्यघटना तयार करून सन १९३५ चें गव्हर्मेंट ऑफ इंडिया बिल पास झालें. या नवीन राज्यघटनेंत हिंदी संस्थानिकांचा समावेश करण्याची कल्पना ब्रिटिश मुत्सद्याचे डोक्यांत कधींपासून होती हें जरी सांगतां येणार नाहीं, तथापि ब्रिटिश हिंदुस्थानांत स्वराज्याबद्दल लढा सुरू झाल्यावर ब्रिटिश प्रजेला राज्य-कारभारांत क्रमाक्रमानें अधिकाधिक हक्क दिले पाहिजेत, ही जाणीव ब्रिटिश मुत्सद्यांना होऊन कोणते हक्क द्यावेत याबद्दल त्यांच्या वाटाघाटी सुरू होऊन सन १९०९ सालीं मोर्ले-मिंटो सुधारणा कायदा पास झाला. या वेळीं ब्रिटिश प्रजेला विशेष महत्त्वाचे असे हक्क द्यावयाचे नसल्यामुळें संस्थानिकांचा विचार

करण्याचें प्रयोजनच नव्हतें. कारण या सुधारणा-कायद्याशीं त्यांचा कांहींच संबंध येणारा नव्हता. पण या सुधारणा-कायद्यानें ब्रिटिश जनतेचें समाधान न होतां तीव्र असंतोष मात्र पसरला व त्यांतच सन १९१४ सालीं महायुद्ध सुरू झालें. तेव्हां ब्रिटिश प्रजा संतुष्ट राखण्याकरिता तिला राज्यकारभारांत उत्तरोत्तर अधिक हक्क दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें पाहून, ब्रिटिश मुत्सद्याच्या अधिकारदानाबद्दल निरनिराळ्या कल्पना प्रसवूं लागल्या. या कल्पनातूनच पुढें संयुक्त राज्यघटनेची कल्पना प्रसवली असें म्हणण्यास हरकत नाहीं. महा-युद्ध ऐन जोरांत असताना सन १९१७ सालीं हिंदुस्थानला डोमिनियन स्टेटस् (वसाहतींचा स्वतंत्र दर्जा-स्वराज्य) देण्याचा आपला अंतिम हेतु असल्याचें ब्रिटिश सरकारनें जाहीर केलें. तत्पूर्वी सन १९१६ सालीं प्रथमच सर्व संस्था-निकांची परिषद भरविण्यांत आली. तेव्हांपासून सन १९२० सालापर्यंत दर वर्षी परिषदा भरविण्यात येऊन सन १९२१ सालीं नरेंद्र-मंडळाची स्थापना झाली. ब्रिटिश सरकारच्या जाहीर घोषणेप्रमाणें पहिला हप्ता म्हणून सन १९१९ सालीं मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा-कायदा पास झाला व त्याचीहि अंमलबजावणी सन १९२१ सालींच सुरू झाली. या सुधारणा-कायद्यातहि हिंदी संस्थानिकांचा समावेश केला नव्हता. तथापि मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांत संयुक्त घटनेची कल्पना गर्भित अर्थानें व्यक्त झालेली दिसून येते.

नरेंद्र-मंडळाची स्थापना झाल्यामुळें संस्थानिकांना आपापल्या संस्थानच्या हितरक्षणार्थ आपल्या तक्रारी संघटित रीतीनें ब्रिटिश सरकारपुढें माडण्याची सोय झाली. भोर संस्थानचे अधिपति श्रीमंत राजेसाहेब याचा नरेन्द्र-मंडळात कायमचे सभासद म्हणून प्रविष्ट होण्याचा न्याय्य हक्क असताना त्यांचा तसा समावेश करण्यांत आला नाहीं. तथापि प्रातिनिधिक सभासद या नात्यानें त्यानीं त्या मंडळांत ७ वर्षें कशा प्रकारें कामगिरी बजावली त्याबद्दलची सविस्तर माहिती मागें देण्यांत आलीच आहे. हिंदुस्थानांत संयुक्त राज्यघटना सुरू करण्याचा जेव्हा विचार निघाला तेव्हांपासून या घटनेबाबत त्यांनीं कोणती कामगिरी केली त्यासंबंधीं माहिती देणें अवश्य असल्यामुळें ती देण्यात येत आहे.

ब्रिटिश हिंदुस्थानला द्यावयाच्या हक्कांचा दुसरा हप्ता देण्याची वेळ आली तेव्हां सार्वभौम सरकारनें सन १९२७ सालीं स्टॅटयूटरी कमिशन

नेमिलें तें ' सायमन कमिशन' या नांवाने संबोधिलें गेलें. या कमिशननें हिंदुस्थानांत दौरा काढून प्रमुख अधिकारी व जनतेचे पुढारी यांच्याशीं विचारविनिमय करून आपल्या शिफारशींसह रिपोर्ट सन १९३० सालीं सादर केला. त्यांत त्यानीं सर्व हिंदुस्थानच्या हिताकरिता कोणत्याना कोणत्या तरी स्वरूपात संयुक्त राज्यघटना अमलांत आणावी लागेल असें सुचविलें. परंतु अशा प्रकारची घटना ताबडतोब अमलात न आणता ती उत्क्रान्त होत गेली पाहिजे, सक्तीनें लादता उपयोगी नाहीं, असें सुचविलें होतें. सर जॉन सायमन यानीं ता. १६ ऑक्टोबर सन १९२९ इ. रोजीं इंग्लंडचे मुख्य प्रधान याना पत्र पाठवून त्यात, ब्रिटिश हिंदुस्थानांतील घटनात्मक प्रश्नांचा विचार हिंदी संस्थानाचा सदर प्रश्नांशीं असलेला संबंध लक्षांत घेतल्याशिवाय करता येणें शक्य नाहीं असें आपले मत असल्याचे कळवून, ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थानें याना सर्वसाधारण लागू असणाऱ्या प्रश्नाची चर्चा करण्याकरिता ब्रिटिश हिंदुस्थान व हिदी संस्थानें यांचें एक कौन्सिल नेमण्याची शिफारस केली होती. सायमन कमिशन नेमण्यांत आलें त्या सुमारास हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी यानीं सार्वभौम सरकार व हिंदी संस्थानें याचे संबंध कशा प्रकारचे आहेत याची चौकशी करून रिपोर्ट करण्याकरिता एक कमिटी सर हारकोर्ट बटलर याचे अध्यक्षतेखालीं नेमली. ती कमिटी 'बटलर कमिटी' या नावानें संबोधिली गेली. या कमिटीनें चौकशी करून आपला रिपोर्ट सन १९२९ चे एप्रिल महिन्यांत स्टेट सेक्रेटरीकडे रवाना केला. या कमिटीनेंहि आपल्या रिपोर्टांत अखिल-भारतीय संयुक्त राज्यघटनेच्या कल्पनेचें दिग्दर्शन केलें होतें. बटलर कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर त्या रिपोर्टांतील कांहीं कलमांसंबंधीं आपले म्हणणें काय आहे तें श्रीमंत राजेसाहेबांनीं व्हाइसरॉयसाहेबाचेकडे पोलिटिकल एजंट याचे मार्फत ता. १३ जून १९२९ इ. रोजीं लेखी कळविले.

पुढें सन १९३० सालीं श्रीमंत राजेसाहेब विलायतेस गेले. तेव्हां, इंग्लंडमध्यें असताना त्यानीं ईस्ट इंडिया ॲसोसिएशन या संस्थेपुढें जें भाषण केले त्यांत त्यानीं निर्भीडपणें व जाहीर रीतीनें सायमन कमिशन व बटलर कमिटी याचे रिपोर्टांवरील आपलीं मतें ब्रिटिश मुत्सद्याचे नजरेस आणिलीं. तें भाषण पूर्वीं सागितल्याप्रमाणें परिशिष्टांत दिले आहे. (यासंबंधी हकीगत पूर्वीं

देण्यात आली आहे.) सायमन कमिशन नेमल्यापासून ज्या गोष्टी घडत गेल्या त्यामुळे संयुक्त राज्यघटनेबद्दल अनुकूल मत बनत चाललें. राष्ट्रसंघात हिंदुस्थानला जें स्थान देण्यात आलें होतें ते फक्त ब्रिटिश इंडिया म्हणून नव्हे तर ब्रिटिश इंडिया व हिंदी संस्थानें मिळून अखिल हिंदुस्थानला तें स्थान मिळालें होतें. हिंदुस्थानच्या राजकीय घटनेचा प्रश्न सोडवावयाचा म्हणजे नुसत्या ब्रिटिश इंडियाचा विचार करून चालण्यासारखें नसून हिंदी संस्थानाचाहि विचार केला पाहिजे, ही गोष्ट लक्षांत घेऊन अखिल हिंदुस्थानच्या राजकीय घटनेचा हा महत्त्वाचा व फार मोठा गुंतागुंतीचा प्रश्न सुलभतेने सोडविण्याकरितां त्या वेळचे राजकारणपटु व दूरदर्शी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन, हल्लीचे लॉर्ड हॅलिफॅक्स, यानी ब्रिटिश इंडिया, हिंदी संस्थानें व ग्रेट ब्रिटन याच्या प्रतिनिधींची वरील प्रश्नाची चर्चा करण्याकरिता इंग्लंडमध्यें राउंड टेबल कॉन्फरन्स ( गोलमेज परिषद ) भरवावी अशी कल्पना सुचविली. ही कल्पना साम्राज्य सरकारास मान्य झाली. व्हा व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यानीं सन १९२९ चे ऑक्टोबर महिन्यात, वरील तिन्ही पक्षांच्या प्रतिनिधींची गोलमेज परिषद लंडन येथें भरविण्यात येईल, असें जाहीर केलें. व्हाइसरॉयसाहेबाची ही घोषणा ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची असून चिरसंस्मरणीय अशीच आहे.

हिंदुस्थानचे व्हॉइसरॉय लॉर्ड आयर्विन यानी १९२९ च्या ऑक्टोबर महिन्यात केलेल्या घोषणेप्रमाणें हिंदुस्थानला देण्यात येणाऱ्या सुधारणाचा विचार करण्याकरिता तिन्ही पक्षातर्फे प्रतिनिधी निवडण्यात येऊन ता. १२ नोव्हेंबर १९३० पासून पहिली गोलमेज परिषद भरली. या वेळीं १९१७ च्या मॉंटेग्यूसाहेबांच्या घोषणेप्रमाणें Responsible Government ची सुधारणा देण्याच्या दिशेनें परिषदेंत विचार व्हावयाचा होता, तरी प्रथम ही जबाबदार राज्यपद्धति फक्त प्रांतांनाच देण्याचा गव्हर्मेन्टचा विचार होता. मध्यवर्ति सरकारचा कारभार जबाबदार राज्यपद्धतीच्या तत्त्वावर न चालविता पूर्वीं चालू असलेल्या धोरणानेंच तो पुढें चालवावा असा गव्हर्मेन्टचा मूळ हेतु होता. दरम्यानच्या काळांत सायमन रिपोर्ट व बटलर कमिटी यांनीं जरी आपले रिपोर्टांतहि संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थान याचें फेडरेशन आस्ते आस्ते कांहीं

वर्षांनीं घडवून आणावें असें सूचित केलें होतें तरी, फेडरेशन ताबडतोब घडवून आणावें व मध्यवर्ति सरकारातसुद्धां जबाबदारीची पद्धति सुरू करावी अशी विचारप्रणाली कांहीं हिंदी राजकारणी मुत्सद्यांचे डोक्यांत सुरू झाली; व त्यांनीं त्या दिशेनें प्रयत्न सुरू केले. तेव्हां संस्थानें फेडरेशनमध्यें मिळण्यास तयार असल्यास मध्यवर्ति सरकारचा कारभार जबाबदार राज्यपद्धतीचे तत्त्वा-प्रमाणें सुरू करण्यांत येईल असें लोकाग्रहास्तव सरकार म्हणूं लागलें. अर्थात् सरकारच्या ह्या म्हणण्याप्रमाणें ब्रिटिश हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांना संस्थानिकांना फेडरेशनमध्यें सामील होण्यास कसे तयार करतां येईल याची विवंचना लागून राहिली होती. त्या दिशेनें त्यानीं आपले प्रयत्न विशेष नेटानें केले होते. पुढें १९३० च्या नवंबरमध्यें पहिली गोलमेज परिषद लंडन येथें भरली. त्या परि-षदेकरितां हिंदुस्थानांतील व संस्थानांचे प्रतिनिधी व्हाइसरॉय ऑफ इंडिया या बोटीनें मुंबईहून लंडनला गेले. त्यांत पतियाळाचे माजी महाराज, बिकानेरचे महाराज, म्हैसूरचे दिवाण सर मिर्झा इस्माइल, सर प्रभाशंकर पट्टणी, बॅ. जयकर, सर तेजबहादुर सप्रु, वगैरे मंडळी होती. ब्रिटिश हिंदु-स्थानचे पुढाऱ्यांना संस्थानिकांचीं मनें वळविण्यास एकत्र प्रवासाची ही संधि अनायसें प्राप्त झाली व त्या संधीचा त्यांनीं पुरेपूर फायदा घेतला. या प्रवासाचे कालांत वरील सर्व मुत्सद्यांची वरचेवर चर्चा होई. याच चर्चेंत हिंदी पुढाऱ्यांनीं फेड-रेशनला सामील होण्यास संस्थानी प्रतिनिधींचीं मनें वळविलीं व त्याचप्रमाणें लंडन येथें पोंचल्यावर, परिषदेच्या वेळीं फेडरेशनमध्यें सामील होण्यास तयार असल्या-बद्दल बिकानेर, पतियाळा, बडोदें, सांगली, धोलपूर वगैरे प्रमुख संस्थानाच्या अधिपतींनीं जाहीरपणें सांगितलें. फेडरेशनमध्यें सामील होण्यानें संस्थानिकांच्या अबाधित अधिकारांत कमीपणा येणार होता; तथापि, सर्व हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें या संस्थानाधिपतींनीं तितका स्वार्थत्याग करून फेडरेशनमध्यें सामील होण्याचें कबूल केलें. ही परिषद भरण्यापूर्वी तीन महिने अगोदर श्रीमंत राजेसाहेब यांनीं लंडन येथें ईस्ट इंडिया असोसिएशनपुढें भाषण करून आपले विचार ब्रिटिश जनतेपुढें मांडले होते. गोलमेज परिषद भरण्यापूर्वी श्रीमंत राजेसाहेब आपला विलायतचा प्रवास संपवून परत हिंदुस्थानांत आले होते. संस्थानिकांनीं जाहीरपणें आपलें धोरण प्रसिद्ध केल्यावर त्यास अनुसरून

पहिल्या गोलमेज परिषदेंत संयुक्त राज्यघटनेचें ( Federation ) तत्त्व मान्य करण्यांत आले व निरनिराळ्या प्रश्नांवर चर्चा करून निर्णय करण्याकरिता निरनिराळ्या कमिट्या नेमण्यात आल्या. या परिषदेचें काम संपल्यावर सागलीचे हिज हायनेस श्रीमंत राजेसाहेब हिंदुस्थानात परत आले. नंतर त्यानीं पहिल्या गोलमेज परिपदेंत हिंदी संस्थानिकाच्या वतीनें गेलेल्या प्रतिनिधींनी संस्थानांच्या हितरक्षणार्थ ज्या योजना माडिल्या होत्या, त्याचा विचार करून त्यावर आपापले अभिप्राय देण्याकरितां सन १९३१ चे मार्च महिन्याच्या पहिल्या आठवड्यात लहान संस्थानिकाची सभा मुंबई येथे भरविली. त्या सभेस भोर संस्थानचे अधिपति श्रीमंत राजेसाहेब गेले होते. या सभेंत बरीच चर्चा झाली. नंतर एक प्रश्नपत्रिका तयार करण्यात येऊन ती महाराष्ट्रातील लहान संस्थानिकाच्याकडे पाठविण्यात आली. पुढें ता. ११ ऑगस्ट सन १९३१ इ. रोजीं औंध संस्थानचे अधिपति यानीं पुणें येथें आपल्या वाड्यात वरील संस्थानिकाची सभा भरविली. या सभेस श्रीमंत राजेसाहेब गेले होते. त्यांच्याबरोबर त्याचे दिवाण रावसाहेब हुल्याळ, कै. माजी दिवाण रावबहादूर सातभाई व सेकंड काउन्सिलर रा. वि. गो. रानडे हेहि हजर होते. फलटण संस्थानचे अधिपति स्वतः हजर होते. बाकीच्या संस्थानिकाचे प्रतिनिधी आले होते. पूर्वी पाठविण्यात आलेल्या प्रश्नपत्रिकेला धरून सर्व प्रश्नांवर एक दिवस चर्चा झाल्यावर सर्व प्रश्नावर जमलेल्या मंडळींनीं आपलें मत ठरविले व सागली संस्थानचे अधिपति हे गोलमेज परिपदेंत लहान संस्थानांचे प्रतिनिधि असल्यानें त्याच्याकडे तें मत लेखी कळविण्याचा अधिकार औंध संस्थानचे अधिपतींस देण्यात आला. औंध संस्थानच्या अधिपतींनीं जी ही सभा बोलाविली होती त्या सभेंतील चर्चेंत श्रीमंत राजेसाहेबांनीं प्रमुख भाग घेतला होता. दुसरी गोलमेज परिषद सन १९३१ सालीं सप्टेंबरपासून डिसेंबरपर्यंत भरली होती.

पहिल्या गोलमेज परिषदेनंतर ज्या कमिट्या नेमल्याचें वर सांगण्यात आलें आहे त्या कमिट्यापैकीं एक कमिटी हिंदी संस्थानिकाशीं येणाऱ्या आर्थिक बाबींची तजवीज लावण्याकरिता नेमण्यात आली होती. या कमिटीचे चेअरमन राइट ऑनरेबल जे. सी. डेव्हिडसन् हे असल्यामुळें ही कमिटी डेव्हिडसन् कमिटी म्हणून संबोधिली गेली. या कमिटीकडे असलेल्या आर्थिक

बाबींत खंडणी व कस्टम्स् (Tribute, Customs etc.) ह्याहि बाबींचा विचार व्हावयाचा होता. हिंदुस्थानांत या कमिटीचें काम सुरू झाल्यावर सन १९३२ चे फेब्रुवारींत भोर दरबारनें सर्व बाबींसंबंधीं आपलें म्हणणें या कमिटीकडे लेखी सादर केलें व या कमिटीचा मुक्काम सांगली येथें असतांना श्रीमंत राजेसाहेबानीं प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें त्यांनीं मि. रानडे यांना आपला प्रतिनिधि म्हणून पाठवून त्यांचेमार्फत भोर दरबारचें खंडणी, कस्टम्स् वगैरे बाबतींत काय म्हणणें आहे तें कमिटीस तोंडीं समजावून दिलें.

दुसऱ्या गोलमेज परिषदेंत ज्या वाटाघाटी झाल्या त्यामुळें संयुक्त राज्य-घटनेचा मार्ग बराच निश्चित झाला. या परिषदेचे काम संपल्यावर सांगलीचे हिज हायनेस श्रीमंत राजेसाहेब हिंदुस्थानात परत आल्यावर त्यांनीं पूर्वींप्रमाणेंच गोलमेज परिषदेंत काय काय झाले त्याची माहिती आपल्या संस्थानिक-बांधवांना देण्याकरितां मुंबईस ताजमहाल हॉटेलांत संस्थानिकांची सभा ता. ६ जानेवारी सन १९३२ इ. रोजीं भरविली. या सभेस श्रीमंत राजेसाहेब गेले होते. या सभेचें काम दोन दिवस चालले होतें. पहिल्या दिवशींचे चर्चेचे वेळीं श्रीमंत राजेसाहेब हजर होते. दुसरे दिवशीं त्यांची प्रकृति थोडी बिघडल्यामुळें त्यांनीं संस्थानचे सेकंड काउन्सिलर रा. वि. गो. रानडे याना सभेस पाठविलें. ता. १६ जानेवारी सन १९३२ इ. रोजीं सांगलीचे राजेसाहेबांनीं सांगली येथें पुन्हा सभा बोलाविली. या सभेस श्रीमंत राजेसाहेबांनीं दरबारतर्फे सेकंड काउन्सिलर रा. रानडे व पोलिटिकल सेक्रेटरी के. लोहोकरे यांना पाठविलें. त्यांनीं नवीन घटनेबाबत दरबारचें धोरण काय आहे तें सभेपुढें मांडिले. पुढें फेब्रुवारी महिन्यांत दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांची सभा पुणें येथें ज्यूनिअर मिरज संस्थानाधिपतींच्या वाड्यांत भरली. या सभेसहि श्रीमंत राजेसाहेबांनीं प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें आपल्यातर्फे सेकंड काउन्सिलर मि. रानडे याना पाठविलें. नवीन राज्यघटनेसंबंधीं संस्थानिकांच्या ज्या ज्या सभा भरल्या त्या प्रत्येक सभेंत श्रीमंत राजेसाहेबांनीं भोर दरबारचें धोरण स्पष्टपणें मांडलें.

सन १९३२ साली अखेर तिसरी गोलमेज परिषद भरली. या परिषदेंत एकंदर झालेल्या कामाचें पर्यालोचन करण्यांत येऊन नवीन राज्यघटना ज्या तत्त्वावर उभारावयाची होती तीं तत्त्वें निश्चित करण्यात आलीं. नंतर साम्राज्य-

सरकारनें हिंदुस्थानच्या राज्यघटनेच्या योजनेचें आपले शुभ्रपत्रक ( White-Paper ) सन १९३३ चे मार्च महिन्यांत प्रसिद्ध केलें व शुभ्रपत्रकातील योजनाबाबत चर्चा करून रिपोर्ट करण्याकरिता दोन्ही सभागृहाची संयुक्त कमिटी नेमण्यास सुचविले. त्याप्रमाणें हाउस ऑफ कॉमन्स व हाउस ऑफ लॉर्ड्स् या दोन्ही सभानीं एक संयुक्त कमेटी ( Joint Parliamentary Committee ), सन १९३३ च्या एप्रिलमध्ये नेमली.

तिसऱ्या गोलमेज परिषदेंत संयुक्त राज्यघटनेची योजना तयार करण्यात आली होती. म्हणून ता. २२ जानेवारी सन १९३३ इ. रोजीं श्रीमंत राजेसाहेबांनीं वरील योजनेचा विचार करण्याकरिता दक्षिणेंतील दोन्ही गटातील लहान संस्थानिकाची सभा पुणें येथील आपल्या बंगल्यात भरविली. या सभेस सांगली संस्थानचे अधिपति हिज हायनेस श्रीमंत राजेसाहेब व फलटण, मिरज ( सीनिअर ) आणि जत या संस्थानाचे अधिपति उपस्थित असून रामदुर्ग संस्थानचे प्रायव्हेट सेक्रेटरी व बॅरिस्टर एम. आर. जयकर हेहि हजर होते. या सभेंत फेडरल लेजिस्लेचरच्या ( संयुक्त राज्यघटनेच्या विधिमंडळाच्या ) अपर हाउसमध्यें ( वरिष्ठ सभेंत ) संस्थानिकाना ज्या जागा देण्यात यावयाच्या होत्या व त्याची संस्थानिकात जी वांटणी होणार होती त्याबद्दल बरीच चर्चा करण्यात येऊन सर्वानुमतें एक मसुदा तयार करण्यात आला. नंतर पार्लमेंटच्या संयुक्त कमिटींत लहान संस्थानिकातर्फे सांगलीचे हिज हायनेस श्रीमंत राजेसाहेब याची नेमणूक करण्याबद्दल साम्राज्य-सरकारास शिफारस करण्याकरिता व लहान संस्थानिकाना आपले म्हणणें संयुक्त कमिटीपुढें मांडण्याच्या सवलती मिळण्याकरिता व्हाइसरॉयसाहेब याचेकडे एक विनंति अर्ज पाठविण्याचें ठरविण्यात आले. नंतर पुढें फेब्रुवारी महिन्यांत मुंबई येथें सरदारगृहात पुन्हा संस्थानिकाची सभा भरून तींत असे ठरले कीं, दक्षिणेंतील संस्थानांचे तर्फे संस्थानिकापैकी एक अगर दोन संस्थानिकानीं आपल्या दिवाणासह इंग्लंडला जावे, व बाकीच्या संस्थानिकानीं आपल्या सामान्य हितरक्षणार्थ सर्वांचे वतीनें जें काम करावयाचें तें करण्याबद्दल तेथें जाणाऱ्या संस्थानिकांस परवानगी द्यावी. त्याच सभेंत भोर संस्थानचे अधिपति श्रीमंत राजेसाहेब यानीं लंडनला जाऊन दोन्ही गटातर्फे कामगिरी करावी असे सुचविण्यात आले.

यानंतर श्रीमंत राजेसाहेबानीं आपल्या संस्थानिक-बाधवाच्या म्हणण्या-प्रमाणें लंडनला जावें कीं नाहीं याबद्दल बराच विचार केला. कारण त्या वेळीं त्याची प्रकृति बरी नसून कौटुंबिक अडचणीहि बऱ्याच होत्या. शेवटीं वरील अडचणी लक्षात घेऊन त्यानीं न जाण्याचें ठरविलें. परंतु त्या वेळीं आपल्या संस्थानिकबंधूंची सेवा करण्याची जी संधी आली होती ती गमाविल्याबद्दल त्याना वाईट वाटल्यावाचून राहिले नाहीं.

जॉइन्ट पार्लमेंटरी सिलेक्ट कमेटी स्थापन झाल्यावर त्या कमिटींत साम्राज्य-सरकारनें दक्षिणेंतील लहान संस्थानाचे प्रतिनिधी म्हणून सागली संस्थानच्या अधिपतींचे पोलिटिकल मिनिस्टर श्रीयुत, हल्लींचे दिवाण रा. ब. वाय. ए. ठोंबरे याची नेमणूक केली होती. श्रीमंत राजेसाहेबाचा मुक्काम महाबळेश्वरीं असताना तेथें फलटणचे अधिपति त्याना भेटले. त्या भेटींत फलटणचे दिवाण श्रीयुत हल्लीं रावसाहेब, गोडबोले, यांना इंग्लंडला पाठवावे व शक्य असल्यास खुद्द फलटणचे अधिपतींनींहि तेथें जाऊन फेडरल लेजिस्लेचरमधील जागाच्या वाटणीची दक्षिणेंतील संस्थानिकानीं सुचविलेली योजना व राज्यकारभाराचे संपूर्ण अधिकार असलेल्या संस्थानिकांना नरेंद्र-मंडळात कायम सभासद म्हणून नेमण्याबद्दलचें आपलें म्हणणें जॉइंट पार्लमेंटरी सिलेक्ट कमिटीकडे सादर करावे असें ठरलें. ज्या संस्थानिकांना तोफांची सलामी आहे त्यांचेबाबत फेडरल लेजिस्लेचरमधील जागाची वाटणी करताना सलामी नसणाऱ्या संस्था-निकापेक्षां विशेष रीतीनें अनुकूल विचार करण्यात येईल असें ब्रिटिश गव्हर्मेन्टनें जाहीर केले होतें. म्हणून भोर संस्थानास ९ तोफांचे सलामीचा वंशपरंपरेचा मान असल्यानें वरील दोन्ही गटातील ज्याना तोफाच्या सलामीचा मान नाहीं अशा संस्थानिकापेक्षां भोर संस्थानबद्दल विशेष रीतीनें विचार करणें कसें न्याय्य आहे हेंहि सिलेक्ट कमिटीच्या नजरेस आणून द्यावें असें श्रीमंत राजेसाहेबांनीं फलटणच्या अधिपतींना सुचविलें.

दक्षिणेंतील, संस्थानिकांच्या वतीनें आपल्या दिवाणासह इंग्लंडास जाण्याचें फलटणचे अधिपतींनीं मान्य केल्यावर सर्व संस्थानिकांनीं फलटणचे अधिपतींना येणाऱ्या खर्चांत वाटेकरी होण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें श्रीमंत राजेसाहेबांनीं प्रथमच त्यांचेकडे तीन हजार रुपये पाठविले. फलटणचे अधिपति

व त्यांचे दिवाण रावसाहेब गोडबोले हे इंग्लंडला गेले व तेथे रावसाहेब गोडबोले यांनीं दक्षिणेंतील संस्थानिकाची बाजू सिलेक्ट कमिटीपुढें सन १९३३ च्या जुलै महिन्यात उत्तम तऱ्हेनें मांडली. भोर संस्थानास ९ तोफांचे सलामीचा वंशपरंपरेचा मान असल्यामुळें हें संस्थान इतर लहान, सलामीचा मान नसलेल्या संस्थानापेक्षा जास्त हक्कास कसे पात्र आहे ही गोष्ट विशेष रीतीनें त्यानी कमिटीचे नजरेस आणून दिली.

व्हाइसरॉयसाहेबानी वाटणीची योजना करून ती दक्षिणेतील संस्थानिकाच्या विचाराकरिता सदर संस्थानिकाचे ए. जी. जी. साहेब याचेकडे पाठविली. ए. जी. जी. साहेबानी ता. ६ एप्रिल सन १९३३ साली कोल्हापूर येथें संस्थानिकाची सभा भरवून त्यांना नवीन योजना समजावून दिली. बहुतेक संस्थानिकाना ही योजना पसंत पडली. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें सर्व प्रश्नाची पूर्ण चौकशी करून आपल्या शिफारशीसह रिपोर्ट केल्यानंतर श्रीमंत राजेसाहेबानी त्या रिपोर्टावरील आपला अभिप्राय भोर येथें ता. ३ जानेवारी रोजीं मे. रेसिडेंटसाहेब कोल्हापूर याचें स्वागत करताना आपल्या भाषणात व्यक्त केला. तें भाषण परिशिष्ट ८ मध्यें दिले आहे. त्यावरून श्रीमंत राजेसाहेबांचे विचार समजून येऊन ते इतर सर्व संस्थानाबरोबर सर्व हिंदुस्थानच्या हिताकरिता झीज सोसण्यास तयार झाले असल्याचे दिसून येणार आहे. ता. २ फेब्रुवारी १९३५ मध्यें हाउस ऑफ कॉमन्समध्यें सरकारतर्फे गव्हर्मेन्ट ऑफ इंडिया बिल माडण्यांत आले. तें सिलेक्ट कमिटीकडे सोपविण्यात आल्यावर त्यावर कमिटीचा विचारविनिमय होण्यापूर्वी बिलाच्या १ ते ४५ या सुरुवातीच्या कलमाबाबत संस्थानिकाच्या काही सुधारणा, सूचना व मतें मागविण्यांत आलीं. त्यांवर विचार करण्याकरिता दक्षिणेंतील संस्थानिकाची पुणें येथें ता. ९ फेब्रुवारी सन १९३५ रोजी श्रीमंत मिरज मळेकर याचे बंगल्यात श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांचे अध्यक्षतेखाली सभा भरली. त्या सभेत बिलाचें कलम ५, पोटकलम २ मध्ये सुधारणा करण्याकरिता पार्लमेन्टकडे पाठविण्याकरिता एक सूचना एकमताने पास होऊन ती ए. जी. जीं.कडे पाठविण्यात आली. भोर दरबारतर्फे १० फेब्रुवारी सन १९३५ रोजीं सोबत वरील प्रश्नाबाबत आपले मत कळविण्यात आले. बिलाच्या बाकीच्या

सुरुवातीच्या कलमांचा विचार ता. २५ फेब्रुवारी सन १९३५ रोजीं मुंबई येथें नरेंद्र-मंडळातर्फे भरविण्यांत आलेल्या बैठकींत करण्यांत आला. या बैठकीस श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले होते. या सभेंत गव्हर्मेन्ट ऑफ इंडिया बिल, प्रांतांचे गव्हर्नर व गव्हर्नर-जनरल यांच्या संबंधांबाबत Instrument of Instruction चा मसुदा व फेडरेशनमध्यें संस्थानिकांनीं शिरण्याबाबतचा करारनाम्याचा Instrument of Accession फेडरेशन-प्रवेशपत्रिका मसुदा यांवर व त्यांबाबत काय धोरण असावे असा विचार करण्याकरितां नेमण्यात आलेल्या दिवाणांच्या कमिटीच्या (Committee of Ministers) रिपोर्टावर चर्चा झाली. दिवाणांच्या कमिटीच्या रिपोर्टांतील शिफारशींप्रमाणें बिल व करारनाम्याचे मसुदे संस्थानचे अंतर्गत हितसंबंध व त्यांच्या हक्काचें योग्य प्रकारें संरक्षण करण्याबाबत जरूर त्या कलमाचा अंतर्भाव करून त्यांत सुधारणा झाल्याखेरीज बिल व करारनामे याना मान्यता देण्यात येऊं नये असें सर्वानुमतें ठरलें. भोर संस्थानच्या मतात, दक्षिणेंतील संस्थानांच्या मतात व नरेंद्र-मंडळाचे मतांत बिल व करारनामे यांबाबत एकवाक्यता असल्यामुळें या विषयावर विचारविनिमयाकरितां दक्षिणेंतील संस्थानिकांची पुन्हां सभा भरविण्यांत आली नाहीं. तथापि याबाबतचें आपलें मत व आणखी कांहीं सूचना भोर दरबारनें ता. २० मार्च सन १९३५ च्या व ता. २६ एप्रिलच्या पत्रानें ए. जी. जीं. मार्फत पाठविल्या.

नरेंद्र-मंडळाच्या मुंबई येथील बैठकींत संस्थानिकांच्यासंबंधीं बिलांतील कलमाबाबत व फेडरेशन-प्रवेशपत्रिकाबाबत पास झालेला ठराव सर्व सूचनासह पार्लमेंटकडे पाठविण्यात आल्यावर त्या ठरावातील सूचनांप्रमाणें बिलाचे कलमांत व करारनाम्यांत संस्थानांचे अंतर्गत हितसंबंध रक्षण केले जातील अशा प्रकारच्या योग्य त्या सुधारणा ताबडतोब करण्यांत आल्या. वरील-प्रमाणें बिलांत सुधारणा करण्यांत आल्यामुळें संस्थान लहान असो अगर मोठे असो, संस्थानिकाच्या इच्छेप्रमाणें सर्वांगीण हितसंरक्षणाची खबरदारी घेण्यात आली आहे. हिंदुस्थानांतील संस्थानांची संख्या अदमासें ६०० असून त्यांनीं हिंदुस्थानच्या लोकसंख्येचा $\frac{1}{3}$ व क्षेत्रफळाचा $\frac{1}{2}$ पेक्षा जास्त प्रदेश व्यापला असल्यानें सरकारलाहि संस्थानिकांचें हितरक्षण करणें अत्यावश्यक वाटलें. गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टप्रमाणें फेडरल असेंब्लींत १२५ व

काउन्सिल ऑफ स्टेटमध्यें १०४ अशा जागा सर्व संस्थानांत विभागून देण्यात आल्या आहेत. त्यापैकीं भोर संस्थानांत त्याच्या गटामधील इतर संस्थानांसह मिळालेल्या जागेबाबत वाटणी खालीं तक्ता दिला आहे त्यावरून लक्षांत येईल.

## काउन्सिल ऑफ स्टेट व फेडरल असेंब्लीमधील दक्षिणेंतील संस्थानांचा प्रतिनिधित्वदर्शक तक्ता

| संस्थाने आणि संस्थानांचा समूह | कौन्सिल ऑफ स्टेटमधील जागांची संख्या | संस्थानें आणि संस्थानाचा समूह | फेडरल असेंब्लीमधील जागांची संख्या | लोकसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ कोल्हापूर | २ | कोल्हापूर | १ | ९५७,१३७ |
| २ सांगली | १ | सांगली | १ | २५८,४४२ |
| सावंतवाडी | | सावंतवाडी | | २३०,५८९ |
| ३ जंजिरा | १ | जंजिरा | १ | ११०,३७९ |
| मुधोळ | | मुधोळ | | ६२,८३२ |
| भोर | | भोर | | १४१,५४६ |
| ४ जमखिंडी | १ | जमखिंडी | १ | ११४,२७० |
| मिरज (सी.) | | मिरज (सी.) | | ९३,९३८ |
| मिरज (ज्यु.) | | मिरज (ज्यु.) | | ४०,६८४ |
| कुरुन्दवाड(सी.) | | कुरुंदवाड (सी.) | | ४४,२०४ |
| कुरुन्दवाड(ज्यु.) | | कुरुंदवाड (ज्यु.) | | ३९,५८३ |
| ५ अक्कलकोट | १ | अक्कलकोट | १ | ९२,६०५ |
| फलटण | | फलटण | | ५८,७६१ |
| जत | | जत | | ९१,०९९ |
| औंध | | औंध | | ७६,५०७ |
| रामदुर्ग | | रामदुर्ग | | ३५,४५४ |

फेडरेशन प्रवेशपत्रिका, गव्हर्मन्ट ऑफ इंडिया कायद्याचें परिशिष्ट ७ ची पहिली यादी व एक्स्ट्रॉ-टेरिटोरिअल राइटस् यांविषयीं संस्थान-दरबार व ब्रिटिश सरकार यांचे दरम्यान पुढीलप्रमाणें चर्चा झाली.

सर्व फेरफारासह हाउस ऑफ कॉमन्समध्यें बिल पास झाल्यावर तें हाउस ऑफ लॉर्डस्‌कडे पाठविण्यांत आलें. तेथें त्याचीं कोणत्याहि तऱ्हेनें फेरफार न करता तीन वाचनें होऊन तें पास झाले व त्यावर बादशहांची सही होऊन १९३५ चा गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट ५ वा या नांवानें प्रसिद्ध करण्यांत आला. त्यानंतर हिंदुस्थान सरकारकडून फेडरेशनमध्ये शिरण्याबाबत संस्थान व मध्यवर्ती सरकार यांच्या दरम्यान करण्यांत येणाऱ्या करारनाम्याचा मसुदा ए. जी. जीं. मार्फत ता. १५ ऑगस्ट १९३६ च्या पत्रासोबत संस्थानचे अधिपतींकडे आला व गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्ट १९३५ च्या सातव्या परिशिष्टातील पहिल्या यादीबाबत संस्थानला कांहीं शर्ती घालण्याच्या असल्यास त्या कळविण्यात याव्यात असें दरबारला कळविण्यांत आले. पुढे हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयकडून ता. १८ ऑगस्ट १९३६चे एक पत्र श्रीमंत राजेसाहेबाना आले. त्यांत परिशिष्ट ७ ची पहिली यादी गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट व फेडरेशन-प्रवेशाच्या करारनाम्यांतील कलमें यासंबंधात अडचणीचे प्रश्न, शंका व संदिग्धपणा यांविषयीं खुलासा करण्यांच्या कामीं सर्व दक्षिणेतील संस्थानिकाना मदत करण्यास, सर कोर्टने लॅटिमर, के. सी. आय. इ., याची खास योजना केली असून ते दक्षिणेंत दौरा काढून संस्थानिकांच्या भेटी घेतील, त्या वेळीं आपल्या अडचणी, शंका काय असतील त्या पूर्वीच तयार ठेवून त्याचेपुढें मांडून उलगडा करून घ्यावा असें कळविण्यात आले.

यानंतर नरेंद्र-मंडळाच्या स्टँडिंग कमिटीनें फेडरेशन-प्रवेशपत्रिकेचा विचार करण्याकरितां कै. सर प्रभाशंकर पट्टणी याचे अध्यक्षतेखालीं मुंबई येथें ताजमहाल हॉटेलमध्यें ता. १७ व १८ ऑगस्ट रोजीं सभा भरविली. या बैठकीस भोर संस्थानचे प्रतिनिधि पाठविण्यात आले होते. या बैठकींत फेडरल कोर्ट, फेडरेशन-प्रवेशपत्रिका व फेडरेशनबाबत सर्व प्रश्नांचा सागोपाग विचार-विनिमय होऊन, फेडरेशन-प्रवेशपत्रिकेबाबत एक प्रश्नपत्रिका तयार करून ती सर्व संस्थानिकाकडे पाठवून तीवर त्याचीं प्रत्येकाचीं मतें आणवावीं व मग फेडरेशन-प्रवेशपत्रिका कायम करावी, असें ठरलें. तसेंच संस्थानाचे अंतर्गत राजसत्तेचे अधिकार, पूर्वापार चालत आलेले हक्क अबाधित व अनिर्बंध राखण्यासाठीं फेडरल विषयाचे परिशिष्टाबाबत कोणकोणत्या अटी घालाव्यात हें ठरविण्याचें

काम एक स्वतंत्र कमिटी नेमून त्या कमिटीकडे सोंपविण्यांत आलें. वर म्हटल्या-प्रमाणें एक प्रश्नपत्रिका तयार करण्यात येऊन ती संस्थानिकाकडे पाठविण्यात आली.

नरेंद्र-मंडळाच्या प्रश्नपत्रिकेचा विचार करण्याकरितां श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ३ सप्टेंबर १९३६ रोजीं पुणें येथें मिरज मळेकर याच्या वाड्यांत दक्षिणेंतील भोर, जमखंडी, मिरज ज्यु., कुरुंदवाड ( ज्यु. ), अक्कलकोट, फलटण, जत, रामदुर्ग आणि सांगली या ९ संस्थानिकाची सभा भरविण्यात आली. त्या बैठकीत प्रत्येक संस्थानानें स्वतंत्रपणे आपली उत्तर-पत्रिका तयार करावी व त्याकरिता सर्व संस्थानांनीं मिळून फेडरेशन-प्रवेश-पत्रिकेत कोणकोणत्या शर्ती असाव्यात याविषयीं मसुदे करण्याचे कामीं कायदेशीर सल्ला घेण्याकरिता बॅरिस्टर जयकर याना सल्लागार नेमावें असें ठरविण्यात आलें. अशाच प्रकारची एक सभा श्रीमंत राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं मुंबई येथे सरदारगृहात ता. ६ ऑक्टोबर १९३६ रोजीं भरली. या बैठकीस बॅरिस्टर जयकर हे हजर होते. यानंतर हिंदुस्थान सरकारच्या फेडरेशन-प्रवेशपत्रिकेच्या मसुद्यावरील भोर दरबारचें म्हणणें ता. १४ ऑक्टोबर रोजीं ए. जी. जीं. ना कळविण्यात आलें.

नरेंद्र-मंडळाच्या चॅन्सेलरांनीं यानंतर ता. २७ व २८ ऑक्टोबर रोजीं मुंबई येथें हिंदुस्थानातील सर्व संस्थानाच्या दिवाणांची परिषद टाउन हॉलमध्यें भरविली. या बैठकीस भोर दरबारचे प्रतिनिधि हजर होते. पुढें ता. ३० व ३१ ऑक्टोबर रोजीं राजे व दिवाण याची परिषद त्याच ठिकाणीं भरली. त्या परिषदेस श्रीमंत राजेसाहेब स्वतः हजर राहिले होते. या बैठकींत कॉन्स्टिटयू-शनल कमिटी व फिस्कल कमिटी अशा दोन कमिट्या नेमण्यात आल्या व संस्थानानीं फेडरेशनमध्यें शिरण्याबाबत गव्हर्नमेंट ऑफ इंडिया कायद्यात काय काय कलमें आहेत त्याचा विचार करण्याचें काम फिस्कल कमिटीकडे सोपविण्यात आलें. ता. १३ नोव्हेंबर रोजीं भोर दरबारने आपलें मत वरील फिस्कल कमिटीकडे पाठविलें.

भोर संस्थानच्या क्रेडिट ( जमा ) व डेबिट ( खर्च ) या आर्थिक बाबींचा तक्ता ता. १० नोव्हेंबर १९३६ रोजीं ए. जी. जीं. कडून दरबारकडे आला. यानंतर वर उल्लेखिलेल्या ९ संस्थानाची पुणें येथें ता. २८ व २९ नोव्हेबर रोजी

बैठक भरविण्यांत येऊन बॅरिस्टर जयकर यांच्या सल्ल्यानें फेडरेशन-प्रवेशपत्रिकेच्या प्रश्नासंबंधीं व गव्हर्नमेंट ऑफ इंडिया कायद्याच्या परिशिष्टांतील यादींतील संस्थानांबाबतच्या प्रश्नांसंबंधीं सर्व संस्थानांना सामान्यपणें लागू असणाऱ्या प्रश्नांचा व वैयक्तिक महत्त्व इत्यादि प्रश्नांचा व्हाइसरॉयांचे प्रतिनिधि सर कोर्टने यांचेपुढें माडण्याच्या दृष्टीनें विचार होऊन ते प्रश्न ए. जी. जीं. कडे सर कोर्टने यांच्या माहितीसाठीं पाठविण्याकरितां ता. ९ डिसेंबर रोजीं आगाऊ पाठविण्यात आले. श्रीमंत राजेसाहेबांनीं वैयक्तिक महत्त्वाच्या प्रश्नांची ता. १ डिसेंबर रोजीं कोल्हापूर येथें समक्ष ए. जी. जीं. चे बरोबर चर्चा करून ते ता. ३ डिसेंबर रोजीं पाठविले. याच विषयावर प्रत्येकाचे वैयक्तिक महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार करण्याकरिता ता. ५ व ता. ६ डिसेंबर रोजीं पुणें पंतसचिव वाड्यांत सभा झाली. या सभेचे बॅरिस्टर जयकर अध्यक्ष होते. ता. ६ रोजीं श्रीमंत बाबासाहेबांनीं बॅ. जयकरांना आपले वैयक्तिक महत्त्वाचे प्रश्न स्वतः समजावून सांगितले.

ता. १८ डिसेंबर रोजीं मुंबई येथें सर्व संस्थानांच्या सामान्य प्रश्नांबाबत सर कोर्टने लॅटिमर यांचेबरोबर ताजमहाल हॉटेलमध्यें चर्चा झाली त्या वेळीं सर्व संस्थानिक, त्यांचे दिवाण व बॅरिस्टर जयकर हजर होते. त्याच ठिकाणीं दुसऱ्या दिवशीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं बॅरिस्टर जयकर व भोर स्टेटचे ऑफिसर यांचे मदतीनें भोर संस्थानच्या विशेष महत्त्वाच्या प्रश्नांवर सर कोर्टने यांचेबरोबर चर्चा केली. वरील दोन्ही वेळीं खुली चर्चा झाल्यामुळे बऱ्याच महत्त्वाच्या व संदिग्ध मुद्यांबाबत खुलासा झाला व संस्थानचे अतिशय महत्त्वाचे प्रश्न सोडविण्यास मदत झाली. याच चर्चेनंतर फेडरेशन-प्रवेशपत्रिकेच्या व गव्हर्नमेंट ऑफ इंडिया कायद्याच्या ७ व्या परिशिष्टांतील १ ल्या यादीविषयीं भोर दरबारनें आपलें पुरवणी मत म्हणून तयार करून तें ता. २२ जानेवारी १९३७ रोजीं ए. जी. जीं. कडे पाठविलें. पुढें ता. २० ते २४ फेब्रुवारी रोजीं दिल्ली येथें नरेंद्र-मंडळाची बैठक झाली. त्या वेळीं या विषयावर चर्चा होऊन कांहीं संदिग्ध प्रश्नांचा आणखी खुलासा झाला व पूर्वीं पाठविलेल्या अभिप्रायांत कांहीं सुधारणा करून पुनः पुरवणी मत म्हणून ता. ९ मार्च सन १९३७ रोजीं भोर दरबारनें ए. जी. जीं.कडे पाठविलें.

ता. १९ डिसेंबर रोजीं सर कोर्टने लॅटिमर, व्हाइसरॉयांचे प्रतिनिधि, यांना या ९ संस्थानांच्या गटातर्फे ताजमहाल हॉटेलांत श्रीमंत राजेसाहेबांचे अध्यक्षतेखालीं डिनरपार्टी देण्यांत आली. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबानीं टोस्टचें भाषण केलें व श्रीमंत राजेसाहेब जमखिंडी यांनीं त्यास दुजोरा दिला.

फेडरेशनमध्यें सामील होण्याच्या करारापैकींच एक पोटविभाग म्हणून संस्थानला अगर व्यक्तिशः संस्थानाधिपतीला संस्थानाबाहेरचे हक्क (Extra-Territorial Rights) कोणकोणते आहेत व फेडरेशननंतर कोणकोणते हक्क कायम राहावेत अशी संस्थानाधिपतींची इच्छा आहे त्यांची यादी पाठवावी, अशा प्रकारची विचारणा करणारे ता. २४ डिसेंबरचें ए. जी. जीं. चें पत्र दरबारला आलें. या प्रश्नावर विचारविनिमय करण्याकरितां फलटण संस्थानचे अधिपतींचे अध्यक्षतेखालीं वरील ९ संस्थानाच्या गटाची सभा मुंबई येथें ता. १६ जानेवारी रोजीं भरली. याच विषयावर पुन्हां श्रीमंत राजेसाहेब भोर यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांच्या पुणें येथील लक्ष्मीविलास बंगल्यात ता. १६ मार्च १९३७ रोजीं दुसरी सभा भरली. सर्व संस्थानांनीं आपआपल्या हक्काची केलेली यादी तपासून पाहून प्रत्येकानें स्वतंत्रपणें आपापली यादी पुराव्यासह सरकारकडे पाठवून द्यावी असें ठरलें. त्याप्रमाणें भोर दरबारनें संस्थानला व संस्थानचे अधिपतींला व्यक्तिशः संस्थानाबाहेर असलेल्या हक्कांची यादी तयार करून ता. १७ एप्रिल १९३७ रोजीं संस्थानचे रेसिडेंटकडे पाठवून दिली.

फेडरेशन-प्रवेशाचे कराराबाबत, गव्हर्मेन्ट ऑफ इंडिया कायद्याच्या ७ व्या परिशिष्टाचे १ ल्या यादीवरील दरबारचे अभिप्राय व एक्स्ट्रॉ-टेरिटोरियल राइटस्‌ची यादी हे सर्व कागदपत्र गव्हर्मेन्ट ऑफ इंडियाचे पोलिटिकल खात्याकडे पाठविण्यांत आले.

त्यानंतर हिंदुस्थान सरकारच्या पोलिटिकल खात्याकडून संयुक्त घटनेच्या सामील नाम्याचा नवीन मसुदा ता. २७-१-१९३९ इ. रोजीं ने. ना. व्हाइसरॉयसाहेब यांच्याकडून श्रीमंत राजेसाहेब यांच्याकडे आला. त्यांवर मसुदा मिळाल्या तारखेपासून ६ महिन्याच्या आंत उत्तर पाठवावे असें लिहून आले. यासंबंधाचा विचार चालू आहे.

---

## प्रकरण १५ वें

# नरेंद्र-मंडळाच्या सभासदत्वाकरितां प्रयत्न आणि नरेंद्र-मंडळाची पुनर्घटना

सन १९२१ सालीं नरेंद्र-मंडळ ( Chamber of Princes ) ही राजेलोकांची संस्था स्थापन करण्यांत आली. मंडळाची घटना व नियम त्या वेळीं तयार करण्यांत आले त्यास अनुसरून वंशपरंपरेच्या ११ किंवा त्यांपेक्षा जास्त तोफांच्या सलामीचा मान ता. १ जानेवारी १९२० सालीं असलेल्यास किंवा अंतर्गत राजसत्तेचे पूर्ण अगर बव्हंशी पूर्ण अधिकार भोगणाऱ्या संस्थानिकास नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद म्हणून घेण्यात यावे असें ठरले होतें. त्या नियमाप्रमाणें १०८ संस्थानाच्या अधिपतीना नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद म्हणून निवडण्यांत आले. दुसऱ्या नियमाप्रमाणे जरी अंतर्गत राजसत्तेचे पूर्ण अगर बव्हंशीं पूर्ण अधिकार भोगणाऱ्या संस्थानिकास नरेंद्र-मंडळांत सामील केले होते, तरी त्याना निदान ९ तोफांच्या सलामीचा वंश-परंपरेचा मान आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यात आली होती.

भोरचे त्या वेळचे अधिपति कै. श्रीमंत रावसाहेब याना ११ तोफांच्या सलामीचा मान होता; परंतु तो वैयक्तिक असल्यामुळे, भोर संस्थान जरी अंतर्गत पूर्ण अधिकार असलेलें होतें, तरी नरेंद्र-मंडळाच्या कायमच्या सभासदाच्या यादींत त्याचा समावेश झाला नाहीं. भोर व बाकीच्या संस्थानाचे वेगवेगळे १२ गट करून त्या प्रत्येक गटातर्फे एक याप्रमाणें १२ प्रतिनिधि नरेंद्र-मंडळात घेण्यात आले. याची दर तीन वर्षांनी नवी निवडणुक व्हावी असा नियम करण्यात आला. केवळ कायमच्या तोफाच्या सलामीचा मान नसल्यामुळे त्या वेळी भोर संस्थान कायमच्या सभासदत्वास मुकले.

दक्षिणेंतील संस्थानाच्या मध्यवर्ति गटातर्फे प्रथमत: अक्कलकोट संस्थानचे अधिपति नरेंद्र-मंडळाचे प्रतिनिधि म्हणून निवडले गेले. प्रतिनिधित्वाची पहिली त्रैवार्षिक मुदत संपण्यापूर्वींच अक्कलकोटचे अधिपति निधन पावले व रिकाम्या जागेवर श्रीमंत राजेसाहेबाची १९२३ सालीं मध्यवर्ति गटातर्फे निवड झाली. त्यानंतर लागोपाठ दोन वेळा निवडून येऊन दक्षिणेंतील मध्यवर्ति

गटाचे प्रतिनिधि म्हणून श्रीमंतांनीं नरेंद्र-मंडळात काम केले. त्याचें सविस्तर वर्णन मागें देण्यांत आलेंच आहे. संस्थानांचे प्रतिनिधि म्हणून जरी ते •काम करीत होते तरी स्वतंत्रपणें कायमचा सभासद म्हणून नरेंद्र-मंडळात भोर संस्थानचा समावेश व्हावा अशी श्रीमंत राजेसाहेबांची उत्कट इच्छा असल्यामुळे त्या दिशेनें त्यानीं सारखे प्रयत्न चालू ठेविले आहेत.

१९२७ च्या नोव्हेंबर महिन्यात श्रीमंत बाबासाहेबाना ९ तोफांच्या वंशपरंपरा सलामीचा मान देण्यात आला. तेव्हा भोर संस्थान नरेंद्र-मंडळाच्या कायमच्या सभासदत्वास मंडळाच्या नियमानुसार लायक झाल्यानें श्रीमंत बाबासाहेबांनीं १९२८ सालीं त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांच्याकडे नरेंद्र-मंडळावर कायमचे सभासद नेमण्यास भोर संस्थानचा कसा हक्क पोंचतो, हें पटविण्याकरिता एक रिप्रेझेंटेशन तयार करून पाठविले. त्यात प्रामुख्यानें ९ तोफांची वंशपरंपरेची सलामी, अंतर्गत पूर्ण सत्ता, दुसऱ्या कोणत्याहि लहान संस्थानापेक्षा भोर संस्थानचा सभासदत्वासाठीं हक्काचा श्रेष्ठपणा, भोरपेक्षा ऐतिहासिक महत्त्व, लोकसंख्या, उत्पन्न इत्यादींनीं लहान संस्थानाचें नरेंद्रमंडळातील अस्तित्व, नरेंद्र-मंडळांत संस्थानाचे प्रतिनिधि म्हणून केलेली ५ वर्षांतील कामगिरी, पाटबंधाऱ्यांबाबत ब्रिटिश सरकारशीं भोर संस्थाननें केलेलें सहकार्य वगैरे गोष्टी सरकारच्या नजरेस आणिल्या. हें रिप्रेझेंटेशन सर लेस्ली विल्सन यानीं आपल्या शिफारशीसह व्हाइसरॉयसाहेबाकडे पाठविले. नेक नामदार व्हाइसरॉयसाहेबाचे प्रायव्हेट सेक्रेटरींकडून श्रीमंत राजेसाहेबाना या प्रश्नाबाबत ता. २१ मे १९३० रोजी आलेल्या उत्तरात त्यानीं कळविलें होतें की,

"The question of your admission to the Chamber of Princes will again be considered when a revision of the constitution of the Chamber is undertaken"

सर लेस्ली विल्सन याची मुदत संपून ते विलायतेस परत गेल्यावर फेब्रुवारी १९३१ मध्यें त्यानीं पाठविलेल्या पत्रात श्रीमंताना लिहिले की,

"I remember well your desire to become a permanent member of the Chamber of Princes and I can understand your

desire–a very natural one–to continue your connection with the Chamber of Princes where you did so much hard work."

सन १९३१ च्या नोव्हेंबर महिन्यांत श्रीमंत राजेसाहेबांनीं पोलिटिकल एजंटमार्फत नरेंद्र-मंडळाच्या कायमच्या सभासदत्वासाठीं दुसरें रिप्रेझेंटेशन पाठविलें.

सन १९३२ सालीं नरेंद्र-मंडळाच्या स्टँडिंग कमिटीनें नरेंद्र-मंडळाच्या घटनेंत फेरबदल सुचविण्याकरितां एक सब-कमिटी नेमली. त्या कमिटीकडे भोर दरबारची केस तयार करून विचाराकरितां पाठवावी असें पोलिटिकल एजंट यांचें पत्र आल्यावरून नरेंद्र-मंडळाचे चॅन्सेलर व सब-कमिटीचे सभासद यांच्याकडे कायमच्या सभासदत्वाबद्दल तिसरें रिप्रेझेंटेशन श्रीमंत राजेसाहेबानीं ऑगस्ट सन १९३२ मध्यें पाठविले. त्यांतहि भोर संस्थानच्या सभासदत्वासाठीं महत्त्वाच्या गोष्टी कमिटीच्या नजरेस आणिल्या होत्या. या कमिटीनें आपला रिपोर्ट मार्च सन १९३३ मध्यें गव्हर्मेंटकडे सादर केला.

१९३३ सालीं फेडरेशनची वाटाघाट चालू असतांना मध्यवर्ति वरिष्ठ व कनिष्ठ विधिमंडळांत संस्थानिकांच्या प्रतिनिधित्वाच्या प्रश्नाची चर्चा सुरू झाली. त्यांत नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद असलेलीं व सभासद नसलेलीं संस्थानें असा भेद करण्यांत येऊन कायमचे सभासद असलेल्यांना विशेष प्राधान्य देण्यांत येईल असा रंग दिसूं लागला. त्यामुळें नरेंद्र-मंडळाचें कायमचें सभासदत्व प्राप्त करून घेणें ही आवश्यक गोष्ट होऊन दक्षिणेंतील संस्थानांचे ए. जी. जीं.चे मार्फत नरेंद्र-मंडळाचे सभासदत्वाचा आपला हक्क प्रस्थापित करण्यासाठीं श्रीमंत राजेसाहेबांनीं चौथें रिप्रेझेंटेशन एप्रिल १९३३ मध्यें पाठविलें. हेंहि रिप्रेझेंटेशन ए. जी. जीं.नीं आपल्या शिफारशीसह हिंदुस्थान सरकारकडे पाठविलें.

यानंतर १९३५ च्या मार्चमध्यें या विषयावर श्रीमंत राजेसाहेबांनीं ५ वें रिप्रेझेंटेशन पाठविलें. त्या वेळीं नरेंद्र-मंडळाच्या घटनादुरुस्तीचे प्रश्नाचा विचार चालू असल्यामुळें "भोर संस्थानच्या प्रश्नाचा विचार तूर्त करितां येत नाहीं" असें कळविण्यांत आलें.

नरेंद्र-मंडळाच्या फेब्रुवारी १९३७मधील दिल्ली येथें झालेल्या Informal Meeting मध्यें नरेंद्र-मंडळाची वाढ करण्याकरितां Criteria Committee नेमण्यांत आली. या कमिटीची बैठक मुंबई येथें कमिटीचे चेअरमन हिज हायनेस जामसाहेब, नवानगर, यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २३ नोव्हेंबर रोजीं झाली. ही कमिटी नेमण्याचा हेतु ज्या लहान संस्थानांना स्वतःच्या हक्कानें नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद होण्याचा हक्क असताना वगळले गेले त्यांपैकीं कोणकोणत्या संस्थानिकाचा नरेंद्र-मंडळात समावेश करून घेता येईल व त्यासाठीं त्याची लायकी काय असावी हें ठरविणें, हा होता. सभासदाकडे श्रीमंत राजेसाहेबांनीं भोर संस्थानचा हक्क प्रस्थापित करणारे निवेदन ता. ६ नोव्हेंबर १९३८ रोजीं पाठविले. कमिटीनें आपल्या बैठकींत नरेंद्र-मंडळाच्या सभासदत्वासाठीं संस्थानिकाची लायकी (Criterion) काय असावी व त्या कसोटीप्रमाणें कोणकोणत्या संस्थानिकांचा नरेंद्र-मंडळात समावेश करून घेता येईल हें ठरवून आपल्या शिफारशींचा रिपोर्ट चॅन्सेलरकडे सादर केला. या रिपोर्टांत दुसऱ्या कांहीं संस्थानांबरोबर भोर आणि जमखंडी या संस्थानांना नरेंद्र-मंडळांत कायमचे सभासद करून घ्यावे अशी शिफारस केली होती. Criteria Committee च्या रिपोर्टावर मुंबई येथें ताजमहाल हॉटेलमध्ये ता. २८ नोव्हेंबर ते ता. २ डिसेंबर १९३८ पर्यंत सर्व संस्थानाचे अधिपति व त्यांचे दिवाण याच्या सभा भरून चर्चा झाली. या चर्चेच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब हजर होते; आणि कमिटीनें केलेल्या शिफारशींबाबत ता. १-१२-३८ रोजीं झालेल्या सभेंत कांहीं संस्थानिकानीं पसंतीदर्शक आणि आभारप्रदर्शक भाषणें करून गव्हर्मेन्ट ऑफ इंडियानें सदरहू शिफारशी लवकर अंमलात आणाव्यात असें सुचविलें. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब जमखिंडी यांनीं केलेल्या भाषणास दुजोरा देण्यासाठीं श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांनीं छोटेंसें भाषण केले. ते म्हणाले:—

"Your Highnesses and Gentlemen,

With feelings of deep delight and sincere satisfaction I rise to offer my support to what has been just now said by my brother Rulers. But, before doing that I should like to take this gladdening opportunity of offering my heartfelt grateful-

ness to His Highness the Chancellor and all the members of the Criteria Committee including His Highness the Maharaja Saheb of Bikaner, for the great labour and care bestowed by them in solving this long standing question that was agitating the minds of a number of so-called smaller States among our Princely Order. I have already submitted my views upon the subject of the admission of more States as full members into the Chamber to His Highness the Chancellor and all members of the Criteria Committee and it is a matter of great pleasure to me to extend my hearty support to the views expressed and remarks made by my brother Ruler, His Highness the Raja Saheb of Jamkhandi."

दिल्ली येथें नरेंद्र-मंडळाची बैठक ता. १३ मार्च पासून १६ मार्च १९३९ पर्यंत झाली. या बैठकींत हिज हायनेस जामसाहेब, नवानगर, नरेंद्र-मंडळाचे चॅन्सेलर यानी गेल्या दोन वर्षांतील नरेंद्र-मंडळाच्या कामकाजाचें सिंहावलोकन केलें. त्यांत कायमचे सभासदत्वास लायक असलेल्या लहान संस्थानिकाचा नरेंद्र-मंडळांत समावेश करून घेऊन त्याची वाढ करण्याच्या प्रश्नाबाबत १९३७ च्या नरेंद्र-मंडळाच्या बैठकीच्या सुरुवातीस त्या वेळच्या चॅन्सेलरनीं केलेल्या भाषणाचा उल्लेख केला. ते म्हणाले होते कीं, नरेंद्र-मंडळातील सर्व संस्थानिकाचा एक मताचा अभिप्राय आल्यावर या प्रश्नाचा हिंदुस्थान सरकार ताबडतोब विचार करील. आता मुंबई येथें झालेल्या संस्थानिकाच्या बैठकीच्या वेळी Criteria Committee नें केलेल्या रिपोर्टास सर्व संस्थानिकानीं आपली पसंती दर्शविली असल्यानें या प्रश्नाचा सहानुभूतिपूर्वक गव्हर्मेन्टकडून लवकरच विचार होईल अशी मी आशा करतों.

## नरेंद्र-मंडळाच्या कार्यकारी मंडळाची पुनर्घटना

### ( Reorganisation of the Standing Committee of the Chamber of Princes )

नरेंद्र-मंडळाची स्थापना करण्यांत आली त्या वेळीं जी घटना ठरविण्यांत आली त्या घटनेंत मोठ्या संस्थानिकाना जितके महत्त्व द्यावयास पाहिजे होतें तितके देण्यांत आलेलं नाहीं, असें प्रत्यक्ष कामकाज सुरू झाल्यावर मोठ्या संस्थानिकाना वाटूं लागलें. तसेंच नरेंद्रमंडळांत सामील

झाल्यानें आपले हित साधता येईलसे त्याना वाटेना; म्हणून त्यानी नरेंद्र-मंडळात काम करण्याचे सोडले. त्यामुळे मध्यम-वर्गापैकीं जे संस्थानिक नरेंद्र-मंडळात काम करीत होते त्याच्या कामाचें तेज पडेना. नरेंद्र-मंडळात काम करण्याचा हक्क असणाऱ्या काहीं लहान संस्थानिकाना नरेंद्र-मंडळांतून वगळल्यामुळे त्याच्या बाबतींत अन्याय होऊन प्रातिनिधिक संस्था या दृष्टीने नरेंद्र-मंडळास हें एक वैगुण्य होतें. तें वैगुण्य दूर करण्याच्या हेतूनें व सर्व संस्थानिकामध्यें एकी व्हावी आणि नरेंद्र-मंडळ ही संस्था खरीखुरी प्रातिनिधिक स्वरूपाची संस्था व्हावी असे जरूर ते फेरफार सुचविणारी घटना तयार करण्यासाठीं नरेंद्र-मंडळातर्फे एक कमिटी ( Reorganisation Committee ) हिज हायनेस महाराजासाहेब, बिकानेर, याच्या अध्यक्षतेखाली नेमण्यात आली. सर्व मोठ्या संस्थानिकांच्या हिताकडे व महत्त्वाकडे लक्ष देऊन नरेंद्र-मंडळाच्या स्टँडिंग कमिटींत त्याच्या योग्यतेनुसार कायमची योजना करणें, सर्व लहान संस्थानांचे प्रतिनिधी कमिटींत येतील अशी योजना ठरवून स्टँडिंग कमिटी पूर्ण प्रातिनिधिक स्वरूपाची बनेल अशी घटना तयार करणे, आणि संस्थानांच्या दिवाणाची एक कमिटी नरेंद्र-मंडळाच्या स्टँडिंग कमिटीला सल्ला मसलत देण्याचे कामासाठीं बनवावयाची त्या कमिटीची घटना सुचविणे हीं मुख्य कामें Reorganisation Committee कडे होती. कमिटीनें जून १९३८ मध्यें बैठक भरवून वरील दोन्ही गोष्टींबद्दल पूर्ण विचार करून आपल्या शिफारशीचा रिपोर्ट नरेंद्र-मंडळाच्या चॅन्सेलरकडे सादर केला.

या रिपोर्टींत स्टँडिंग कमिटींत एकंदर ३३ सभासद असावेत अशी शिफारस केली होती. त्यात २१ तोफाची सलामी असलेल्या बडोदा, ग्वाल्हेर, हैद्राबाद, काश्मीर आणि म्हैसूर या पाच संस्थानातर्फे प्रत्येकी एकप्रमाणें ५ प्रतिनिधि; फेडरल कायदेमंडळांत ज्याना ३ अथवा जास्त जागा आहेत अशा भावलपूर, भोपाळ, बिकानेर, कोचीन, इंदूर, जयपूर, जोधपूर, कोल्हापूर, पतियाळा, रेवा, त्रावणकोर आणि उदेपूर या १२ संस्थानांतर्फे १० प्रतिनिधि, ( मात्र या संस्थानाच्या गटात राजपुताना, मध्य हिंदुस्थान, पंजाब, दक्षिण हिंदुस्थान व महाराष्ट्र या पाच गटातील संस्थानाचे प्रतिनिधींचा समावेश झाला पाहिजे, ); पश्चिम हिंदुस्थान व गुजराथेंतील भावनगर, कच्छ, जुनागड,

नवानगर, कॅम्बे, जंजिरा, मोर्वी आणि पोरबंदर या आठ मोठ्या संस्थानांतर्फे २ प्रतिनिधि; वरील संस्थानापैकीं ज्यांना फेडरल कायदेमंडळात प्रत्येकीं १ प्रतिनिधित्व आहे, लोकसंख्या साडेचार लक्ष आहे अथवा १७ तोफांची सलामी आहे अशा अलवार, भरतपूर, बुंदी, कुचबिहार, करोली, कोटा, रामपूर आणि टोंक या आठ संस्थानांतर्फे २ प्रतिनिधि; बाकी राहिलेले दक्षिण हिंदुस्थान व महाराष्ट्रांतील संस्थानांतर्फे १ प्रतिनिधि; राजपुताना संस्थानातर्फे २ प्रतिनिधि; मध्य हिंदुस्थान व बनारसतर्फे ४ प्रतिनिधि; पंजाब संस्थानातर्फे २ प्रतिनिधि; पश्चिम हिंदुस्थान व गुजराथ संस्थांनातर्फे २ प्रतिनिधि; पूर्व हिंदुस्थान व सिक्किमतर्फे २ प्रतिनिधि; आणि चेंबरच्या प्रतिनिधि-सभासदातर्फे १ प्रतिनिधि याप्रमाणें एकूण ३३ सभासद. याच धर्तीवर दिवाणाची कमिटी करण्यांत यावी अशी शिफारस करण्यांत आली.

वरील शिफारशीप्रमाणें नरेंद्र-मंडळाच्या मार्च १९३९ मध्यें झालेल्या बैठकींत ठराव माडण्यांत येऊन तो सर्वानुमतें पास करण्यांत आला.

या कमिटीनें वरील घटनादुरुस्तीच्या वाटाघाटी चालू असतांना कायमचे सभासदत्वाचा अगर नवीन संस्थानांचा नरेंद्र-मंडळांत समावेश करण्याबाबतचा प्रश्न त्याच कामाकरितां म्हणून नेमण्यांत आलेल्या Criteria Committee कडे सोंपविला असल्यानें त्याची विशेष वाटाघाट केली नाहीं. फक्त जून १९३८ मधील आपल्या मुंबई येथील बैठकींत एक ठराव पास करून Criteria Committee ज्यांबद्दल शिफारस करील आणि नरेंद्र-मंडळ ज्यास संमति देईल अशीं संस्थानें नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद म्हणून सामील करून घेण्यास या रीऑर्गनायझेशन कमिटीनें आपली संमति दर्शविली आहे.

Criteria Committee नें, इतर कांहीं संस्थानांबरोबर भोर संस्थानाचा कायमचे सभासद म्हणून नरेंद्र-मंडळांत समावेश करून घ्यावा, अशी शिफारस केली आहे. ही हकीकत वर विस्तृत दिलीच आहे. हिंदुस्थान सरकारचा या बाबतींतील निर्णय अद्याप व्हावयाचा आहे.

---

# प्रकरण १६ वें

# संस्थानच्या दर्जांत वाढ

## नवीन मान

### ९ तोफांचे सलामीचा वंशपरंपरेचा मान

सन १९२७ हें साल भोर संस्थानच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे. या सालच्या नोव्हेंबर महिन्यांत सार्वभौम बादशहाकडून श्रीमंत राजेसाहेबांस ९ तोफांचे सलामीचा वंशपरंपरेचा बहुमान मिळाला. कै. श्रीमंत रावसाहेबाना ११ तोफांचे सलामीचा मान मिळाला होता; परंतु तो वैयक्तिक होता. अर्थात् वैयक्तिक सलामीच्या मानापेक्षा वंशपरंपरेच्या सलामीला जास्त महत्त्व देण्यात येतें. संस्थानास वंशपरंपरेचा मान संपादन करण्याची संधि पूर्वी आली होती, परंतु ती कशी गेली हें पहिल्या भागात सांगण्यांत आलें आहे. श्रीमंत राजेसाहेबानीं गादीवर आल्यावर अवघ्या ५ वर्षांत राज्यकारभारात सुधारणा करून प्रगति केली व आपल्या अंगची कर्तबगारी दाखवून वैयक्तिक हिताकडे लक्ष न देतां संस्थानास हा जो वंशपरंपरेचा मान मिळवून दिला यांत त्यांचा थोरपणा दिसून येतो.

श्रीमंत राजेसाहेब प्रचंडगड तालुक्यात जमाबंदीनिमित्त दौऱ्यावर असतांना वेले येथें ता. २७ नोव्हेंबर १९२७ इ. रोजीं त्यांना हा सलामीचा अपूर्व बहुमान मिळाल्याची बातमी कळली. ज्या प्रचंडगडावर श्रीछत्रपति शिवाजीमहाराजानीं मराठी साम्राज्याचें तोरण बांधून त्या किल्ल्यास तोरणा असें नांव दिलें त्याच किल्ल्याचे पायथ्याशीं वेलें गांव आहे. या ठिकाणीं श्रीमंत राजेसाहेबांस ही आनंदाची बातमी प्रथम समजली; ही गोष्ट त्याच्या भावी उत्कर्षाची शुभशकुनच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. ही आनंदाची बातमी सर्व संस्थानांत लवकरच पसरून सर्वत्र आनंदाचे वातावरण निर्माण झालें. प्रथम तोरणा किल्ल्याचे पायथ्याशींच तेथील अधिकारी व इतर लोक यांनीं श्रीमंत राजेसाहेबास पुष्पहार घालून पानसुपारीचा समारंभ केला.

जमाबंदीचें काम ३-४ दिवसात संपवून ता. २ डिसेंबर रोजीं श्रीमंत राजेसाहेब भोरास आले. त्या अवधींत या बहुमानाबद्दल ब्रिटिश सरकारचे

बडे अधिकारी, संस्थानिक बंधू, आप्त, इष्टमित्र, हितचिंतक व प्रजाजन याचे-कडून अभिनंदनाचीं शेकडों पत्रे व तारा आल्या. ता. २ डिसेंबर १९२७ इ. रोजीं सायंकाळीं श्रीमंत राजेसाहेब भोरास आले त्या वेळीं शहरचा राजमार्ग पताकानीं उत्तम रीतीनें सुशोभित करून रोषणाई करण्यांत आली होती. शहराच्या प्रवेशद्वारापासून वाड्यापर्यंत श्रीमंत राजेसाहेबांची मोठ्या थाटाची मिरवणूक काढण्यात आली. वाटेने नागरिकाकडून शेकडों पुष्पहार अर्पण करण्यात आले. श्रीमंत राजेसाहेब वाड्यात गेल्यावर तेथें अधिकारी व इतर नोकर यानींहि श्रीमंतास पुष्पहार घातले.

या बहुमानानिमित्त संस्थानातील तालुक्यातील प्रजाजन, भोर म्युनिसिपालिटी व इतर संस्था यानीं श्रीमंत राजेसाहेबांस मानपत्रे स्वीकारण्याची विनंति केली. श्रीमंत राजेसाहेबानीं सर्वांच्या इच्छेस मान देऊन मानपत्रें स्वीकारण्याचें कबूल केलें. हा मानपत्र-अर्पणाचा समारंभ ता. २९ जानेवारी सन १९२८ इ. रोजी श्रीराममंडपात दरबार भरवून करण्यात आला. या वेळीं भोर म्युनिसिपालिटी, पुणें बालवीरसंस्था, राजगड, पौनमावळ व सुधागड तालुक्यातील प्रजाजन व पिरंगूट येथील प्रजाजन याचेकडून श्रीमंत राजेसाहेबास मानपत्रें अर्पण करण्यात आलीं. त्या वेळीं सर्व मानपत्रास उत्तर देताना श्रीमंतांनीं प्रथम सर्वांचे आभार मानून या आनंदोत्सवाचे चिरस्मरणार्थ म्हणून संस्थानात कायदे-मंडळासारखी प्रातिनिधिक संस्था स्थापन करण्याचा आपला हेतु असल्याची महत्त्वाची गोष्ट जाहीर केली. या हेतूप्रमाणें याच सालीं आपल्या ६ व्या वार्षिक राज्यारोहणाच्या समारंभाच्या वेळीं म्हणजे ता. १८ ऑगस्ट रोजीं कायदेमंडळाची स्थापना केली. वरील सलामीचा मान प्राप्त झाल्यानंतर ता. ८ मे १९२८ रोजीं मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांनीं भोरास भेट दिली. त्या वेळीं दरबारमध्यें केलेल्या भाषणांत त्यानी सलामीचे प्राप्तीबद्दल अभिनंदन करून पुढील गौरवपर उद्गार काढले:—

"It is, as you, Chief Saheb, have pointed out, unusual for a Governor of Bombay to visit Bhor more than once during his term of office, but, since I was here last, an important event in the history of the State has taken place, and I was anxious to have an opportunity of coming here and personally

**चित्रांक ११९**



९:तोफांची सलामी मिळाल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांना मानपत्रें अर्पण करण्यासाठीं ता. २९ जानेवारी १९२८ रोजीं भोर येथें भरविलेला दरबार.

[ सं. पा. ६८८

congratulating the Chief, within his own State, on the honour that has been conferred upon him by His Majesty the King-Emperor. I wished also to offer my congratulations in person to the people of Bhor, not only upon the distinction conferred upon the State, but upon their good fortune in having as their ruler the present Shrimant Pant Sachiv.

As the people of the various countries in the world live under governments of all sorts, both good and bad, so among the Indian States there are many that are ruled for the benefit of the subjects of those States, and there are others few, I am glad to think, in number in which the welfare of the people does not always appear to be the paramount consideration. Within the former class a prominent position must be given to the State of Bhor under your present ruler, who, during the six years that have passed since he succeeded to the gadi has worked whole-heartedly for the prestige of his State and for the welfare of those whose happiness and prosperity have been committed to his charge.

It would not be appropriate for me, on an occasion such as this, to try to describe to you the various improvements in the Administration which the Chief Saheb has introduced in recent years, often at very considerable cost to the revenue of the State, and indeed I fear it would take too long if I were to attempt even to enumerate these improvements in any detail. To the people of the State, who have benefitted from these reforms they are too well known to require any statement from me on the subject, and to the outside public the permanent salute of 9 guns which has been recently conferred, is sufficient proof that the Chief's excellent administration of the internal affairs of his State as well as his loyal and whole-hearted co-operation with Government, particularly in the important irrigation scheme which derives its water supply from the great work at Bhatghar, have been fully appreciated and recognised not only by the Government of Bombay, but by His Excellency the Viceroy and by His Majesty the King-Emperor. It gives me great pleasure to be able thus publicly

to express my appreciation of the work that your Chief has done, and is doing, for the welfare of the State, my gratitude for his constant friendship and loyal co-operation in the efforts my Government have been making for the benefit of the people of Bombay Presidency, and to offer now, in the presence of his people, my warmest personal congratulations to Shrimant Pant Saheb, Chief of Bhor."

## ' राजा ' ह्या वंशपरंपरेच्या बहुमानाच्या पदवीची प्राप्ति

९ तोफांच्या सलामीचा वंशपरंपरेचा मान मिळाल्यानंतर ता. ३ जून सन १९३५ इ. रोजीं संस्थानाचे अधिपतींस ' राजा ' ही बहुमानाची वंशपरंपरेची पदवी ब्रिटिश सरकारकडून मिळाली. हा दिवसहि भोर संस्थानच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनींच लिहून ठेवण्यासारखा आहे. पूर्वीं संस्थानच्या अधिपतींस ' चीफ ' असें संबोधण्यांत येत असे. भोरसारख्या संस्थानचे अधिपतींस ' चीफ ' ही पदवी न्यूनत्वदर्शक होती. ' राजा ' ही पदवी मिळाल्यानें संस्थानास आलेला कमीपणा नाहींसा होऊन संस्थानला योग्य दर्जा प्राप्त झाला, व त्यामुळें संस्थानच्या प्रजाजनांस आनंद झाला. ९ तोफांचे सलामीचे वेळीं ज्याप्रमाणें सर्वत्र आनंदोत्सव होऊन श्रीमंत राजेसाहेबांस मानपत्रें अर्पण करण्यांत आलीं, त्याचप्रमाणें ता. १८ जून १९३५ रोजीं प्रजाजनाकडून व अनेक सार्वजनिक संस्थांकडून श्रीराम-मंडपांत दरबार भरवून श्रीमंत राजेसाहेबांस मानपत्रे अर्पण करण्यांत आलीं. त्यांत दत्तमंदिर संस्था भोर, तालुका लोकल बोर्ड, विचित्रगड, नोटिफाइड एरिया कमिटी शिरवळ, गोदुग्धप्रसारक मंडळ, भोर, सुधागड तालुका लोकल बोर्ड, सॅनिटरी बोर्ड पाली, राजगड तालुका लोकल बोर्ड, राजगड तालुका-सभा, पाली वाचनालय, समाज-सेवासंघ, हरिजनसेवकसंघ, नसरापूर सॅनिटरी कमिटी, प्रचंडगड तालुका लोकल बोर्ड, सुधागड सरकारी संघ मुंबई, नाडसूरसेवा मंडळ व भोर म्युनिसिपालिटी, इत्यादि संस्था प्रमुख होत्या.

या मानपत्रसमारंभांतील विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे सुधागड तालुक्यांतील हरिजनसेवकसंघानें दिलेले मानपत्र ही होय. मानपत्रसमारंभ करण्याचें ठरलें तेव्हां वरील तालुक्यातील हरिजनसेवासंघाचे चालकानीं श्रीमंत

राजेसाहेबास संघाचे मानपत्र स्वीकारण्याबद्दल विनंती केली. श्रीमंत राजेसाहेबानीं त्याची विनंति मान्य केली, तेव्हां हरिजनसेवकसंघास आनंद वाटून संघानें आपल्यातर्फे मानपत्र देण्याकरिता भोरास शिष्टमंडळ पाठविण्याचें ठरवून त्याप्रमाणें श्रीमंत राजेसाहेबांस कळविलें.

अस्पृश्यांचें शिष्टमंडळ येऊन श्रीमंत राजेसाहेबास दरबारात मानपत्र अर्पण करणार ही बातमी ऐकून सनातनींना धक्काच बसला. शिष्टमंडळांत अस्पृश्य येणार, तेव्हा त्याना दरबारात कोठे बसवावे, त्याची व्यवस्था कशी ठेवावी याबद्दल अधिकारीवर्गांत वाटाघाट सुरू झाली. अधिकाऱ्यांत काहीं जुने अधिकारी सनातनी आहेत. शास्त्री, पंडित व भिक्षुकवर्गास त्यांचा आधार. शास्त्री-पंडितानीं वरील अधिकाऱ्यांस सागितलें कीं, श्रीराम-मंडपात जर अस्पृश्यांचा प्रवेश होऊं दिला तर धर्मावर मोठाच घाला पडणार आहे. यास्तव मानपत्र दुसऱ्या कोणीतरी स्पृश्यानें श्रीमंत राजेसाहेबास अर्पण करावें.

श्रीमंत राजेसाहेबांनीं जेव्हां अधिकाऱ्याचा सल्ला विचारला तेव्हा सनातनी अधिकाऱ्यांनीं व उपाध्ये दीक्षितानीं अस्पृश्याना श्रीराम-मंडपांत दरबारांत बसवूं नये, असें सागितलें. कांहीं नवमतवादी अधिकाऱ्यांचें म्हणणें पडले कीं, ज्याअर्थीं अस्पृश्याचें मानपत्र स्वीकारण्याचें कबूल केले त्याअर्थी इतर मानपत्रें देण्यास येणाऱ्या लोकाप्रमाणेंच अस्पृश्याना वागविणें इष्ट आहे. श्रीमंत राजेसाहेबानीं सर्वांचें म्हणणें ऐकून घेऊन विशेष चर्चा न करितां इतर मंडळीप्रमाणेच अस्पृश्यांची राहण्याची व जेवणखाणाची तजवीज ठेवून दरबारात इतर लोकामध्येंच त्याची बसण्याची व्यवस्था करण्याबद्दल हुकूम दिले. त्याप्रमाणें त्यांची उतरण्याची वगैरे व्यवस्था ठेवण्यांत येऊन दरबारांत योग्य ठिकाणीं त्यांना बसविण्यांत आलें. अस्पृश्यांपैकीं एकानें आपलें मानपत्र वाचून दाखवून तें स्वतः आपल्या हातानें श्रीमंत राजेसाहेबांस अर्पण केले. या वेळी अस्पृश्याना किती धन्यता वाटली असेल !

हा मानपत्रांचा समारंभ झाल्यावर ता. १९ जून रोजीं श्रीमंत राजेसाहेबानीं हरिजनांचे बाबतींत जें उदार धोरण व मनोधैर्य दाखविले त्याबद्दल श्री. गोपाळ कृष्ण देवधर, एम्. ए., सी. आय. ई., अध्यक्ष, महाराष्ट्र प्रांतिक

हरिजनसेवकसंघ, याचेकडून श्रीमंत राजेसाहेबास जें पत्र आलें त्यातील उतारा पुढें दिला आहे.

## महाराष्ट्र प्रांतिक हरिजनसेवकसंघ

पुणें, सेवासदन,
ता. १९ जून १९३५.

श्रीमंत सरकार रघुनाथराव शंकरराव ऊर्फ बाबासाहेब पंतसचिव,
राजा ऑफ भोर, यांसी:—

साष्टांग नमस्कार वि. वि.

आपणास साम्राज्य-सरकारकडून राजा हा बहुमानाचा किताब वंशपरंपरेनें मिळाला याबद्दल भोर संस्थानांतील निरनिराळ्या संस्थातर्फे भोर येथें श्रीरामचौकांत दरबार भरून ता. १८ जून १९३५ रोजीं आपलें अभिनंदन करण्यात आले हें योग्यच झाले. सदर प्रसंगीं पाली हरिजनसेवकसंघातर्फे संस्थानांतील हरिजन प्रजाजनाकडून देण्यात आलेल्या मानपत्राचा आपण स्वीकार केला व वेदोनारायणापासून हरिजनांपर्यंत सर्वांना आपल्या दरबारात आपण समानतेनें वागविले ही गोष्ट भोर संस्थानच्या इतिहासात फार महत्त्वाची गणली जाईल यांत शंका नाहीं. पाली हरिजनसेवकसंघाच्या चालकाना पालीसारख्या गांवीं पांढरपेशा सनातनी म्हणविणाऱ्या वर्गांकडून बहिष्कृत करण्यात आले असतां, त्याच हरिजनसेवकसंघाचें मानपत्र भोर येथील दरबारात आपण स्वीकारून जें मनोधैर्ययुक्त सौजन्य दाखविले व प्रजाजनास अस्पृश्यतानिवारणाचे कामीं जें नवीन वळण लाविले त्यांबद्दल आपलें अभिनंदन करून पाली हरिजनसेवकसंघाच्या चालकाच्या चिकाटीचें व धैर्याचेंहि कौतुक करावें असेंच कोणाहि सुज्ञास वाटेल.

आपण ज्या धोरणानें आबालवृद्धाच्या उन्नतीचें कार्य अंगिकारले आहे त्यात परमेश्वर आपणास उत्तरोत्तर अधिक यश व आयुरारोग्य देवो, अशी जगन्नियंत्या परमेश्वराजवळ प्रार्थना करून मी आमच्या हरिजन मंडळींच्या वतीनें हें अभिनंदन-पत्र पेश करतों.

आपला,
**गोपाळ कृष्ण देवधर,**
एम्. ए., सी. आय. ई.
अध्यक्ष.

**चित्रांक १२०**



मुंबई सरकारचे पोलिटिकल सेक्रेटरी मि. सी. डब्ल्यू. ए. टर्नर यांनीं सन १९२४ सालीं भोरास भेट दिल्यावेळीं घेतलेला फोटो.
खुर्चीवर—१ अ. कृ. गांडेकर; २ मि. टर्नर; ३ मिसेस टर्नर; ४ श्री. राजेसाहेब; ५ श्री. युवराज; ६ रा. ब. सातभाई.

श्रीमंताना 'राजा' पदवी प्राप्त झाल्यावर ता. १३–६–१९३५ रोजीं पुणें येथील रा. ब. हणमंतरामशेट यांनीं आपल्या बंगल्यात ॲट-होम पार्टी दिली. त्या वेळीं रा. ब. हणमंतरामशेट यानीं अभिनंदनपर भाषण केले. त्यास समयोचित उत्तर देऊन श्रीमंत राजेसाहेब यांनीं त्यांचे आभार मानले.

पुढें ता. १६ रोजीं रा. ब. चिमणशेट यानीं चहापार्टी केली. आयुर्वेदाचार्य नानलशास्त्री यांनी ता. २४–६–१९३५ रोजीं व श्री. रा. रा. वासुदेव गोपाळ पुराणीक यानीं २९–६–१९३५ रोजीं थाटाची मेजवानी दिली.

श्रीमंत बाबासाहेब याना ' राजा ' या पदवीबद्दल श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यानी एक चादीचा चहाचा सेट भेट म्हणून दिला.

श्रीमंत राजेसाहेब याना ' राजा ' पदवीबद्दलची सनद ए. जी. जी. मार्फत ता. ६ ऑगस्ट १९३५ रोजीं मिळाली. ती सनद पुढीलप्रमाणें:—

## राजा पदवीची सनद

Government Seal
Crown
SANAD.

To

Meherban Shrimant Raghunathrao Shankarrao
Pant Sachiv of Bhor.
Deccan States.

I hereby confer upon you the title of 'RAJA' as a hereditary distinction.

Willingdon.
Viceroy & Governor-General of India.

Simla,
The 3rd June 1935.

Seal of the
Governor-General of India.
in Council.

श्रीमंत नानासाहेब निंबाळकर फलटणचे अधिपति यानीं श्रीमंत बाबासाहेब व जमखिंडी संस्थानचे अधिपति यांना पुणें येथील वेस्टर्न इंडिया टर्फ क्लबमध्यें ता. २० ऑगस्ट १९३५ रोजीं डिनरपार्टी दिली. या पार्टीस सुमारें

१०० पाहुण्याना बोलाविलें होतें. त्यांत श्रीमंत बाळासाहेब अधिपति मिरज, हिज हायनेस अप्पासाहेब पटवर्धन सांगली, श्रीमंत चीफसाहेब इचलकरंजी व मुंबई सरकारचे बरेच बडे अधिकारी होते. श्रीमंत राजेसाहेब फलटण यांनीं 'राजा' ही पदवी भोरचे अधिपति व जमखिंडीचे अधिपति यांना मिळाल्याबद्दल भाषण करून अभिनंदन केलें तें परिशिष्ट ९ मध्यें दिलें आहे. श्रीमंत राजेसाहेब भोर व जमखिंडी यानीं उत्तरादाखल भाषणें करून राजेसाहेब फलटण यानीं केलेल्या सत्काराबद्दल त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानले.

श्रीमंत बाबासाहेब यांना 'राजा' ही पदवी मिळाल्यानंतर ४ महिन्यांनीं मुंबईचे गव्हर्नर नेक नामदार लॉर्ड ब्रेबोर्न यानीं भोरास ता. १८ माहे ऑक्टोबर १९३५ इसवी रोजीं भेट दिली. त्या वेळीं दरबारात त्यांनीं केलेल्या भाषणांत सुरुवातीस श्रीमंतांचें 'राजा' ही पदवी मिळाल्याबद्दल अभिनंदन केले. ते म्हणाले :

"Let me first of all express the great pleasure I feel in taking this opportunity of expressing in public Lady Brabourne's and my own hearty and sincere congratulations upon your getting the title of 'Raja' from the Government of India, though I had already done so in private. Raja Saheb, it gave me great pleasure when I read your name in the honour's list."

पुढें १९३६ च्या मार्च महिन्यात नुकत्याच बनविलेल्या भोर येथील कायदेमंडळानें खास दरबार भरवून श्रीमंत राजेसाहेब याना 'राजा' पदवी प्राप्त झाल्याबद्दल मानपत्र ता. ३० मार्च १९३६ रोजीं अर्पण केलें.

सन १९३६ च्या जून महिन्यांत श्रीमंत राजेसाहेब मुंबईस गेले असता ठाणें येथील देशमूख संघानें ता. २ जून रोजीं जाहीर समारंभ करून श्रीमंतांचे अभिनंदन केले. या संघाचे उपाध्यक्ष भोर कायदेमंडळाचे सभासद श्री. रा. के. अ. देशमूख यांचे नेतृत्वाखालीं हा समारंभ सरदारगृहांत झाला. त्यानीं संघाचे सर्व सभासदाची श्रीमंत राजेसाहेब याचेबरोबर ओळख करून दिल्यावर संघाचे सेक्रेटरी मि. ए. व्ही. दिघे यांनीं अभिनंदनपर भाषण केले. श्रीमंतांनीं समयोचित शब्दांत संघाचे आभार मानले व संघाच्या सभासदाना 'ॲट-होम' पार्टी दिली.

चित्रांक १२१



भाटघर धरणास व्हाइसरॉयांची भेट.

१ सर लेस्ली विल्सन; २ ने. ना. लॉर्ड आयर्विन, हल्लींचे लॉर्ड हॅलिफॅक्स; ३ लेडी आयर्विन; ४ श्री. राजेसाहेब. [ सं. पा. ६९९

हरिजनसेवकसंघानें, ता. १८ जून १९३५ रोजीं श्रीमंतानीं भोर येथें मानपत्रांचे दरबारांत हरिजनाचें मानपत्र स्वीकारले त्याच्या स्मरणार्थ १८ जून १९३६ हा दिवस वृक्षारोपणदिन म्हणून साजरा केला. या समारंभास भोर दरबारतर्फे सुधागड तालुक्याचे मामलेदार हजर राहिले होते.

श्रीमंत राजेसाहेब याना 'राजा' ही पदवी मिळाल्याचें समजल्यावर लंडनहून लॉर्ड झेटलंड, स्टेट सेक्रेटरी, व सर अर्नेस्ट हॉटसन, मुंबईचे माजी तात्पुरते गव्हर्नर, यानीं पत्रें पाठवून श्रीमंताचे अभिनंदन केले. सर हॉटसन यांचें पत्र खालीं दिले आहे.

**Congratulatory Letter from Sir Earnest Hotson,**
a former Acting Governor of Bombay.

C/o Grindley & Co.,
Sussex Hotel, Castbourne,
19th August 1935.

My Dear Raja Saheb,

I have much pleasure in congratulating you on having secured the Hereditary title of Raja. It must be a very great satisfaction to you to have so notably enhanced the prestige of your State.

It was only the other day that a cutting from *The Times of India* which told of this honour, came into my hands. Had I known of it sooner, I should have written to you at once. We hope that you and all your family are in good health and that your State is prospering.

By now, I suppose you are being accustomed to the new arrangements by which your ancestral connection with the Government of Bombay has been severed, but I am sure your friendly relations with those in Poona have not been impaired by the change.

With all good wishes and kind regards.

Yours sincerely,
**Earnest Hotson.**

## संस्थानचे कारभाऱ्यांस ‘ दिवाण ’ हुद्दयाची प्राप्ति

सन १९२७ सालीं भोर संस्थानचे मुख्य अधिकारी यास कारभारी म्हणण्यात येत असे. ९ तोफांचे कायमचे सलामीचा मान संस्थानला या साली प्राप्त झाल्यावर बाकीच्या मोठ्या संस्थानाच्या दिवाणाप्रमाणे भोर संस्थानचे कारभाऱ्यासहि ‘ दिवाण ’ म्हणण्यास संमति मिळावी, अशाबद्दल श्रीमंत राजेसाहेब यांनीं मुंबई सरकारला विनंति केली. त्याप्रमाणें संस्थानचा दर्जा श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यापासून बराच वाढला आहे व संस्थानची सर्वांगीण प्रगति समाधानकारकपणे होत आहे हें ध्यानीं घेऊन, कारभाऱ्यास ‘दिवाण’ म्हणण्यास सरकारनें ताबडतोब संमति दिली. ही गोष्ट संस्थानचे दर्जाचे वाढीत भर घालण्यास कारणीभूत झाली आहे. तेव्हापासून कारभारी यास ‘ दिवाण ’ म्हणण्यात येतें.

## नवीन अधिकारांची प्राप्ति

श्रीमंत राजेसाहेब गादीवर येण्यापूर्वी संस्थानच्या फौजदारी अधिकारा-वर जीं नियंत्रणे होतीं तीं श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर एक वर्षानंतर ब्रिटिश सरकारनें काढून टाकिली. त्यामुळे संस्थानला दिवाणी व फौजदारी खात्यातील संपूर्ण व अनिर्बंध अधिकार प्राप्त झाले. सन १९३० सालापर्यंत संस्थानच्या बाहेरील दुसऱ्या संस्थानातील इसमानें खुनाचा गुन्हा केला तर संस्थानला त्याची चौकशी पोलिटिकल एजंट याच्या परवानगीशिवाय करता येत नसे. परंतु, सन १९३० सालीं हा प्रतिबंध काढून टाकण्यात आला. तेव्हापासून पोलिटिकल एजंट, ए. जी. जी. व पुढें रेसिडेंट याचे परवानगी-शिवाय, दुसऱ्या संस्थानच्या कोणाहि इसमानें खुनाचा गुन्हा केल्यास त्या गुन्ह्याची चौकशी करून शिक्षा देण्याचा संस्थानास अधिकार मिळाला.

सन १९३२ सालापर्यंत संस्थानात गुन्हा करून पळून जाणाऱ्या गुन्हेगारांचा ब्रिटिश हद्दींत पाठलाग करण्याचा संस्थानच्या पोलिसांस अधिकार नसे. तो त्या सालीं देण्यात आला. ब्रिटिश हद्दींतील गुन्हेगाराचा संस्थानच्या हद्दींत पाठलाग करण्याची ब्रिटिश अंमलदारास मात्र परवानगी असे. ही स्थिति संस्थानचा कमीपणा दर्शविणारी होती. परंतु, संस्थानचें पोलिसखातें ब्रिटिश पोलिसखात्यापेक्षा कार्यक्षमतेच्या दृष्टीनें कमी योग्यतेचें नाहीं अशी खात्री

होऊन वरील सालीं म्हणजे सन १९३२ सालीं ब्रिटिश सरकारनें संस्थानच्या पोलिस अंमलदारास ब्रिटिश हद्दींत पळून जाणाऱ्या गुन्हेगाराचा पाठलाग करण्याचा अधिकार काहीं विशिष्ट प्रतिबंध ठेवून दिला. या अधिकारामुळे संस्थानच्या पोलिसखात्याचे इभ्रतींत भर पडली.

याच सालीं भोर दरबार व बडोदे दरबार यांचे दरम्यान गुन्ह्याची चौकशी करण्याचे कामीं सापडलेला मुद्देमाल ओळखण्याकरिता काही शर्तीवर एकमेकानी एकमेकास मदत देण्याची तजवीज करण्यात आली. अशाच प्रकारची मुंबई इलाख्यातील सर्व जिल्हा-अधिपति व भोर दरबार यांचे दरम्यान एकमेकानीं एकमेकास मदत करण्याची तजवीज सन १९३६ इ. सालीं तीन वर्षांकरिता करण्यात आली.

संस्थानी व ब्रिटिश हद्दींत फौजदारी खटल्यात झालेले दंड वसूल करण्याचे बाबतींत संस्थानी व ब्रिटिश कोर्टें याचे दरम्यान परस्परानी मदत देण्याचें सन १९३३ सालीं ठरले. यामुळे दंड वसुलीचें काम सोपें झालें.

सन १९३६ सालीं भोर संस्थान व मुंबई सरकार याचे दरम्यान नॉन-एक्स्ट्रॅडायटेबल खटल्यात आरोपीवर समन्से बजावण्याचे बाबतींत करार झाला. या कराराप्रमाणे एकमेकाना एकमेकाचे हद्दींत समन्सें बजावितां येतात.

एक्साइज करास पात्र असलेल्या जिनसा चोरून आणणें, चोरून दारू गाळणें वगैरे गुन्हे शोधून काढून त्याची चौकशी करण्याचा अबकारी ॲक्टाच्या ३६, ३७, व ४१ कलमाप्रमाणें अधिकार संस्थानातील हेड कॉन्स्टेबलच्या वरील दर्जाच्या पोलीस अंमलदारास ब्रिटिश सरकारकडून देण्यात आला आहे.

वर सांगितलेले सर्व अधिकार श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यानंतरच संस्थानास मिळालेले आहेत. यांशिवाय संस्थानाधिपतींस अपमानास्पद अशा काहीं गोष्टी रूढ होत्या त्याहि श्रीमंत राजेसाहेबानीं काढून टाकविल्या.

योग्य कारणें दाखवून आपलें नांव सरदाराचे यादीतून कमी करण्या-बद्दल मुंबई सरकारकडे एक यादी पाठविली. मुंबई सरकारास श्रीमंत राजे-साहेबाचें म्हणणें सयुक्तिक वाटून सरदाराचे यादींतून त्याचे नाव सन १९३२ सालीं काढून टाकण्यात आलें.

याशिवाय महायुद्धानंतर हिंदुस्थानच्या राज्यकारभाराच्या नवीन घटनेनुसार जे फेरफार करण्यात आले त्यामुळेंहि संस्थानच्या इभ्रतींत भर पडली. हिंदुस्थानातील सर्व महत्त्वाच्या संस्थानाचा संबंध प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारशीं ठेवण्यात यावा, अशी मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांत शिफारस करण्यांत आली होती. सन १९१९ सालीं दिल्ली येथें संस्थानिकांची जी परिषद झाली त्या परिषदेंत व्हाइसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं वरील शिफारस साम्राज्य-सरकारास मान्य असल्याचें जाहीर केलें. या नवीन धोरणाप्रमाणें प्रथम पंजाब, मद्रास, पश्चिम हिंदुस्थान, मध्यप्रांत व बिहार, ओरिसा यांतील संस्थानांचा संबंध मध्यवर्ति सरकारशीं जोडण्यांत आला. नंतर जेव्हां दक्षिणेंतील संस्थानांची पाळी आली तेव्हा अंतर्गत राज्यकारभाराचे संपूर्ण अधिकार असलेल्या महत्त्वाच्या भोर संस्थानाचा संबंधहि बाकीच्या दक्षिणेंतील संस्थानांबरोबर ता. १ एप्रिल सन १९३३ पासून प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारशीं जोडण्यांत आला. पूर्वी संस्थानचा संबंध मुंबई सरकारशीं होता. त्या वेळीं पुण्याचे कलेक्टरासच संस्थानचे पोलिटिकल एजंट म्हणून अधिकार असे. हिंदुस्थान सरकारशीं संबंध जोडला गेला तेव्हां कोल्हापूरचे रेसिडेंट यानाच दक्षिणेंतील संस्थानांचे एजंट टु दी गव्हर्नर-जनरल नेमण्यांत आलें. पुढें ता. १ एप्रिल सन १९३६ इ. रोजीं जेव्हां नवीन गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट हिंदुस्थानास लागू केला त्याच वेळीं एजंट टु दि गव्हर्नर जनरल या नात्यानें त्यांच्याशीं संस्थानचा हा संबंध न राहिल्यामुळें सदर अधिकाऱ्यास ए. जी. जी. ऐवजीं रेसिडेंट फॉर कोल्हापूर ॲन्ड डेक्कन स्टेटस् असें संबोधण्यात आलें. या वरील फरकामुळेंहि संस्थानचे महत्त्व वाढलें आहे. हल्लीं भोर संस्थान हें पहिल्या वर्गांतील संस्थानांत मोडतें.

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आले त्या वेळीं ज्या भोर संस्थानाची गणना फर्स्टक्लास सरदारात होत असे, त्या संस्थानास श्रीमंत राजेसाहेबांच्या १७ वर्षांच्या कारकीर्दींत संपूर्ण अधिकाराच्या बाबतींत असलेले निर्बंध नाहींसे होऊन नवीन अधिकारांची प्राप्ति होऊन, ९ तोफाचे सलामीचा वंशपरंपरेचा मान, त्याचप्रमाणें 'राजा' ही वंशपरंपरेची पदवी मिळून भोर संस्थानास पहिल्या प्रतीच्या संस्थानाचा दर्जा प्राप्त झाला, ही गोष्ट श्रीमंत राजेसाहेबाच्या उज्ज्वल राज्यकारभाराची, कर्तृत्वशक्तीची व संस्थानहितसंवर्धनाची द्योतक आहे.

---

चित्रांक १२२




नेक नामदार लॉर्ड आयर्विनसाहेब, हल्लींचे लॉर्ड हॅलिफॅक्स, श्रीमंत राजेसाहेबांसमवेत संस्थानच्या गार्ड ऑफ ऑनरची भाटघर येथें पाहणी करीत आहेत.

[ सं. पा. ६११

# प्रकरण १७ वें

# सत्कारसमारंभ

## संस्थानांतील



## व्हाइसरॉय व सरसेनापति यांच्या संस्थानला भेटी



### व्हाइसरॉयसाहेबांना चहापार्टी

भोर संस्थान हें लहान संस्थान असल्यामुळे आजपावेतों जिल्ह्याचे कलेक्टर व इलाखाधिपति याखेरीज बड्या लाटसाहेबाच्या भेटीचा मान भोरला मिळाला नव्हता व पुढेंहि कधीं मिळेल अशी आशा वाटण्यास जागा नव्हती. तथापि, भाटघर येथील हिंदुस्थानातील १ ल्या नंबरचें धरण हें भोरचे हद्दींत भोरपासून सुमारें २ मैलावर असल्यामुळे मुंबई इलाखाधिपति याचे विनंतीवरून तें धरण पाहण्यास नेक नामदार व्हाइसरॉय लार्ड आयर्विनसाहेब हे त्याच्या दक्षिण हिंदुस्थानातील दौऱ्याचे कार्यक्रमाप्रमाणे १ ऑगस्ट १९२६ रोजीं भाटघर येथें आले. नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब याच्या दक्षिणेंतील दौऱ्याचा कार्यक्रम प्रसिद्ध झाल्यावर व ता. १ ऑगस्ट रोजीं ते भाटघर येथें येणार आहेत असें समजल्याबरोबर भाटघर येथें चहापार्टी देण्याचा आपला हेतु श्रीमंत राजेसाहेबानीं मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन याचेमार्फत कळवून तिचा स्वीकार करावा अशी व्हाइसरॉयसाहेबाना विनंति केली. त्या विनंतीला मान्यतादर्शक उत्तर आल्यावर भाटघर येथें पार्टीकरिता एक भव्य शामियाना उभारण्यांत आला. ता. १ ऑगस्ट रोजीं ४-४५ वाजता नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब भाटघर येथें आल्यावर श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज व संस्थानचे कारभारी यानीं त्याचें स्वागत केलें. बरोबर मुंबईचे गव्हर्नर नेक नामदार सर लेस्ली विल्सन हे आले होते. सर्वांना चहापार्टी झाल्यावर श्रीमंत राजेसाहेबाना व्हाइसरॉयसाहेबानीं खासगी भेट दिली. नंतर हारतुरे, अत्तरगुलाब, पानसुपारी, फोटो वगैरे झाल्यावर सर्व पाहुणेमंडळी भाटघर धरणाच्यावरचे बाजूस धरण पाहण्यास गेली. धरण पाहून झाल्यावर व्हाइसरॉयसाहेब पुण्याकडे रवाना झाले.

## हिंदुस्थानचे सरसेनापति यांचें भोरास आगमन

श्रीमंत राजेसाहेब १९३० च्या मे महिन्यांत विलायतेस गेले, त्या वेळीं ते ज्या ‘ व्हाइसरॉय ऑफ इंडिया ’ बोटीनें प्रवास करीत होते त्याच बोटीनें हिंदुस्थानचे भावी सरसेनापति (कमांडर-इन्-चीफ) सर फिलिप डब्ल्यू. चेटवुड हे विलायतेस जात होते. त्या प्रवासात श्रीमंत राजेसाहेब याची त्याजबरोबर ओळख झाली. त्याच वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं त्याच्याजवळ भोरास एकदा भेट द्यावी, अशी विनंति केली. त्यांनीं हिंदुस्थानात परत आल्यावर दक्षिण हिंदुस्थानातील आपल्या दौऱ्याचे वेळीं भोरास येण्याचें आश्वासन दिले. पुढे १९३१ च्या ऑगस्टमध्यें सरसेनापति यानीं दक्षिणेंत दौरा काढण्याचें ठरविले व आपल्या कार्यक्रमांत २ ऑगस्ट रोजीं भोरास येण्याचें जाहीर केलें. ठरल्याप्रमाणें सरसेनापतिसाहेब हे भोरास वरील तारखेस १–३० वाजता आले. त्याच्या भेटी-संबंधींची व्यवस्था पाहण्यास पोलिटिकल एजंट मि. ए. एम्. मॅकमिलन हे अगोदर २ तास आले होते. सर सेनापति याच्याबरोबर त्याचे मिलिटरी सेक्रेटरी व एक ए. डी. सी. होते. श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज व पोलिटिकल एजंट यानीं सन्मान्य पाहुण्याचें रामबागेत मोठ्या आदरानें स्वागत केलें. त्या वेळीं दिवाण रा. ब. हुल्याळ, माजी दिवाण श्रीधर आबाजी सातभाई वगैरे मंडळी हजर होती. सरसेनापतिसाहेबांना आगमनार्थ १७ तोफाची सलामी देण्यात आली. परसांतील बंगल्यात लंच झाल्यावर वाड्यात त्याच्या स्वागतार्थ दरबार भर-विण्यांत आला. दरबारात सर्व पाहुणे स्थानापन्न झाल्यावर सर्व अधिकारी-वर्गाची सरसेनापतींना ओळख करून देण्यात आली. हारतुरे, अत्तरगुलाब, पानसुपारी, फोटो वगैरे झाल्यावर नवीन पुलाचे चालू झालेले काम दाखविण्यात आलें. नंतर सरसेनापतिसाहेब भाटघर धरण पाहून पुण्यास गेले. भोर संस्थान हें लहान संस्थान असल्यामुळें यापूर्वी सरसेनापतीसारख्या बड्या अधिकाऱ्याच्या भेटीचा योग कधीच आला नव्हता, तो बहुमान सर फिलिप चेटवुड यांच्या आगमनानें भोरला प्राप्त झाला.

## मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यांचें भोरास आगमन

मुंबईचे गव्हर्नर नेक नामदार सर फ्रेडरिक साइक्स याना भोरास एकदा भेट देण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांनीं विनंति केली. त्या विनंतीस मान देऊन

चित्रांक १२३



माटघर धरणाशेजारी भोरची इन्फन्ट्री; नेक नामदार व्हाइसरॉयसाहेबांना सलामी देण्यापूर्वी ( १९२६ ).

नेक नामदारसाहेब हे लेडी साइक्स यांचेसह २६ एप्रिल १९२९ रोजीं महाबळेश्वराहून भोरास आले. रामबागेंत श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज, पोलिटिकल एजंट मि. एच्. आर. गूल्ड व संस्थानचे अधिकारी यानीं त्याचे स्वागत केले. तेथें थोडी विश्राति घेतल्यावर सर फ्रेडरिक व लेडी साइक्स यांना शहरांतून मिरवीत मिरवीत राजवाड्यांत आणलें. वाड्याचे दरवाज्यात श्रीमंत राजेसाहेब व श्रीमंत युवराज यांनीं स्वागत करून त्यांचे आगमनार्थ शृंगारलेल्या श्रीराम-मंडपात त्यास नेण्यांत आलें. तेथें दरबार भरविण्यांत आला होता. आरंभी श्रीमंत राजेसाहेब यानीं त्याच्या स्वागतपर भाषण केले. त्यात त्यानी गव्हर्नरसाहेबाचे **आगमनाचे स्मरणार्थ भोरचे नागरिकांना निवडणुकीचे हक्क देऊन म्युनिसिपालिटीचे सभासदांपैकीं निम्मे लोकनियुक्त सभासद ठेवण्याचें जाहीर केलें.** नंतर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष यानी मानपत्र वाचून दाखवून तें रौप्य-करंडकातून नेक नामदारसाहेब याना अर्पण केले. श्रीमंताचे भाषणास व म्युनिसिपालिटीचे मानपत्रास उद्देशून नेक नामदारसाहेब यानीं जें भाषण केलें त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे:—

"I must thank you also, Mr President and Councillors of the Bhor Municipality, for the address of welcome which you have presented to us, and express the pleasure which Lady Sykes and I feel at meeting those who are entrusted with the care of the health and welfare of this town. As I remarked just now, we had already heard much of the consistent efforts of your ruler, Shrimant Pant Saheb, to place the administration of his State on model lines, and of the many ways in which his laudable ambitions have been realised during the six years of his rule. It is but recently that his zeal for the public welfare has received special recognition from His Majesty the King-Emperor in the conferment of a dynastic salute of 9 guns. And I am very glad that my presence here today has been marked by a further step in the forward policy which he has set before himself in encouraging the growth of local self-government in the State. You have heard the announcement of the Pant Saheb that an elective principle will be introduced into the constitution of this

Municipality for the first time. I congratulate both him and you that this reform has been found to be justified by the manner in which this Municipal Board has been fulfilling its obligations in the past, and I sincerely trust that the right of election now conferred will be used entirely for the good of this town and its inhabitants. At the same time, if I may offer a word of advice, I would remind you that the right of election is not an end in itself, but a means to an end, and that its test lies in the manner in which it is used. The exercise of the franchise is not to be regarded as a way of gratifying personal likes and dislikes, or of satisfying personal ambitions. It throws on each elector the responsibility of judging what is best for the community as a whole, and unless he regards his vote as having such a meaning, and makes a conscientious effort to decide how best to use it for the good of his fellow citizens, he will fail to realise the value of what has been given to him. I hope that, just as in other ways you have been endeavouring,with the encouragement and asssitance of your ruler, to make this town a model of municipal administration, so in the matter of using their vote the electors will fully justify the anticipations with which it has been conferred on them,"

दरबार संपल्यावर नेक नामदारसाहेबानीं स्काउटचे खेळ पाहिले व हायस्कूलला भेट दिली. तेथें मुलांचीं संभाषणें वगैरे झाल्यावर लेडी साइक्स यांनीं मिठाई व बक्षिसें वाटली. शाळेतून नेक नामदारसाहेबांना श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालयांत नेण्यात आले. तेथें श्रीमंत राजेसाहेब यानीं थोडक्यात भाषण करून नेक नामदारसाहेबाना कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव याच्या तैलचित्राचे अनावरण करण्याची विनंति केली. नेक नामदार यानीं चित्राचें अनावरण करून समयोचित भाषण केले. तें मागें देण्यात आलें आहे.

सायंकाळीं नदीकिनारीं दारूकाम सोडण्यात आले, तें पाहण्यास पाहुण्याना नेण्यात आले. रात्रीं नेक नामदार व लेडी साइक्स याना बागेंतील बंगल्यांत

थाटाची मेजवानी देण्यांत आली. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं टोस्टचें भाषण केलें व त्यास समयोचित असें नेक नामदारसाहेब यानीं उत्तर दिले. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे.

"I had often heard of the regard and the picturesque beauty of the Ghats in the midst of which your State lies, and all that I have seen to-day has more than fulfilled my expectations. As I motored down the road from Mahableshwar to Bhor and gazed at the wild and mountainous country which met my view, I could not but be reminded of the days when it was the scene of the exploits of Shivaji who founded the Maratha Empire, and how, as his early conquests came to be consolidated, your illustrious ancestor, Shankaraji Narayan, distinguished himself and was appointed 'Pant Sachiv', one of the eight hereditary Ministers of the State. From his high office and out of the rewards for his services has arisen the Bhor State as we know it to-day.

It is over a century now since the commencement of relations between the British Government and Bhor, and I am happy to say that these relations have been uniformly of a cordial nature I welcome the opportunity of acknowledging the loyalty and goodwill of your State and yourself to the King Emperor and the British Government, and its manifestations during the Great War. It is true that this is a matter of the past, but in the years of peace following the close of the war you have, I am informed, continued to display a similar readiness to help my Government both with your personal assistance and the resources of your State. I recall especially the matter of the Bhatghar Dam–one of the biggest irrigation works of its kind in the world– which, thanks to your public spirit and co-operation, has removed the threat of scarcity and famine from thousands of cultivators on this side of the Presidency. This great work I hope to see tomorrow."

ता. २७ रोजी सकाळीं भाटघर धरण पाहून नेक नामदार व लेडी साइक्स याच्या स्वाऱ्या महाबळेश्वरास परत गेल्या.

## लेप्टेनंट-कर्नल एच्. विल्बरफोर्स-बेल यांची भोरास भेट

ले.-क. एच्. विल्बरफोर्स-बेल, ए. जी. जी., कोल्हापूर, यांची दुसरीकडे बदली झाली. नवीन जागेचा चार्ज घेण्यास जाण्यापूर्वी त्यानीं मिसेस बेल याचेसह ता. १७ ऑगस्ट १९३४ रोजीं भोराला पुन्हा भेट दिली. ए. जी. जी. मिसेस् बेल यांच्यासह ४ वाजता भोरास आले. त्यांचें श्रीमंतानीं स्वागत करून बागेंतील बंगल्यांत चहा वगैरे झाल्यावर राजवाड्यांत दरबार भरविण्यांत आला. श्रीमंतांनी प्रथम स्वागताचें भाषण केलें. त्यांत भोर येथें हायस्कूलची पहिली इमारत मुलाची संख्या वाढत असल्यामुळें पुरत नसल्यानें हायस्कूलकरितां नवीन इमारत बांधण्याचा आपला मनोदय असल्याचें सांगून मे. विल्बरफोर्स-बेल **यांच्या या भेटीच्या स्मरणार्थ सदर शाळेच्या इमारतीकरितां आपल्या खाजगी उत्पन्नांतून रक्कम रु. २०,००० देण्याचें जाहीर केलें.** यावर ए. जी. जी. यानीं भाषण केलें, तें फार चागल्या प्रकारचें झालें. त्यात त्यांनी श्रीमंताच्या राज्यकारभारातील अनेक सुधारणांचा व त्यांच्या नरेंद्रमंडळांतील कामगिरीबद्दलचा गौरवपूर्वक उल्लेख केला असल्यानें तो महत्त्वाचा मार्ग त्या त्या विषयाखालीं देण्यात आला आहे. येथें फक्त जरूर तेवढाच भाग दिला आहे.

" You have referred also to certain schemes which you have in hand for the benefit of your subjects. Among these I will briefly refer to your decision to construct a High School with its playgrounds in the vicinity of the Laxmibai Bridge. It will give me a great pleasure to have my name associated with Bhor in this way,

The fact that you have decided to assist it materially from your own resources is an indication of the interest with which the idea will be pursued.

You have had on the whole a successful year upon which I congratulate you, and I feel sure that each succeeding year will show progress in your state. "

हा समारंभ झाल्यावर मे. ए. जी. जी. साहेब हे भाटघर धरण पाहून पुण्यास गेले.

चित्रांक १२४



हिंदुस्थानचे सर-सेनापति सर फिलिप चेटवुड यांची भोरास भेट.

खुर्चीवर—१ मि. ए. एम्. मॅकमिलन, पो. ए.; २ हि. ए. जनरल सर फिलिप चेटवूड; ३ रा. कु. रावसाहेब; ४ श्रीमंत राजेसाहेब; ५ रा. कु. बापूसाहेब; ६ श्री. युवराजसाहेब.

## ले.-क. जे. सी. टेट् यांचें भोरास आगमन

ले.-क. विल्बरफोर्स-बेल यांचेमागून आलेले नवीन ए. जी. जी. ले.-क. जे. सी. टेट् हे कोल्हापुरास येऊन जागेचा चार्ज घेतल्यावर ता. २ जानेवारी सन १९३५ रोजीं भोरास आले. भेटीची तारीख ठरून आल्यावर संस्थानच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें भोरास होणाऱ्या भेटीचा कार्यक्रम तयार करून ए. जी. जी. याचेकडे पसंतीकरिता पाठविण्यात आला. आजपावेतों भोरास कोणीहि सरकारी अधिकारी म्हणजे गव्हर्नर, कलेक्टर, कमिशनर, अगर पोलिटिकल सेक्रेटरी ह्यापैकीं कोणीहि भोरास आले तरी, ते भोरास आल्याबरोबर रामबागेंत श्रीमंत राजेसाहेब व दरबारचे अधिकारी यानीं त्याचें प्रथम स्वागत करावयाचें व नंतर दरबारकरिता राजवाडयात घेऊन जावयाचें अशी प्रथमपासून पद्धत होती; व याच पद्धतीस अनुसरून भेटीचा कार्यक्रम ए. जी. जी. याचेकडे पाठविण्यांत आला. पहिले ए. जी. जी. ले.-क. विल्बरफोर्स-बेल यानीं भोरास दोन वेळ भेट दिली. त्या वेळीं हीच पद्धति स्वीकारण्यात आली होती. तथापि ले.-क. टेट् याच्याकडून नवीन कार्यक्रमासह पत्र आलें. हा वेळपावेतों मुंबई इलाखाधिपतींचें स्वागत करण्याची जी पद्धति होती ती बदलण्यात येऊन नवीन पद्धति सुरू झाली. ऑफिशिअल व्हिजिट व रिटर्न व्हिजिट याच वेळीं सुरू केली. ठरल्याप्रमाणें ता. २ जानेवारी सन १९३४ इ. रोजीं ए. जी. जी. भोरास आले. रामबागेंत आल्याबरोबर मे. ए. जी. जीं. ना १३ तोफाची सलामी देण्यात आली. जनरल सॅल्यूट व गार्ड ऑफ ऑनरची सलामी दिल्यावर ए. जी. जीं. नीं श्रीमंत राजेसाहेब यांचेसह गार्ड ऑफ ऑनरची पाहणी केली. श्रीमंत राजेसाहेब यांनीं त्यांना श्रीमंत युवराज व संस्थानचे प्रमुख अधिकारी यांची ओळख करून दिली. नंतर ए. जी. जीं. नीं श्रीमंत राजेसाहेब व श्रीमंत युवराजसाहेब याना हार घातले व पानसुपारी दिली. कॅप्टन ग्रीनवे, ए. जी. जीं. चे अंडर सेक्रेटरी, यानीं दरबारचे मानकरी व अधिकारी याना पानसुपारी दिली. श्रीमंत राजेसाहेब ए. जी. जीं. चा निरोप घेऊन राजवाड्यात परत आले.

# भेटी परतभेटी

दुपारीं २–१५ वाजतां कॅ. ग्रीनवे हे मे. ए. जी. जीं.च्या ऑफिशिअल भेटीकरितां श्रीमंत राजेसाहेब यांना नेण्यास राजवाड्यांत आले व श्रीमंत राजेसाहेब यांना चार घोड्यांचे रथातून ए. जी. जीं. च्या निवासस्थानीं घेऊन गेले. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब याना ९ तोफांची व गार्ड ऑफ ऑनरची सलामी देण्यांत आली. संस्थानगीत वाजविण्यात आलें. रथांतून उतरल्यावर मे. ए. जी. जी. यांनीं त्यांचें स्वागत करून त्यांना बंगल्यात नेलें व आपले उजवे बाजूस बसविलें. दरबारचे मानकरी व अधिकारी यांना उजव्या बाजूस बसविण्यांत आलें व ए. जी. जीं. नीं श्रीमंत राजेसाहेब व श्रीमंत युवराजसाहेब याना पुष्पहार, पानसुपारी व अत्तरगुलाब दिला. या वेळीं सर्व मंडळी उभी राहिली होती. ए. जी. जीं. चे अधिकारी यांनीं श्रीमंत राजेसाहेब यांचे मानकरी व अधिकारी यांना पानसुपारी व अत्तरगुलाब दिला. श्रीमंत राजेसाहेब परत राजवाड्यांत जाण्यास निघाले त्या वेळीं ते येतांना झालेले सर्व समारंभ म्हणजे ९ तोफांची सलामी, गार्ड ऑफ ऑनर, संस्थानगीत-वादन वगैरे करण्यांत आलें.

नंतर ३–१५ वाजतां रावबहादुर दिवाणसाहेब, व श्रीमंताचे नातेवाईक श्रीमंत अप्पासाहेब गांडेकर हे श्रीमंत राजेसाहेब यांच्या परतभेटीकरितां मे. ए. जी. जी. साहेब याना घेऊन येण्यास रामबागेंत गेले. ए. जी. जी. साहेब व दिवाणसाहेब एका गाडींत व श्रीमंत गाडेकर व सीनिअर ऑफिसर हे दुसऱ्या गाडींत असे बसून राजवाड्यांत आले. वाड्याचे दरवाज्यांत श्रीमंत युवराज यांनीं त्यांचें स्वागत केलें. १३ तोफांची सलामी व गार्ड ऑफ ऑनरची व जनरल सॅल्यूटची सलामी देण्यांत आली. श्रीमंत युवराज ए. जी. जीं.ना दिवाणखान्यांत घेऊन गेले. तेथें राजेसाहेबांनीं स्वागत करून मध्यभागीं असलेल्या कोचावर त्यांना उजवे बाजूस बसविलें. ए. जी. जीं.चे सीनिअर ऑफिसर याना उजवे बाजूस बसविण्यांत आलें. श्रीमंत युवराज, दरबारचे मानकरी व अधिकारी याना डावे बाजूस बसविण्यांत आलें. भेटीच्या रिवाजाप्रमाणें कुशल प्रश्नोत्तरें झाल्यावर श्रीमंत राजेसाहेब यानीं ए. जी. जीं. ना हार घातला व अत्तरगुलाब दिलें व

चित्रांक १२५



दक्षिणेंतील संस्थानांचे ए. जी. जी. ले.-क. एच्. विल्बरफोर्स-बेल यांच्या भेटीच्या वेळचा फोटो ( सन १९३३ ).
खुर्चीवरः—४ ले. क. विल्बरफोर्स-बेल; ५ श्रीमंत राजेसाहेब; ६ मिसेस् विल्बरफोर्स-बेल. [ सं. पा. ७०४

दिवाणसाहेब यानीं ए. जी. जीं. चे सीनियर ऑफिसरना अत्तरगुलाब, गुच्छ वगैरे दिले. या वेळीं हजर असलेली सर्व मंडळी उभी राहिली होती.

नंतर श्रीमंत राजेसाहेब यानीं ए. जी. जीं. ना श्रीमंत युवराज व रा. ब. दिवाण यांची ओळख करून दिली, व रा. ब. दिवाण यानीं दरबारचे मानकरी व अधिकारी यांची ए. जी. जीं. ना ओळख करून दिली. ए. जी. जी. परत जातांना ते येतेवेळीं करण्यात आलेले सर्व विधी म्हणजे गार्ड ऑफ ऑनर, १३ तोफांची व जनरल सॅल्यूटची सलामी इत्यादि करण्यांत आले. भोरास ए. जी. जी. अगर रेसिडेण्ट यांची ऑफिशिअल भेट होईल तेव्हां अशा प्रकारें शिष्टाचार पाळावा असें ठरलें.

## नवीन हायस्कूलची कोनशिला स्थापना

याच दिवशीं सायंकाळीं ५ वाजतां नवीन हायस्कूलच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ ए. जी. जी. यांचे हस्तें करण्यात आला. बरोबर ५ वाजतां ए. जी. जी. मिसेस टेट्, कॅप्टन ग्रीनवे यांचेसह लक्ष्मीबाईपुलाचे उत्तरेस शाळेकरिता योजिलेल्या ठिकाणीं आले. तेथें भव्य मंडप उभारण्यात आला होता. श्रीमंत राजेसाहेब यानीं त्याचें स्वागत केलें. सर्वजण स्थानापन्न झाल्यावर प्रथम श्रीमंत राजेसाहेब यानीं भाषण केले. मि. व्ही. पी. कान्हेरे एंजीनिअर व मि. व्ही. के. सामक, शाळाधिकारी, याची दिवाणसाहेब यांनीं ओळख करून दिल्यावर शाळाधिकारी यानीं औपचारिक भाषण करून हायस्कूलची कोनशिला बसविण्याची विनंति केली. ए. जी. जी., मिसेस टेट्, श्रीमंत राजेसाहेब वगैरे मंडळी कोनशिला बसविण्याच्या जागीं आली. शाळेचे प्लॅन्स व डिझाइन्स पाहून ए. जी. जी. नीं कोनशिला बसविली. शाळेचे प्रांगणांत ए. जी. जी., मिसेस टेट्, व श्रीमंत राजेसाहेब याच्या हस्तें या भेटीच्या स्मरणार्थ झाडें लावण्यात आलीं. नंतर सर्वजण स्वस्थानी परत आल्यावर ए. जी. जी. यानी भाषण केले.

हा समारंभ आटोपल्यावर स्काउटचे खेळ दाखविण्यात आल्यावर ए. जी. जी. रामबागेंत परत गेले. रात्रीं रामबागेंत खासगी डिनर झालें.

दुसरे दिवशीं सकाळीं परेड ग्राउंडवर पोलीस, स्वार-शिबंदीची परेड झाली. ९–३० वाजतां भोर हायस्कूलला ए. जी. जीं. नीं भेट दिली.

नेहमींच्या पद्धतीप्रमाणें शाळेंतील कार्यक्रम स्वागतपर पद्ये, मुलाचीं संभाषणें व शाळाधिकारी याचें शिक्षणखात्याचा रिपोर्ट वाचन झाल्यानंतर ए. जी. जी. यानीं थोडेंसें भाषण केलें. नंतर मिसेस टेट यांच्या हस्तें मुलांना बक्षिसें व मेवामिठाई वाटण्यांत आली.

शाळेंतील समारंभानंतर ए. जी. जीं. नीं भोरचे धर्मार्थ दवाखान्यास भेट दिली. तेथील सुव्यवस्था पाहून त्यानीं समाधान व्यक्त केलें. दवाखाना पाहून झाल्यानंतर त्यांनीं कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालयास भेट दिली. वाचनालयाचे सेक्रेटरींनीं स्वागत करून सर्व लायब्ररी दाखविली. वाचनालयाचे दिवाणखान्यांत सर्व आपआपल्या स्थानीं विराजमान झाल्यावर सेक्रेटरींनीं वाचनालयाचा अहवाल वाचून दाखविला. वाचनालयाची प्रगति पाहून ए. जी. जीं. नीं संतोष व्यक्त केला. नंतर हारतुरे होऊन समारंभ समाप्त झाला. ए. जी. जी. रामबागेत परत गेले, व श्रीमंत राजेसाहेब राजवाड्यात परत आले.

दुपारीं चार वाजता मानपत्राचा दरबार राजवाड्यातील श्रीराम मंडपात भरविण्यांत आला. दरबाराकरिता रा. ब. दिवाणसाहेब हे ए. जी. जी. व मिसेस् टेट् यांना घेऊन आले. राजवाड्याचे दरवाज्यांत श्रीमंत राजेसाहेब यांनीं त्यांचें स्वागत करून त्यांना श्रीराम-मंडपांत घेऊन आले. सर्व स्थानापन्न झाल्यावर राजेसाहेब यांनीं समयोचित भाषण करून त्यांचें स्वागत केलें. श्रीमंत राजेसाहेब यांनीं भोर म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षांची ए. जी. जीं. ना ओळख करून दिल्यावर त्यांनीं मानपत्र वाचून तें ए. जी जीं. ना रौप्य-करंडकांतून अर्पण केलें व सर्व सभासदांची त्यांना ओळख करून दिली. ए. जी. जीं. नीं श्रीमंत राजेसाहेब यांचे भाषणास व म्युनिसिपालिटीचे मान-पत्रास एकत्र उत्तर दिलें.

ए. जी. जीं. चें उत्तरादाखल भाषण झाल्यावर म्युनिसिपालिटीचे अध्यक्षानीं ए. जी. जीं.ना हारतुरे पानसुपारी अर्पण केली व दरबार समाप्त झाला.

नंतर राजवाड्यांतील पदार्थ-संग्रहालय व जुनीं हत्यारे पाहून ए. जी. जी., मिसेस टेट, श्रीमंत राजेसाहेब व श्रीमंत युवराजसाहेब याचेसह भाटघर येथील लॉइड धरण पाहण्यास गेले. असिस्टंट एंजिनिअर मि. माजगांवकर

चित्रांक १२६



दक्षिणेंतील संस्थानांचे ए. जी. जी. ले.-क. जे. सी. टेट हे राजा रघुनाथराव हायस्कूलची कोनशिला बसवीत असतांना.

[ सं. पा. ७०७

यांनीं त्यांना धरण दाखविलें. धरणाचे उत्तर टोंकाचे मेमोरिअल बिल्डिंगमध्यें चहापान झाल्यावर सर्वजण भोरास परत आले.

रात्रीं ८–३० वाजतां बागेंतील बंगल्यांत खाना देण्यांत आला. नदीकांठीं दारुकाम ९–३० वाजतां सोडण्यांत आलें. तें पाहून झाल्यावर मे. ए. जी. जी. व मिसेस टेट रामबागेंत परत गेले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं भोर शहरानजीकचे परेड ग्राउंडवर स्वार-शिबंदी पोलीस-फोर्सचे खेळ ए. जी. जीं. ना करून दाखविण्यात आले. यशस्वी व प्रवीण खेळाडूंना पदके व पारितोषिके ए. जी. जीं. च्या हस्तें देण्यांत आलीं. नंतर परत रामबागेंत जाऊन साहेबबहादुरांनीं ब्रेकफास्ट घेतल्यावर ९–४५ वाजता मे. ए. जी. जी. व मिसेस टेट् याना श्रीमंत राजेसाहेब यानीं हार घातला व पानसुपारी दिली व रा. ब. दिवाणसाहेब यानीं स्टाफ ऑफिसर्स कॅ. ग्रीनवे याना हार घातला व पानसुपारी दिली व सर्वांना सन्मानपूर्वक निरोप दिला. त्या वेळीं १३ तोफांची गार्ड ऑफ ऑनरची व जनरल सॅल्यूटची सलामी देण्यांत आली.

## लेफ्टेनंट-कर्नल जे. डी ला हे गॉर्डन, ओ. बी. इ., एम्. सी., यांची भोरास भेट

ले.-कर्नल जे. गॉर्डन, दक्षिणेंतील संस्थानचे ए. जी. जी., यांनीं अंडर-सेक्रेटरी लेफ्टेनंट ए. आर. सी. के. ग्रीनवे यांचेसह ता. २२ माहे एप्रिल १९३६ इ. रोजीं भोरास भेट दिली. ता. २२ रोजीं सकाळीं रेल्वेनें ते पुणें स्टेशनवर आले. तेथें त्यांचें रावबहादुर दिवाण व दरबार वकील रा. आर. के. देशपांडे यांनीं स्वागत केलें. पुणें येथील लक्ष्मीविलास बंगल्यांत चहा घेऊन ए. जी. जी. पुण्याहून निघून सुमारें ८–३० वाजतां भोरास आले. भोर येथें रामबाग बंगल्यांत ए. जी. जीं. चें श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वागत केलें. ले.-क. टेट् यांच्या वेळच्याप्रमाणेंच ऑफिशिअल भेटी परतभेटीचा कार्यक्रम झाला. ५ वाजता ले.-क. ए. जी. जी. हे भोर टेनिस क्लबावर टेनिस खेळण्यास गेले होते.

ता. २३ एप्रिल रोजीं सकाळीं परेड ग्राउंडवर स्वार, शिबंदी, पोलिस यांचे खेळ झाले. १०–२५ वाजतां श्रीराम-मंडपांत दरबार भरविण्यांत आला.

मे. ए. जी. जी. राजवाड्याजवळ आल्यावर दरवाज्यांत श्रीमंत राजेसाहेब व श्रीमंत युवराज यानीं त्यांचें स्वागत करून त्यास श्रीराम-मंडपांत नेलें. त्यांचे आगमनाप्रीत्यर्थ श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वागतपर भाषण केलें. श्रीमंत राजेसाहेबांनीं म्युनिसिपालिटीचे अध्यक्षांची ए. जी. जीं.ना ओळख करून दिल्यावर अध्यक्षांनीं स्थानिक स्वराज्यसंस्थेतर्फे मानपत्र वाचून दाखवून अर्पण केलें. मानपत्रांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे.

**Address Presented by Bhor Municipality to the A. G. G.**

" Sir, the history of the progress of this institution synchronises with the progressive rule of our beloved ruler Shrimant Raja Saheb, who, very soon after his accession in 1922, reconstituted this institution by applying the District Municipal Act in this State and introducing the principle of appointing seven non-official members upon its Board of 16 members. To enable the body to execute its responsibilities, Shrimant Raja Saheb was besides pleased to favour it with an annual grant of Rs. 5,000. The Municipal Committee having proved itself worthy of the trust reposed in it, Shrimant Raja Saheb thereafter bestowed upon the residents of the town in 1929 the invaluable right of electing one half of its councillors upon the Municipal Body.

It is aptly said, Sir, that Local Self-Government institutions supply the necessary training-ground for people to be initiated in the art of governing their own selves. Our ruler of progressive ideas has therefore established representative institutions like the Taluka Local Boards and the Legislative Council. And, in furtherance of his benevolent policy of associating the people with the administration of the State, he was pleased to bestow further upon the Municipal Committee and the Local Boards the right to elect and send one of their non-official members to the Legislative Council of the State.

## भोर म्युनिसिपालिटीनें केलेल्या सुधारणा

We now come a little to what we have achieved in the domain of our proper Municipal functions. The population

चित्रांक १३९



श्रीमंत राजेसाहेबांनीं मुंबईचे गव्हर्नर ने. ना. सर लेस्ली विल्सन यांना पुणें येथील लक्ष्मीविलास बंगल्यांत दिलेल्या पार्टीच्या वेळचा फोटो.
खुर्चीवर—३ सर अर्नेस्ट हॉटसन; ४ श्री. राजेसाहेब, औंध; ६ मि. न्यू; ८ श्री. राजेसाहेब, भोर; ९ ने. ना. सर लेस्ली विल्सन; १० लेडी विल्सन;
११ श्री. युवराज; १२ श्री. राजेसाहेब, फलटण; १४ श्री. भास्करराव जाधव; १५ सरदार मुजुमदार; १६ रा. ब. अंजनगांवकर. [सं. पा. ७६२

व इतर बरेच सभ्य गृहस्थ या समारंभास हजर राहिले होते. प्रथमतः या संस्थेंतील वैद्य रा. आपटे व आयुर्वेदाचार्य नानलशास्त्री यांनीं स्वागतपर भाषणें केलीं. त्यात त्यांनीं सदर संस्थेचा मागील ५ वर्षांचा अहवाल निवेदन केला. त्यानंतर श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांनीं आयुर्वेदिक औषधोपचारपद्धतीची महति सागून श्रीमंत राजेसाहेबाना इमारतीचें उद्‌घाटन करण्याची विनंति केली. श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून संस्थेच्या विश्वस्तमंडळाचे आभार मानून सदर लोकोपयोगी कार्यास मदत म्हणून रु. ७००० ची देणगी जाहीर केली व आयुर्वेदिक औषधोपचारपद्धतीची महती सागून इमारत उघडल्याचे जाहीर केलें. या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं जें भाषण केलें तें बरेंच विस्तृत असल्यामुळें परिशिष्ट १२ त दिले आहे.

शेवटीं रा. ब. हणमंतरामशेट यानीं श्रीमंत राजेसाहेबाचे व इतर सर्वांचे आभार मानल्यावर हा समारंभ समाप्त झाला.

## कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांच्या तैलचित्राचें अनावरण

श्रीमंत राजेसाहेब याच्या मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांच्या तैलचित्राचें अनावरण पुणें येथील शेट ताराचंद रामनाथ आयुर्वेदिक धर्मार्थ रुग्णालयात मिरज संस्थानचे अधिपति श्रीमंत सर बाळासाहेब पटवर्धन याच्या हस्तें ता. १७ जुलै १९३२ रोजीं झाले. या समारंभाकरिता पुण्यातील बरेच प्रमुख गृहस्थ आले होते. प्रथमतः रुग्णालयाचा सप्तम-वार्षिक वृत्तान्त वाचून दाखविण्यात आला. यानंतर श्रीमंत राजेसाहेब यानीं पुढील भाषण केलें.

### श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव याचें भाषण

" आज आपण ज्या ठिकाणी जमलों आहों, त्या या धर्मार्थ आयुर्वेदीय हॉस्पिटलचा प्रवेशसमारंभ ता. १५-११-१९३१ रोजीं झाला. या वेळी मीं माझें या आयुर्वेदाबद्दलचें काय मत आहे तें विस्तारपूर्वक सागितलेंच आहे. म्हणून आयुर्वेदाच्या श्रेष्ठत्वासंबंधीं आज मला विशेष कांहीं सागावयाचें नाहीं.

आपल्या आर्यवैद्यकावर माझा पहिल्यापासूनच विश्वास आहे व तो जास्त होण्याचें कारण, नुकताच मला जो अनुभव झाला, तो होय. सुमारे एक वर्षापूर्वी भोरास बारीक तापानें व खोकल्यानें माझी प्रकृति बिघडली. प्रथम तेथेंच डॉक्टरचें औषध घेतलें, परंतु ताप राहीना; म्हणून मुंबईस जाऊन

तेथील नामांकित डॉक्टरांनाहि प्रकृति दाखविली. परंतु उपयोग झाला नाहीं. ताप १०३-१०४।। डिग्रीपर्यंत येऊं लागला. वैद्य नानलशास्त्री यांनीं माझ्या आजाराचें निदान करून योग्य औषधाची योजना केल्यामुळें माझी प्रकृति इतपत सुधारली हें येथें सांगण्यास मला आनंद वाटत आहे व या त्यांच्या बहुमोल कामगिरीबद्दल अल्पसा मोबदला म्हणून दोन हजार रुपये आम्हीं त्याना देण्याचें योजिले आहे.

सद्गृहस्थहो, या संस्थेची उपयुक्तता लक्षात घेऊन आम्हीं पूर्वींच या संस्थेस सात हजार रुपये देणगीदाखल दिले. त्या वेळीं या इमारतीच्या एखादे विभागास आमच्या घराण्यांतील कोणाचें तरी नांव द्यावे अशी संस्थेच्या चालकांपैकीं काहींची इच्छा असल्याचें त्यांच्याकडून आम्हांस कळल्यावरून आम्हास ती कल्पना पटली व आमच्या परमपूज्य मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचें एका विभागास नांव देऊन त्यांच्या नांवानें दोन रुग्णशय्या ठेवाव्या असें आम्हीं संस्थेच्या व्यवस्थापकांना कळविलें व त्यांनीं तत्काल आमची विनंति मान्य केली त्याबद्दल आम्ही व्यवस्थापकांचे फार आभारी आहों. पूर्वीं आम्हीं ७००० रुपये दिले आहेतच. याशिवाय आणखी ५००० च्या प्रॉमिसरी नोटा संस्थेस देण्याचें ठरवून मुद्दल खर्च न करतां नोटांच्या व्याजातून रुग्णशय्यांचा वार्षिक खर्च चालवावा व भोर संस्थानांतील रोगी या हॉस्पिटलांत आल्यास त्यांना ताबडतोब यात घेण्यांत यावें अशी आमची इच्छा असल्याचें व्यवस्थापकाना कळविलें व हीहि आमची विनंति त्यांनीं मान्य केली, याबद्दल आम्हांस अत्यंत आनंद वाटत आहे व आमच्या संकल्पाप्रमाणें आम्ही संस्थेच्या स्वाधीन पांच हजारांच्या प्रॉमिसरी नोटा करणार आहोंत.

या विभागास आमच्या मातोश्रींचें नांव देण्याचें कारण, त्यांचाहि देशी वैद्यकावर विश्वास होता व त्यानीं आपल्या सर्व आयुष्यात डॉक्टरचे औषध कधींहि घेतले नाहीं. तेव्हां आर्यवैद्यकाला मदत केल्याबद्दल त्याच्या आत्म्यास आनंदच वाटेल, असें मनात आल्यावरून त्याचेंच नांव देण्याचें आम्हीं ठरविले व आज येथें त्यांच्या तसबिरीचा अनावरणसमारंभ श्रीमंत सर बाळासाहेब, मिरज संस्थानचे अधिपति, यांचे हस्तें होत आहे हें पाहून आम्हास किती आनंद वाटत आहे हें शब्दानीं व्यक्त करून दाखवितां येत नाहीं.

चित्रांक १४०




अखिल भारतीय अर्वाचीन इतिहास परिषद, पुणें. श्रीमंत राजेसाहेब या परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. परिषदेचें उद्घाटन लॉर्ड ब्रेबोर्न, गव्हर्नरसाहेब मुंबई, यांचे हस्तें झालें.

[ सं. पा. ७७५

श्री. सर बाळासाहेब यांची आयुर्वेदीय औषधपद्धतीवर अतिशय भक्ति आहे व त्यामुळें आलेला हा योग श्रेयस्कर आहे असेंच आम्हांस वाटतें.

येथें हें सांगण्याची परवानगी घेतों कीं, संस्थानावर हल्लींच्या परिस्थिती-मध्यें प्रस्तुतच्या देणगीचा बोजा पडूं नये म्हणून ही सर्व रक्कम मीं खाजगींतून देण्याचें योजिलें आहे.

सद्गृहस्थहो, सरते शेवटीं आज येथें आपणांस धर्मार्थ आयुर्वेदीय हॉस्पिटलची जी ही सुंदर व भव्य इमारत दिसत आहे ती रा. ब. शेट हणमंतराम रामनाथ यांच्या उदार देणगीचें व अविरत परिश्रमाचें फळ आहे हें मला फिरून सांगणें अवश्य वाटतें. ही त्याची देणगी नसती तर ही संस्था अस्तित्वात आली असती कीं नाहीं याबद्दल शंकाच वाटते. शेट रा. ब. हणमंतराम रामनाथ यांचे मी अंतःकरणपूर्वक आभार मानतों. त्याचप्रमाणें या संस्थेस जे डॉक्टर, वैद्य व इतर गृहस्थ निःस्वार्थबुद्धीनें मदत करीत आहेत त्यांचेहि आभार मानणें हें माझें कर्तव्य आहे. ही संस्था आपल्या महाराष्ट्रांत नमुनेदार होऊन सर्व देशास आदर्शभूत होवो, अशी परमेश्वरा-जवळ प्रार्थना करून मी आपलें भाषण पुरें करतों. ''

श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण झाल्यावर रुग्णालयाचे विश्वस्तमंडळा-पैकीं श्री. रा. न. चिं. केळकर यांनीं थोडें भाषण केलें. त्यांत कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांच्या अंगच्या सत्यप्रियता, धार्मिकपणा, श्रद्धाळुपणा इत्यादि थोर गुणांचें वर्णन करून, तसेंच त्यांनीं केलेलीं धार्मिक कृत्यें व व्रतवैकल्यें यांचा गौरवपूर्वक उल्लेख करून व अशा थोर पुण्यशील स्त्रीच्या तैलचित्राचें अनावरण करण्याची संधि प्राप्त झाली ही संस्थेस अत्यंत भूषणास्पद गोष्ट आहे असें सांगून, त्यांच्या तैलचित्राचें अनावरण करण्याची समारंभाचे अध्यक्ष श्रीमंत सर बाळासाहेब पटवर्धन, अधिपति संस्थान मिरज सीनियर, यांना विनंति केली. श्रीमंत बाळासाहेब यानीं तैलचित्राचें अनावरण करून भाषण केलें, त्यांत श्रीमंत राजेसाहेबांच्या मातुश्रींसारख्या थोर व धार्मिक स्त्रीच्या तैलचित्राचें अनावरण करण्याचा मान आपणास प्राप्त करून दिल्याबद्दल संस्थेच्या चालकांचे अंतःकरणपूर्वक आभार मानले व या थोर स्त्रीला आपण आपल्या

मातोश्रीसमान समजत असून त्याचेविषयीं अत्यंत आदर व प्रेम वाटत आहे, असें त्यानीं सांगितले.

संस्थेतर्फे रा. ब. शेट हणमंतराम यानीं सर्वांचे आभार मानल्यावर हा आनंदकारक समारंभ समाप्त झाला.

## सर परशुरामभाऊ कॉलेजच्या सभागृहाची कोणशिला-स्थापना

पुणें येथील शिक्षणप्रसारक मंडळीच्या सर परशुरामभाऊ कॉलेजमध्ये नवीन सभागृह बांधण्याचें काम सुरू करण्याचें ठरवून त्याची कोणशिला बसविण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबाना विनंति केली. त्या विनंतीस मान्यता देऊन सदर समारंभ ता. १० माहे डिसेंबर १९३२ इ. रोजीं श्रीमंत राजेसाहेब यानीं केला. प्रथमतः कॉलेजचे प्रिन्सिपॉल व्ही. जी. आपटे यांनीं स्वागतपर भाषण केले. नंतर सेक्रेटरींनीं संस्थेचा अहवाल वाचून दाखवून सभागृहाची उपयुक्तता निवेदन केली व श्रीमंत राजेसाहेबांना कोणशिला बसविण्याची विनंति केली. श्रीमंत राजेसाहेबांनीं संस्थेच्या शिक्षणविषयक कामगिरीचा गौरवपर उल्लेख करून तद्विषयक आणखी हातीं घेतलेल्या संस्थेच्या कार्यांत यश येऊन उत्तरोत्तर भरभराट होवो अशी आशा व्यक्त केली व कोणशिला बसविल्याचें जाहीर केलें.

पुढें पुणें येथील परशुरामभाऊ कॉलेजचें १६ वे संमेलन ता. २३ सप्टेंबर १९३४ इ. रोजी मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हाइस-चॅन्सेलर बॅरिस्टर विठ्ठल नारायण चंदावरकर याच्या अध्यक्षतेखालीं झालें. या संमेलनास श्रीमंत राजे-साहेब हजर राहिले होते. या वेळीं बॅरिस्टर चंदावरकर याचे हस्ते नुकत्याच बाधलेल्या असेंब्ली हॉलचा उद्‌घाटनसमारंभ झाला. त्या हॉलकरिता श्रीमंत राजेसाहेब यानीं रु. २००० देणगी दिली असल्याबद्दल त्यानी आपल्या अध्यक्षीय भाषणात जाहीर केलें.

## नेक नामदार सर फ्रेडरिक साइक्स यांना चहापार्टी

मुंबईचे गव्हर्नर नेक नामदार सर फ्रेडरिक साइक्स याची मुदत संपल्या-मुळें ते लवकरच विलायतेस परत जावयाचे होते. त्यापूर्वीं श्रीमंत राजेसाहेबानीं त्यांना व लेडी साइक्स याना पुणें येथील लक्ष्मीविलास बंगल्यांत निरोपाची चहापार्टी ता. १९ जुलै १९३३ रोजीं दिली. या पार्टीस मुंबई सरकारचे

एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे मेंबर्स, सेक्रेटरी, दिवाण, मध्यभाग कमिशनर, पुण्याचे कलेक्टर वगैरे मंडळी आली होती.

श्रीमंतानीं एक छोटेंसें भाषण करून नेक नामदार व लेडी साइक्स याचे स्वागत केलें. नेक नामदार यांनीं वरील भाषणास आभारदर्शक उत्तर दिलें.

## पुणें येथील देशस्थ ऋग्वेदी शिक्षणोत्तेजक संस्थेस भेट

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण-शिक्षणोत्तेजक संस्था, पुणें, या संस्थेच्या संचालकानीं श्रीमंत राजेसाहेब याना संस्थेस भेट देऊन कै. रा. सावळारामपंत पानसे याच्या तसबिरीचें अनावरण करावें अशी विनंति केल्यावरून श्रीमंत राजेसाहेब यांनीं ता. २१ माहे मार्च १९३४ इ. रोजीं संस्थेस भेट दिली. प्रथम संस्थेचे अध्यक्ष श्रीमंत सरदार बाळासाहेब पुरंदरे यानीं स्वागतपर भाषण केलें. रा. वि. के. खासनिस, चिटणीस, यांनीं संस्थेचा अहवाल वाचून दाखविल्यावर श्री. विठ्ठल मोरेश्वर कुलकर्णी यानीं कै. पानसे याच्यासंबंधीं थोडक्यांत हकीकत सांगून तसबिरीचे अनावरण करण्याबद्दल श्री. राजेसाहेबांना विनंति केली. श्रीमंत राजेसाहेबानीं समयोचित भाषण करून तसबिरीचें अनावरण केलें व संस्थेच्या कार्यास मदत म्हणून रु. २००० ची देणगी दिल्याचें जाहीर केले. ही रक्कम श्रीमंतानीं आपल्या खासगी खर्चांतून दिली.

## देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणपरिषद, सातारा

सातारा येथें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणोत्तेजक संस्थेची तिसरी परिषद ता. २५-५-१९३५ रोजीं श्रीमंत राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं झाली. परिषदेच्या सुरुवातीस स्वागताध्यक्ष श्रीमंत सरदार बाबासाहेब पंडितराव यांचें भाषण झालें. त्यांचे भाषणांतील महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे. ते म्हणाले:

“ मराठी साम्राज्याच्या राजधानीचें वैभव एके काळी प्राप्त झालेल्या या आमच्या इतिहासप्रसिद्ध सातारा शहरात या परिषदेचें तिसरें अधिवेशन भरविण्याचा सुयोग प्राप्त झाला, याबद्दल आम्हांस खरोखर अतिशय आनंद व उत्साह वाटत आहे; आणि त्यांतले त्यांत या अधिवेशनास, इतिहासांत स्वपराक्रमानें नाव कमाविलेल्या कै. परमपूज्य शंकराजी नारायण पंतसचिव यांच्या घराण्यांतील हल्लींचे सुविद्य, सुस्वभावी व कर्तबगार असे श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव यांची अध्यक्षस्थानीं योजना झाली असल्यामुळे आजचा

सुयोग अपूर्व व दुधांत साखर पडल्यासारखा झाला आहे. छत्रपति संभाजीनंतर मराठी साम्राज्यावर मोठा आणीबाणीचा प्रसंग गुदरला असतां तन्निमित्त झालेल्या स्वातंत्र्ययुद्धांत पंतसचिव घराण्यांतील पूर्वज व मूळपुरुष श्री. शंकराजी नारायण यांनीं विशेष मर्दुमकी गाजविली व मोठा पराक्रम गाजवून मराठ्यांचें स्वातंत्र्य कायम टिकविले. त्या वेळीं त्यांनीं अतुल आत्मयज्ञ केला ही गोष्ट महाराष्ट्रीय केव्हांहि विसरणार नाहींत. अशा थोर घराण्यांतील आजचे आपले अध्यक्ष श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव हे असून त्यांनीं आपल्या कर्तबगारीनें, प्रेमळ व उदार स्वभावानें आपल्या घराण्याच्या नांवलौकिकांत भर घातली आहे. पूर्वीचे जाचक व विषमतादर्शक कर रद्द केले आहेत. त्यांनीं प्रजेच्या हिताकडे आपलेपणानें लक्ष पुरविलें आहे. संस्थानांत कायदेमंडळाची स्थापना करून प्रजेच्या प्रतिनिधींना संस्थानच्या राज्यकारभारांत भाग घेण्याची संधि दिली आहे. स्वतःच्या संस्थानात व इतर खालसांतीलहि निरनिराळ्या लोकहिताच्या संस्थांना त्यांनीं सढळ हातानें मदत केली आहे. जनतेच्या कल्याणासाठीं झटणारे, सुस्वभावी व कर्तव्यरत भोर संस्थानाधिपती आमच्या संस्थेच्या अधिवेशनास आज अध्यक्ष लाभले आहेत हें खरोखरच परिषदेचें भाग्य आहे यांत शंका नाहीं."

नंतर त्यांनीं संस्थेनें हातीं घेतलेल्या कार्याची उपयुक्तता सांगून श्रीमंत राजेसाहेब यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें म्हणून विनंति केली. अध्यक्ष-स्थान स्वीकारून श्रीमंत राजेसाहेब यांनीं पुढील महत्त्वाचें भाषण केलें व संस्थेस रु. ५०० व विद्यार्थ्यांकरितां बांधण्यांत येणाऱ्या वसतिगृहास रु. ५०० मिळून १००० रुपयांची देणगी दिली.

## श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव यांनीं केलेलें भाषण

"स्वागताध्यक्ष, श्रीमंत सरदार पंडितराव, इतर ठिकाणचे संस्थांचे प्रतिनिधी,
सन्मान्य सभासद, व सभ्य स्त्री-पुरुषहो,

सातारा प्रांतीय देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण संस्थेच्या विद्यमानें भरणाऱ्या आपल्या समाजाच्या या तृतीय परिषदेच्या अधिवेशनप्रसंगीं अध्यक्षस्थानीं आमची निवड करून आपण जो आमचा बहुमान केलात, त्याबद्दल आपले आभार मानणें आमचें आद्य कर्तव्य आहे व तें आम्ही प्रथम करीत आहोंत.

या सन्मानाबरोबरच एकंदर समाजाच्या कार्याची धुरा वाहण्याची जी जबाबदारी आमच्यावर आपण आज सोंपविली आहे ती फार जड आहे याची जाणीव आम्हांस पूर्ण आहे व म्हणूनच आमची प्रकृति सुदृढ नसल्यामुळें आम्ही ही जोखीम पत्करण्यास प्रथम आनमान करीत होतों. परंतु श्रीमंत सरदार पंडितराव यांनीं आग्रह केल्यामुळे, व मुख्यतः ज्या आत्मीयतेच्या, सहानुभूतीच्या व प्रेमाच्या आधारावर आपण हें कार्य आम्हास सांगितलें आहे त्या आपल्या सद्भावनेच्या व सहकार्याच्या विश्वासावरच आम्हीं हें समाजसेवेचें कार्य मोठ्या आनंदानें पत्करिलें आहे, हें आपणास विदित केले पाहिजे असें नाहीं. शिवाय या कार्याच्या निमित्तानें थोडा वेळ का असेना, पण आपल्याबरोबर एकत्र बोलण्या-बसण्याची सुसंधि मिळणार असल्यानें, आम्हीं आपल्या विनंतीस मोठ्या संतोषानें अनुमति दिली व त्याप्रमाणें आज आपणा सर्वांस येथें जमल्याचें पाहून आम्हास फार समाधान होत आहे.

या संस्थेचे उद्देश फार उच्च दर्जाचे आहेत हे पाहून आम्हास फार संतोष वाटत आहे. या संस्थेचे नाव ऐकून प्रथम कोणालाहि वाटेल कीं, या संस्थेचे उद्देश स्वार्थी व इतर समाजाशीं दुजाभाव उत्पन्न करणारे आहेत; परंतु असा प्रकार मुळींच नाहीं. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचें संघटन करणें, त्याची सर्व मार्गांनी–म्हणजे शैक्षणिक, औद्योगिक, आर्थिक वगैरे सर्व प्रकारानीं–उन्नति होईल अशी खटपट करणे, समाजातील इतर पोटशाखाबरोबर सहकार्य करून अखिल ब्राह्मण समाजाचें एकीकरण करणें, एवढेंच केवळ नव्हे तर सर्व हिंदु समाजाची सहानुभूति मिळवून सर्वांची उन्नति करणें इत्यादि उद्देश उच्च आहेत असे कोण म्हणणार नाहीं ? आपल्या ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण मंडळींची स्थिति दिवसेदिवस फार हलाखीची होत आहे. देशस्थ ब्राह्मण मंडळींनाच केवळ नव्हे, तर सर्वच ब्राह्मणाना हल्लींचे दिवस फार कठिण आले आहेत. त्याची सर्वतोपरि कुचंबणा होत आहे. तरी या सर्व आपत्तींतून व अडचणींतून आपल्याला मार्ग काढावयाचा आहे.

आपल्या समाजात आजपर्यंत अनेक साधुसंत, कवी, विद्वान, शास्त्री, मुत्सद्दी, सेनापती असे कर्तृत्ववान् पुरुष होऊन गेले आहेत व आजहि राष्ट्रकार्यास वाहून घेतलेले, तसेंच शिक्षण, इतिहास, धर्मशास्त्र, यंत्रशास्त्र वगैरे

अनेक विषयात पारंगतता मिळविलेले पुष्कळ सन्मान्य गृहस्थ आहेत. यावरून आपला समाज निर्बुद्ध, आळशी अथवा कूपमंडूक वृत्तीचा आहे वगैरे जे दोषारोप आपल्या समाजावर करण्यात येतात, ते किती निरर्थक आहेत हें आम्ही सांगावयास पाहिजे असे नाहीं व जे दोष असतील ते घालविण्याचा आपल्याला प्रयत्नहि केला पाहिजे. कोणत्याहि समाजाची सुधारणा करणें म्हणजे त्याचा मूळ पाया सुधारला पाहिजे. नवी पिढी म्हणजे विद्यार्थिवर्ग याना आपण चागले वळण लाविले पाहिजे. हल्लीं अश्लील नाटके, सिनेमा, फराळाचीं दुकानें वगैरेंना इतका ऊत आला आहे की, या सर्व मोहापासून विद्यार्थ्यांचा बचाव करणें फार अवघड झाले आहे. तथापि त्यापासून तरुणाना अलिप्त राखण्याची आईबापानी व शिक्षकानीं फार खटपट केली पाहिजे. हल्लीं विद्यार्थिवर्गामध्ये वाडवडील व गुरुजन यांच्या संबंधानें पूज्यबुद्धि नष्ट झाली आहे व अनादर वाढत चालला आहे. याचीं कारणें शोधून काढून ही स्थिति सुधारेल असे प्रयत्न झाले पाहिजेत. विद्यार्थ्यांना कोणत्या धंद्याचें शिक्षण द्यावयाचें हा मोठा बिकट प्रश्न सर्व समाजापुढे उभा राहिला आहे. सर्व धंद्यांतील लोकाची संख्या इतकी वाढली आहे कीं, कोणालाहि पोटभर अन्न मिळत नाहीं. वकिली, वैद्यकी, एंजिनियरिंग, शिक्षण इत्यादि कोणतेंहि खातें घ्या, त्यामध्ये पुष्कळ भरती झालेली आहे. याकरिता आतां औद्योगिक शिक्षणाशिवाय दुसरा मार्गच राहिलेला दिसत नाहीं. प्रथम आपलें शारीरिक बळ वाढविलें पाहिजे. निकोप प्रकृति व चांगले शरीरसामर्थ्य असल्याशिवाय कोणत्याहि उद्योगामध्ये यश मिळावयाचें नाहीं. वृथाभिमान सोडून, अमके काम हलक्या दर्जाचें आहे, तें काम करूं लागल्यास मला कमीपणा येईल असल्या वेडगळ समजुती झुगारून दिल्या पाहिजेत. प्रसंगीं हातांत नांगर धरून शेतकाम करण्याची सुद्धा आपल्या वर्गाची तयारी झाली पाहिजे. आपल्या देशांत सर्व लहानमोठे उद्योगधंदे सुरू झाले पाहिजेत. नवीन धंदेशिक्षण घेण्याकरितां विद्यार्थ्यांना परदेशात पाठविले पाहिजे. परदेशांत जाऊन उच्च शास्त्रीय ज्ञान मिळावयाचें म्हणजे मुबलक पैसा पाहिजे. याकरितां ठिकठिकाणीं निधि जमवून हुषार विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देऊन परदेशांत पाठविलें पाहिजे. शिवाय खेडोपाडीं लहान लहान कारखाने काढून

चित्रांक १४१



ने. ना. सर लेस्ली विल्सन यांच्या भोरास झालेल्या भेटीच्या वेळीं लेडी विल्सन यांचा घेतलेला फोटो.

खुर्चीवरः—३ लेडी विल्सन; ४ श्री. सौ. राणीसाहेब; ५ कु. त्रिवेणी पुराणिक.

[ सं. पा. ७८६

विद्यार्थ्यांची सोय लावली पाहिजे. या सर्व गोष्टींस पैशाचा भरपूर पुरवठा पाहिजे. तथापि कार्य चागलें असलें तरी कार्यकर्ती माणसें सच्चीं व उत्साहपूर्ण असलीं म्हणजे पैसा आपोआप चालून येतो. हल्लीं बऱ्याच चळवळी अशा आहेत कीं, वर्षांतून एकदोन दिवस त्यांच्या सभा भरतात व नंतर सर्व प्रतिनिधी आपापल्या गांवीं परत गेले कीं इकडची आठवणहि त्यांना नाहींशी होते व सर्वजण आपापल्या पोटापाण्याच्या उद्योगात निमग्न होतात. अशी स्थिति उपयोगाची नाहीं. महिन्यातून एकदा तरी सभासदांची सभा होऊन आपण आतापर्यंत काय काय केले व काय करावयाचें राहिले आहे वगैरे पाहिले पाहिजे. तरच आपल्या हातून कांहींतरी प्रगति होईल. आमचा सागण्याचा उद्देश इतकाच कीं, उत्साहानें, कळकळीने व थोडी झीज सोसून मनापासून काम करणारे काहीं थोडेतरी पुढारी तयार झाले पाहिजेत, व त्यानीं वेळोवेळीं लोकाना जागृत करून चळवळ चालू ठेविली पाहिजे. नुसती सभासदांची संख्या मोठी असून भागत नाहीं, व आमच्यासारख्या अध्यक्षांचाहि त्या कामीं विशेष उपयोग होत नाहीं. कारण आमचीं संस्थानचींच कामें आम्हास पुरेशीं असतात.

प्रिय बंधु-भगिनींनो, आपल्या समाजाच्या ज्या दोन परिषदा यापूर्वी होऊन गेल्या, त्या त्या वेळच्या नामांकित, समताप्रिय व विद्वान् अध्यक्षानीं जो बहुमोल उपदेश केला आहे, त्यायोगें माझें आजचें काम फार हलके झालें आहे. तथापि, अध्यक्ष या नात्यानें आम्हास आपणाला चार शब्द सागितले पाहिजेत, म्हणूनच आम्ही केवळ संक्षेपतः तसे करीत आहोंत. आपल्या समाजामध्येंच नव्हे तर सर्व ब्राह्मणसमाजात पुष्कळच सुधारणा व्हावयास पाहिजे आहे. सुधारणाच्या या अनेक बाबींपैकीं काहींचा निर्देश आज आम्हीं ठोकळ मानानें करीत आहोंत. उदाहरणार्थ, ( १ ) वडिलोपार्जित जी थोडीशी जमीन असेल तीवरच निर्वाह करीत घरीं न बसतां काहीं तरी नवा उद्योगधंदा शेतीस जोड म्हणून तरी केला पाहिजे. ( २ ) मी जमीनदार आहें, श्रीमंत आहें, मला कामधंदा करण्याची जरूरी नाहीं, वगैरे वृथाभिमान सोडला पाहिजे. ( ३ ) स्त्रियामध्यें खऱ्या व संसारोपयोगी शिक्षणाचा प्रसार केला पाहिजे. ( ४ ) धर्मासंबंधानें अंधश्रद्धा, गतानुगतिकत्व आणि मानसिक दौर्बल्य

सोडून खऱ्या धर्मासंबंधीं श्रद्धा व स्वार्थत्यागबुद्धि बाळगिली पाहिजे. (५) देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे यांमध्यें परस्पर विवाह रूढ झाले पाहिजेत व हुंडा घेण्याची चाल बंद केली पाहिजे. ( ६ ) शरीर-सामर्थ्य वाढविलें पाहिजे. ( ७ ) खेडोपाडीं जाऊन तेथील लोकांची स्थिति सुधारली पाहिजे. ( ८ ) भाऊबंदकी म्हणजे जमिनीच्या लहानशा तुकड्याकरितां सर्व इस्टेट घालविण्याची घातक बुद्धि सोडली पाहिजे. ( ९ ) हरिजनाशीं सहानुभूतिपूर्वक वागले पाहिजे, तरच हिंदुसमाज घटत न जातां तो वाढून हिंदुधर्म टिकणार आहे. ( १० ) धर्मकृत्यांत अनाठायीं खर्च करण्याच्या प्रवृत्तीचा त्याग केला पाहिजे. या विविध दृष्टींनीं विचार करिता या व इतर ठिकाणीं देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण-संस्थाच्या स्थापनेपासून गेलेला अल्प काळ व कार्याचा व्याप आणि बिकटपणा लक्षात घेता सर्व संस्थेची झालेली प्रगति उपेक्षणीय आहे असें म्हणतां येणार नाहीं; किंबहुना ती अभिनंदनास पात्र आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. या कामी कोणाची किती मदत झाली आहे हें आम्हांस कळून आलें नसलें तरी आपल्या संस्थेचे अध्यक्ष श्री. सरदार पंडितराव यांनीं हें कार्य नेटानें व उमेदीनें चालविलें आहे हें पाहून व ऐकून आम्हास फार आनंद होत आहे. आपला पूर्वेतिहास उज्ज्वल आहे व तोच भविष्यकाळींहि आपल्या उन्नतीचा मार्गदर्शक व आधार असून आपली उन्नति सर्वस्वी आपल्या आत्मविश्वासावर, दृढ निश्चयावर व उद्यमप्रियतेवर अवलंबून आहे हें विसरता कामा नये. अजून होणें असलेला कार्यभाग पुष्कळच मोठा आहे. विश्रांतीचें स्थळ फार दूर आहे व थकवा वाटूं देण्यास तर मुळींच अवकाश नाहीं. तेव्हा ' प्रस्थिता दीर्घमध्वानं यूयं किमथ सीदथ । ' ह्या हितवचनाकडे सदैव अवधान देऊन कार्य चालू ठेवण्याकडे आपण प्रवृत्त असावें अशी आपणां सर्वांस आमची सस्नेह सूचना आहे. आपण याप्रमाणें करीतच आहां हें फार चांगले आहे. आपल्या या कार्यास अल्प मदत म्हणून पसंतीदाखल अथवा गुणग्रहणनिदर्शक अशी आम्ही ५०० रु. देणगी देत आहोंत. आमच्या या मदतीचा संस्था प्रेमानें स्वीकार करील अशी उमेद आहे.

श्री. सरदार पंडितराव यांचें व माझें आताच बोलणें झाले त्यावरून

चित्रांक १४२



बडोद्याच्या महाराणीसाहेब यांनीं भोरास भेट दिल्यावेळचा फोटो.

खुर्चीवर:—४ श्री. सौ. चिमणाबाई, महाराणीसाहेब बडोदें; ५ श्री. सौ. लक्ष्मीबाई, राणीसाहेब भोर; ६ श्री. सौ. माईसाहेब ( युवराज्ञि ); ७ श्री. सौ. भागिरथीबाई पुराणिक.

[ सं. पा. ७८५

येथें वसतिगृहाची विशेष जरूरी आहे, म्हणून आम्ही त्या वसतिगृहाकरितां आज शिवाय रु. ५०० देणेचें जाहीर करतों. वसतिगृह न झाल्यास सदर पैशाचा उपयोग दुसरीकडे केला तरी हरकत नाहीं.

सद्गृहस्थहो, सरते शेवटीं संस्थेच्या कार्यास वाढतें यश प्राप्त होवो अशी प्रभु श्रीरामचंद्राचे चरणीं अनन्य भावानें प्रार्थना करून व पुन्हा एकवार आपणा सर्वांचे आभार मानून आम्ही आपली आनंदानें रजा घेतों."

परिषदेस आलेले संदेश रा. खासनीस यानीं वाचून दाखविल्यानंतर अध्यक्षानीं मांडलेले महत्त्वाचे ठराव पास करण्यांत आले. सातारा येथील श्री. राजोपाध्ये वकील यांनी अध्यक्षाचे आभार मानल्यावर वरील परिषद समाप्त झाली.

## पुणें महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचा हीरक-महोत्सव

पुणें महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद सरदार बाबासाहेब मुजुमदार, रा. माळशे, रा. बापट व रा. मोडक यानीं श्रीमंत राजेसाहेब यांना या संस्थेच्या हीरक-महोत्सवसमारंभाचे वेळीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल विनंति केली. त्या विनंतीस मान देऊन ता. २ मार्च १९३५ इ. रोजीं वरील समारंभ साजरा करण्यात आला, त्या वेळीं श्रीमंतानीं अध्यक्षस्थान स्वीकारलें. प्रारंभीं संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष दिवाणबहादुर के. आर. गोडबोले यांनीं संस्थेच्या सुरुवातीपासूनचा इतिहास सागून श्रीमंत राजेसाहेब याना अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी विनंति केली. त्या सूचनेस श्रीमंत सरदार बापूसाहेब काळे यांनीं अनुमोदन दिलें. श्रीमंत अध्यक्षस्थानीं विराजमान झाल्यावर संस्थेनें साठ वर्षांत केलेल्या कामगिरीचा अहवाल वाचून दाखविण्यांत आला व या समारंभाची भेट म्हणून स्मारकग्रंथाची एक प्रत श्रीमंत राजेसाहेबाना अर्पण करण्यात आली. श्रीमंतांनीं नंतर अध्यक्षीय भाषण केले. तें परिशिष्ट १३ मध्यें दिलें आहे. संस्थेच्या काहीं माजी विद्यार्थ्यांचीं भाषणें झाल्यावर मि. एच्. जी. घारपुरे, ( रिटायर्ड ) आय. सी. एस्., कार्यकारी मंडळाचे एक सभासद यानीं अध्यक्षांचे आभार मानल्यावर हा समारंभ संपला.

## अखिल हिंदुस्थान अर्वाचीन इतिहास-परिषद

पुणें येथील भारत इतिहास संशोधन मंडळाच्या विद्यमानें मंडळाच्या रौप्य ज्युबिली महोत्सवानिमित्त मंडळाचे संचालकानीं डॉ. सर शफत अहमद खान यांचे

अध्यक्षतेखालीं अखिल-भारतीय अर्वाचीन इतिहास परिषदेचें प्रथम अधिवेशन १९३५ च्या जून महिन्याचे ८ ते १० तारखांस सर परशुरामभाऊ कॉलेजचे इमारतींत भरविलें. श्रीमंत राजेसाहेब यांनीं परिषदेच्या स्वागतमंडळाचें अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें.

ता. ८ रोजीं मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर नेक नामदार लॉर्ड ब्रेबोर्न यांनीं परिषदेचें उद्घाटन केलें. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वागतपर भाषण केलें, तें परिशिष्ट १४ त दिलें आहे.

त्यानंतर लॉर्ड ब्रेबोर्न यानीं भाषण केले. त्यात त्यानीं प्रथमतः श्रीमंताना नुकत्याच मिळालेल्या ' राजा ' या किताबाबद्दल श्रीमंत राजेसाहेब यांचें अभिनंदन केलें; व परिषदेस सुरुवात करून दिली. डॉ. सर शफत यांचें अध्यक्षीय भाषण झालें. परिषदेनिमित्त ऐतिहासिक वस्तूंचें एक प्रदर्शन टिळक स्मारक-मंदिरामध्यें भरविण्यात आलें होतें. त्यांत भोर संस्थानचे वस्तुसंग्रहाचा एक स्वतंत्र विभाग तयार करण्यांत आला होता. प्रदर्शनाबद्दल वर्तमानपत्रांतून प्रशंसापर लेख आले, त्यांपैकीं ज्ञानप्रकाशमधील उतारा 'भोर वस्तुसंग्रहालय' या सदरात देण्यात आला आहे. त्याच दिवशीं तिसरे प्रहरीं परिषदेच्या निरनिराळ्या ठिकाणच्या सुमारें ३०० प्रतिनिधींना राजेसाहेबांनीं एक ' ॲट होम ' दिली. परिषदेच्या शेवटीं परिषदेचे अध्यक्ष डॉ. सर शफत, प्रो. भूयान, आसामतर्फे आलेले एक प्रतिनिधि, व बंगालमधील डॉ. सेन यानीं आपल्या भाषणात श्रीमंत राजेसाहेब यांनीं परिषदेच्या कार्यक्रमात विशेष उत्सुकतेनें भाग घेतल्याबद्दल त्यांचे आभार मानले.

डॉ. सेन आपल्या भाषणांत म्हणाले कीं, "' राजा ' अगर 'महाराजा ' या पदव्या धारण करणारे अनेक संस्थानाधिपति आपणाला हिंदुस्थानांत सांपडतील. परंतु ' पंतसचिव ' ही पदवी धारण करणारे भोर संस्थानचे अधिपती श्रीमंत राजेसाहेब हे एकच आहेत. पंतसचिव ही ऐतिहासिक महत्त्वाची अर्थपूर्ण पदवी वंशपरंपरेची असून ती त्यांचे पूर्वजापासून चालत आलेली असल्यानें 'पंतसचिव' या पदवीस मी विशेष महत्त्व देतों." दोघांनींहि आपल्या भाषणात पंतसचिव घराण्याचे आद्य संस्थापक श्रीशंकराजी नारायण यांनीं मराठी राज्य स्थापन करण्याचे कामीं केलेल्या कामगिरीचा गौरवपूर्ण उल्लेख केला.

चित्रांक १४३



श्रीमंत युवराज भाऊसाहेब यांच्या द्वितीय विवाहास आलेल्या पाहुणेमंडळींचा फोटो. (सन १९२४)

[ सं. पा. ७९५

चित्रांक १४४



श्री. रा. कु. बापूसाहब; श्री. रा. कु. रावसाहब आणि श्री. रा. कु. पद्मावतीराजे घोड्यावर बसण्यास शिकत असतांना.

[ सं. पा. ७८३

## पुणें महाराष्ट्रीय मंडळाचा बुधवार-शाखेचा उद्‌घाटनसमारंभ

पुणें महाराष्ट्रीय मंडळ ( व्यायाम-शिक्षण-संस्था ) या संस्थेची शाखा बुधवार पेठेत उघडण्यांत आली. तो समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांचे हस्तें पुणें येथील बुधवार पेठेंतील नूतन मराठी विद्यालयाचे मराठी शाळेंत ता. २८ फेब्रुवारी १९३६ रोजीं करण्यांत आला. विद्यालयाचे प्रवेशद्वारात श्रीमंत राजेसाहेब यांचे, संस्थेचे सेक्रेटरी रा. एस्. व्ही. दामले व डॉ. जेजुरीकर यानीं स्वागत केले. डॉ. कुलकर्णी यानीं परस्थाचे आलेले शुभ संदेश वाचून दाखविल्यानंतर संस्थेंतील मुलांमुलींनीं व्यायामविषयक निरनिराळे खेळ करून दाखविले. संस्थेचे अध्यक्ष श्रीयुत ल. ब. ऊर्फ अण्णासाहेब भोपटकर यानीं भाषण केलें. ते म्हणाले:—

"As already stated above, it is one of our aims and objects to carry on propaganda for the spread of the physical education both inside and outside Poona, and it is a part of the same that the Mandal has started its branch here, for the opening ceremony of which we have assembled here. The Mandal has been exceptionally fortunate in securing a worthy person for that purpose. Shrimant Raja Raghunathrao Shankarrao Pandit Pant Sachiv, Raja Saheb of Bhor, is well-known throughout the Presidency, not only for his keen love for physical culture, but also for his sporting qualities, and the Mandal could not have secured a better sportsman than him to perform to-day's function. With these remarks I request him to take the chair on this occasion and to perform the opening ceremony of this branch of the Mandal."

त्यावर श्रीमंत राजेसाहेब यांनीं उत्तरादाखल भाषण करून संस्थेस रु. ५०० देणगी देण्याचें जाहीर केले. वरील देणगीबद्दल व समारंभाचे अध्यक्ष-स्थान स्वीकारल्याबद्दल श्रीयुत तात्यासाहेब केळकर यानीं श्रीमंताचे आभार मानल्यानंतर हा समारंभ समाप्त झाला.

## श्रीमंत राजेसाहेब औंध यांना विलायतेस जाण्यापूर्वी निरोप

औंध संस्थानचे राजे श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि १९३६ मध्यें विलायतेच्या सफरीवर गेले. जाण्यापूर्वी श्रीमंत राजेसाहेबांनीं श्रीमंत बाळासाहेब

व त्यांची नात राजकुमारी श्रीमंत अक्कासाहेब पंत यांना मुंबई येथें सरदारगृहांत ता. १३ मार्च रोजीं रात्रीं ८ वाजतां डिनर-पार्टी दिली. भोजनोत्तर हारतुरे, पानसुपारी वगैरे झाल्यावर श्रीमंत राजेसाहेब यांनी समयानुरूप भाषण केलें. त्यांत श्रीमंत बाळासाहेब यांचे डिनर-पार्टीचा स्वीकार केल्याबद्दल आभार मानून त्याना मिळालेल्या ‘ राजा ’ या पदवीबद्दल अभिनंदन केलें; व विलायतची सफर काढण्यांत हिंदी चित्रकला, तत्त्वज्ञान आणि सूर्यनमस्कार व्यायामपद्धति याचा पाश्चिमात्याना परिचय करून देण्याचा सद्धेतु सफल होवो व प्रवास सुखकर होवो अशी आशा प्रगट केली. त्यावर श्रीमंत बाळासाहेब यांनीं पुढील भाषण करून श्रीमंत राजेसाहेब याचे आभार मानले.

## औंधच्या राजेसाहेबांचें भाषण

" Shrimant Sarkar,

It gives me pleasure to recall to my mind the friendly relations that subsist between the two houses of Pant Sachiv of Bhor and the Pant Pratinidhi of Aundh (prominent in the ministry of the Mahratta Empire) for the last two centuries and a half and it is on that very account that I value most the affectionate send-off that is being given to me by the Raja Saheb of Bhor, for which I am greatly thankful to him. The exercise of Surya Namaskara is not a new idea. It includes the ten Yogasanas (postures of body mentioned in the ancient yoga system of Physical culture). By my long experience, I am convinced that this method of Physical culture has shown its efficacy in the complete removal in an easy way of many incurable diseases. My book dealing with this question has been translated in many Indian languages and has helped to render its spread far and wide. This brings me to the conclusion that it will meet a favourable acceptance from the people in Europe as has been the case in our own country. "

ता. १४ रोजीं श्रीमंत बाळासाहेब व त्यांची नात श्रीमंत अक्कासाहेब याना निरोप देण्याकरितां श्रीमंत राजेसाहेब बॅलार्ड पिअरवर गेले होते.

चित्रांक १४५



श्री. रा. कु. रावसाहेब व श्री. रा. कु. बापूसाहेब स्काउटचे पोषाखांत.

## ले.-क. के. ए. जी. इव्हॅन्स-गॉर्डन, यांचा पुणें येथें सत्कार

कोल्हापूर येथील दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेन्ट ले.-क. के. ए. जी. इव्हॅन्स-गॉर्डन हे ऑक्टोबर १९३७ मध्यें सहा महिन्यांच्या रजेवर गेले. रजेवर जाण्यापूर्वी त्यांचा पुणें येथें २ दिवस मुक्काम होता. ता. १६ रोजीं मे. रेसिडेन्टसाहेब हे मिसेस व मिस गॉर्डन यांचेसह सायंकाळीं ६ वाजता कोल्हापुराहून पुण्यास आले. त्यांचें श्रीमंत राजेसाहेब यानीं स्वागत केलें. पुणें येथील कोरेगाव पार्क बंगला नं. २७ मध्यें ते उतरले होते. ता. १७ रोजीं रात्रीं श्रीमंत राजेसाहेब यानीं मे. रेसिडेन्टसाहेब यांना पुणें येथील टर्फ क्लबहाउसमध्यें मेजवानी दिली. या मेजवानीस मुंबई सरकारचे रेव्हिन्यू सेक्रेटरी मि. इ. डब्ल्यू. पेरी आणि मिसेस पेरी, पुण्याचे कलेक्टर मि. इ. डब्ल्यू. टॉटमन, कमिशनर मि. जे. डब्ल्यू. स्माइथ व मिसेस स्माइथ इत्यादींना बोलविलें होतें. याखेरीज श्रीमंताचे स्नेही श्री. रा. कोंडो महादेव कुमठेकर, हल्लींचे दिवाण, श्रीमंत युवराज भाऊसाहेब व संस्थानचे कांहीं ऑफिसर हेहि या पार्टीस हजर होते.

दुसरे दिवशीं सकाळीं साहेबबहादुरांच्या स्वाऱ्या नाशिककडे रवाना झाल्या. जाण्यापूर्वीं श्रीमंत राजेसाहेबांनीं त्याना लक्ष्मीविलास बंगल्यात पानसुपारी, हारतुरे अर्पण करून निरोप दिला.

## पुणें येथील अनाथपंगू-गृहाचा ७५ वा वाढदिवस-समारंभ

पुणें येथें गरीब, लुळे, पांगळे, अनाथ अशा लोकास कायमचा आश्रय मिळावा व त्याचें आयुष्य सुखमय करावे या सद्हेतूनें स्थापन करण्यात आलेल्या ( David Sassoon Infirm Asylum ) पुणें अनाथपंगू-गृह या संस्थेस १९३७ सालीं पंचाहत्तर वर्षें पूर्ण झालीं. थोर, उदार धनिकाच्या दातृत्वामुळें व समाजकार्यकर्त्यांच्या परिश्रमांमुळें ही संस्था अव्याहत सुमारें पाऊण शतका-इतक्या दीर्घकालपावेतों चालत आली आहे. या संस्थेचा ७५ वा वाढदिवस अनाथपंगू-गृहाच्या कार्यकारी समितीनें ता. १९ डिसेंबर १९३७ रोजीं साजरा केला. या समारंभाचें अध्यक्षस्थान श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वीकारले होतें. पुण्याचे कलेक्टर मि. इ. डब्ल्यू. टॉटमन यानीं संस्थेचे अध्यक्ष या नात्यानें श्रीमंतांचें स्वागत केलें. त्या वेळीं प्रथम स्वागतपर पद्यें झाल्यावर

संस्थेचे उपाध्यक्ष श्री. के. एस्. जठार यांनीं स्वागतपर भाषण केलें. नंतर संस्थेचे चिटणीस डॉ. नातू यांनीं ७५ वर्षांतील प्रगतीचा अहवाल वाचून दाखविला आणि संस्थेचे सह-चिटणीस रा. ब. चिमणलाल किसनलाल यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना संस्थेचे माजी उपाध्यक्ष कै. दि. ब. गोडबोले यांच्या तैलचित्राचें अनावरण करण्याचो व गृहांतील लोकांना कपडे वांटण्याची विनंति केली. त्या विनंतीस अनुसरून श्रीमंत राजेसाहेबांनीं तैलचित्राचें अनावरण केलें आणि अनाथपंगूंना कपडे वांटल्यावर भाषण करून रु.५०० देणगी दिल्याचें जाहीर केले. श्रीमंताचें भाषण झाल्यावर श्री. सरदार दादासाहेब नातू व रा. ब. व्ही. एल. ठुबे यांचीं आभारप्रदर्शक भाषणें झाल्यावर समारंभ समाप्त झाला.

रुपये ५०० ची प्रॉमिसरी नोट खरेदी करून तिचा संस्थेच्या कायम निधींत समावेश करण्यात यावा, असें संस्थेच्या चालकाना कळविण्यात आले आहे. ही संस्था पुणें येथें सुरू झाली त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांचे आजे कै. श्री. नानासाहेब यांनीं संस्थेस दिलेल्या बहुमोल देणगीबद्दल त्यांचें तैलचित्र संस्थेंत लावण्याचें संस्थेच्या चालकानीं ठरविलें आहे. त्यांनीं विनंती केल्यावरून कै. नानासाहेबांचें तैलचित्र तयार करून देण्याचें श्रीमंत राजेसाहेब यानीं कबूल केले आहे.

## सातारा येथील संस्कृत विद्यालयाचा उद्‌घाटनसमारंभ

सातारा येथें संस्कृत शिक्षणाची स्वतंत्र अशी सोय नव्हती. शाळांतून प्रवेशपरीक्षेकरिता विद्यार्थ्यांना संस्कृत विषयाचें काय शिक्षण मिळत असे तेवढेंच. तें शिक्षण अपुरें असल्यानें संस्कृत वाङ्मयांतील काव्य, शास्त्र, वेदान्त, साहित्य इत्यादि शास्त्रांच्या आस्वादाशीं, वेदकालीन व पौराणिककालीन आर्यांच्या संस्कृतीशीं ते पूर्ण अपरिचित राहतात. वेदकालीन संस्कृतींत आर्यांचें वैशिष्ट्य आहे. तेव्हां अशा अत्यंत महत्त्वाच्या संस्कृत शिक्षणाकडे दुर्लक्ष होणें चागलें नाहीं. असा दूरदृष्टीचा विचार करून तो सातारा येथील जनतेपुढें तेथील रहिवाशी व अध्यापनाचा व्यवसाय करणारे वे. शा. सं. माणेश्वरशास्त्री गोकर्ण-कर या विद्वान् गृहस्थानें मांडला व त्याकरिता एखाद्या संस्कृत विद्यालयाची आवश्यकता असल्याचें त्याच्या मनावर ठसविलें. अशा प्रकारचें संस्कृत शिक्षण देणाऱ्या विद्यालयाची योजना शास्त्रीबोवांनीं जनतेपुढें ठेविली व जनतेची सक्रिय

चित्रांक १४६



रा. कु. बापूसाहेब यू. टी. सी.चे शिक्षण घेत असतांना.

चित्रांक १४८




सर लेस्ली विल्सन व लेडी विल्सन यांची पुणें सेवासदनला भेट; त्यांना श्रीमंत राजेसाहेब व श्री. सौ. राणीसाहेब निरोप देत आहेत.

१ श्री. राजेसाहेब; २ सर लेस्ली विल्सन; ३ श्री. सौ. राणीसाहेब; ४ लेडी विल्सन; ५ गो. कृ. देवधर.

सहानुभूति लाभल्यास आपण संस्थेचें नेतृत्व स्वीकारूं असें सांगितलें. संस्कृत भाषेच्या शिक्षणाचें पुनरुज्जीवन करण्याचा स्तुत्य हेतु लक्षात घेऊन साताऱ्या सुशिक्षित नागरिकांनीं सर्व प्रकारे साहाय्य करण्याचें कबूल केले. तेव्हा शास्त्रीबोवानीं विद्यालयाची योजना निश्चित करून श्रीमंत राजेसाहेबाना या विद्यालयाचें उद्‌घाटन करण्याची विनंति केली. श्रीमंताना संस्कृत वाङ्मयाची प्रथमपासून आवड आहे. संस्कृत शिक्षणाची सर्वत्र वाढ व्हावी अशी त्यांची मनापासून इच्छा आहे. संस्कृत शिक्षणासारख्या लोकोपयोगी कार्यास साहाय्य करून लोकसेवा करण्याची आलेली संधि दवडणे त्याना अशक्य होतें. शास्त्रीबोवाच्या विनंतीस मान देऊन विद्यालयाचे उद्‌घाटन करण्याची तारीख मुक्रर करण्यांत आली. सदरहू समारंभ सातारा येथें श्रीमंताच्या हस्तें ता. २३ जुलै सन १९३८ रोजी दुपारी ३ वाजता झाला. प्रथमतः स्वागतपर पद्यगायन झाल्यावर श्री. रा. कृष्णाजी शंकर दीक्षित, रि. डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर, यानीं स्वागताचे भाषण करून श्रीमंताना समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति केली. त्याच्या विनंतीस अनुसरून श्रीमंत अध्यक्षस्थानीं विराजमान झाल्यावर त्याना पुष्पहार समर्पण करण्यात आला. वे. शा. सं. गोकर्णकरशास्त्री यानीं संस्कृत विद्यालयाची योजना, शिक्षणक्रम, ध्येय वगैरे सविस्तर हकीकत सांगितली. समारंभाकरिता मुद्दाम उपस्थित झालेले पंडित रंगाचार्य रड्डीशास्त्री यानीं संस्कृत शिक्षणाचें महत्त्व व त्यापासून होणारे फायदे याचे विवेचन करून विद्यालयाचें उद्‌घाटन करण्याची श्रीमंताना विनंति केली. नंतर श्रीमंतानीं आपले अध्यक्षीय भाषण करून, या स्तुत्य उपक्रमाबद्दल चालकाचा गौरव करून, आपणास उद्‌घाटन करण्याची संधि दिल्याबद्दल त्यांचे आभार मानून विद्यालय उघडल्याचें जाहीर केलें व त्या कार्यास मदत म्हणून रु. ३०० ची देणगी जाहीर केली. श्रीमंताचें भाषण परिशिष्ट १५ त दिले आहे. नंतर श्री. रा. भाऊसाहेब सोमण यानीं श्रीमंतांचे आभार मानल्यावर पानसुपारी वांटण्यात येऊन समारंभ आटोपला. दुसरे दिवशीं श्रीमंत राजेसाहेब साताऱ्याहून परत आले.

---